कवीन्द्र परमानन्दपुत्र देवदत्त व पौत्र गोविन्द कृत

# परमानन्दकाव्यम्

## अनुपुराण

मराठी अनुवादासह

## छ. संभाजी महाराज चरित्र-साधन


संपादक – डॉ. सदाशिव शिवदे

अनुवादक – डॉ. स. मो. अयाचित



धियोयोन: प्रचोदयात्

विश्वामित्र प्रकाशन,

पुणे

# अनुक्रम



***

# प्रस्तावना

छत्रपती शककर्ते शिवाजी महाराज यांचे चरित्र आणि त्यांचा संपूर्ण कालखंड हा क्रांतिकारक आहे, असे जवळजवळ सर्वच इतिहास अभ्यासकांनी आणि लोकनेत्यांनी म्हटले आहे. शिवकालाच्या मर्यादा या केवळ इ.स. १६३० ते इ.स. १६८० अशा धरून चालत नाहीत. इसवी सनाचे सोळावे शतक आणि अठराव्या शतकाचा पूर्वार्ध शिवकालातच सामावतो. या कालखंडात निर्माण झालेले संतवाङ्मय, शाहिरी वाङ्मय, बखर वाङ्मय, पत्रव्यवहार आणि कोरीव लेखसुद्धा अभ्यासासाठी उपयुक्त ठरतात. प्रत्यक्ष महाराज शहाजीराजे भोसले आणि थोरले शाहू महाराज छत्रपती यांच्या सहवासात अनेक लेखक उदयास आले. त्यातच शिवछत्रपतींच्या सान्निध्यात परमानंद गोविंद नेवासकर हा संस्कृत कवी मोठाच व्युत्पन्न होता. त्याने 'अनुपुराण' (म्हणजे शिवभारत) हे शिवचरित्र लिहिले. ते संस्कृतात काव्यमय आहे. तरीही ते अतिशय साक्षेपी आहे आणि साधार इतिहास कथन करणारे आहे. शाहिस्तेखानाच्या मोहिमेचा प्रारंभकाल त्यात आला आहे. पुढील भाग परमानंदाच्या हातून पूर्ण झालेला नसावा. अद्याप पुढील भाग उपलब्ध झालेला नाही. त्याचा पुत्र देवदत्त व नातू गोविंद हेही भोसले राजघराण्याच्या संबंधात होते. पण त्यांनीही शिवचरित्र लिहिले नाही, वा पूर्ण केले नाही. देवदत्ताने व काही प्रमाणात गोविंदाने शिवपुत्र शंभूछत्रपती यांच्यासंबंधी संस्कृत काव्यलेखन केले, तेच हे प्रस्तुत 'परमानंदकाव्यम्' होय. या काव्याला 'परमानंदकाव्यम्' असे नाव स्वतः देवदत्ताने वा गोविंद कवीने अधिकृतपणे दिलेले नाही. हे नाव डॉ. गो. स. सरदेसाई व डॉ. जदुनाथ सरकार यांनी प्रसिद्ध करताना दिले. ती त्यांची चूकच होती; परंतु आता ही दुसरी आवृत्ती प्रसिद्ध करताना तेच नाव, 'परमानंदकाव्यम्' हे उल्लेखणे आवश्यक वाटले, म्हणून डॉ. सदाशिव शिवदे यांनी ते कायम ठेवले आहे.

प्रस्तुत आवृत्ती ही पहिल्या आवृत्तीचे पुनर्मुद्रण आहे. हिचे महत्त्व अभ्यासकांस नक्कीच जाणवेल. ते म्हणजे या आवृत्तीत मूळ ग्रंथाचे मराठी भाषांतर दिले आहे. हे मराठी भाषांतर डॉ. स. मो. अयाचित यांनी उत्तम प्रकारे केले आहे. मूळ संस्कृत काव्य अनेक ठिकाणी दुर्बोध, क्लिष्ट आणि पाल्हाळीक झालेले आहे. त्यामुळे डॉ. अयाचित यांनाही या दोषांच्या वेदना सहन कराव्या लागल्या आहेत. भाषा आणि इतिहास या दोन्ही बाबतीत हे काव्य इतिहास अभ्यासकांना फारसे समाधान देऊ शकत नाही. तरीही



हे समकालीन साधन असल्यामुळे इतिहास लेखनात याचा उपयोग थोडाफार होऊ शकतो. लेखक देवदत्त व गोविंद हे स्तुतिपाठक व पक्षपाती आहेत असे दिसून येते. त्यामुळे त्यात इतिहासाचे ज्ञान व रसपूर्ण काव्यगुण बेतानेच उतरले आहेत. या दृष्टीने या काव्याचे मूल्यमापन यापूर्वीच प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, इतिहास संशोधक श्री. य. ग. फफे, शिवकालीन साधनांचे साक्षेपी संशोधक व थोर तज्ज्ञ देवीसिंह चौहान आणि प्रस्तुत आवृत्तीचे संपादक डॉ. सदाशिवराव शिवदे यांनी अगदी निर्भीडपणे केले आहे. इ.स. १९५२ मध्ये डॉ. गो. स. सरदेसाई व डॉ. जदुनाथ सरकार यांनी मूळ संस्कृत संहिता बडोद्याच्या गायकवाड ओरिएन्टल मालेत प्रसिद्ध केली. डॉ. शिवदे आणि मराठी भाषांतरकार डॉ. अयाचित यांनी अतिशय परिश्रमपूर्वक मराठी भाषांतरासह ती आज अभ्यासकांपुढे ठेवली आहे. हे त्यांचे ऋण फार मोठे आहे.

हे कवींद्र नेवासकर घराणे नगर जिल्ह्यातील नेवासे येथील आहे. परमानंदाचे खेडले या नावाचे एक गाव या नेवासे तालुक्यात आहे. या दोन्हीही ठिकाणी शोध केला तर या घराण्याची कागदपत्रे, पोथ्या, वास्तू आणि अन्य काही ऐतिहासिक पुरावे सापडण्याची शक्यता आहे. या घराण्याचे एक श्रीराम मंदिर अस्तित्वात होते असा उल्लेख प्राप्त झाला आहे. पोलादपूर (जि. रायगड) येथे कवींद्र परमानंदांचा मठ होता. त्याचाही अधिक शोध होणे लाभदायक ठरेल. या कवींद्राची समाधी पोलादपुरात आहे.

शिवकालीन इतिहासासाठी जेवढी साधने अभ्यासपूर्वक प्रकाशात येतील, तेवढी ती इतिहासास उपकारकच ठरतील. त्या दृष्टीने डॉ. सदाशिवराव शिवदे यांनी गेली अनेक वर्षे हे संशोधनाचे कार्य चालविले आहे. खरोखर, अभ्यासक त्यांचे अपार ऋणी आहेत. तसेच, असे साधनग्रंथ प्रसिद्ध करणे म्हणजे फार मोठी आर्थिक झीज सोसणे आहे. 'विश्वामित्र प्रकाशना'ने हे अवघड व्रत हाती घेतले आहे. प्रकाशक श्री. उमेश सुभाष धालपे यांचे ऋण न फिटणारे आहे.

अधिक काय लिहावे? राजते लेखनावधि ।।

२६, पर्वती, पुरंदरे वाडा,
पुणे – ९.

बाबासाहेब पुरंदरे



परमानन्दकाव्यम् पोथीच्या पानाची प्रतिमा : शहाजीराजांचे वर्णन

अर्थ – सूर्यकुलोत्पन्न, कुलभूषण, रक्षक, सौभाग्यशाली सैन्यदलाने सामर्थ्यवान शत्रूंना काट्याप्रमाणे बोचणारा, चिंतामुक्त दुसरा एक पुत्र असला, तरी प्रमथ गणांचा स्वामी असलेल्या श्री शंकराला प्रिय झालेला पवित्र, पुण्यशील आणि पुण्याचा अंशच असा रजनीनायक (चंद्राप्रमाणे आल्हाददायक) म्हणजे शहाजीच ।।४।। गौरीला सर्वस्वभूत झालेला, सर्व राजांना ज्यांची मुद्रा शिरोधार्थ झाली आहे असा, शत्रूसैन्याचा निःपात करणारा व आपल्या राज्याची सीमा समुद्राला भिडविणारा, पृथ्वीवरील सामर्थ्याचा अर्कच असलेला, भक्तिधर्मावतारी जणू रुद्रच, असा अतुल पराक्रमी शहाजी राजा ।।५।। अनेक राजांशी झालेल्या समरांमध्ये ज्याची तेजोभास निर्माण करणारी, तळपणारी, सळसळणारी समशेर, मत्त झालेल्या हत्तीच्या गंडस्थळावर आघात केल्यावरच शांत होते; परंतु आश्चर्य असे की, अशी अमंगल रक्तांकित ती असली, तरी त्याच्या गळ्यातील शुभ्र मौक्तिकांची माला अनेक युद्धांमध्ये आपले मंगल रूपच सिद्ध करती झाली. (प्रकरण १ – मूळ संहितेतील विभाग १ – श्लोक ४, ५, ६, ७)

# संपादकीय मनोगत

ज्वलज्ज्वलनतेजस छत्रपती संभाजीराजांच्या चरित्राचा अभ्यास करीत असताना 'परमानन्दकाव्यम्' या संस्कृत साधनाचा मला अभ्यास करावा लागला. त्याचा संपूर्ण मराठी भाषेत किंवा अन्य भाषेत अनुवाद झाल्याचे मला समजलेले नाही. तरीसुद्धा माझ्या संस्कृत भाषेच्या थोड्याफार अभ्यासाने व माझ्या काही संस्कृत जाणकार मित्रांच्या सहकार्याने त्यातील अनेक श्लोकांचे अनुवाद मी करून घेतले व त्याचा वापर मी माझ्या 'ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा' या ग्रंथाच्या कामासाठी करून घेतला. त्यावेळी माझ्या मनात या काव्याचा समग्र अनुवाद कोणीतरी करावयास हवा या कल्पनेने मूळ धरले. संभाजीराजांच्या दानपत्राचा मराठी अनुवाद मला पुणे येथील प्रसिद्ध संस्कृत पंडित कै. काशिकरशास्त्री यांनी करून दिला होता. त्यावेळीच त्यांच्याशी परमानंदकाव्याविषयी मी चर्चा केली होती. ९२ व्या वर्षात पदार्पण केलेल्या शास्त्रींना या कामात ओढणे मला योग्य वाटले नाही. त्यानंतर त्यांचे निधनही झाले. माझ्या मनातील कल्पना मला गप्प बसू देत नव्हती. एक दिवस प्रा. वसंतराव नूलकर यांना यासंबंधी मी विचारणा केली. त्यांना स्वत:ला त्यांच्या कार्यबाहुल्यामुळे हे कार्य करणे शक्य झाले नाही. मात्र त्यांनी डॉ. स. मो. अयाचित (कै. ल. रा. पांगारकरांचे नातू) यांच्याशी माझी ओळख करून दिली व त्यांच्या-बरोबर चर्चा केल्यावर डॉ. अयाचितसरांनी आपल्या वयाची पंचाहत्तरी ओलांडली असताना देखील हे काम अतिशय नि:स्पृहतेने स्वीकारले व अवघ्या सहा महिन्यांत त्याची पूर्तताही केली. त्याबद्दल मीच काय पण मराठ्यांच्या इतिहासाच्या प्रत्येक अभ्यासकानेही त्यांचे आभार मानायला पाहिजेत. उतारवयातील त्यांचा उत्साह, निगर्वी भाव, प्रामाणिकपणा, सालसता आणि संस्कृत भाषेचा गाढ अभ्यास या गोष्टी पुढील पिढीला खचितच मार्गदर्शक ठरतील.

**काव्याची उपलब्धता व स्वरूप** – कवीन्द्र परमानन्द यांनी शिवछत्रपतींच्या सूचनेवरून शिवचरित्रावर एक महाकाव्य लिहिण्याचे कार्य आरंभिले. शंभर अध्यायांमध्ये हे शिवचरित्र महाभारताप्रमाणे लिहिण्याचे त्यांनी योजिले होते. त्यांचे योजनेप्रमाणे सर्व शंभर अध्याय पूर्ण झाले होते किंवा नव्हते हे समजत नाही. कारण आज अखेर या काव्याचे एकतीस अध्याय व बत्तिसाव्या अध्यायातील नऊ श्लोक एवढेच उपलब्ध आहेत. छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकानंतर स्वराज्यात संभाजीराजांच्या संदर्भात काही घटना घडल्या. त्यासंबंधी व नंतर संभाजीराजांची राज्यप्राप्ती, राज्याभिषेक,

पुत्रप्राप्ती शाक्तपंथ वगैरे बाबींचा उल्लेख असलेले हे 'परमानन्दकाव्य' सातारच्या व कोल्हापूरच्या राजोपाध्ये घराण्यातील कागदपत्रांतून उपलब्ध झाले. ते महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार, बडोदा ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थेमार्फत प्रसिद्ध करणार होते; परंतु सात वर्षे पूर्ण झाली, तरी हे काम पूर्ण झाले नाही. त्यानंतर गो. स. सरदेसाई व जदुनाथ सरकार यांनी त्याची फोटोस्टॅट प्रत घेतली आणि हे काव्य प्रसिद्ध करावयाचे ठरविले. प्रा. गोडे यांनी सन १९३८ साली भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेच्या नियतकालिकात सातारा आणि कोल्हापूर येथील राजोपाध्ये यांच्या दप्तरातील या काव्याचा काही भाग प्रसिद्ध केला. नंतर जदुनाथ सरकार आणि गो. स. सरदेसाई यांनी १९४८ साली हे काम स्वीकारून ते १९५२ साली ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूट ऑफ बडोदा यांच्यामार्फत प्रकाशित केले.

**काव्यकर्ता** – कवीन्द्र परमानन्दांना श्रीधर आणि देवदत्त ही दोन मुले होती. देवदत्ताला गोविंद नावाचा मुलगा होता. गोविंद आणि देवदत्त या दोघांनी हे काव्य लिहिले आहे. श्रीधर आणि देवदत्त यांना कोल्हापूर संस्थानातील विशाळगड जहागिरीतील एकोली व पेदूर ही दोन गावे 'धारादत्त इनाम' म्हणून मिळालेली होती. देवदत्ताचा मुलगा गोविंद हा नंतर शाहूराजांच्या आश्रयास आला होता. कवीन्द्र परमानन्दांच्या शिवभारत या काव्यानंतरचा काही भाग छत्रपती संभाजीराजांच्या चरित्रातील काही घटनांचा उल्लेख करणारा असा कवीने लिहिला आहे. या काव्याचे स्वरूप खालीलप्रमाणे असून काव्याचे एकूण तीस अध्याय असून श्लोकसंख्या २०९३ आहे. जेव्हा या काव्याची पोथी उपलब्ध झाली तेव्हा त्यातील पाने व्यवस्थित लावली नसल्याचे दिसले. अनेक ठिकाणी घटनाक्रम उलटसुलट असल्याचे दिसले. नंतर त्याची व्यवस्थित जुळणी करून ते गायकवाड ओरिएन्टल सिरीज बडोदा यांनी त्यास छोटे आराखडावजा इंग्रजी निवेदनासह ते छापले. त्यातील पृष्ठसंख्या व श्लोकसंख्या पुढीलप्रमाणे होती– १) भोसले कुलवृत्तान्त, पृ.२९, श्लो.१४३; २) राजारामास राज्यप्राप्ती, पृ.१२, श्लो.१५३; ३) संभाजीराजांच्या हालचाली, पृ.७८, श्लो.८८० (१६७७-७८); ४) शिवयोग्याचे चरित्र व काली उपासना, पृ.४६, श्लो.४७३; ५) संभाजीराजांचा त्याग, पृ.३७, श्लो.३६१; ६) विस्कळीत पाने, पृ.६, श्लो.३६; ७) इतर, श्लो.११; एकूण पृष्ठ २०८ व श्लोकसंख्या २०५७. बडोदा सिरीजमध्ये २३६ पृष्ठे व त्यावर २१४६ श्लोक आहेत.

सरदेसाई व सरकार यांनी शाहूराजांवरील 'शाहूराजकीर्ति प्रभामंजरी' या शीर्षकाखाली लिहिलेले शंभर श्लोक वगळून इतर सर्व श्लोक प्रसिद्ध केले आहेत.

**लेखनकाल** – कवीन्द्र परमानन्द हे शिवराज्याभिषेकास १६७४ मध्ये उपस्थित



होते. महाराजांच्या आज्ञेवरूनच त्यांनी सूर्यवंशम् – अनुपुराण – शिवभारत हे काव्य रचले. १६७८ मध्ये संभाजीराजे महाराजांच्या आज्ञेनुसार शृंगारपूरला गेले. नंतर कर्नाटक मोहिमेतून परत आल्यावर महाराजांनी संभाजीराजास सज्जनगडावर जाण्यास सांगितले. सज्जनगडाहून संभाजीराजे दिलेरच्या गोटात सामील झाले. नंतर ते पन्हाळगडावर परत आले. त्यानंतर महाराजांचे महानिर्वाण झाले आणि संभाजीराजांना प्रतिकूल परिस्थितीत राज्यप्राप्ती झाली. संभाजीराजांचा राजकीय कालखंड १६८० पासून सुरू झाला. शृंगारपुरात त्यांच्यावर शाक्तांचा प्रभाव पडला होता. कवी कलश नावाचा एक कनोजी शाक्तपंथीय ब्राह्मण त्यांच्या सहवासात आला. १६८१च्या जानेवारी महिन्यात संभाजीराजांचा विधियुक्त राज्याभिषेक झाला. त्या राज्याभिषेकाचे वर्णन या काव्यात आले आहे. तसेच शहाजादा अकबराचे आगमनागमन, औरंगजेब आदिलशाही व कुतुबशाही जिंकतो इ. वरीलप्रमाणे घटना काव्यात लिहिल्या गेल्या आहेत. यावरून काव्याचा लेखनकाल साधारणपणे ठरविता येईल. इ.स. १६७८ ते १६८२ पर्यंतच्या घटना व त्यानंतर शाहूराजांवरील स्तुतिपर काव्य याचा विचार केला, तर कवीन्द्र परमानन्द पुत्र देवदत्त याने संभाजीराजांचा कालखंड, तर गोविंद याने शाहूराजांची कारकीर्द पाहिली होती. काव्यलेखनाचे निश्चित वर्ष किंवा तिथी सांगता येत नाही. ह्या काव्याचा काही भाग छ. संभाजी समकालात किंवा पूर्ण काव्य शाहूराजांच्या कारकिर्दीत लिहिलेले असावे; त्यामुळे कालखंड निश्चित करता येत नाही.

पहिल्या विभागात शहाजी, शिवाजी, संभाजी यांच्या वैयक्तिक आणि सार्वजनिक जीवनाची माहिती (१६८७ पर्यंतची) कवीने सारांशरूपाने दिली आहे. याची २१ पृष्ठे व १४७ श्लोक असून त्यास शार्दूलविक्रीडितादी वृत्ते दिली आहेत. दुसऱ्या विभागात दोन अध्याय असून पहिल्या अध्यायात ११२ श्लोक आणि दुसऱ्या अध्यायात १४० श्लोक असून तो अपूर्ण वाटतो. चौथ्या विभागात सात अध्याय, ४८८ श्लोक आणि पाचव्या विभागात पाच अध्याय, ३६१ श्लोक आहेत. हे दोन्ही विभाग एकत्र केले, तर एक स्वतंत्र काव्य होते. कारण दोन्ही विभागाचा विषय शाहूचा जन्म असा आहे.

चौथ्या विभागाच्या पहिल्या अध्याय समाप्तीनंतर 'अंशावतरण' असा शब्द आला आहे. पाचव्या विभागात पहिल्या चार अध्यायात काव्यविषय दिलेला आहे. उदा. यज्ञसामुग्रीसमुपलब्ध्यधिवासो नाम अध्यायः, कालीवरप्रदानं नाम अध्यायः, शिवपुराणान्तर्गतायामध्यायः, साधितायामंशावतरणे अध्यायः पुत्रजननं नाम (शेवटचा अध्याय).

अंशावतरण म्हणजे शाहूच्या जन्माचे प्रकरण. हे कवीन्द्र परमानन्दांचा नातू कवी

गोविंद याने लिहिले आहे. विभाग एक आणि दोन हे वेगवेगळ्या लेखकांनी लिहिले आहेत. चौथा आणि पाचवा हे एक प्रकरण असून ते कवी गोविंदाने लिहिले आहे. तिसऱ्या विभागात चौदा अध्याय आहेत. पहिला आणि दुसरा विभाग कवीन्द्र परमानन्दांनी लिहिलेला नाही हे भाषा वगैरेच्या दृष्टीने विचार करता सिद्ध होते आणि हे गो. स. सरदेसाई व जदुनाथ सरकार यांना मान्यही आहे. चौथा आणि पाचवा विभाग हा खुद्द कवी गोविंदानेच लिहिला आहे. तिसऱ्या विभागात चौदा अध्याय असून ९२७ श्लोक आहेत.

कवीन्द्र परमानन्दपुत्र देवदत्त व नातू कवी गोविंद यांनी लिहिलेल्या या काव्यात त्यांनी संभाजी, शाहू, गंगाधर प्रतिनिधी, सकवारबाई यांच्यावर इनामाच्या आशेने स्फुटकाव्येही लिहिली आहेत. कवी गोविंदाने 'शाहूराजकीर्तिप्रभामंजिरी' हे मराठी काव्य शाहूराजे व त्यांच्या पत्नी सकवारबाई यांच्या कृपेस पात्र होण्यासाठी व त्यांच्याकडून अर्थार्जन करण्यासाठी लिहिले. पेशव्यांना कवी गोविंदाविषयी कोणत्याही प्रकारची सहानुभूती नव्हती. कवींद्र गोविंद हा नारायण दीक्षित बापट नावाच्या आपल्या शिष्यास २३ मार्च १७८२ ला लिहितो, 'मी आता खूप थकलो आहे. माझ्या माघारी मला कोणी वारस नाही. जीवन मला ओझे झाले आहे म्हणून मी माहुली येथील डोहात जलसमाधी घेत आहे. नेवासे येथील माझ्या राममूर्तींची तुम्ही काळजी घ्या आणि सरकारने प्रतिवर्षासाठी मंजूर केलेले ३०० रुपये रामनवमीच्या उत्सवासाठी उपयोगात आणा.' अत्यंत दरिद्री अवस्थेतील हा कवी जलसमाधीस्थ झाला.

## काव्याचा अंतरंग -

**प्रकरण १ – शहाजीराजे, जिजाबाई, शिवाजीराजे, संभाजीराजे, राजाराम जन्म.**

मूळ प्रतीतील विभाग १ , श्लोक १ ते ५७. विभाग ३, अध्याय १४, श्लोक १, विभाग ४, अध्याय ७, श्लोक ४७–४९ व गद्य उतारा.

**प्रकरण २ – सोयराबाईचा हट्ट, संभाजीराजांना शृंगारपूरला जाण्याचा आदेश.**

मूळ संहितेतील विभाग ३ मधील श्लोक व अध्याय. विभाग ३, अध्याय ५, श्लोक १ ते ६३, विभाग ३, अध्याय ६, श्लोक १ ते ५२, विभाग ३, अध्याय ७, श्लोक १ ते १०९

**प्रकरण ३ – छ. शिवाजी महाराजांचे कर्नाटक मोहिमेस प्रयाण, संभाजीराजे शृंगारपुरात, संभाजीराजांचे शृंगारपुरातील दिवस, कलशाभिषेक, संभाजीराजे–दिलेर संधान, शिवाजीराजे कर्नाटक मोहिमेवरून परत, शिवाजीराजे–मंत्री संवाद, संभाजीराजांना सज्जनगडाकडे जाण्याचा आदेश, संभाजीराजे दिलेरच्या गोटात, भूपाळगड संग्राम.**

मूळ संहितेतील विभाग ३ मधील अध्याय ८, श्लोक १ ते १०१. विभाग १, श्लोक ६१ ते ६२ व श्लोक ६४ ते ७५, विभाग ३, अध्याय ९, श्लोक १ ते ४७, अध्याय १०, श्लोक १ ते ६७, अध्याय ११, श्लोक १ ते ४१, अध्याय १२, श्लोक १ ते ९८, अध्याय १३, श्लोक १ ते ६०.

**प्रकरण ४ – शिवाजी महाराजांचे महानिर्वाण, रायगडावरील कारस्थान, संभाजीराजांचे रायगडावर आगमन, संभाजीराजांचा राज्याभिषेक.**

मूळ संहितेतील विभाग १, श्लोक ५८ ते ६० व ६३, विभाग २, अध्याय १ व २ पूर्ण, विभाग ३, अध्याय १ ते ४ पूर्ण, विभाग ३, अध्याय १४, श्लोक २४ ते ४७, श्लोक २ ते ७.

**प्रकरण ५ – शहाजादा अकबर आगमनागमन.**

मूळ मूळ संहितेतील विभाग १, श्लोक ७६ ते ८२, श्लोक १२४ ते १४७.

**प्रकरण ६ – औरंगजेब आदिलशाही व कुतुबशाही घेतो.**

मूळ संहितेतील विभाग १, श्लोक ८३ ते १२३.

**प्रकरण ७ – संभाजीराजांची स्तुती व पुत्रकामेष्टीचा सल्ला, कालीदेवीचे वर्णन व स्तुती, बीजमंत्र, शिवयोग्याचे माहात्म्य व दीक्षा, शिवयोग्याची तपश्चर्या, शिवयोगी व शंभूराजे, शिवयोग्याचे चमत्कार, गणेशभट्ट जांभेकर आणि मंत्रविद्या, केशवपंडित.**

मूळ संहितेतील विभाग ४, अध्याय १, श्लोक १ ते १०१, अध्याय २, श्लोक १ ते ८१, अध्याय ३, श्लोक १ ते ६६, अध्याय ४, श्लोक १ ते ९५, अध्याय ५, श्लोक १ ते ७७, अध्याय ६, श्लोक १ ते ३०, अध्याय ७, श्लोक १ ते २३.

**प्रकरण ८ – विभाग पाचवा – पुत्रकामेष्टी.**

अध्याय १, श्लोकसंख्या ७७, पुत्रकामेष्टीची तयारी आणि पूर्तता; अध्याय २, श्लोकसंख्या ८७, पुत्रकामेष्टीची तयारी आणि पूर्तता; अध्याय ३, श्लोकसंख्या १ ते ६०, विष्णुस्तुती; अध्याय ४, श्लोकसंख्या ५३ : श्लोक १ ते ८, कालीचे स्वप्नात दर्शन, श्लोक ९ ते ४३, यज्ञविधी, श्लोक ४४ ते ५३, संभाजीराजांचे रूपवर्णन; अध्याय ५, श्लोकसंख्या ८४ : श्लोक १ ते ५७ येसूबाईंचे (राजसबाई) डोहाळे वर्णन, श्लोक ५८ ते ६४ सूतिकागृहव्यवस्था, श्लोक ६५ ते

६८ शाहूजन्म, श्लोक ६९ ते ७५ बालकाचे वर्णन, श्लोक ७६ ते ८४ आनंदोत्सव.

## ज्येष्ठ इतिहास संशोधकांनी केलेले या काव्याचे परीक्षण :-

**त्र्यं. शं. शेजवलकर यांनी केलेले परीक्षण :- काही मुद्दे -**

१) या काव्यातील कोणताही भाग कवीन्द्र परमानन्दांनी लिहिलेला नसून त्यांच्या देवदत्त नावाच्या लबाड पुत्राने तो संभाजीच्या कारकिर्दीत आपल्या इष्ट हेतुसिद्ध्यर्थ मागील काही शिवकाल त्यात घेऊन त्रुटित स्वरूपात कसाबसा रचला; व त्याला पुढे त्याचा पुत्र गोविंद याने शाहूची मर्जी संपादन करण्याकरिता शाहूच्या जन्माचे रामजन्मासारखे पूर्वाख्यान रचून पुत्रकामेष्टीरूपाने त्याचा जन्म घडवून आणून जोड दिली. तो स्वत:ला कवीन्द्र म्हणवून घेतो.

२) या काव्यात अतिशयोक्ती हा विशेष काव्यालंकार असून, या काव्यात सत्याशी अगदी विसंगत व शिसारी आणण्याइतके स्तुतिपठण व वर्णन आढळते. त्यास भाटांच्या पोवाड्यांचीच सर येते. तरीसुद्धा ते समकालीन असल्यामुळे त्याची मांडणी जरी काल्पनिक, पूर्वग्रहदूषित आणि उघडउघड खोटी असली, तरी अंशत: ऐतिहासिक सत्य मिळते.

३) शाक्तपंथाचा गुरू छंदोगामात्य मंत्री कवी कलश हा होता; आणि त्याने कलशाभिषेक करून संभाजीराजांशी कशी मैत्री केली हे दिले आहे. तसेच सोयराबाईला कलीची दूती, राक्षसी समजून तिच्या सर्व कृत्यांचा उल्लेख स्वार्थपर लावला आहे. तसेच शिवाजीचे सर्व प्रधान लबाड, स्वार्थी, प्रजावंचक व ढोंगी असे रंगविले आहेत. संभाजीला मात्र सर्वगुणसंपन्न, निर्दोष, उदार असा ठरविला आहे. हे योग्य नाही.

४) ग्रंथसंपादक व प्रास्ताविक लिहिणारे यदुनाथ सरकार व रियासतकार सरदेसाई यांनी ग्रंथाचे वाचन अथपासून इतिपर्यंत केले नाही.

५) एकंदरीत हे काव्य ऐतिहासिक साधन म्हणून विचारपूर्वक वापरावे लागेल.

**मा. श्री. देवीसिंह चौहान :-** परिशिष्टात त्यांचा लेख दिला आहे.

**श्री. य. ग. फफे :-** परिशिष्टात त्यांचा लेख दिला आहे.

देवदत्त आणि गोविंद यांनी छत्रपती सभांजी व छत्रपती शाहू यांची मर्जी संपादन करून आपले ऊर्जित करून घेण्याच्या दृष्टीने हे स्तुतिपरकाव्य लिहिले आहे. त्यातील काही भाग समकालीन असल्यामुळे ऐतिहासिक साधन म्हणून त्याचा उपयोग करून घेता येईल. ऐतिहासिक साधन म्हणून या काव्यातून खालील गोष्टी ज्ञात होतात -

१) शिवाजी महाराजांचे कर्नाटक मोहिमेस जाणे, २) संभाजीराजे व अष्टप्रधान यांचे संबंध. (विसंगत वर्णने), ३) सोयराबाई या मोहिते वंशातीलच, ४) सोयराबाईंचा



राजारामास राज्य देण्याचा हट्ट, ५) संभाजीराजे शृंगारपुरात- संभाजीराजांचा व्यायाम, अभ्यास वगैरे. शाक्तपंथाशी संबंध, कविकलशाशी संबंध, कलशाभिषेक, संभाजीराजे सज्जनगडावर, ६) संभाजीराजे दिलेरच्या गोटात, ७) भूपाळगडावरील हल्ला, ८) संभाजीराजे पन्हाळगडावर असताना शिवाजी महाराजांचा मृत्यू, पन्हाळगडावर श्राद्धविधी, ९) रायगडावरील मसलत, १०) हंबीररावांच्या साथीने संभाजीराजे 'छत्रपती' म्हणून घोषित, ११) अण्णाजी दत्तो व मोरोपंत यांना कैद, १२) संभाजीराजे रायगडावर, मातांचे सांत्वन, राजारामाची भेट, १३) राज्याभिषेक वर्णन, १४) शहाजादा अकबराचे स्वराज्यात आगमन व इराणला परत जाणे, १५) शाहूराजांचा जन्म, १६) याशिवाय आदिलशाही व कुतुबशाहीचा औरंगजेबाकडून अस्त, १७) शाक्तपंथाचा महाराष्ट्रातील प्रभाव व कर्मकांडाकडे ब्राह्मणांचा ओढा ,१८) सामाजिक स्थितीचे सामान्य अवलोकन.

प्रस्तुतचे काव्य कवीन्द्र परमानन्दांनी लिहिले नसल्याचे अनेक इतिहास तज्ज्ञांनी परीक्षणे लिहून सिद्ध केले आहे. त्यामुळे हे काव्य थोडेसे उत्तरकालीन असल्याने त्याचा साधन म्हणून अंशत:च उपयोग करता येईल. हे काव्य छत्रपती संभाजी आणि छत्रपती शाहू यांचे स्तुतिकाव्य असून त्यात कवीने काव्यनायकाचा विशेषत: छत्रपती संभाजीराजांचा गुणगौरव करताना सावत्र माता, सोयराबाई यांना कैकयीची उपमा देऊन प्रतिरामायण रचले आहे. ते लिहिताना कवीने छत्रपती शिवाजी महाराजांसारखे समस्त दोषांपासून मुक्त, सर्व उच्च लक्षणांनी युक्त (समस्तदोषरहितं सहितं लक्षणैर्निजै:।। १९।।) अशा महान विभूतींच्याबद्दल विपरीत लिहिले आहे.

छत्रपती संभाजीराजे व दिलेरची भेट, दिलेरच्या तोंडी घातलेले महाभारत व रामायण या ग्रंथांतील दाखले, भूपाळगडावरील हल्ल्याचे वर्णन या गोष्टी वाचताना कुठे बापाचे विशाल अंत:करण, उदात्तता आणि लेखनशैलीतील प्रतिभाविलास? कवीन्द्र परमानन्दांच्या या पुत्रपौत्रांनी या काव्यात आपल्या प्रतिभेचे आणि विद्वत्तेचे दिवाळे काढले आहे असे म्हणावेसे वाटते.

या काव्यात असलेला एक गद्य उतारा वाचल्यावर कवीच्या कल्पनाविलासाची आणि बुद्धीची पातळी हीनावस्थेला पोचली हे ध्यानात येते. या काव्यातून अंशत: काही ऐतिहासिक बाबी समजतात, एवढाच त्याचा उपयोग आहे.

**काव्य या दृष्टीने मूल्यमापन -** देवदत्त आणि गोविंद हे जरी कवीन्द्र परमानन्दांचे पुत्रपौत्र असले, तरी परमानन्दांच्या शिवभारताशी या काव्याची तुलना होऊ शकत नाही. संभाजी महाराजांच्या स्तुतीने भरलेले हे काव्य जरी असले आणि ते जुन्या पद्धतीने अलंकारांनी, वृत्तांनी बद्ध केले असले, तरी वर्णनशैली अत्यंत उथळ व ढोबळ स्वरूपाची

आहे. अनेक ठिकाणी वाक्यरचना काव्यात आणताना संदर्भाच्या दृष्टीने महत्त्वाचे असलेले शब्द गळून जातात. उदा. शंभूराजांनी गती (शनीची) सहन केली. डॉ. स. मो. अयाचित म्हणतात, 'भाषाशैली व अनुवाद अभ्यासकांना अनेक प्रकारे एक्सरसाइजमधून बराच लाभ होऊ शकेल व असा अभ्यास एखाद्या स्नातकाने केला, तर त्याला भाषिक अभ्यासातून चांगला निबंधही लिहिता येईल, इतकी सामग्री यात आहे. एम.फिल.साठी हा चांगला विषय होऊ शकेल.'

चिक्कीरीयाः, रायलीयाः, चञ्जापुरीयाः, माथुराः, सेतुसंस्थाः, श्यामास्याः, पठाणाः, कर्णाटाः, खुवासानजाःखानाः, चेदिलभूपतिः, शिकंदरशहा, इराणी–तुराणी, ताम्राननाः बिन्दुपुरम्, रैङ्गिरिःरैधरः (रायगड), गौडाः, चाहुवाणाः, विन्ध्याधिपः, ब्रह्मगिरिः (त्र्यम्बकेश्वरः), प्रभावली, पल्लीवनम्, जयवल्ली (जावळी), दलेलः (दिलेरखान), मयूर (=मोरे पृ.६८), भागानगरम्, श्यामलाः, लोदी (?), एकराजः (=एकोजी), म्लेच्छा (साहिजहान), ओरङ्गशाहः (सज्जनपर्वतः) इत्यादी ऐतिहासिक संज्ञा संस्कृतीकरणपूर्वक केलेल्या आहेत, हे स्तुत्य आहे. कोङ्कणक्रूरदेशे, क्रूरकोङ्कणज अशा स्थळी मात्र संशय उत्पन्न होतो. शिवयोगाच्या इतिहासात आरंभी अनेक स्थानिक निर्देश घोटाळ्यात टाकणारे आहेत. पाळेगार याचे संस्कृतीकरण पालेगाराः आणि पुंडचे पुण्ड्र असे केलेले दिसते. ते अर्थातच उथळ आहे, म्हणजे विचारपूर्वक केलेले नाही. गतापाय = सुरक्षित हा पर्याय चांगला आहे (त, १–३५) आहे त्या स्थितीत या काव्याला तितक्याच प्रामाणिकपणे मराठीत आणणे कित्येक ठिकाणी अडचणीत टाकते, हे खरे असले तरी कित्येक शब्दप्रयोग त्या त्या संदर्भात चपखल मराठी वाक्प्रचार सहजरीत्या सुचवितात, हे उपकारकच आहे.

कवीन्द्र परमानन्दांच्या शिवभारत या काव्यातील वर्णनशैली व देवदत्त, गोविंदकृत या काव्यातील वर्णनशैलीतील भिन्नतेचा विचार केला, तर त्यात महत् अंतर जाणवते. कवीन्द्र परमानन्दांची निरीक्षणशक्ती, प्रसादयुक्त भाषा आणि उदात्तता या गोष्टी या काव्यामध्ये अभावानेच आढळतात, नव्हे उदाहरण म्हणून सापडतही नाहीत. शिवभारतातील शब्दार्थालंकार आणि चमत्कृतीपूर्ण वर्णने ही फारच उच्च दर्जाची दिसून येतात. उपमा आणि दृष्टांत यासारखे सामान्य अर्थालंकार काही ठिकाणी आढळत असले, तरी अनुप्रासांची ओढाताण प्रकर्षाने लक्षात येते.

**शृंगाररस** – शिवभारतातील अनेक ऐतिहासिक व्यक्तींची वर्णने वाचताना शृंगाररसाचा काडीमात्र आश्रय कवीन्द्र परमानन्दांनी घेतलेला नाही. वात्सल्यपूर्ण वर्णने कवीन्द्र लिहितात. स्त्रियांकडे बघण्याचा दृष्टिकोन कवी स्वतः साधुवृत्तीचे असल्यामुळे



निर्मळ असाच आहे. देवदत्त आणि गोविंद हे दोघेही शाक्तपंथाचे अनुयायी असल्याचे त्यांच्या लेखनावरून लक्षात येते. शिवपत्नी सोयराबाई यांच्यात 'ममता' शिरली व ती कैकेयीस्वरूप झाली असे म्हणून कवीने प्रति रामायण उभे केले आहे. यापुढे जाऊनही सोयराबाईंनी शिवाजी महाराजांना आपल्या रूपसौंदर्यावर व शृंगारिक अलंकाराद्वारे कसे मोहित केले व आपला मुलगा राजाराम यास राजगादी देण्याचा हट्ट कसा धरला हे वाचल्यावर कवीची वृत्ती लक्षात आल्यावाचून राहत नाही.

अश्लील वर्णन करून कवीला यात छत्रपती शिवाजी महाराजांचे चारित्र्यहनन होत आहे याचे भान राखलेले नाही.

**विसंगत वर्णन** – संभाजीराजांच्याबद्दल शिवाजी महाराजांच्या मनात निर्माण झालेली चिंता, राज्यवारसाचा प्रश्न यासंबंधीचा विचार प्रधानमंडळ व महाराज यांच्यात चालला असल्याचे या काव्यावरून लक्षात येते. महाराजांच्या मनात कलीने प्रवेश केला असे काहीतरी लटके कारण निर्माण करून कवीने सत्य दडविण्याचा प्रयत्न केला आहे. तरीसुद्धा शिवाजी महाराजांच्या राज्याची समृद्धी झाल्याचे तो लिहितो. दुसरे विसंगतीचे उदाहरण असे की, शिवाजी महाराज आपण वृद्ध झाल्याचे कवी त्यांच्या तोंडी घालतो आणि परत ते कर्नाटक मोहिमेला जातानाचा महाराजांचा उत्साहही वर्णन करतो.

**देवदेवतांचे आदेश, चमत्कार, आशीर्वाद** – शिवभारतात कवीन्द्र परमानन्दांनी दैवी आदेशांचा वापर काही प्रसंगी केला आहे. त्यात त्यांनी योग्य औचित्य आणि प्रासंगिक महत्त्व यांचा अतिशय कौशल्यपूर्णरीतीने विचार केला आहे.[१३०] कवी देवदत्त व गोविंद यांनी मात्र दैवी आदेशांचा वापर दुष्ट व अशिष्टसंमत गोष्टींसाठी कलिप्रवेश, ममताप्रवेश या गोष्टी सोयराबाई, शिवाजी महाराज, राजाराम आणि प्रधानमंडळ यांच्यातील दोष प्रकट करण्यासाठी शंभूराजांना दिलेरखानाकडे जाण्याचा आदेश कालीने किंवा तुळजाभवानीने दिल्याचे कवी लिहितो. शिवभारतात ब्राह्मणांना दक्षिणा देण्याचे प्रसंग नाहीत; परंतु या काव्यात ब्राह्मणदक्षिणेचे प्रसंग अनेक ठिकाणी आले आहेत.

छत्रपती संभाजीराजांच्या कारकिर्दीत त्यांच्या प्रशासनावर कवी कलश याचा प्रभाव होता. कवी कलश हा शाक्तपंथी तंत्रमार्गातील असल्यामुळे तांत्रिक आणि कर्मकांड यांचा प्रसार झाला. ठिकठिकाणी अनेक प्रसंगी पुरोहितांचा बढेजाव व त्यांना दिले जाणारे दान आणि दक्षिणा यांचे वाटप केल्याचे या काव्यात दिसून येते. आनंदव्यक्तीसाठी दक्षिणाच वाटणे ही गोष्ट प्रकर्षाने या काव्यात दिसून येते. उदा. अध्याय १ – श्लोक ६, अध्याय ३ – श्लोक २९, अध्याय ४ – श्लोक ४१ ते ४५, अध्याय ८ – श्लोक ९, ७२, ९५, ९६, अध्याय १० – श्लोक ५०. विभाग ५ – अध्याय ३ – श्लोक ११ ते २६ यात

कवी म्हणतो, 'या श्रेष्ठ राजाने (छत्रपती संभाजीराजे) ब्राह्मणांना भूमीवर जितके धुळीचे कण असतील, ढगांमध्ये जेवढ्या जलधारा असतील, सागरतीरावर जितकी वाळू असेल, पृथ्वीवर जेवढी गवताची पाने असतील, सुवर्णपर्वताच्या जितक्या अतितेजस्वी शिळा असतील, आकाशात जेवढ्या तारका असतील, तेवढी दाने दिली.'

इतिहासाचार्य गो. स. सरदेसाई यांनी या काव्यास 'Paramanandkavya of Kavindra Paramanand' असे नाव दिल्यामुळे व ते प्रचलित झाल्यामुळे ते अनुवादासह प्रकाशित करताना त्याच नावाने प्रकाशित करावे लागत आहे. आम्ही फक्त या काव्यास **'परमानन्दपुत्र देवदत्त व पौत्र गोविन्द कृत परमानन्दकाव्य (अनुपुराण)'** असे शीर्षक दिले आहे. ऐतिहासिक साधन म्हणून त्याचा उपयोग अंशतः तरी निश्चितपणे होतो यात शंका नाही. या काव्याचा आजपर्यंत अनुवाद झाला नसल्याची खंत माझ्याप्रमाणेच इतर अभ्यासकांना बोचत असली पाहिजे. आम्ही या काव्यातील घटनाक्रमांचा विचार केला व ते त्या कालक्रमा-नुसार प्रसिद्ध करीत आहोत. त्यामुळे त्यातील श्लोकांचे आकडे घटनाक्रमानुसार काव्याचे संपादन केल्यामुळे बदलले आहेत. आज हा अनुवाद वाचकांच्या हातात देताना ही उणीव भरून काढल्याचे मला समाधान वाटते आहे. याचे सर्व श्रेय माझे मित्र डॉ. स. मो. अयाचित यांना दिले जावे. मी फक्त या गोष्टीचा योजक या भूमिकेतून आपल्यापुढे उभा आहे. 'योजकस्तत्र दुर्लभः।' असे म्हणतात आणि त्यामुळे या कृतीचा मी सार्थ अभिमान बाळगल्यास ती गर्वोक्ती ठरू नये. हे काम तसे अवघड होते; परंतु ते करताना माझे मित्र कै. श्री. श्रीकृष्ण वैद्य यांचे प्रोत्साहन आणि कै. डॉ. अ. रा. कुलकर्णी, डॉ. जयसिंगराव पवार व श्री. पांडुरंग बलकवडे यांच्या रेट्यामुळे या कामास गती देता आली. श्रीमंत शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांचा या कामी आशीर्वाद लाभला, ही गोष्ट मी परमभाग्याची मानतो. जानेवारी २००७ साली हे काम पूर्ण झाले होते. परंतु प्रकाशकाच्या अभावी ते तसेच पडून होते. आज ते 'विश्वामित्र प्रकाशन'चे श्री. उमेश धालपे यांच्यामुळे पूर्णत्वास जात आहे. त्यामुळे त्यांना किती धन्यवाद द्यावेत हे समजत नाही.

हे काम करताना माझी लेखनिक सौ. मैथिली पिंपळे, माझे मित्र श्री. रमण चितळे, डॉ. धडपळे, श्री. नंदू लांडगे, डॉ. श्रीपाद भट तसेच आशय टाइपसेटर्सचे श्री. महेंद्र देव यांची बहुमोल मदत झाली. या सर्वांचा मी ऋणनिर्देश करतो.

**– डॉ. सदाशिव शिवदे**



# प्रकरण १

## शहाजीराजे, शिवाजीराजे, संभाजीराजे, राजाराम जन्म.

**(मूळ संहितेतील विभाग ३, अ. १४, श्लो. १, वि.१, श्लो. १–५७, वि.४, अ. ७, श्लो. ४७–४९ व गद्य उतारा.)**

---

**श्रीगोविन्द । कवीन्द्र उवाच । वन्दारुविबुधोदारमौलिमन्दारदामभिः । स्विद्यत्पदारविन्दाय गोविन्दाय नमो नमः ।। १**

**अर्थ –** श्रीगोविन्द कवीन्द्र म्हणाले, बुद्धिमंतांच्या शिरोभूषणावरील मंदार पुष्पांच्या माळांनी ज्याची पदकमले ओली होतात, अशा वंदन करू इच्छिणाऱ्या त्या गोविंदाला अनेक नमस्कार असोत.

### शहाजीराजे -

**यद्यप्यन्यस्तनूजस्तरणिकुलमणेर्वंशभूषायुतोभूद् गोप्ता सौभाग्यशाली प्रबलबलयुतो विज्वरो वैरिशै(श)ल्यः । एतन्मध्ये तथापि प्रमथगविपतेः प्रेमपात्रं पवित्रं। पुण्याशः पुण्यशीलः समजनि रजनीनायकः शाह एव ।। ४**

**अर्थ –** सूर्यकुलोत्पन्न, कुलभूषण, रक्षक, सौभाग्यशाली, सैन्य दलाने सामर्थ्यवान, शत्रूंना काट्याप्रमाणे बोचणारा, चिंतामुक्त दुसरा एक पुत्र असला तरी प्रमथ गणांचा स्वामी असलेल्या श्री शंकराला प्रिय झालेला, पवित्र, पुण्यशील, पुण्याचा अंशच असा रजनीनायक (चंद्राप्रमाणे आल्हाददायक) म्हणजे शहाजीच.

**गौरीसर्वस्वभूतः सकलनृपशिरोधार्यमान्यैकमुद्रो । भक्त्याविर्भूतरुद्रः परदलदलनो बद्धि(द्ध)सीमासमुद्रः । सत्कर्मी राजधर्मी स्थितिधृतिगतिभिर्ज्ञातधर्मावतारः । सारं सर्वंसहायाः समभवदतुलः साहसी शाहभूपः ।। ५**

**अर्थ –** गौरीला सर्वस्वभूत झालेला, सर्व राजांना ज्याची मुद्रा शिरोधार्य झाली आहे असा, शत्रू सैन्याचा निःपात करणारा व आपल्या राज्याची सीमा समुद्राला भिडवणारा, पृथ्वीवरील सामर्थ्याचा अर्कच असलेला, भक्तिधर्मावतारी जणू रूद्र असा अतुल पराक्रमी शहाजीराजा.

**यस्यानेकमहीमहेन्द्रसमरे मत्तेभकुम्भस्थले विद्युद्वन्तिकरी बभूव निभृता खड्ग-भ्रमिर्भास्वरा। आश्चर्यं तु महात्स्वमङ्गलपरासृक्सङ्गलिप्ता सती जाता मङ्गलरूपिणी किल गले मालामला मौक्तिकी ।। ६**

**अर्थ –** अनेक राजांशी झालेल्या समरामधे ज्याची तेजोभास निर्माण करणारी, तळपणारी, सळसळणारी समशेर मत्त झालेल्या हत्तीच्या गंडस्थळावर आघात केल्यावरच शांत होते; परंतु आश्चर्य असे की अशी अमंगल रक्तांकित ती असली तरी त्याच्या गळ्यातील शुभ्र मौक्तिकांची माला अनेक युद्धांमध्ये आपले मंगल रूपच सिद्ध करती झाली.

**कम्पन्ते चिक्किरीयाः शरणनुसृता मैसुरीयास्तुरीयाः । कारुण्यासेकमात्रप्रमुदितहृदया रायलीयास्तुरीयाः । चञ्जीचञ्जापुरीया मधुरभणितिभिर्माथुरा नोद्धुराः स्युः । शङ्कन्ते सेतुसंस्थाः समरविजयिनः शाहजीकास्त्वसङ्गम् ।। ७**

**अर्थ** – म्हैसूरचे तसेच इक्केरीचे पराक्रमी सैनिक त्याच्यापुढे वाकत, तर रायरीचे त्याच्या प्रेमाच्या वर्षावाने आनंदित होतात. जिंजी व तंजावरचे सैनिक त्याच्या मधुर भाषणाने बंड करीत नाहीत, असे शहाजीचे समरविजयी सैन्य. सैनिकांना ते सैन्य सामील न झाले तरच नवल!

**किं ब्रूमश्चास्य भाग्यं नियतिकृतिवशाद् द्राग्वजीरत्वयुक्तो । युक्तिप्रत्युक्तिरीत्या स्वयमिव सकले राजकार्ये धुरीणः । निःशङ्कं खड्गधाराग्रहणगरिमणि प्रोच्छलच्छैनिकास्त्रा । दिक्पालाः पातशाहा अपि समरविधौ यद्भुजं प्रार्थयन्ति ।। ८**

**अर्थ** – नियतीच्या साहाय्याने (कृपेने) जो थोड्याच दिवसांत दिवाण पदापर्यंत पोहोचला; परंतु स्वतःच्या युक्तिप्रयुक्तीने राजकारण धुरंधर झाला. समशेरीच्या धारा झेलण्यात मोठेपणा असलेल्या आणि युद्धकार्यात अतिउत्साही, सैनिक बाळगणारे दिक्पाल राजे आणि बादशहा शहाजीराजांच्या बाहुबलाच्या साहाय्याची अपेक्षा करतात, त्यांचे भाग्य आम्ही कसे वर्णावे?

**पुत्रैः पौत्रैर्नवीनैरनुसृतपरमप्रेयसीभिः प्रवीणैः । क्रीडाभिः शोभिनीभिः प्रतिपदमनय– द्वासरान्सौख्यसारान् । चञ्चच्छ्रीचन्द्रमौलेश्चरणकमलयोर्मोदमग्नः सुलग्नो । यश्चित्तं चञ्चरीकश्चल–नवलनयोर्नो विधिं स्वीचकार ।। ९**

**अर्थ** – मुले–नातवंडे आणि आपल्या प्रियजनांचे लाड पुरविणारे असे प्रवीण युवक यांच्यातील अनेक सुरम्य क्रीडा पाहून अत्यानंदात त्याचे दिवस जात होते. लखलखीत अशा चंद्रमौलीश्वराच्या पदकमलावर तो आनंदाने लीन झाला होता. त्याचे चित्त भुंग्यासारखे झाले आणि युद्धकारणातील कोणत्याही हालचालींच्या बाबतीत कोणतेही बंधन स्वीकारायला ते तयार नव्हते.

**ब्रह्मण्यस्त्वद्वितीयः प्रकृतिमुपगतः शास्त्रसंस्काररीत्या । ब्रह्मण्येऽप्यद्वितीये सुजनसरणिभिः पारमायात एव । तत्तादृक्पाण्डवेयप्रमुखनृपवरैश्चोपमेयोऽप्रमेयो । यातः श्रीरामजायाजनकवदतुलं पूज्यभावं जगत्याम् ।। १०**

**अर्थ** – अद्वितीय ब्रह्मभाव असल्यामुळे आणि शास्त्रशुद्ध संस्कारमार्गामुळे त्याचा स्वभाव निसर्गानुकूल झालेला होता. तत्त्वज्ञानाची त्याची ओढ अद्वितीय अशी होती आणि सुजनांच्या सन्मार्गाचे नैपुण्यही त्याने प्राप्त केले होते. अशाच स्वभावाच्या पांडवादी श्रेष्ठ राजांची त्यास उपमा द्यावी असा तो अप्रमेय होता, आणि सीतेच्या पित्याप्रमाणे त्याला जगात सर्वात अतुलनीय असा सन्मान प्राप्त झाला होता.

**उद्धृष्टाः समरे भटाः करिघटाः प्रत्ताः कविभ्यः स्फुटाः । प्रोत्कृष्टाः किल कल्पपादपगुणाः स्पष्टाः स्वयं स्वीकृताः । सन्तुष्टैस्तरुणीजनैर्निवसता सङ्गीतशालान्तरे । सृष्टाः कामकलानिधे रसकला म्लिष्टाः प्रनष्टा अपि ।। ११**

**अर्थ** – त्याने युद्धात सैनिक पकडले, पकडलेल्या हत्तींचे कळप कवींना दान करून टाकले आणि ज्यामध्ये कल्पवृक्षाची स्पष्टपणे लक्षणे आहेत, असे स्वतःकडे ठेवून घेतले. संगीतशाळेत आल्हादित झालेल्या तरुणींबरोबर कामकलास्वामी मदनाप्रमाणे रसकला निर्माण केल्या आणि अमंगल नाहीसे झाले.

**गन्धर्वा इव गायकाः परिचराः प्रेष्याः प्रवीणा इव । व्रात्याः क्षत्रधुरन्धरा इव धराधीशा इव प्रीतिदाः । सत्यं सत्यसमाश्रयाः कलिगताः संसारिणः सारिणः । सर्वे शाहमहीपतेः सुरसुहृत्साम्राज्यराज्ये बभुः ।। १२**

**अर्थ** – त्याच्याजवळील गायक गंधर्वांसारखेच निपुण असे होते. तसेच सेवकवर्ग आणि दूत हे पण निपुण होते. खट्याळ लोकही होते. क्षत्रिय धुरंधरांसारखे, आणि मांडलिक असे आनंद देणारे पण होते. शहाजीराजांचे प्रजाजन गुणवान आणि कलियुगातही निःशंकपणे सत्याचाच आश्रय करणारे होते. (जणू काय) ते स्वर्गाच्या साम्राज्यात शोभायमान झाले होते.

**सर्वे सत्यपरायणाः सुकृतिनः शुद्धीकृताः शासनाद् । ब्रह्मद्वेषसुराग्रहग्रहणजा वार्ता कुतः स्यात् कथम् । किं वाच्यं चरितं तु शाहनृपतेश्चित्रं विचित्रं स्फुटं । चक्रं चौर्यकुलस्य येन सकलं काशीजले मज्जितम् ।। १३**

**अर्थ** – सर्वजण सत्यपरायण, सत्कृत्ये करणारे, सदाचारी, सुशिस्तप्रिय असे असल्यामुळे येथे ब्रह्मद्वेष आणि मद्यपान यांसारख्या दुर्वार्ता तेथे कुठून आणि कशा असतील? ज्याने सर्व चोर–डाकूंच्या टोळ्या गंगेत बुडविल्या त्या शहाजीराजांच्या सुस्पष्ट अशा आश्चर्यजनक चारित्र्याबद्दल काय सांगावे?

**गेहं गेहमहो नु धान्यसदृशो राशिर्धनस्याभव । च्चातुर्वर्ण्यमनङ्गवैरिनिरतं सम्यक् स्वधर्मे स्थिरम् । इत्थं शाहनृपेऽनुशासति महीं माहात्म्यमन्यादृशं । द्रष्टुं चारु वसुन्धरेति च पदं पृथ्व्या अभूत् सार्थकम् ।। १४**

**अर्थ** – प्रत्येक घर धान्यराशीप्रमाणे धनराशीने युक्त होते. चारही वर्णांचे लोक मदनान्तक शंकराचे भक्त असून स्वकर्तव्य परायण झाले होते. अशा तऱ्हेने राज्य करणाऱ्या शहाजीराजांचा महिमा वेगळाच आणि सुदर्शनी होता. त्यामुळे 'वसुंधरा' हे पृथ्वीचे नाव सार्थक झाले.

**आबाल्यात् बलवद्विरोधवलनात्स्वीयं पदं प्रोज्झितं । तत्रापि प्रकटप्रतापधरणा– त्स्वाराज्यता नोज्झिता । यं देशं समुपाश्रितः प्रबलधीः श्रीशाहभूमिपति । र्लोकैरेवमलोकि पूर्ववदसौ तद्देश्य एव प्रभुः ।। १४**

**अर्थ** – बाल्यावस्थेपासून (राजकारणाच्या) प्रचंड विरोधात भ्रमण झाल्यामुळे स्वतःचे स्थान (पद) गमवावे लागले, तरी प्रचंड पराक्रमाच्या आश्रयामुळे स्वतःचे राज्यशासन सोडले नाही. शहाजीराजे ज्या ज्या प्रदेशात गेले, तेथील लोकांना ते प्रखर बुद्धिमान असल्याचे आणि पूर्वीच्या त्या त्या ठिकाणचे भूमिपती असल्यासारखेच जाणवले.

**यद्यत्कार्यमुरीकरोति बहुधा वायुप्रबद्धे पथि । प्रीत्या तत्परिपूरयत्यतितरां भक्त्या भवानीपतिः । राजानो बहुशो बभूवुरपरे प्राग्दाक्षिणात्याः परं । श्रीमहच्छाहनृपस्य केवलमहाराजाभिधा पप्रथे ।। १५**

**अर्थ** – त्यांनी आपल्या झंझावाती दौऱ्यात जीजी अनेक प्रकारची कामे स्वतःच्या अंगावर घेतली, त्या त्या कामांची परिपूर्ती भवानीपती शंकराने अतिशय आनंदाने केली. दक्षिणदेशी इतर अनेक राजे झाले; परंतु महाराजा म्हणून फक्त शहाजीच प्रसिद्ध पावला.

**एकं व्याकरणं विना प्रविदितो नो धातुवादः क्वचित् । प्रावृट्कालमृते व्यलोकि न पुनर्मालिन्यमेवाम्बरे । आश्चर्यं त्विदमेव शाहमनसा सच्छास्त्रसंसेवनैः । सम्प्राप्तं तु मनुत्वमेव हि कथं नाणुत्वमात्रं जहौ ।। १६**

**अर्थ** – व्याकरणाखेरीज इतर धातुवाद त्यांना माहीत नव्हता. वर्षाऋतूखेरीज त्यांना आकाश मलिन झाल्याचे दिसले नाही. सत्शास्त्राच्या अभ्यासामुळे शहाजीच्या मनाला प्राप्त झालेले मनुत्व यत्किंचितही मलिन झाले नाही. (मनूसारखी शासनव्यवस्था कायम राहिली.)

**वारं वारमहो नु वर्ण्यमतुलं किं तद्यशो निर्मलं । पारावारपरम्परोपरिसरेष्वाजन्मतः**

प्रस्थितम्। दृष्टे शाहमहीपतौ मतिमतामित्थं मतिः प्राभवद् । धात्रैकत्रभरीकृतः स्वभरितः सर्वो गुणानां गणः ।। १७

अर्थ – सागराप्रमाणे अनेक विषयांत जन्मजात असलेली त्याची अतुलनीय निर्मल कीर्ती पुनःपुन्हा वर्णन करण्यासारखी आहे. शहाजीराजांचे दर्शन झाल्यावर बुद्धिमंतांना असे वाटत असे की, विधात्याने सर्व सद्गुण एकाच ठिकाणी भरलेले दिसतात.

तद्राज्ञो रजनीकरस्य ललिते ज्योत्स्नेव शोभावहे । द्वे भार्ये सुबभूवतुः शुभगुणे शोणाधरे शोभने । तत्राद्याऽभवदादराद्यदुकुलोत्तंसा जिजाम्बाभिधा । त्वन्या तन्महितान्ववायमहिता ख्याता तुकाम्बा तथा ।। १८

अर्थ – चंद्राप्रमाणे आल्हाददायक असलेल्या त्या राजाला चांदण्यांप्रमाणे शोभणाऱ्या शुभगुणांच्या, लाल ओठ असलेल्या, सुंदर आणि चतुर अशा दोन भार्या होत्या. पहिली जाधव कुलातील आदरणीय अशी जिजाबाई नावाची, तर दुसरी प्रसिद्ध अशा मोहिते कुलातील तुकाई.

धुर्यास्ता अपराः समाहृतगुणाः सङ्गीतरत्नाकरा । नार्योऽनार्यगुणोज्झिता बहुतरा आसन् पराः प्रेयसि । तासां सन्ततिसन्ततिः समुदभूच्छोभाधरा सद्गुणा । सर्वा शाहमहीपतिं सुचरितैरानन्दयाञ्चक्रिरे ।। १९

अर्थ – गुणांचा साठा असलेल्या, अनार्य गुणांचा त्याग करणाऱ्या आणि संगीतधुरंधर अशा पुष्कळच अनेक स्त्रिया त्याच्या प्रेमास पात्र होत्या. त्यांची मोठी संतती सद्गुणी आणि सुंदर होती. त्या सर्व स्त्रियांनी आपल्या आचरणाने शहाजीराजांना आनंद दिला होता.

ज्येष्ठा श्रेष्ठगुणैर्युता सुरसरित्साधारणी धोरणी । नाम्नान्यत्र कनिष्ठतानुलसती निष्ठा कनिष्ठा क्वचित् । मुख्ये स्त्रीजनमण्डने नरपते राज्ञ्यावुभे निर्वृते । मुख्यापेक्षतया ययोरतितरामाज्ञा नरीनृत्यति ।। २०

अर्थ – ज्येष्ठा (जिजाऊ) ही अत्यंत श्रेष्ठ गुण असलेली आणि गंगेसारखी स्थिर गती असलेली (शांत) अशी होती, तर दुसरी कनिष्ठा (तुकाई) धोरणी होती. या दोघी सारख्याच श्रेष्ठ अशाप्रकारच्या आणि स्त्रीजनांना भूषणभूत झालेल्या अशा शहाजीराजांना वाटल्या. महत्त्वाच्या बाबतीत दोघींच्याही आज्ञा पटकन मानल्या जात असत.

### शिवाजी महाराज -

शम्भोः सारकथानुसारवशतः शम्भोः परं सद्गुणं । श्रीशम्भोश्चरणारविन्दनिरतं राजन्यधर्मोद्धुरम् । सा काले समजीजनद्गिरिसुता पुत्रं कुमारं यथा । धाम्नैवाकलितं शिवस्य परमप्रेष्यं शिवाख्यं सुतम् ।। २१

अर्थ – शंकराच्या पराक्रमाच्या कथांना वश होऊन (पराक्रमावर आरक्त होऊन) त्याच्या श्रेष्ठ गुणांची आणि पदकमलांची भक्ती करणाऱ्या पार्वतीच्या क्षात्रकर्मनिपुण अशा कुमार नावाच्या पुत्राप्रमाणे तिनेही (जिजाऊने) योग्य समयी तेजःपुंज अशा शिव नावाच्या शिवावताराला जन्म दिला.

एकं पुत्रमसूत तुष्टमनसा तूर्णं तुकाम्बा ततो । जुष्टं देवगुणैरनन्तबिभवैर्भूजानिभारक्षमैः । राज्ञा राज्यविधौ तथापि बहुशो भाव्यः सुसम्भावितः । श्रीमच्छ्रीशिव एक एव हि कुलोद्धारीभवन् सम्बभौ ।। २२

अर्थ – नंतर लवकरच तुकाईनेदेखील प्रसन्न चित्ताने एका पुत्राला जन्म दिला. तो इंद्राप्रमाणे



भारदस्त, अत्यंत वैभवशाली, दैवी गुणांनी युक्त होता. तथापि (पुढे) राजाला त्याच्या राज्यकारभारात अनेकप्रकारे मान्य झालेला श्रीमान शिवाजी हा एकच कुलाचा उद्धार करणारा ठरला.

बालो वृद्धधियं दधन्नु विदधत्सर्वं च सत्तात्मकं । खर्वो गर्वभरेण वामनमनाः सर्वोपरि भ्राजते। किञ्चित्स्निग्धसुपत्रिताङ्कुर इवोद्वर्धिष्णुतामादधद् । बाल्यादेव बलानुजस्य सकलं चापल्य-मेवाभ्यसत् ।। २३

अर्थ – लहान असतानाही पोक्त बुद्धी असलेला सर्वसत्ताधीश, कमी उंचीचा पण वामनाप्रमाणे स्वाभिमानी वृत्तीचा तो सदैव शोभत असे. किंचित कोवळा अंकुर व पाने फुटून वाढीस लागलेल्या वृक्षाप्रमाणे बालपणापासूनच बलरामाच्या धाकट्या भावाच्या (श्रीकृष्णाच्या) सर्व चापल्याचा अभ्यास करू लागला.

प्रोक्तं मन्त्रिवरैः सुयुक्तिमधुरं युक्तं जिजाम्बाम्बया । मुक्तं पूर्णसपत्निभावभरितैरुग्रैस्तुका-म्बोक्तैः । राजा राज्यभरादिवैभवभिया भ्राजद्भवस्याज्ञया । पुण्यग्राम्णि समाहितो निजधिया वीराग्रग्रण्यं शिवम् ।। २४

अर्थ – सावत्रपणाच्या भावनेने पूर्ण भरून गेलेल्या उग्र भाषणांनी, मंत्रिवरांनी तर्कशुद्ध व मधुर भाषेतून राजास सल्ला दिला. त्यामुळे राजा राजकाजादी उच्च (महत्त्वाकांक्षेची) धास्ती घेऊन शिवदेवतेच्या आज्ञेने विचार करून वीराग्रगण्य अशा शिवाजीला जिजाईसह पुणे गावास घेऊन आला.

म्लेच्छा मोहमुपाययुर्गलबलागल्लां जहुर्मुद्गलाः । शुष्का एव तुरुष्किका हृदि सदा त्रेसुः सुरत्राणकाः । क्षीणाः प्रेक्षणमात्रतः क्षयमुपाजग्मुर्जना यावनाः । स्वल्पैरेव सुवासरैः शिवशिवः शब्दो धरामाभरत् ।। २५

अर्थ – म्लेन्च्छांना संभ्रम झाला, शस्त्रांनी गलबला केला. तुर्कांच्या तोंडचे पाणी पळाले. देवांचे रक्षणकर्ते (क्षत्रिय)ही मनातून भ्याले. दुर्बल झालेल्या यवनांनी हे पाहिले आणि ते पसार झाले व थोड्याच दिवसांत शिवशिव (शिवाजी-शिवाजी) हा शब्द सर्व धरतीवर गरजू लागला.

सर्वाण्येव सदा महेन्द्रवदसौ वज्रीभवद्वैरिणां । कर्माण्यप्रतिमानुषाणि रचयन्नना-विधान्यादरात्। नित्यं नीतिविशारदैः परिजनैः प्रोत्साहयुक्तैर्वृतः । पारावारपरिष्कृतामपि शिवो विश्वम्भरामावृणोत् ।। २६

अर्थ – इंद्राप्रमाणे आपली सर्व अतिमानवी कर्मे अनेक प्रकारांनी योजून शत्रूला तो वज्राप्रमाणे झाला. शिवाजीने सदैव नीतिमान अशा उत्साही सहकाऱ्यांच्या सान्निध्यात असल्यामुळे जणू काही समुद्राने वेढलेल्या पृथ्वीलाही आवर घातला.

श्यामास्याः समरे जिता रणपराः पिष्टाः पठाणाः पुनर्नानाभेदपरास्तथा प्रमृदिता वैजापुरा-श्चोत्कटाः । कर्णाटाः करदीकृताः कपटिनोऽप्याकण्ठतः कुण्ठितास्तत्को नाम नरः शिवस्य धुरि यः पञ्जान्तरं नागतः ।। २७

अर्थ – त्याने यवनांना पराभूत केले, पठाणांचा पिट्टा पाडला, विजापूरच्या मातब्बर फितुरांचे निर्दलन केले, कर्नाटकी लोकांना कर देण्यास भाग पाडले, कपटी लोकांना कंठस्नान घातले. शिवाजीराजांच्या कचाट्यात कोण सापडला नाही?

विश्रान्तैर्निजभालदेशविलसच्चन्द्रांशुमन्दाकिनी । कल्लोलांशसुमिश्रितैः पुरभिदः पूर्णैः कटाक्षोत्करैः । शुद्धास्तेन सुपर्वता बहुविधा बद्धाः शिवेनादरात्तत्तन्मूर्ध्नि नृसिंहवह्निविभवाः

सिंहा निबद्धाः कति ।। २८

अर्थ – आपल्या भालप्रदेशावर विलसणाऱ्या चंद्राच्या किरणांत गंगेच्या लाटांचा अंश मिसळून विश्रांती मिळालेल्या, शंकराच्या उत्फुल्ल कटाक्षाने पर्वत शुद्ध (शुभ्र) झाले. शिवाजीने प्रयत्नाने ते अनेक प्रकारांनी बद्ध केले आणि त्यांच्या शिखरावर नरसिंहाप्रमाणे तेजस्वी वैभवसंपन्न अशा कितीतरी वीरांना बसविले.

**रात्रेर्मध्यभरे भरत्यतिभराद्भेरीभरे निर्भरे । गर्जत्यद्भुतरूपधृक्शिवनृपेणोच्चैर्मटैरुद्भटैः। छेदीकृत्य गृहस्थलेषु विविधान्नारीनरान्भूरिशः । शास्ताखानसमान आसुरवरश्रेटीचपेटीकृतः ।। २९**

अर्थ – भर मध्यरात्रीला भेरींचा ध्वनी उठत असताना अद्भुत रूप धारण करणाऱ्या शिवाजीने व त्याच्या पराक्रमी सैनिकांनी गर्जना करीत वाड्यात ठिकठिकाणी भगदाडे पाडून अनेक पुरुषांना व स्त्रियांना अनेक प्रकारांनी (शासन करून) शाहिस्तेखानसारख्या बलाढ्य राक्षसाला आपल्या कचाट्यात आणले.

**सामन्तप्रमुखाः सचन्द्रदलवीमुख्यादयो दुर्मुखा । दुर्दान्तास्तरसा धृताः सहगृहाः कारागृहे स्थापिताः । युद्धप्रारभणैः कृता यमपुरप्रास्थानिकाः केचन । भ्रष्टाः केचिदवि(व)भ्रमन्त्य–भिभवाद्भीमे भराट्सङ्घवत् ।। ३०**

अर्थ – सावंत, चंद्रराव (मोरे), दळवी (जसवंतराव) इत्यादी दुर्मुखलेल्या परंतु दुर्दान्त असलेल्या प्रमुख शत्रूंना वेगाने पकडून कारागृहात टाकले. युद्ध आरंभिल्यामुळे कित्येक यमपुरीचे पाहुणे झाले. तसेच कित्येक .......

**युद्धं शुद्धमधारि षट्दशसमाः प्रत्ता वरिष्ठा नगा । गत्वा दर्शनमाचकार सहसा दिल्लीश्वरस्या–प्यहो । स्वीयं राज्यमथो बभार सहसा स्वल्पैरहोभिः स्वयं । चित्रं चारुतरं शिवस्य चरितं को वाऽनुगन्तुं क्षमः ।। ३१**

अर्थ – सोळा वर्षे युद्ध झाले. अनेक मोठे गड शत्रूला दिले. (पुरंदरचा तह) अकस्मात जाऊन दिल्लीश्वराचे (औरंगजेबाचे) दर्शन घेतले आणि तितक्याच आकस्मिकपणे अल्पावधीत स्वराज्य निर्माण केले. असे हे आश्चर्यकारक आणि अत्यंत रमणीय श्री शिवचरित्र समजून घेण्यास कोण समर्थ आहे?

**नानादेशनिदेशधर्मनिपुणाश्छत्राधिनाथैरलं । मान्या नामिकजस्य यस्य वितता नामावली पप्रथे । आश्चर्यं सुमहत्प्रतापनिकरैर्जाज्वल्यमानोऽपि सन् । जातः श्रीशिवभूपतेश्च विषये दिल्लीश्वरोऽनीश्वरः ।। ३३**

अर्थ – देशविदेशातील अनेक धर्मपरायण छत्रपतींना पूर्णपणे मान्य झाले. त्या अनेक अनामिकांची विस्तृत नामावली प्रसिद्ध झाली. परंतु महद् आश्चर्य हे की, आपल्या पराक्रमाने जाज्वल्यमान असलेला दिल्लीचा बादशहादेखील शिवाजीराजांच्या प्रदेशात सत्ता मिळवू शकला नाही.

**शलिप्सों कुतुपाभिधस्य विलसत्कौटिल्यवारांनिधे । विंस्मृत्याखिलराजनीतिरचना गत्वा ददौ दर्शनम् । श्रीमच्छ्रीशिवविक्रमार्कविहितां विश्वोपकारक्षमां । क्ष्मानाथः समनुक्रमेण सकलां चर्यां चरीचक्रमे ।। ३४**

अर्थ – राजनीतीतील सर्व नीतितत्त्वे विसरून त्याने कल्याणाची इच्छा करणाऱ्या परंतु सागराप्रमाणे अपार कुटिलपणाने विलसणाऱ्या कुतुबशहाला स्वतः जाऊन भेट दिली. श्रीमान शिवाजीरूप विक्रमादित्याच्या विश्वाला उपकारक ठरेल अशा सर्व चरित्राचा क्रमाने आढावा पृथ्वीपती शंकरच घेऊ शकतो.

**प्राणा एव बहिश्चराः खलु सुरत्राणस्य ये सम्मता । ये ख्यातास्तु समस्तदेशविषये खानाः खुरासानजाः । ते खड्गेन शिवेन सम्भ्रमवशात्खण्डीकृता लुण्ठितास्तेषामेव हि दण्डनेन शमते भूमण्डलाखण्डलः ।। ३४**

अर्थ – देवांचे रक्षणकर्ते क्षत्रिय व येथील जनतेचे प्राणभूतच या देशात जे खुरासानमधील प्रसिद्ध खान होते, त्या सर्वांना शिवाजीने आपल्या समशेरीने ठार केले, त्यांना लुटले. अशांना शासन केल्याने पृथ्वीवरील इंद्रासारखा राजा शांत होत असतो.

**येन त्वेकनिशि प्रसह्य सबलाप्यौरङ्जेबस्य सा । सेना रावणसन्निभस्य मरिता युद्धाब्धि–सन्तारिणी । स्वेनैवाशु घटीचतुष्टयमितं न्यक्कर्णधारीकृता । नौकेवोग्रभटैरुदग्रकपटैरान्दोलनां दोलिता ।। ३५**

अर्थ – शिवाजीने एका रात्रीतच रावणासारख्या औरंगजेबाची प्रबळ सेना आवेशाने युद्धरूपी समुद्रात लोटली आणि लवकरच चार घटकांच्या अवधीत खाली आणून ताब्यात घेतली व अतिशय कुशल व शूर सैनिकांकडून नावेप्रमाणे हेंदकाळत ठेवली.

**गर्वश्चेदिलभूपतेर्धृतिभरो वजीरवर्गस्य तु । त्रासो हिन्दुगणस्य हृद्रत उतोत्कर्षोऽसिता–स्यात्मनाम् । शल्यं श्रीतुलजाम्बिकाहृदयतः संशो(क्षो)भ्यमाणे शिवे । बिच्छूच्छालनतः पतत्यफजले किं किं क्रमान्नापतत् ।। ३६**

अर्थ – विजापूरच्या आदिलशहाचा गर्व, त्याच्या वजिरांचे धैर्य, हिंदूंच्या मनास होणारा त्रास आणि भीती, यवनांचा उत्कर्ष हे श्रीतुळजाभवानीच्या हृदयातील शल्य होते. शिवाजी प्रक्षुब्ध झाला असता त्याने अफझलखानावर बिचवा उगारून मारला आणि नंतर काय काय घडले नाही?

**बिच्छूच्छालननिपातितः क्षितिभृता पट्टा कपाले हतो । घट्टाटोपभरात्तथापि तरसा पल्लङ्किकामग्रहीत् । पश्चात्क्लेशभरैरकृन्ति च शिरः कष्टं सुरा अब्रुवन् । कालस्याप्यफजल्ल–खानकलने कालो न संलक्ष्यते ।। ३७**

अर्थ – बिचवा उगारून पाडल्यावर शिवाजीराजांनी त्यांच्या कपाळावर पट्टा मारला, त्याच आवेगाने हातात सुरा घेतला आणि नंतर क्लेशपूर्वक त्याचे शिर कापले. देवांनीही कारुण्योद्गार काढले. साक्षात काळ असलेल्या अफझलखानाला मारण्यास फार वेळ लागला नाही.

**पूर्वं मासचतुष्ट्याद् हृदि जनास्ता दुर्दशा भेजिरे । किं भाव्यं ह्यफजल्लखाननृपतेर्जाते मिलापे शिवे । द्वित्रैरेव शिवप्रसादभरितैर्दृष्टं क्षणैरद्भुतं । विश्वव्यापि यशः शिवस्य समभूद्विश्वैकभोग्योऽसुरः ।। ३८**

अर्थ – अफझलखानाचे आणि शिवाजीराजांचे काय होईल यासंबंधी चार महिन्यांपूर्वी लोकांच्या हृदयात कालवाकालव झाली होती; परंतु शंकराची कृपा झालेल्या अशा दोनतीन क्षणांतच शिवाजीराजांना विश्वव्यापी असे आश्चर्यजनक यश मिळाले आणि तो जगन्मान्य असा परमेश्वरच झाला.

**सम्पातादफजल्लकस्य तुलजासंस्थानशालान्तरे । सन्तोषादुदभूदलं किलिकिलाशब्दो महानद्भुतः । तालोत्तालविमिश्रणाच्छिवनृपस्याश्चर्यसङ्घातनात्सञ्जातः करतालिकाकलरवः**

श्रीकालिकायाः पुरः ।। ३९

अर्थ – अफझलखानास संपवल्यानंतर तुळजाभवानीच्या प्रतिष्ठानामध्ये आनंदाचा अद्‌भुत असा कलकलाट झाला. कालीदेवीच्या पुढे गर्जना आणि टाळ्या यांच्या मिश्र आवाजामुळे आणि शिवाजीराजांच्या आश्चर्यकारक अशा आघातामुळे कडकडाट झाला.

**कालुष्यन्तु कलेः समागतमयो मोहस्य मोहान्धता । मालिन्यस्य विकासता प्रतिहता क्रोधस्य लोभस्य च । तृष्णाख्या ललना विमर्दिततनुस्तत्राभवत्तत्क्षणात् । पापोप्यप्रतिभः शिवक्षितिभृता पापेऽफजल्ले हते ।। ४०**

अर्थ – कलियुगावर आलेला काळिमा, मोहाने आलेला आंधळेपणा, मालिन्य, क्रोध आणि लोभ या सर्वांचा (अफझलखान मेल्यामुळे) विकास थांबला. त्याच क्षणी तृष्णारूपी स्त्रीची काया चेपली गेली आणि पापालाच लाज वाटली.

**सङ्क्रान्तं किल कालसन्निभभटैरत्युद्धटैरुत्कटं । प्रध्वस्तं बलमस्फुटस्फुटतरं सङ्काल्यमानं क्रुधा । विश्वान्तस्पृगखर्वशर्वमहिमासर्वस्वसंस्थापकं । सर्वं सद्यवनैर्व्यलोकि- यमवत्तज्जावलीकाननम् ।। ४१**

अर्थ – यासारख्या शूर अशा सैनिकांनी क्रोधाने उसळलेल्या आणि लपून बसलेल्या छुप्या आणि उघडपणे दिसलेल्या सैन्यावर जबरदस्त हल्ला केला. जावळीच्या त्या अरण्यावर शंकराचा अत्युच्च महिमा जणू क्षितिजाला स्पर्श करीत आहे असा त्या यवनांना भास झाला.

**देवाः प्रापुरलं हवींषि सुखिनो गोब्राह्मणाः स्युर्यदा । शेषस्यापि शिरस्थधूरभिहता भूमण्डलं निर्मलम् । त्रैलोक्यस्थितिसञ्चरत्सुकृतिसम्मत्या त्वदीयं तदा । मान्यं मानदकस्य नोऽभवदिदं वीराग्रगण्यं रणम् ।। ४२**

अर्थ – देवांना भरपूर हवी मिळाला, गोब्राह्मण सुखी झाले, शेषाच्या डोक्यावरील पृथ्वीच्या भारालाच धक्का बसला, भूमंडळ निर्मळ झाले. (हे शंकरा) त्रैलोक्याच्या सुस्थितीसाठी संचार करणाऱ्या सत्कर्मांच्या संमतीने आणि तुला मान्य असलेल्या तसेच आमचाही मान राखणाऱ्या अग्रगण्य वीरांनी हे युद्ध केले.

**चञ्चच्च(विष्णुद्वेष?) सतृष्ण एव नितरामासीत्पुरा प्रेमतः । शम्भुस्नेहपराङ्- मुखोऽप्यतितरां मूढो वरीवर्तते । तद्वद् दुष्टदिलीश्वरोऽपि निवसन् लग्नोऽस्ति युद्धोद्यमे । नो जानाति यथैव कालयवनः कालं शिरःस्थं स्वकम् ।। ४३**

अर्थ – पूर्वी विष्णुद्वेष्टा, शंकराच्या भक्तीला पारखा झालेला, अत्यंत लोभी असा एक विलक्षण मूर्ख ठरला आणि त्याच्यासारखाच दुर्वर्तनी. दिल्लीश्वर असाच युद्धाच्या उपद्व्यापात गुंतला गेला. त्या यवनाला आपल्या डोक्यावर काळाचाच आघात होत आहे हे लक्षात आले नाही.

**सर्वेऽपि प्रतिपन्थिनः प्रसरिता अन्तर्बहिःस्था जना । जानीते जनतागतो जनपदः का नो गतिर्भाविनी । प्रत्यूहप्रतियातिकातिशुभदा शम्भौ नृपे सर्वदा । शम्भुस्नेहपरम्परैव नितरां वर्वर्ति सर्वोपरि ।। ४४**

अर्थ – सर्व अंतर्बाह्य, सर्व विरोधक दूर झाले. आपल्या देशास काही भवितव्य आहे हे जनतेच्या लक्षात आले. शंकराच्या भक्तीची परंपरा शिवाजीसारखा राजा असताना नेहमीच विघ्नांचा विरोध करून शुभकारक असा विजय प्राप्त करून देते.

**चञ्चचन्द्रकपालकुण्डलधरो वेतालतालोत्करैस्तालोच्चैस्तिरयंस्तरन्नतितरां तारुण्यलीलां वहन् । नृत्यं नृत्यविशारदोऽप्यभिनयन्शुद्धाञ्जलीर्मण्डलीर्मन्दं मण्डयति स्म मण्डलमथो देवो मृडानीपतिः ।। ४३**

अर्थ – कपाळावर सुंदर मंडलाकार चंद्रकोर धारण करणारा, वेताळानी वाजविलेल्या टाळ्या आणि गर्जना यामुळे स्वतःला लोपविणारा आणि पुन्हा पूर्वस्थितीवर येणारा व तारुण्याची शोभा धारण (शोभायमान) करणारा नृत्यविशारद असूनही ओंजळीच्या आकाराच्या मंडलाचा अभिनय करीत गौरीपती शंकर भगवान जगन्मंडळाला सौम्यपणे शोभा देत होता.

**शाम्यच्छ्रीतुलजाविरोध्यफजलोत्साही विदेहीभवन् । विश्वव्यापितभक्तवत्सल इति प्रोद्यत्प्रवाही पुनः । विश्वस्योद्धरणं कृतं कृतमिति प्रेम्णा सुरास्त्वब्रुवन् श्रीमच्छ्रीशिव- वंशसङ्कटहरो हृद्यं हरो नृत्यति ।। ४६**

अर्थ – तुळजाभवानीचा विरोधक अफझलखान याचा विरोध शमवून विदेही होणारा; परंतु विश्वव्यापी भक्तवत्सल अशा कीर्तीचा श्रोत अशा शंकराने विश्वाचा उद्धार केला असे सुरवर प्रेमाने म्हणत होते. त्या शंकराने श्रीमान शिवाजीराजांच्या वंशावर आलेल्या संकटांचा नाश केला आणि तो रमणीय असे नृत्य करीत राहिला.

**हर्षोत्फुल्लविलोचनो निजजनोत्कर्षं सतर्षं वहन् । शीर्षे चन्द्रकलाम्बु- निर्झरझरीधारानुकारान्नयन् । धारावाहिकया कयापि कलया लोकान्समुद्धारयन् । श्रीमच्छ्रीशिववंशवैभवविधौ भव्यो भवोऽभूत्क्षणात् ।। ४५**

अर्थ – हर्षोत्फुल्ल नेत्रांचा, आपल्या भक्तांचा अभिमानाने उत्कर्ष करणारा, मस्तकावरील चंद्रकलेच्या अमृतरूप जलधारांच्या ध्वनींचे अनुकरण करून सतत कोणत्या ना कोणत्या मार्गाने भक्तांचा उत्कर्ष करणारा श्रीशंकर श्रीमान शिवाजीच्या वंशाची कीर्ती एका क्षणात वाढविता झाला.

**एतस्मिन्समये निरस्तकुहकाः प्रेङ्खत्प्रतापोत्कटाः । प्रेक्ष्यन्ते परितः पुरस्तत इतःप्रोद्य- त्प्रतापोज्झिताः । भेरीभाङ्कृतिसम्भ्रमेण भरिताः श्यामायमाने वने । खड्गाः खड्गिकमा- मिलन्ति सुभटाः कण्ठीरवोद्यत्स्वनाः ।। ४६**

अर्थ – यावेळी दुष्टाव्याचा निरास करून सतत चाललेल्या युद्धामुळे (पराक्रमामुळे) समोर, अवतीभोवती, इतस्ततः फिरणाऱ्या शत्रूचे वीर सैनिक प्रतापगड परिसरात भरकटत असल्याचे दिसत होते. रणभेरींच्या निनादात संभ्रमित होऊन त्या अंधारात तलवारींना तलवारी भिडत होत्या आणि त्या अरण्यात शूर सैनिक सिंहगर्जना करीत होते.

सुरत्राणीयसैन्यास्तथा

**सर्वत्र प्रथितप्रशस्तयशसा पृथ्वीतले पार्थिवः । श्रीमच्छाहसुवंशमण्डनमणेरद्धा शिवस्या-धुना किं वक्तव्यमतो नु शौर्यमसुरैकाङ्क्षिताङ्गीकृता ।। ४७ छत्रं रायगिरौ धृतं धृतिमता सिंहासनं साधितं शत्रूणां शमनं कृतं सुबहुशो म्लेच्छाः क्षयं प्रापिताः । आबाल्याच्छिवमातृभक्तिरतुला सम्यक्समासादिता तस्यैवोग्रबलेन सर्वजगती- साम्राज्यमासादितम् ।। ४८ तस्यानेकनरेन्द्र-सेवितपदद्वन्द्वस्य निर्द्वन्द्वसद्भावाबोधमयी मयीति सुखदा शक्तिः शुभाऽसीत्पुरा । पीयूषां शकलेन कल्पकतरोर्वल्लीव जन्मान्तरे रत्नं रत्नपुरेश्वरस्य भवति प्राक्कन्यकाख्यं परम् ।। ४९**

अर्थ – देवांच्या मदतीस असलेले सैन्य, सर्वत्र योग्य आणि पसरलेली कीर्ती असलेला पृथ्वीवरील राजा, श्रीमान शहाजीच्या उत्तम वंशाला शोभणाऱ्या शिवाजीसारख्या रत्नाविषयी व

शौर्याविषयी काय बोलावे? असुरांनी मात्र एकांगीपणाचाच अंगीकार केला. धैर्याने रायगडावर छत्र आणि सिंहासन धारण केले. शत्रूंचा नाश केला. मोठ्या संख्येने म्लेच्छांना मारले. बाल्यापासूनच मातृभक्ती अतुलनीय अशी साध्य केली आणि त्याच्याच विशेष प्रभावाने सर्व जगावर साम्राज्य मिळविले. अनेक राजांनी त्याच्या चरणावर आपली सेवा वाहिली. त्याची निर्द्वंद्व आरि सद्भावपूर्ण आणि ज्ञानपूर्वक अशी पुण्यमय आणि सुखदायक शक्ती माझ्या ठायी पूर्वी होती. (किंवा पुरी होती) कल्पतरूच्या शाखेने अमृतवल्लीच जणू जन्मांतराने रत्नपुरेश्वराला अगोदर उत्तम कन्यारत्नच होते. (?)

**राजानो बहवो धृताः खलु....**

**बन्धः सुसिद्ध एव । अङ्कुरितवैरिभावान्तःकरणतया शम्भुसंज्ञां प्रविष्टस्य पुरोहितसूनोः किञ्चिद्वक्रिमभावो विभाव्यते पितुः पुत्रस्य च । स्वस्य वासनानुबध्नानुबद्धसम्बन्धा अपि त्रयस्त्रिगुणात्मिकां शरीरसम्पदं प्रापुरेवं सूचनामात्रप्रदर्शनं विहितमात्र ग्रन्थगौरव-भयाद्गौरवेणाऽलम् ।**

पुष्कळ राजे पकडले गेले...

बन्ध हा सिद्ध आहेच. मनामध्ये वैरभाव निर्माण झाल्यामुळे शंभू नावात गुंग झालेल्या पुरोहित पुत्राला किंचित वाकडेपणा आलेला असण्याची शक्यता आहे. पिता आणि दोघे पुत्र, आनुवंशिकतेमुळे तिघांना (शुद्ध, सात्विक नव्हे तर) त्रिगुणात्मक शरीरसंपदा लाभली. इतकीच फक्त सूचना या ठिकाणी करून ठेवली आहे. ग्रंथ फुगेल म्हणून विस्तार करीत नाही.

### संभाजीजन्म -

**श्रीशम्भोश्चरणानुसेवनरतौ तौ दम्पती सर्वदा । तत्तत्काल उपागतान्बहुविधान्सम्पूजयन्तौ सुरान् । प्रेमोद्रेकमुपेयुषोरनुदिनं स्वल्पैरहोभिस्तयोः । शम्भुः प्रादुरभूत्सुतः शुभतरः स्वामी कुमारप्रभः ।। ५१**

अर्थ – शंकराच्या चरणसेवेत तल्लीन झालेले ते दाम्पत्य वेळोवेळी येणाऱ्या अतिथींचा सत्कार करीत असे. त्यांना नेहमी त्यातच आनंद वाटत असल्यामुळे थोड्याच दिवसांत त्यांना कुमारस्वामीप्रमाणे शुभंकर असा शंभू नावाचा मुलगा झाला.

**राज्यं वृद्धिमुपागतं बहुतरं शौर्यं शिवेनार्जितं । कीर्तिर्दक्षु दशस्वपि प्रसरिता प्रत्यक्षभूचन्द्रिका। शम्भोरद्भुतविक्रमस्य विशदं श्रीविक्रमार्कानुगं । विज्ञातं सकलैर्जनैस्तु जनुषो माहात्म्यमन्यादृशम् ।। ५२**

अर्थ – शिवाजीराजांचा आपल्या शौर्याने भरपूर राज्यविस्तार झाला. चंद्राप्रमाणे त्यांची कीर्ती दशदिशांत पसरली. अद्भुत पराक्रमी आणि विक्रमादित्याच्या पावलावर पाऊल टाकणारे शिवमाहात्म्य निर्मल व आगळे असल्याचे सर्वांना माहीत झाले.

**तस्याः श्रीशिवभक्तिभावभरितहृदयश्रीशिवभूपपट्टराज्ञ्या जातिस्मृतिप्रत्यासत्यवगतं जन्मान्तरीय–वृत्तान्तजातं विशदयामः। सां किल सोमान्ववायमण्डनायमानरत्नपुरेशमहा-महीपालपुत्रिका ललामा कमनीयतररमणीयरूपे द्विजदैवतैकनिष्ठा कनिष्ठी-कृतवसिष्ठवामदेवादिब्रह्मर्षिस्वरूपे नारदादिदेवर्षिदीधित्यनुरूपे कस्मिंश्चिन्निजपुरोधःपुत्रे प्रेमातिशयमहिम्ना पुत्रभावनां कलयाञ्चकार ।सोऽपि पञ्चगौडान्तर्गतद्विजाग्रणीर्गुण-गरिमनिविष्टहृदयः सहृदयः सुतरां स्वसौन्दर्यसौष्ठववशीकृतसुरसुन्दरीमपरां त्रिपुरसुन्दरीं सुन्दरीं**



**मातृभावनया भावयामास । एवं निरतिशयानुपमेयाप्रमेयप्रेमसम्भारभरितमनसोस्तयोः कौसल्यारामयोरिव सर्वजनमनोरमा एकाहोरात्रत्रुटिकासहनशीलः सीताकुशीलवलयसमानो शिशिरीकृत- सर्वशरीरावयवः कश्चिदपूर्वः स्नेहकलाकलापः शुद्धान्तःकरणयोर्निष्प्रत्यूहं प्रतिफलति स्म ।**

अर्थ – श्री शिवभक्तीने हृदय भावभरित झालेल्या शिवाजीच्या पट्टराणीचा मागच्या जन्माचा सर्व वृत्तांत (योगातील) जाती, स्मृती, प्रत्यासत्तीच्या साहाय्याने स्पष्ट करतो. ती सोमवंशाला शोभणाऱ्या रत्नपुरेशाच्या महामहीपालाची सुंदर, विलोभनीय, रमणीय, देवब्राह्मणावर निष्ठा असलेली, वसिष्ठ–वामदेवादी ब्रह्मर्षींच्या स्वरूपालाही कनिष्ठ ठरविणारी, नारदादी देवर्षी–दीधितींना अनुरूप अशा आपल्या पुरोहिताच्या पुत्रावर ती कन्या अत्यंत प्रेमाने पुत्रभावना धारण करीत होती. पंचगौडापैकी श्रेष्ठ गुणांमध्ये मन रमविणारा सहानुभूतीपूर्ण असा ब्राह्मणश्रेष्ठ आपल्या सौंदर्याने व सौष्ठवाने अप्सरांना वशीभूत केलेल्या, दुसरी त्रिपुरसुंदरीच, अशा त्या सुंदर (कन्यकेला) तोही मातृभावनेनेच पहात होता. अशा प्रकारे निरतिशय, अनुपमेय अशा प्रेमसंभाराने मन भरलेल्या, कौसल्या आणि रामाप्रमाणे सर्व जनांमध्ये मनोरम, एक दिवसाचाही खंड पडताच विरह सहन न होणारा, सीता–कुश–लव यांच्यातील एकात्मतेप्रमाणे सर्व शरीरावयव शिशिर केलेला एक अपूर्व असा स्नेह, कलेचा समूह शुद्ध अंतःकरणाच्या त्या दोघांमध्ये विनाप्रतिबंध निर्माण झाला, ज्यात काही अडसर राहिला नाही.

### राजारामजन्म -

**राजाः शम्भुगुणान्विता बहुतराः स्युर्ममकीनाः सुता इत्येवं प्रतिवासरं दृढतरां दुर्वासनां सन्दधे । शम्भौस्तत्तपसः प्रभाववशतः शम्भुः क्रुधैवानु किं राजाराममिति प्रियं द्रुततरं पुत्रं द्वितीयं ददौ ।। ५३**

अर्थ – शंकरासारखे गुणयुक्त असे पुष्कळसे पुत्र मला असावेत अशी प्रबळ वासना राजा सदैव बाळगून होता. शंकराच्या तपाच्या प्रभावाने शंकराने जणू रागानेच प्रिय राजाला राजाराम नावाचा दुसरा पुत्र दिला.

### महाराणी सोयराबाई -

**शर्मिष्ठेव गरिष्ठगौरवभरा निष्ठावती सर्वदा पत्युः पादसरोजसेवनसमारम्भैकनिष्ठा सती । जाता श्रीमहितान्वयेऽतिमहिता श्रीसोयराम्बा परा राजारामसुतेन सम्भ्रमवती लोकैरलोकि स्फुटम् ।। ५४**

अर्थ – पतीच्या पदकमलांची सेवा करणारी, अत्यंत निष्ठावान, शर्मिष्ठेप्रमाणे गौरवप्राप्त अशा मोहिते घराण्यातील अत्यंत मान्यता पावलेल्या सोयराबाईला राजाराम हा पुत्र प्राप्त झाल्यामुळे भांबावल्याची (दुसरा वारस निर्माण झाल्यामुळे – संपादक) जनलोकांत चर्चा सुरू झाली.

**विष्वग्विदृ(द्रु)मसम्भवा व्रततिका विस्तारभावं गता व्याप्नोत्येव हि विस्तृतं विभुतरं सिन्धुं यथा सर्वतः । श्रीशम्भोरतिमानुषा गुणगणा लीनास्तदङ्गऽप्यहो तत्सम्बन्धिन एव दुःखनिचयैर्ना–नाविधैरावृणोत् ।। ५५**

अर्थ – सर्व बाजूंनी फोफावलेल्या पोवळ्याच्या वेली ज्याप्रमाणे विस्तृत आणि अथांग, व्यापक अशा सागराला व्यापून टाकते, त्याप्रमाणेच शंकराचे दैवी गुण तिच्या अंगातही उतरले आणि त्यांच्या संबंधांमुळे अनेकविध दुःखांनी ती भरून गेली.

तथापि राजा रमणीयरीतिं कनिष्ठभावैर्भरितो जहौ किम् । ज्येष्ठे सुते शम्भुनरेन्द्रसंज्ञिके सन्ध्याविहीनस्तु(नं तु) शिवार्चनं यथा ।। ५६

अर्थ – शंभूराजा हे ज्येष्ठ पुत्र असताना राजारामाचे रमणीय असे वर्तन पाहून संध्या न करता शिवार्चन करणे याप्रमाणे मनात कनिष्ठता ठेवून त्याचा त्याग केला का?

शिवस्य शम्भोरनुरागिणोरलं दिनेषु गच्छत्सु तयोरतिस्फुटम् । प्राचीनसंस्कारविशेष आदौ विरुद्धतामङ्कुरयाश्चकार ।। ५७

अर्थ – शिवाजी आणि संभाजी यांच्यावर उत्कट प्रेम करण्यात दिवस जात होते; परंतु विशेष अशा प्राचीन संस्कारांचा परिणाम झाला आणि विरोधी भावनेचा अंकुर वाढीस लागला.

* * *



# प्रकरण २

## महाराणी सोयराबाई हट्ट, संभाजीराजांना शृंगारपूरला जाण्याचा आदेश.

(मूळ संहितेतील विभाग ३, अ. ५, श्लो. १–६३, वि.३, अ. ६, श्लो. १–५२, वि.३, अ. ७, श्लो. १–१०९)

---

**महाराणी सोयराबाई हट्ट** (विभाग ३, अध्याय ५)

कवीन्द्र उवाच ।

अथ मोहः शिवनृपं प्रवेष्टुमुपचक्रमे । तथापि लोकपालांशतया तस्य न चक्षमे ।। १ ततः सदाशिवेऽमुष्मिन्विचिन्तितसदाशिवे । स्वसारं निःसहं वीक्ष्य स्वसारं स्वामवीविशत् ।। २ अथ माध्वीमधुरया मृदुगम्भीरया गिरा । आयतापाङ्गपर्यन्तगामिना वीक्षितेन च । स्नैग्धेन सुप्रसिद्धेन वैदग्ध्येन च भूयसा ।। ४ व्यक्ताव्यक्तेन तन्मन्तुज्ञापकनेङ्गितेन च । मीनकेतोः सवयसा वयसा मध्यमेन च ।। ५ नमतोन्नमता धन्वसमेन भ्रूयुगेन च ।। ह्रीतकारदम्बवृन्देन सिञ्जन्मञ्जीरशालिना । जितमन्दग–जेनातिललितेन गतेन च ।। ९

अर्थ – कवीन्द्र म्हणाले, नंतर मोह शिवराजाच्या शरीरात प्रवेश करायला सज्ज झाले; पण त्यात लोकपालांचा अंश असल्यामुळे ते तो सहन करू शकला नाही. सदैव सदाशिवाचे चिंतन करणाऱ्या शिवनृपतीत प्रवेश न करता त्याने आपली बहीण दुर्बल पाहून तिच्यात (सोयराबाई) प्रवेश केला. नंतर मधाप्रमाणे गोड आणि सौम्य पण गंभीर वाणीने, सुंदर कटाक्षानी, प्रेमपूर्वक दृष्टीने आणि चातुर्य प्रगट करून काहीशा व्यक्त व पुष्कळशा अव्यक्त अशा नाराजीच्या लक्षणांनी मध्यम वयातील मदनाला साजेल अशा रीतीने सुंदर दिसणाऱ्या कंबरपट्ट्याच्या आवाजामुळे लहानसा मध्यभाग (कंबर), धनुष्याप्रमाणे वक्र असलेल्या भुवया, कदंब वृक्षांनाही लाजवणारी, वाळ्याच्या छनछनाटाने खुलून दिसणारी व गजगतीलाही जिंकणाऱ्या मोहिते वंशातील राणीने राजाचे मनोरंजन केले.

सरतस्वर्णवलयश्रेणिसौष्ठवशालिना । परिहासकथावेशतरस्तरलितात्मना ।। १०
ऊर्मिकारुचिकिंर्मीरनखरश्मिमहोर्मिणा । पाणिना ताम्रनलिनप्रतिमानतलेन च ।। ११
तालवृन्तानलेनापि मस्तकान्दोलनेन च । क्षुत्तृड्वेलापरिज्ञानविधिना च दिने दिने ।। १२
वसनाञ्चलचाञ्चल्यवशात्प्रचलतां मुहुः । अलकानां ललाटान्तात्सम्यमाकुञ्चनेन च ।। १३
मस्तकादधिकस्निग्धमुग्धकुन्तलहस्तकात् । वसनान्तस्य चलतस्तत्स्थानीकरणेन च ।। १४
अपत्रपाप्रपञ्चेन निचोलाडम्बरेण च । दर्शितोरः सूत्रिकया लीलया च कयाचन ।। १५
तेन तेन च वेषेण विशेषेण विलासिनी । राजानं रञ्जयामास राज्ञी मोहितवंशजा ।। १६ सा
तेन पत्या सुश्रोणी व्यभादतितमां तथा । सर्वास्वपि सपत्नीषु शशिना रोहिणी यथा ।। १७
तस्यामजनयद्राजा राजारामाभिधं सुतम् । महतेऽनिष्ठयोगाय ग्रहं केतुमिवोद्गतम् ।। १८ शिशुः
सुलक्षणोऽप्येष वैलक्षण्यमधात्तथा । उपचित्यापचित्या च पक्षे पक्षे यथा शशी ।। १९
तत्तद्गुणवतीष्वात्मसपत्नीषु सतीष्वपि । राजारामस्य जननी पुत्रिणीऽत्यधिकाऽभवत् ।। २०

आरामेण दृशोस्तेन राजारामेण सूनुना । मुमुदेऽभ्यधिकं माता ममता नाम दानवी ।। २१
मधुरास्फुटया द्राक्षासदृक्षाक्षरया गिरा। स कीर इव वाचाल: पितरौ समरञ्जयत् ।। २२
वैमात्रेयममुं शम्भोरम्भोजसमलोचनम् । बतास्तुत्यमपि प्रीत्या पिता स्तुत्यमिवास्तुत ।। २३

अर्थ – रत्ने आणि सुवर्ण यांच्या बांगड्यांच्या सौंदर्याने शोभणारा, थट्टा-मस्करीच्या भरात हालणारा, अंगठीच्या सौंदर्याने चित्रविचित्र नखकिरणांच्या लाटा निर्माण करणारा हात, तांबूस निळ्या आकृत्या असणारा तळहात लक्ष वेधून घेणारे होते. पंख्याच्या वाऱ्याने मस्तकाच्या आंदोलनाने, रोजच्या भूक-तहान वेळेचे ज्ञान होत होते (?) वस्त्राच्या पदराच्या सतत हालण्याने केसही पुन्हापुन्हा (भुरुभुरु) हालत होते; आणि कपाळाचेही त्यामुळे सुंदर आकुंचन होत होते. मस्तकापेक्षा अधिकच स्निग्ध आणि मुग्ध (मृदू आणि मोहक) केसावरील पदर हालत असता तो परत जागेवर बसविला जात होता. लज्जेचा विलास आणि चोळीचा डामडौल आणि छातीवरील मंगळसूत्र विलासिता सूचित करीत होते. उठावदार पोशाखामुळे (मोहिते घराण्यातील) त्या विलासिनी राणीने आपल्या पतीचे मनोरंजन केले. सर्व सवतीत यामुळे आपल्या पतीबरोबर ती चंद्राच्या रोहिणीप्रमाणे अतिशय शोभत होती. तिला अत्यंत अनिष्ट योगासाठी केतू ग्रहाप्रमाणे राजाराम हा मुलगा झाला. दर पंधरवड्याला चंद्र ज्याप्रमाणे वाढतो आणि कमी होतो, त्याप्रमाणे हा मुलगा सुलक्षणी असला, तरी विलक्षण बने. वेगवेगळे गुण असलेल्या अनेक सवती असल्या, तरी राजारामाची आई पुत्रवती म्हणून वरचढ झाली. डोळे सुंदर असल्यामुळे व पुत्र राजारामामुळे ममता नावाच्या राक्षसी मातेला जास्त आनंद होई. द्राक्षासारख्या मधुर बोलांनी तो पोपटाप्रमाणे बडबड करून आई-वडिलांची करमणूक करी. कमलनयन अशा सवतीच्या शंभूचे कौतुक करायला नको असले, तरी वडील त्याचे प्रेमाने कौतुक करीत.

मनीषिण ऊचुः । कुलैकवर्मणः प्रौढकर्मणः शम्भुवर्मणः । कनिष्ठमपि तं कस्मात्प्रभुः प्रेष्ठममन्यत ।। २४

अर्थ – विद्वज्जन लोक (दरबारी लोक) म्हणाले, ''कुलाचा एकमेव (= प्रमुख) आधार आणि कर्तृत्ववान असलेल्या शंभूराजापेक्षा लहान असलेला राजाराम हा शिवाजी महाराजांचा लाडका का?''

कवीन्द्र उवाच । शम्भोरेव प्रसादेन शम्भुः पितुरनन्तरम् । पृथिव्याः सागरान्तायाः कर्ता राज्यमकण्टकम् ।। २५ रहस्यमिति देवानामवगम्य कलिस्तयोः । अन्तरा वर्तमानस्तमन्तरायं किलाकरोत् ।। २६

अर्थ – कवीन्द्र म्हणाला, ''शंकराच्या प्रसादानेच वडिलांच्या पश्चात सागरापर्यंत पृथ्वीवर निष्कंटक असे राज्य करणारे शंभूराजे होतील, हे रहस्य देवांकडून समजून घेऊन त्या दोघांमधे प्रविष्ट असलेल्या कलीने हा खोडा निर्माण केला.

अतः स तं महाबाहुर्महाबाहुं महाद्युतिम् । द्वितीयं स्वमिवात्मानं जितात्मानं प्रतापिनम् ।।२७ प्रथितं तेजसात्युच्चैश्चतुर्थमिव पावकम् । त्रयोदशमिवादित्यमादित्यपतिविक्रमम् ।।२८ शम्भुं शम्भुकृपावाप्तं स्वनिष्ठं ज्येष्ठमात्मजम् । अवमत्य विमुग्धात्मा कनिष्ठं बव्हमन्यत ।।२९

अर्थ – म्हणून तो पराक्रमी असा राजा संभ्रमात पडला. पराक्रमी, महातेजस्वी, जणू स्वतःचाच दुसरा आत्मा, संयमी, प्रतापी, श्रेष्ठ तेजामुळे जणू चौथा अग्नीच,आदित्यपतीप्रमाणे विक्रमी, जणू तेरावा आदित्यच, शंकराची कृपा प्राप्त झालेला, स्वनिष्ठ, अशा ज्येष्ठ पुत्र संभाजीला कमी समजून



धाकटा हा लाडका झाला.''

मनीषिण ऊचुः । ममतायाः प्रसङ्गेन राज्ञि रायगिरीश्वरे । प्रावर्तत यथा मोहस्तथाभि-हितवान्भवान् ।। ३० अथ क्रोधादयः सर्वे कलिकालनियोजिताः । समस्तान्प्रविविक्षन्तस्तां-स्तांस्तत्राधिकारिणः ।। ३१ प्रावर्तत पथा येन यत्र यत्र यथा यथा । कवीन्द्र परमानन्द निरूपय तथा तथा ।। ३२

अर्थ – ''रायगडच्या स्वामी (राज्ञी) ममतेबरोबरच मोह देखील होता, असे आपण म्हणाला; पण कलिकाल नियुक्त असे क्रोधादी सर्व विकार मातब्बर होऊन प्रविष्ट होऊ पहात होते. जेथे जेथे, जेव्हा जेव्हा, ज्या ज्या मार्गाने ते प्रवृत्त झाले, तसे तसे हे परमानन्द कवीन्द्रा! आम्हाला वर्णन करून सांगावे.''

कवीन्द्र उवाच । क्रोधः पण्डितराजस्य दानधर्माधिकारिणः । प्राविशद्विवशीभूतं मानसं मानसंयुतः ।। ३३ परिक्षयाय महते पात्रापात्रपरीक्षया । मत्वात्मसादिवाशेषमवामंस्त द्विजर्षमान् ।। ३४ किमधीतमधीषे किं किंविधा शेमुषी तव । का श्रुतिः श्रुतिमानीता किं श्रुतं भवता श्रुतम् ।। ३५ पठितानि पुराणानि भवता नूतनानि न । आस्तां तवान्यथा ख्यातिरन्यथाख्यातिवादिनः ।। ३७ न करोति कृति काञ्चिदात्मा तव बतात्मना । चेतसे चेतसेह त्वं प्रकृतिस्ते त्वचेतना ।। ३८ अपि प्रत्ययलोपेऽस्ति यत्र प्रत्ययलक्षणम् । प्रत्येमि त्वन्मतं तद्धि सर्वतन्त्रविलक्षणम् ।। ३९ इतिहासवशादेष इतिहासादिवेदिनः । अधिचिक्षेप चिक्षेप मयप्रकृतिरर्थिनः ।। ४० अबद्धमाहतं म्लिष्टं क्लिष्टश्चैतदनक्षरम् । ग्रस्तं निरस्तमित्यादीन्वदन्नादीनवानयम् ।। ४१ अपेतकरुणोऽत्यर्थं महाकारुणिकः स्वयम् । त्रिकेदेन सुमनसो वाचस्पतिसमानपि ।। ४२ मिलितानर्थिनोऽर्थाय महते द्वारि भूपतेः । वदतः स्वान्यधीतानि वावदूको व्यदूषयत् ।। ४३

अर्थ – कवीन्द्र म्हणाले, दानाध्यक्ष पंडितराज यांच्यात क्रोध शिरला. अभिमानी असला तरी त्याचे मन क्रोधाच्या आहारी गेले. पात्रापात्र परीक्षा करूनही तो सर्व ब्राह्मणांना पूर्णपणे आपल्या काबूत असल्यासारखे मानू लागला; आणि त्यामुळे मोठा नाश ओढवून घेतला. 'तू काय शिकलास? काय शिकतोस? तुझी बुद्धी कशी आहे? कोणता वेद पाठ केलास? वेद ऐकलास का? पूर्वीचीच पुराणे वाचलीस, नवीन नाही ना? तू सांख्य आणि मीमांसक दिसतोस, तेव्हा तुझी विपरीत प्रसिद्धी तुझ्याजवळच असू दे. आत्मा स्वतःहून कोणतेच कार्य करीत नाही ना? आपल्या मनाचेच आत्मज्ञान होणार का? तुमची प्रकृती तर अचेतन आहे, जेथे प्रत्यय प्रत्यक्ष दिसतो, तेथे प्रत्ययाचा लोप असतानाही (काही अनुभव नसातानाही) बुद्धी आहे असे म्हणतात. हे तुमचे मत शास्त्रापेक्षा विलक्षण दिसते.'

(अशा रीतीने) तो इतिहासाचे ज्ञान असलेल्या पंडिताचा इतिहासाच्या परिणामीच अधिक्षेप करू लागला. खोटेपणा अंगी भिनल्यामुळे तो दुःखित आश्रितांना मूर्ख, पराभूत, रानटी, उपद्रवी, अशिक्षित, अंधश्रद्ध, निषेध करण्यासारख्या गोष्टी बोलू लागला. स्वतः दयाळू असला, तरी एकाएकी दया बाजूला ठेवून वाचस्पती, विद्वान, अशांनाही राजद्वारी याचक म्हणून मोठ्या प्रयोजनासाठी आले असता तो स्वतःच्या अधिकाराने त्यांना दूषणे देऊ लागला.

ततस्त्रिजगति ज्ञातैःवज्ञातैरनेकधा । सप्तरस्तप्तिसमैः शप्तस्तप्तिग्मतपस्तमैः ।। ४४ तैर्देवैरिव भूदेवैर्द्विजराज इवोदितः । असौ शिवाश्रितो राजयक्ष्मणा प्रत्यपद्यत ।। ४५ अथ

भक्तान्पशु-पतेः स्वामिसेवापरात्मनः । स्प्रष्टुं न प्रभवोऽभूवन्नमूनेकैकशो यदा ।। ४६ तदा लोभमदक्रोधका-दर्यइह(कामसम्मोह)मत्सराः । अनृतस्तेवनास्तिक्यब्रह्मद्वेषपुरःसराः ।। ४७ तिष्यामात्या इमे तत्र सम्भूय किल सर्वशः । मयूरप्रभृतीनेत्य शिवामात्यानवीविशन् ।। ४८ महापिशाचैरिव तैः प्रविश्यान्तःस्थिता अमी । अधर्मरुचयोऽभूवन्नन्वभूवंश्च वैभवम् ।। ४९ अथ ते प्रतिगोपुच्छं प्रतिमानवमस्तकम् ।प्रतिप्रपं प्रतिगृहं प्रतिपाणिग्रहं तथा ।। ५० प्रतितीर्थाभिषेकं च प्रत्यश्व-त्थपरिक्रमम् । प्रतिपण्याङ्गनापण्यं तथा प्रत्यहितुण्डिकम् ।। ५१ प्रतिदैवतायात्रं च प्रतिग्राम-वनीपकम् । प्रतिप्रेतमभिप्रेतं बलिमाददिरे बलात् ।। ५२ तैरर्द्यमाना दुर्वृत्तैस्तस्य भूपस्य पश्यतः। अनाथा इव भीतास्ताः प्रजाश्चुक्षुभिरेऽभितः ।। ५३ न्यायमेवात्तमित्यस्मै ज्ञापयन्ति स्म मन्त्रिणः।प्रजानां तु करे लग्नः कणिशस्य कणोऽपि न ।। ५४ प्रसभाहतवित्तेभ्यः प्रवृत्तेभ्यः प्रणाशने । बिभ्युरिभ्यास्ततस्तेभ्यो व्याघ्रेभ्यो गोव्रजा इव ।। ५५ मृत्पात्रसङ्ग्रहाः शीर्णवल्कलावृतविग्रहाः। निःस्वीभूय बभुस्तत्र तपस्विन्य इव प्रजाः ।। ५६ लुलुण्ठुः पराराष्ट्राणि पृतनापतयो यथा । महाराष्ट्रपतेस्तस्य राष्ट्रं धीसचिवास्तथा ।। ५७ तस्मादुपहतास्तैस्ते शतशः स्वर्णराशयः । यैः सुमेरुसमैर्नित्यं मुमुदे स महाशयः ।। ५८ यथा यथा महाबाहुः स मुमोहतमां तदा । तथा तथा दिगन्तेभ्यस्तमायान्ति स्म सम्पदः ।। ५९

अर्थ - तेव्हा त्रैलोक्यात ज्ञात आणि अनेक प्रकारांनी अवज्ञा झालेल्या, सूर्याप्रमाणे तीव्र तप आचरलेल्या ब्राह्मणांनी त्या श्रेष्ठ ब्राह्मणाला म्हटले. हा तर शिवाश्रय केलेला, राजयक्ष्मा झालेल्याप्रमाणे शरण आलेला आहे. तेव्हा शंकराच्या भक्तांना स्वामिसेवापरायण असल्याने जेव्हा ते विकार एकेकाला स्वतंत्रपणे स्पर्श करू शकले नाहीत, तेव्हा लोभ-मद-क्रोध-कंजूषपणा-काम-संमोह-मत्सर-असत्य-चौर्य-नास्तिक्य-ब्रह्मद्वेष इत्यादी कलीचे अमात्य सर्वजण एकत्र येऊन मोरोपंतादी, शिवाजीराजांच्या अमात्यांच्या शरीरात शिरले. ते सर्व महापिशाच्चाप्रमाणे अंतरंगात शिरल्यावर अधर्मरूचि होऊन वैभव भोगू लागले. ते प्रत्येक गायीच्या, मानवाच्या, पाणपोईच्या, घराच्या मागे, प्रत्येक लग्नप्रसंगी, तीर्थाभिषेक समयी, जिथे जिथे पिंपळाला प्रदक्षिणा घातली जात असे, त्या ठिकाणी प्रत्येक वेश्याबाजारात, प्रत्येक गारुड्याच्या मागे, जत्रेत, खेड्यात, प्रत्येक स्मशानात जबरदस्तीने हवा असलेल्याचा बळी घेऊ लागले. लोक दुष्टाकडून छळले जात होते आणि ते सुद्धा राजासमक्ष. त्यामुळे अनाथाप्रमाणे भयभीत होऊन प्रजा सर्व बाजूंनी क्षुब्ध झाली. त्याला (राजाला) मंत्री म्हणाले, ''त्यांना न्यायच मिळालेला आहे'' (?) परंतु प्रजेच्या हाताला कणसाचा एकही दाणा लागलेला नाही. वाघामुळे गाईंचे कळप पळावे, त्याप्रमाणे श्रीमंत, पण जबरदस्तीने धन घेणाऱ्या व नष्ट करण्यास प्रवृत्त झालेल्या त्या दुष्टांच्यामुळे भीतिग्रस्त झाले. फक्त मातीची भांडीच शिल्लक राहिली आहेत. अंगावर फाटके कपडेच आहेत, सर्वस्व नष्ट झाले आहे, अशी बिचाऱ्या प्रजेची दैना झाली. परराष्ट्रे आणि सेनापती, महाराष्ट्राचे हुशार मंत्रीदेखील राष्ट्राला लुटू लागले. तो कली त्या सुमेरूप्रमाणे असलेल्या त्यांच्याकडून सोन्याच्या राशी शेकडोंनी घेऊ लागल्यामुळे सतत खूश राहू लागला. जसजसा तो पराक्रमी मोहग्रस्त होऊ लागला, तसतशी त्याच्याकडे सर्व बाजूंनी दिगंत संपत्ती येऊ लागली.

ये दत्तपूर्वास्ताम्रेभ्यस्तेऽमुना प्रभुणा हताः । पर्वताः पर्वतेन्द्रेण प्रबलाः प्रबलादयः ।। ६० अनिष्टमपि यच्चक्रे कालचक्रेण मोहितः ।तदेवेष्टमभूत्तस्य पूर्वपुण्यानुभावतः ।। ६१ यद्यदादत्त हस्तेऽसौ प्रतिपक्षवधोद्यतः । तत्तद्विदुरतां भेजे भगवत्या प्रभावतः ।। ६२ तं



भूपालमपार-बाहुबिभवं मोहेन तेन स्वयं तं तं धीसचिवं च कर्मसचिवं क्रोधादिभिः क्रोधिभिः। आविश्येति निपात्यमानमपथे पश्यन्प्रतापाधिकः स्वं मेने पुरुषार्थमात्मनि किलात्यर्थं कृतार्थं कलिः ।। ६३

इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायामध्यायशतसम्मितायांशुभलक्षण-लक्षितायां वैयासिक्यामध्यायः ।।

अर्थ - ज्यांनी मोगलांना काही दिले होते (?) ज्याप्रमाणे हिमालयाने पर्वतांना, प्रबळांनी प्रबळांना, त्याप्रमाणे त्यांना स्वामीने लुबाडले. कालचक्राने मोहित होऊन त्याने जे काही अनिष्ट केले, तेच त्याच्या पूर्वपुण्याच्या प्रभावाने इष्ट झाले. प्रतिपक्षाला मारण्यासाठी उद्युक्त होऊन जे जे हातात घ्यावे, ते ते भगवतीच्या सामर्थ्याने फुटून जाऊ लागले. बाहुबलाने अमाप पराक्रम करणाऱ्या त्या राजाला मोह पाडून क्रोधाच्या भरात स्वतः आणि हुशार मंत्री आणि अंमलबजावणी करणारे कारभारी यांच्यात शिरून त्यांना चुकीच्या मार्गावर आणून पाहिले. ते ते तो प्रतापी आणि कृतार्थ झालेला कली स्वतःचा पुरुषार्थच मानू लागला.

अनुपुराणे सूर्यवंशे कवींद्र परमानंदाने प्रकाशित केलेला शंभर संहितेतील शुभलक्षणे सांगणारा वैयासिक अध्याय ।।

### महाराणी सोयराबाई हट्ट (अध्याय ६)

**मनीषिण ऊचुः । बत मोहस्य माहात्म्यमतिमानुपतेजसम् । सदाशिवार्चने यत्तं यत्तं शिवममोहयत् ।। १ स बताप्रतिमप्रेमा ममतामतमास्थितः । शम्भुराजे महाराजस्तदा कथमवर्तत ।। २**

अर्थ - विद्वज्जन म्हणाले, ''मोहाचे माहात्म्य पाहा, मनुष्याच्या सामर्थ्यापेक्षा किती वरचढ असते! शंकराच्या पूजेतून शंकरालाच मोह पाडला. बरं मग ममतेच्या (आईच्या) मनावर अवलंबून असलेला, हृदयात अतिशय माया असलेला राजाराम संभाजीराजांविषयी कसा वागला?''

**कवीन्द्र उवाच । कस्याञ्चन निशीथिन्यामतीव विमनायिताम् । प्रसह्य केनचिन्नीत-सर्वस्वामिव दुःस्थिताम् ।। ३ निशम्य सहसा राजा राजारामस्य मातरम् । विवर्ण-वदनस्तूर्णमन्तःपुरमवीविशत् ।। ४ तत्र चित्रमये तल्पे निपेते मणिकुट्टिमे । निःसहां निरलङ्कारां निराहारां निपेतुषीम् ।। ५ चिरस्योपचरन्तीभिः सञ्चरन्तीभिरन्तिके । अवनम्रमुखी-मात्मसखीभिरुपवेशिताम् ।। ६ निषण्णां स्तम्भमालम्ब्य विषण्णां स्तब्धविग्रहाम् । विदूरग्रावजग्रावमयीं पाञ्चालिकामिव ।। ७ दिने दिने हीयमानतमां तनुमिवैन्दवीम् । दशदिग्व्यापिना स्वेन प्रसादेन विना कृताम् ।। ८**

अर्थ - ''एका रात्री अत्यंत खिन्न झालेली कुणीतरी, जबरदस्तीने सर्वस्व लुबाडल्याप्रमाणे वाईट स्थितीला आलेली आहे, असे राजारामाच्या आईविषयी एकाएकी कानावर आल्यामुळे राजा म्लान वदनाने झटकन अंतःपुरात गेला. त्या ठिकाणी त्याला आपल्या पत्नीचे दर्शन झाले. रत्नजडित, रंगीत, सुंदर बिछान्यावर अशक्त, अलंकारहीन, उपाशी पडून राहिलेली, जवळच इकडेतिकडे लगबगीने फिरणाऱ्या दासी बराच वेळ तिची सेवा करून खाली मान घातलेल्या (आपल्या मालकिणीस) बसविण्याचा प्रयत्न करीत आहेत. खांबाला टेकून ती बसली आहे. खिन्न आहे, शरीर ताठ झालेले आहे. जणू पोवळ्याच्या खड्याची बनलेली बाहुलीच. सर्व दिशांना व्यापणारी चंद्रकोर दिवसानुदिवस कमी कमी होत आहे आणि तिच्यातला प्रसन्नपणाही लुप्त झालेला आहे.

परित्र(स्र)स्तालकां तां तां कान्तां समवलोकयन् । व्यषीदत्स विशेषेण न्यप्रीदच्च तदन्तिके ।। ९ नलिनीदलमादाय मृदुलं मृदुमानसः । सतां मणिः सतां तत्र मन्दं मन्दमवीजयत् ।। १० अथोर्वीवल्लभः स्वेन पल्लवेनेव पाणिना । सतर्ष इव पस्पर्श भूयो भूयः स तद्वपुः ।। ११ स्वपाणिस्पर्शमात्रेण प्राणन्तीं प्राणदस्तदा । वसुधावासवः प्राह सुधारसकिरं गिरम् ।। १२ किमपूर्वमभूद्येन यथापूर्वं न वीक्षसे । अन्यादृक्षेव वामाक्षि कार्श्येनानेन लक्ष्यसे ।। १३ यदि नास्ति शिरीषकुसुमप्राये काये च तव कश्चन । गदश्चेदगदङ्कारैः सद्य एवापनोद्यते ।। १४ यदि नास्ति शिरीषकुसुमप्राये काये च तव कश्चन । गदश्चेदगदङ्कारैः सद्य एवापनोद्यते ।। १५ मुग्धे व्यथा कापि मानसे मानसीमिमाम् । अयेऽपलप मा पद्मलपने लप माधुना ।। १६ मा स्निग्धान्परिस्पृष्टनिटिलान्कुटिलानिमान् । समागतेन समया मया नियमयालकान् ।। १७ ममेव विषीद विशालाक्षि निषीद मदुपह्वरे । विलसेः स्वविलासेन हसेः परिहसेरपि ।। १८ स्पृश(श्य)से तव वामोरु सर्वा वसुमती वशे । अवलम्बस्व मामेव किं स्तम्भमवलम्बसे ।। १९ ईदृशीं त्वद्दशां वीक्ष्य न येन तापेन तमावेदय सुव्रते । एनमेन इवोपेतमपनेतुमहं यते ।। २० एवमुक्ताऽमुना भूमेः सुनासीरेण सर्वथा । अनुनीता सुवचसा प्रीयेऽहमयि प्रिये ।। २१ प्रतिवाचमुवाच सा ।। २१

**अर्थ** – अशा अवस्थेत केस विस्कटलेले आहेत अशा पत्नीकडे पाहून त्याला खूप वाईट वाटले व तो तिच्याजवळ बसून राहिला. नंतर अत्यंत कोमल मनाने मऊ असे कमलदल हातात घेऊन त्या सज्जन श्रेष्ठाने तिला शांतपणे वारा घातला. आपल्या पालवीप्रमाणे असलेल्या हाताने व्याकूळ होऊन तिच्या शरीराला पुन्हापुन्हा स्पर्श केला. तिचा तो प्राणदाता पृथ्वीवरील जणू इंद्रच असा राजा, आपल्या केवळ हस्तस्पर्शाने तिला प्राण मिळत असलेला पाहून अमृतरसाचा वर्षाव करणाऱ्या वाणीने असे म्हणाला, ‘‘असे काय झाले आहे की तू पूर्वीसारखी दिसत नाहीस? हे वामाक्षी, तुझ्या या कृश शरीरामुळे तू काही वेगळीच भासत आहेस. शिरीष फुलाप्रमाणे कोमल अशा तुझ्या शरीराला काही व्यथा असेल तर अनेक वैद्य आहेत. त्यांच्याकडून ती आत्ताच दूर करू. शारीरिक व्यथा नसेल, मनात काही सलत असेल तर ते लपवून ठेवू नकोस. वेडे! कपाळावर आलेले हे मऊशार कुरळे केस आवर बघू. योगायोगानेच मी येथे आलो आहे ना? हे विशालाक्षी, वाईट वाटू देऊ नकोस. माझ्या अगदी जवळ बस. आपल्या खेळकरपणाचा विलास दाखव आणि काही मजेदार बोलून हास्याचा खळखळाट कर. हे वामोरू! माझ्याप्रमाणेच तुझाही या पृथ्वीवर अधिकार आहे ना? माझ्या छातीवर मान टेक. खांबाचा कशाला आधार घ्यायचा? हे सुव्रते! जे काही मनात खदखदत असेल ते सांग. पापाप्रमाणे तेही काढून टाकण्याचा मी प्रयत्न करीन. हे प्रिये! तुझी ही दशा पाहून मला बरे वाटत नाही.’’ असे त्या पृथ्वीवरील नरवीराने वारंवार सर्वप्रकारे समजविल्यावर ती गोड वाणीने उत्तरादाखल म्हणाली.

**राज्ञी उवाच । यशसा भवदीयेन महीमिव हि मां हिमाम् । न कदाचन भूपाल तापस्तापयितुं प्रभुः ।। २२ त्वया पीयूषहस्तेन नासत्यसममूर्तिना । दृष्ट्वा स्पृष्ट्वा च पृष्टाहमभवं लब्धजीविता ।। २३**

**अर्थ** – राणी म्हणाली, ‘‘हे राजन, तुमच्या कीर्तीने पृथ्वीप्रमाणेच थंड असलेल्या मला कोणताही ताप दुखवू शकणार नाही. अश्विनी (वैद्याप्रमाणेच) असलेल्या तुमच्या अमृतासारख्या हस्तस्पर्शाने, दर्शन दिल्याने आणि विचारपूस केल्याने मला पुनर्जीवन मिळाले आहे.

**मदर्थमवनीपाल विद्यां सञ्जीविनीमिमाम् । भुवि भार्गवमानाय्य कदा पठितवान्भवान्**



**।। २४ किञ्ज येनामयेनाऽहं दुःसहेन वशीकृता । व्यथामेतावतीमेतवती तमधुना श्रृणु ।। २५ सुकृतैः सुकृतैर्लब्धो राजारामः शिशुर्मया । अदृष्ट्या द्रक्ष्यते ह्येनं शम्भुवर्मा महाशयः ।। २६ विजहासति चेदानीं त्वामिदं मध्यमं वयः । दुरन्तया दिवारात्रं दूयेऽहं चिन्तयाऽनया ।। २७ समर्थः शम्भुरत्यर्थमसमर्थश्च मे शिशुः । अमुना हेतुनाऽमुष्मिन्विमर्शे मदुपक्रमः।। २८ मातरं पितरं पुत्रं भ्रातरश्चापि सोदरम् । घातयन्ति महाराज राजानो राज्यलोलुभाः ।। २९ अनयोऽयं यदनयोरुग्रविग्रहयोरिह । एकत्र स्थितिरग्रेऽपि ग्रहयोरुभयोरिव ।। ३० भवन्तमिव तं सर्वेऽप्यनमन्तं नमन्ति हि । नूनं तदीयतामेतुमतीवोत्सहते मही ।। ३१ अहंयुः स महा–ज्शम्भुवर्मा त्वत्सचिवानिमान् । नमतो मां न मनुते तदवैति न किम्भवान् ।। ३२ अदः सुदुःसहं शल्यमन्तःस्थं सोढुमक्षमाम् । रक्ष मां पक्षमात्मीयं क्षमाजाने जहि क्षमाम् ।। ३३ नियामक भवान्दैवात्पारोक्ष्यं भविता यदा । अविजा भविता पश्य मत्पोतस्यास्य कस्तदा ।। ३४ इदमुक्तवती सा तु रुरोदारुन्तुदारवम् । अभिद्यत यथा सद्यस्तदा हृदपि दारवम् ।। ३५**

**अर्थ** – महाराज, माझ्यासाठी ही संजीवनी विद्या पृथ्वीवरील भार्गवमुनीकडून आपण आणली का? असो, ज्या दुःसह वेदनेने मला हतबल करून टाकले, ती व्यथा मला कशी झाली ते ऐका. पूर्वसुकृताने राजाराम हा बाळ मला लाभला आणि त्याच्याकडे शंभूराजे मात्र नको त्या दृष्टीने पहात आहेत. आपले हे मध्यम वय निघून जाईल याचीच मी रात्रंदिवस काळजी करीत असते. ती चिंता काही सहजपणे दूर होत नाही. शंभूराजा समर्थ आहे. माझा मुलगा मात्र तितकासा समर्थ नाही. त्यामुळे मी हा विचार करू लागले. राज्यलालसेने राजेलोक, आईवडील, मुलेच काय; पण सख्ख्या भावालाही मारतात. या दोघातील हा उग्र विरोध असल्यामुळे त्यांचे एकत्र राहणे यापुढेही दोन ग्रह एकत्र यावेत त्याप्रमाणे योग्य होणार नाही. आपण कोणापुढेही माघार घेत नाही. सर्वजण आपल्यापुढे नतमस्तक असतात. खरे म्हणजे तसेच असायला हवे. सर्व जगालाही तेच वाटते. सर्व मंत्रिगण माझा मान राखत असतानाही तो (शंभूराजा) मला मान देत नाही, हे आपणास माहीत असेलच. हेच दुःख सहन करण्यापलीकडचे असल्यामुळे आत होणाऱ्या वेदना मला सहन होत नाहीत. तेव्हा आपल्याला प्रिय असलेल्या मला यापासून वाचवा. आपणच सर्वांचे नियामक आहात, दैवयोगाने माझ्या दृष्टिआड गेलात, तर माझ्या या बाळाचे रक्षण कोण करणार याचा विचार करा.’’ असे म्हणून मर्मावर आघात होईल असे ती रडू लागली. लाकडाप्रमाणे कठोर हृदयही पटकन फुटेल असे ते रडणे होते.

**ततस्तद्वेदनावेगप्रव्यक्तकरुणारसः । तद्वक्त्रमश्रुसंसिक्तं नक्तकेन मर्माज सः ।। ३६ स्रस्तं तत्कचहस्तं च स्निग्धाञ्जनसमप्रभम् । स्वा त्यां नियमयामास हस्ताभ्यां स महाप्रभुः ।। ३७ अथाश्लिष्य निवेश्याङ्के शशाङ्केन समाननाम् । जगाद तां दतान्धाम विकिरन्नधिधाम सः ।। ३८ मा भैर्भीरु ततः शम्भोः स्वार्भकानिष्ठशङ्किनी । अपथस्यास्य किं पान्थः स वत्सः स गुणाग्रणीः ।। ३९**

**अर्थ** – तेव्हा त्या वेदनेच्या आवेगाने कारुण्य व्यक्त होऊन महाराजांनी अश्रूंनी भरलेले मुख वस्त्रांनी पुसले आणि स्निग्ध अशा अंजनाप्रमाणे असलेले तिचे केस आणि हात आपल्या हाताने दाबले. त्याने त्या चंद्राननेला आलिंगन देऊन आपल्या मांडीवर बसविले व हास्यवदनाने (आपले दंतकिरण सर्वत्र पसरवीत) तिला म्हटले, ‘‘भिऊ नकोस. शंभूराजाकडून आपल्या मुलाचे अनिष्ट होईल अशी तुला शंका वाटते आहे; पण अत्यंत गुणवान असलेला तो बाळ नको त्या वाटेला

जाणार आहे का?

**महाराणी सईबाईसाहेबांची आठवण -**

मत्प्रा जन्मसखीपद्मसहोदरमुखी सती । मद्धर्मपत्नी या ह्यासीत्प्रथिता प्रथितान्वया ।। ४०   शम्भुं शम्भुप्रसादेन सुतमेनं प्रसूय सा । जगाम सद्यः स्वं धाम स्वप्नलब्धेव देवता ।। ४१ अत एष सुतः श्रेष्ठः प्रेष्ठश्च मम शिक्षितः । मयाप्यनवमन्तव्यो मन्तव्योऽन्यैरहं यथा ।। ४२ प्रतापी तपति ह्येष तपातप इव स्वयम् । हन्तेह न सहन्तेऽद्य तेन धीसचिवा इमम्।। ४३ अहंयुत्वाभिपन्नास्ते सचिवा मामकाधियः । महीधीवरमूर्धन्यरत्नं नोपसहन्तु तु ।। ४४ यद्येकत्रानयोर्वा–सस्त्वपरित्रासकारणम् । अम्भोजनयने तर्हि शम्भोरस्तु स्थलान्तरम् ।। ४४ इत्युक्तया तया तत्र निरपत्रपया पुनः । स्वगतं पृथिवीपालः प्रवक्तुमुपचक्रमे ।। ४६

अर्थ – लक्ष्मीसारखी उदारवृत्तीची मातब्बर कुळातील व स्वतःही प्रथित अशी असलेली माझी सखी, माझी धर्मपत्नी श्री शिवकशंकराच्या प्रसादानेच शंभूबाळाला जन्म देऊन स्वप्नात पाहिलेल्या एखाद्या देवतेप्रमाणे निजधामास लगेच निघून गेली. म्हणून माझा हा मुलगा श्रेष्ठ, सर्वांचा लाडका, माझ्या तालमीत तयार झालेला, माझ्याकडूनही अवमानाला पात्र होणार नाही. माझ्याप्रमाणेच त्याची इतरही लोक समजूत घालू शकतात. पराक्रमी असा तो जणू तळपणाऱ्या सूर्याच्या तेजानेच प्रकाशत आहे. त्यामुळे हुशार मंत्रीदेखील हा तेजस्वीपणा सहन करू शकत नाहीत. अहंकाराने ग्रस्त झालेले माझे सचिव बुद्धिमान आणि अग्रगण्य अशा शंभूला सहन न करू देत. (पटवून घेत नाहीत.) परंतु त्या दोघांना एकत्र ठेवण्यानेच जर तुला भीती वाटत असेल, तर हे कमलनयने, शंभूराजांना दुसरीकडे हलवू.'' असे म्हटल्यावर निर्भय होऊन ती पुन्हा आपले मनोगत राजाला सांगू लागली.

यदि चाहमनुग्राह्या प्रेयसः प्रेयसी तव । यदि कर्तुमकर्तुं वा त्वमीश्वर इवेश्वरः ।। ४७ तर्हि राज्यमिदं राजन्राजारामाय दीयताम् । प्रौढाय शम्भुराजाय भवतान्यद्धि मृग्यताम् ।। ४८ अनयावहमप्येतत्प्रणयार्थी स पार्थिवः । तदुक्तभुररीचक्रे कालचक्रेण मोहितः ।। ४९ अथ हर्षभरोद्धूतरोमहर्षविभूषिता । अतीव सरसापाङ्गी कृशाङ्गी मधुरस्मिता ।। ५० हासेन परिहासेन विलासेन च भूयसा । रमणं रमयामास रमणीया चिराय सा ।। ५१ अथामुष्मिन्भूभृत्यनुभवति सौषुप्तिकसुखं चिरेण प्राग्भागं समयमिव भेजे दिनमुखम् । स्थिरीभूताः सूता अपि भृशबल–प्रौढिविषयाम् सुधाम्भोधेः सीमां वरदबिरुदश्रेणिमपठन् ।। ५२

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकर कवीन्द्रपरमानन्दकृतौ ममताग्रहविग्रहाङ्कुरनिरूपण नाम अध्यायः ।

अर्थ – ''मी जर तुमची आवडती आणि कृपेस योग्य असेन व तुम्हीही ईश्वराप्रमाणे कर्तुम्-कर्तुम् समर्थ असाल, तर हे राज्य राजारामाला द्यावे. प्रौढ अशा शंभूराजांना दुसरे एखादे राज्य शोधावे.'' तिचे हे बोलणे अन्यायकारक असले तरी कालगतीत सापडलेल्या त्या प्रणयार्थी राजाने ते स्वीकारले. तेव्हा हर्षभराने रोमांचित होऊन त्या रमणीय कृशांगीने आपल्या मधुर स्मिताने, अत्यंत कुशल कटाक्षाने पुष्कळशा हास्य-परिहास विलासांनी आपल्या रमणाची बराच वेळ करमणूक केली. नंतर त्या राजाने निद्रासुख अनुभवल्यानंतर पहाटेपूर्वीचा बराच वेळ व्यतीत केला. भाटदेखील उभे राहून सागराच्या सीमेपर्यंत पोहोचेल अशी महान शौर्याचे वर्णन करणारी श्रेष्ठ बिरुदावली म्हणू लागले.



अनुपुराण सूर्यवंश निवासकर कवीन्द्र परमानन्दकृत ममताग्रह विग्रहांकुर निरूपण नाम अध्याय।

## पिता-पुत्र संवाद, संभाजीराजांना प्रभावळीकडे जाण्याचा आदेश (अध्याय ७)

कवीन्द्र उवाच । शय्यानिशान्तपर्यन्तान्निशान्तेऽथ विशाम्पतिः । विशन्नेव सभावेश्म माभिः स्वामिरभासयत् ।। १ स्वर्णसिंहासनारूढं निरूढं स्वेन तेजसा । तमुद्यतमिवादित्यं ददृशुस्तत्र सर्वशः ।। २ बभाराभरणं यद्यत्स बताभरणं भुवः । तत्तस्याभरणायैव न निजस्येति निर्णयः ।।३ आस्थानीमास्थितेऽमुष्मिन्सुमनोभिर्मनोहराम् । सृष्टां स्वयम्भुवा भूमौ सुधर्माणमिवापराम् ।। ४ स्तम्भा इवास्य सदसः संस्तभ्यात्मानमुन्नतम् । उपासाञ्चक्रिरे सभ्यास्तमभ्याशजुषोऽधिपम् ।। ५ सञ्चरच्चन्द्रकिरणश्रेणीपुञ्जसमप्रभे । भ्राजमाने भुवोर्भतुरुभयोरपि भागयोः ।। ६ भूयो भूयोऽप्युदगवाग्भावदम्भात्प्रकीर्णके । प्राशंसतामिवोत्कर्षं जगत्यत्र परत्र च ।। ७ यत्र यत्र प्रभोस्तस्य प्रचरन्ति स्व दृष्टयः।तत्र तत्र सरोजानामभवन्निव वृष्टयः।। ८ उभाभ्यामपि भागाभ्यां बद्धाञ्जलिपुटं स्थिते । विरेजतुर्विराजोऽस्य पुरो राजपरम्परे ।। ९ अथ प्राचीमुखोल्लासविलास–विनिवेदिनाम् । पठत्सु विरुदश्रेणीं निकुरम्बेषु बन्दिनाम् ।। १० स्वर्णवञ्जुलहस्तेन जयजीवेति वादिना । पुरुषेण सुवेषेण तत्तदन्वयवेदिना ।। ११ उदितेन समं ह्येनमभिनन्तुमुपेयुषाम् । क्रमेण कीर्त्यमानेषु नामधेयेषु भूभृताम् ।। १२ उच्चैस्तरां महाराजं द्रष्टुमुत्कण्ठितात्मनाम् । सम्मर्दात्तोर–णोपान्ते मृन्धतामितरेतरम् ।। १३ तत्तन्नीवृदुपेतानां मौलिभागेषु भूभुजाम् । समन्तान्निष्पतन्तीषु रत्नवेत्रलतासु च ।। १४ ध्वनदम्भोधिबाधिर्यमुद्रोद्भेदविधायिभिः । भरेण भेरीभाङ्कारैर्दिक्षु भाङ्कारितासु च ।। १५ व्यायामभवनात्सद्यो विनिर्यातो जितश्रमः । प्रसादमधुरस्मेरवदनो मदनोपमः ।। १६ पाणिना चापमेकेन शरान्पश्चापरेण च । कलयन्वलयं भूमेः सद्योऽवितुमिवोद्यतः ।। १७

अर्थ – कवीन्द्र म्हणाले, रात्र संपताच शय्येच्या शीतलतेतून (आल्हादकतेतून) ते बाहेर आले आणि त्यांनी दरबारात प्रवेश केला. आपल्या तेजाचा प्रभाव व्यक्त केला. सिंहासनावर आरूढ झालेल्या तेजःपुंज राजाकडे पाहताच सगळीकडे जणू काही सूर्योदय झाला, पृथ्वीचा अलंकार असल्याने जो जो अलंकार घालावा तो तो त्या अलंकाराचीच त्याने शोभा वाढावी, असेच वाटले. फुलांनी सजविलेल्या आणि रमणीय दिसणाऱ्या आसनावर तो बसला होता. ब्रह्मदेवानेच जणू इंद्राचा दुसरा दरबारी कक्षच निर्माण केला होता. स्तंभाप्रमाणे दृढ असलेले दरबारी सदस्य ताठ मानेने राजाच्या जवळ बसले. चंद्रकिरणांप्रमाणे आल्हादक असे राजाचे दोन भाग शोभून दिसत होते. खाली-वर हलणाऱ्या चवऱ्यांचा डामडौल उत्कर्षच सूचित करीत होता. राजाची दृष्टी जिकडे फिरे तिकडे जणू कमळांचा वर्षाव होई. दोन्ही बाजूंना हात जोडून त्या राजश्रेष्ठाच्या पुढे दोन राजपरंपराच विराजत होत्या. प्रभातकाळचा विलास वर्णन करणाऱ्या (भूपाळ्यातून) भाटांचा समुदाय बिरुद म्हणू लागले. सोन्याची छडी हातात धरलेले त्या त्या वंशाची माहिती असणारे, सुंदर पोशाख घातलेले पुरुष जयजयकार करू लागले. नावे जसजशी उच्चारली जात, तसतसे अभिनंदनार्थ राजे पुढे येत होते. महाराजांचे दर्शन घेण्याच्या उत्कंठेने तोरण बांधलेल्या ठिकाणाजवळ (मुख्यद्वाराजवळ) धक्काबुक्की करणाऱ्यांत वाद निर्माण झाला. त्या त्या देशातून आलेल्या राजांच्या मस्तकावर सर्व

बाजूंनी रत्नजडित छड्या टेकवत होते. नगाऱ्यांच्या आवाजाने सर्व दिशा दुमदुमून गेल्या होत्या.
जणूकाही हे नगारे म्हणजे समुद्रगर्जनेला मागे सारून त्यावर आपला शिक्काच उमटवितात.
इतक्यात व्यायामशाळेतून परिश्रम केलेला निरागस, मधुर हसऱ्या चेहऱ्याचा, मदनाप्रमाणे
सुंदर शंभूराजा आला. त्याच्या एका हातात धनुष्य व दुसऱ्या हातात पाच बाण होते. हातातले वळे
खेळवीत तो जणू त्यावेळी भूमीचे रक्षण करण्यास उद्युक्त झाला होता.

**अररव्यायतोरस्कः प्रोच्चस्कन्धः सुलोचनः । विचक्षणः क्षमाशाली महासत्त्वः सुलक्षणः ।। १८ अतृप्तानामिवोपेत्य भूयो भूयो प्रपश्यताम् । आददानो दृगन्तेन समन्तान्नमतां नतीः ।। १९ अतीव विनयोपेतैः सवयोभिः स्मयोज्झितैः । सुवेषैः पश्चषैः सम्यगनुयातो महामनाः ।। २० द्वारि दौवारिकैर्दूराद्दत्तवर्त्मा दुरासदः । उद्धवद्यौवनावस्थो वनद्विप इवोन्मदः ।। २१ मध्येसभं सहस्रांशुसमे सिंहासने स्थितम्। सहस्रपत्रपत्राक्षं सहस्राक्षमिवापरम् ।। २२ समुच्छलितवा–त्सल्यव्यक्तवीक्षणलालसम् । ननाम पितरं शम्भुर्मौलिना चरणौ स्पृशन् ।। २३ प्रणमन्तममुं दोर्भ्यां परिगृह्य स पार्थिवः । उपावेशयदभ्यर्णे जयन्तमिव वासवः ।। २४**

**अर्थ** – कपाटाप्रमाणे भक्कम छाती असलेला, उंच खांदे व सुंदर डोळे असलेला अत्यंत हुशार, क्षमाशाली, महाधीराचा, सुलक्षणी असा तो नतमस्तक झालेल्या राजाच्या सर्व बाजूंनी मिळणाऱ्या नमस्कारांचा तो आपल्या कटाक्षाने स्वीकार करीत होता. त्या मोठ्या मनाच्या (शंभूराजाच्या) मागून सुवेष धारण केलेले, शिस्तबद्ध, विनयशील, निगर्वी असे त्याचे मित्र येत होते. द्वारपालांनी त्यांना सत्वर वाट करून दिली. नवयौवनावस्थेत आलेला, वनगजराजाप्रमाणे भावनातिरेकी असा अजिंक्य (संभाजी) दरबारात सूर्याप्रमाणे लखलखणाऱ्या सिंहासनावर बसलेल्या, सहस्रदल कमळाप्रमाणे डोळे असलेल्या, जणू दुसरा इंद्रच अशा अतिशय वात्सल्याने त्याला पाहण्याची इच्छा असणाऱ्या वडिलांना चरणस्पर्श करून त्याने प्रणाम केला. तो प्रणाम करीत असतानाच दोन्ही हातांनी पकडून इंद्राने जयंताला घ्यावे त्याप्रमाणे त्याला आपल्या जवळ बसविले.

**उपवेष्टुं पुरा पित्राप्युच्यमानः पुनः पुनः । समर्यादे समर्यादः स बतोपविवेश न ।। २५ तमैक्षन्त सभास्तारास्तारापतिसमश्रियम् । मेनिरे च समेष्यन्त्याः श्रियस्तस्याः समाश्रयम् ।। २६ दुर्निरीक्ष्यो हि वैलक्ष्यात्सदःसद्भिरुदीक्षितः । प्ररराज महाराजकुमारोऽयं सुशिक्षितः।। २७ वेत्तारं सर्वनीतीनां भेत्तारं परवक्षसाम् । बहु मेने महाराजस्तमात्मानमिवात्मजम् ।। २८ अथ सञ्जातमध्याह्नसमयस्याभिधायके।ध्वनत्युदारगम्भीरमधुरस्वरमानके ।। २९ शाखिशाखान्तनीडान्तर्निलीने पत्रिमण्डले । वाचंयम इवातीव स्थिते सपदि निश्चले।। ३० तपातपभवोत्तापतप्तात्मसु पदे पदे । स्थिरीभूतेषु पान्थेषु तरुप्रच्छायमण्डले।।३१ यथा–मतमनन्ताध्वमध्यभागमुपागते । तान्तितः किमु विश्रान्तिकामे कान्तिपतौ स्थिते ।। ३२**

**अर्थ** – वडील बसण्यासाठी पुन्हा पुन्हा आग्रह करीत होते, तरी ज्या ठिकाणी मर्यादा पाळणे गरजेचे आहे असा मर्यादशील तो तेथे बसला नाही. सर्व दरबारी मंडळी तारापती हरिश्चंद्राप्रमाणे त्याच्याकडे पाहत होते. त्यांना असे वाटले की, येत असलेली लक्ष्मी त्याच्याच स्वाधीन होणार. या महाराजांच्या सुशिक्षित पुत्राकडे चांगल्या–वाईट अपेक्षांनी पाहिले जात असता तो गोंधळून गेला होता. त्याच्या मनातले भाव समजणे कठीण झाले होते. महाराज स्वत:प्रमाणेच आपल्या पुत्रालाही मानाने वागवीत होते. कारण तो सर्व नीतिशास्त्रांचा जाणकार आणि शत्रूंची हृदये विदारण करणारा होता. तेवढ्यात दुपारची वेळ झाल्याचे गंभीर आणि मधुर स्वरांच्या वाद्याने सुचविले.



वृक्षांच्या फांद्यावर आणि ढोल्यांच्या आत पक्षिगणांनी मौन धारण केल्याप्रमाणे ते चटकन निश्चल बसले. प्रखर उन्हाच्या झळीमुळे तप्त झालेले वाटसरू ठिकठिकाणी झाडांच्या वर्तुळाकार सावल्यात विसावले. मार्गाच्या मध्यभागी आल्यावर दमल्यामुळे आकाशमार्गातील प्रकाशाचा पती सूर्य दमल्यामुळे विश्रांती घेण्याच्या इच्छेने स्थिर झाला.

**स्वेन भ्रूचेष्टितेनैव विनिर्दिष्टे महाशये । स्वाय स्वाय निकेताय प्रयाते राजमण्डले।। ३३ दरस्मितमुखः शम्भुममुं शम्भुदयाफलम् । वत्सलो वसुधालोकवृषा किल विलोकयन् ।। ३४ व्यपेतदोषमोजस्विप्रसादमधुरं मृदु । नयोपचितमत्युच्चैरयोचत वचोऽर्थवत् ।। ३५**

**अर्थ** – भुवयांच्या हालचालीतून महाराजांचा इशारा झाल्यावर दरबारी मंडळी आपापल्या निवासाकडे जाऊ लागली. श्रीशंकराचा कृपाप्रसाद अशा शंभूराजाकडे वात्सल्यपूर्ण असे किंचित स्मित करून अमृतवर्षी दृष्टीने पहात प्रसादमधुर, ओजस्वी, निर्दोष, हळुवार, अर्थगंभीर, न्याय्य असे भाषण मोठ्याने करू लागला.

**शिवराज उवाच । महाभारमिदं राज्यं भारवाडिव दुर्बलः । वोढुं न क्षमते जातु साधारणगुणो नृपः ।। ३६ अष्टानां लोकपालानामंशैरप्यायिता नृपः । जायतेऽर्थाय जगतामनर्थाय किलापरः ।। ३७ दानशौण्डित्वमिन्द्रस्य प्रतापो जातवेदस । स तु दण्डधरस्यांशो यस्तु दण्डो यथोचितः ।। ३८ नैर्ऋतस्य ह्यसौम्यत्वं नीतिमत्वं प्रचेतसः । अनिलस्य बलं चैकपिङ्गस्योच्चैः समृद्धता ।। ३९ ईश्वरस्येश्वरत्वं च गुणा येषां पृथक्पृथक् । यत्रैकत्र वसन्त्ये स राजा राज्यमश्नुते ।। ४० श्रृणु वत्स यथा राज्यमुपलब्धमिदं मया । अतीव दयया देव्याः स्वधिया च समृद्धया ।। ४१ य आसीदिभरामस्य महमूदस्य चाश्रयः । अल्लीशाहस्य च पदं प्रविष्टस्य महाशयः ।। ४२ श्रुतिस्मृतिपुराणेषु शास्त्रेष्वपि च सर्वशः । तत्त्वदर्शी महासत्त्वः सत्यवादी दृढव्रतः ।। ४३ सकलस्यापि लोकस्य प्रियकारी महायशाः । कृशानुरिव तेजस्वी मनस्वी शेवधिः श्रियः ।। ४४ सहस्रबाहुसदृशः शौर्ये धैर्ये धरासमः । ज्ञाता दातावदातात्मा स कारणिकसत्तमः ।। ४५ लक्षणानि मदीयानि सामुद्रिकमते पुनः । पश्यन्समुत्समुत्साहशाली शाहः पिता मम ।। ४६ उदग्रनय–सम्बन्धान्निबन्धाञ्जलिमग्रतः । सम्बोध्य मां महाबुद्धिर्मिथ एतदभाषत ।। ४७**

**अर्थ** – शिवराज म्हणाले, ‘‘हे राज्य अत्यंत जबाबदारीचे आहे. साधारण गुण असणारा, सामान्य, दुर्बल, भारवाहकाप्रमाणे तो ते वाढविणार नाही. आठही लोकपालांच्या अंशांनी बलवान झालेला राजाच तेथे उपयोगी ठरतो. बाकीचे जगाच्या अनर्थालाच कारणीभूत व्हायचे. इंद्राचे दातृत्वातील औदार्य, अग्नीचा प्रतापीपणा, यमाचे यथोचित दंडधरत्व, नैऋताचा कडकपणा, वरुणाचे नीतिअधिष्ठान, वायूचे सामर्थ्य, कुबेराची अत्युच्च समृद्धी आणि ईश्वराचे नियामकत्व हे भिन्न भिन्न गुण ज्याच्या ठिकाणी एकत्र निवास करतात, तोच राजा राज्य मिळवितो. बाळा, मला हे राज्य कसे मिळाले ते ऐक. देवीच्या महाकृपेने व स्वतःच्या बुद्धिसामर्थ्याने गजांतलक्ष्मी असलेल्या महमुदाच्या आश्रयस्थानी असलेल्या, अल्लीशाहाच्या पदाला पोहोचलेला, मोठ्या मनाचा, श्रुतिस्मृति पुराणशास्त्रातील सर्वज्ञ, महाधैर्यशाली, सत्यवादी, दृढनिश्चयी, सर्व लोकांचे प्रिय करणारा, कीर्तिमान, अग्नीप्रमाणे तेजस्वी, बाणेदार, लक्ष्मीचा आश्रय, सहस्रबाहू कार्तवीर्याप्रमाणे शूर, पृथ्वीप्रमाणे धैर्यवान, ज्ञाता, दाता, पुण्यकर्मा आणि अतिशय कृपाळू असे माझे उत्साहशाली बुद्धिमान वडील शहाजीराजे माझी सामुद्रिक लक्षणे पाहून श्रेष्ठ राजनीतीचा विचार असल्यामुळे

............ मला उद्देशून म्हणाले.''

शाहराज उवाच । अपर्याप्तमिति प्राज्यमपि राज्यमिदं मम । तस्मादन्यस्य तस्याप्त्यै त्वया कार्यः परिश्रमः ।। ४८ सन्त्यन्येऽपि हि मे पुत्राः येषामंशाः पृथक्पृथक् । तेन तेन विधानेन विधास्यन्ते नयान्मया ।। ४९

अर्थ – शहाजीराजे म्हणाले, ''मोठे असले तरी हे राज्य मला पुरेसे नाही. तेव्हा तू अन्य राज्याच्या प्राप्तीसाठी उद्योगाला लागले पाहिजेस. माझी इतरही मुले आहेत. त्यांना वेगवेगळ्या पद्धतीने मी मार्ग दाखवीन.

नार्जयन्ति स्वतः स्वं ये पित्र्यमेव तु भुञ्जते । ताननूनगुणोपेतानपि लोको न मन्यते ।। ५० सुतः सुविद्यतां धत्ते पारोक्ष्येण यथा पितुः । तथा खलु न सान्निध्यादिति नीतिविदो विदुः ।। ५१ मन्ये दुग्धोद एवादो मन्यते मतमुत्तमम् । प्रापयामास यः सद्यः स सश्चन्द्रमसं शिवम् ।। ५२ कल्पद्रुमः सुरपुरं सुधादीधितिरम्बरम् । विभूषयतिं सा भूषा क्षीरोदमपि सान्तरम् ।। ५३ प्रकाशतां सकाशे मे प्रकाशात्मा स तेऽग्रजः । प्रशस्तः स्वेन वृत्तेन यौवराज्यं प्रशास्ति यः।। ५४ त्वं तु पुण्यं जनपदं मदीयं मदनुज्ञया । अनवद्यमते सद्यः प्रपद्य परिपालय ।। ५५ स्वस्य पूर्वेण पुण्येन पूर्वेषां च प्रथीयसा । आदेशाच्च महेशस्य पुण्यदेशाधिपो भव ।। ५६ क्रमात्त्रिविक्रमस्येव पराक्रमवतस्तव । मेधाविन्महती मेधा मदः(महत्)पदमुपैष्यति ।। ५७ बलं न केवलं बुद्धेर्न च बाव्होर्बलं बलम् । उभे अपि बले यस्य मन्ये तस्य बलं बलम् ।। ५८

अर्थ – जे स्वतः काही मिळवीत नाहीत, पित्याने मिळविलेल्याचाच फक्त उपभोग घेतात, त्यांच्यात भरपूर गुण असले तरी लोक त्यांना मानत नाहीत. जगाची रीत जाणणारे लोक असे म्हणतात की, पित्याच्या अपरोक्ष मुलगा जितका सुशिक्षित होतो, तितका त्याच्या सान्निध्यात राहून होत नाही. मला वाटते की, हे मत दुग्धसागराप्रमाणे उत्तम आहे. तो क्षीरसागर क्षणात चंद्राला पवित्र करून टाकतो. कल्पवृक्ष स्वर्गाला व अमृतकिरणांचा चंद्र आकाशाला शोभा आणतो. ती शोभा क्षीरसागरामधेही आहे. तुझा तेजस्वी थोरला भाऊ माझ्याजवळ राहून पराक्रम करो. तो आपल्या वागणुकीने स्तुतीस पात्र झाला असून युवराजपद भूषवीत आहे. तू माझे हे पवित्र, निर्वेध असे जनपद आत्ताच घेऊन त्याचा सांभाळ कर. यास तुला माझी संमती आहे. आपल्या पूर्वपुण्याईने, पूर्वजांच्या कीर्तीने आणि महेशाच्या आज्ञेने पुण्यदेशाचा (पुण्याच्या जहागिरीचा) प्रमुख हो. त्रिविक्रम विष्णूप्रमाणे क्रमाने पराक्रमी अशा तुला ब्रह्मदेव उत्तम बुद्धी देईल आणि तू मोठी सत्ता प्राप्त करशील. बळ केवळ बुद्धीचे नसते, तसेच नुसते बाहुबळ म्हणजे बळ नसते. बुद्धी आणि पराक्रम दोन्ही ज्याच्याजवळ असेल त्याच्याचजवळ सामर्थ्य आहे असे माझे मत आहे.''

इदमादिश्यमाशिष्यमाचार्य (इदमाशास्यमादिश्य आचार्य) इव सुव्रतः । पुण्यवान्पुण्यदेशाय प्रतापी प्रजिघाय सः ।। ५९ अथ येदिलदिल्लीन्द्रराज्यद्वितयसीमया । सरिता भीमया नाम सुधासोदरनीरया।।६० शरदभ्रघटाशुभ्रसिकताङ्कितततीरया। विराजमानमारामनगरग्रामलग्नया।।६१ अन्याभिरापगाभिश्च वापिकाभिश्च भूरिशः । कामिनीकुचकाश्मीरकलुषाभिरशेषतः ।।६२ चक्रकादम्बकबकप्लवप्लवपरिप्लवैः । पर्यन्तस्फुरदुद्दामप्रच्छायद्रुमदामभिः ।। ६३ तर्कुटङ्क–मुखोन्मृष्टशिलासोपानशालिभिः । शशिबिम्बसमाकारैः कासारैः सुमनोहरैः ।। ६४ सरोवरैश्च बहुभिः सरोजरुचिराम्बुभिः । नितान्तमातपक्लान्तपान्थतान्तिनिवारकम् ।। ६५ सदाफल–सदापुष्पवृक्षसंसक्तषट्पदम् ।



सदावासमनायासं प्रभवात्सर्वसम्पदम् ।। ६६

अर्थ – असा योग्य सल्ला देऊन व्रताचरणी गुरूप्रमाणे ते पराक्रमी व पुण्यवान वडील (शहाजीराजे) पुण्यदेशाकडे (पुण्याकडे) गेले. नंतर ते आदिलशहा आणि दिल्लीचा बादशाहा यांच्या राज्यांच्या सीमेच्या कडेकडेने वाहणाऱ्या, अमृताप्रमाणे गोड पाणी असणाऱ्या भीमा नदीच्या काठाकाठाने सैन्यासह वडिलार्जित प्रदेशात आले. भीमा नदीचा काठ शरदाच्या मेघाप्रमाणे पांढऱ्या वाळूने युक्त होता. बागा, गावे, खेडी त्याच्यालगत असल्यामुळे तो शोभून दिसत होता. स्त्रियांच्या स्तनावरील केशरामुळे गढूळ झालेल्या दुसऱ्या नद्या आणि विहिरी पुष्कळ होत्या. तेथे चक्रवाकांचे थवे, बगळे, बेडूक, माकडे, मेंढ्या, कारंडव इत्यादीकांच्या उड्यांनी, गाढ छाया देणाऱ्या वृक्षांच्या फांद्या हालत होत्या.

अखर्वचेतसां सर्ववेदसां शर्वतेजसा । अपास्ततमसां तप्ततपसां प्रेष्ठमास्पदम् ।। ६७ उपेत्य तं जनपदं पूर्वेषामात्मनः पदम् । अध्यवात्सं समं सैन्यैः सोत्सवं पुण्यपत्तनम् ।।६८ तदा प्रभावलीपालस्तथा पल्लीवनाधिपः । जयवल्लीपतिस्ते ते सामन्ता अपि सर्वशः ।। ६९ सह्यपर्वत–पर्यन्तवर्तिनोऽन्ये च भूभृतः । विषयानन्तरस्ताम्रो येदिलश्च विशेषतः ।। ७० तत्र मे वर्तमानाय समया इव सर्वशः । स्वं स्वं सम्प्रेषयामासुरुपायनमुपायतः ।। ७१ आस्तामिदमथो वृत्तमवर्तत यथा यथा । सर्वत्र विदितं सर्वैर्वेदितव्यं न तत्तथा ।। ७२ आसमुद्रमिदं राज्यं समर्थमधिकं मया। विधाय दर्शितं खण्डपरशोरनुकम्पया ।। ७३ दिनेष्वेतेषु मद्वर्ष्मं विवशी कुरुते जरा । नेतुं मां परलोकाय कालदूतीव सत्वरा ।। ७४ अतो नास्थितचित्तस्य मम सम्पदियं तथा । पुरः प्रस्थातुमुत्कस्य पान्थस्य वसतिर्यथा ।। ७५ अद्याहं निःसहीभूय न सहेऽन्यस्य कस्यचित् । वचनश्चार्वपि यदा कथं राज्यमिदं तदा ।। ७६ सर्वमेताद्धि विन्यस्य वां मध्ये मूर्ध्नि कस्यचित् । तं स्वर्गमपवर्गं वा हन्तुं गन्तुमिहोद्यतः ।। ७७ उक्तिप्रत्युक्तिमान्युक्तिप्रत्युक्तिक्रमकोविदः । कमनीयः कनीयान्यस्तव भ्राता विमातृजः ।। ७८ अन्ते वयसि सञ्जात इति योऽतीव मे प्रियः। पश्य सोऽप्यस्य राज्यस्य न भागं भोक्तुमिच्छति ।। ७९ भवांस्तु स्वगुणोदग्रः समग्रां भुवमर्हति। वर्तेत वर्तितव्येषु मन्त्रिणां सम्मते यदि ।। ८० यस्तु पश्यति नादर्शसदृशा मन्त्रिणां दृशा । स राजाऽराजतां लब्ध्वा राजतां भागधेयतः ।। ८१

अर्थ – मनोहर अशी चंद्रबिंबाकार कमळे आणि मधुर जल यांनी युक्त अशी सरोवरे होती. सूर्यप्रकाशामुळे म्लान झालेल्या वाटसरूंच्या झुंडी शांत होत होत्या. सदाफल, सदापुष्प अशा वृक्षांवरील भुंग्यांना तेथे विनाश्रम नेहमी रहावेसे वाटे. सर्व प्रकारची संपत्ती तेथे निर्माण झाली होती. मोठ्या मनाचे सर्वज्ञ असे, शंकराप्रमाणे तेजस्वी, तपश्चर्या केल्याने अज्ञान हरण झालेल्या विद्वानांचे ते आवडते ठिकाण होते. नंतर प्रभावलीचा सुभेदार, पल्लीवन आणि जयवल्ली यांचे अधिकारी, प्रदेशातील जहागीरदार, सह्याद्रीच्या प्रदेशातील राजे विशेषेकरून पलीकडे असलेला अदिलशहा जणू काही दरबारी रीतीप्रमाणे मला प्रयत्नपूर्वक नजराणे पाठवू लागला. परंतु ही हकिकत जशी असेल तशी असो, ती सर्वांना ज्ञात आहेच. खंडेरायाच्या कृपेने सागरापर्यंतचे हे राज्य मी अधिक बलशाली केले आहे. अलीकडे वार्धक्यामुळे मला परावलंबित्व आले आहे. जणू काही कालदूतच मला परलोकाला नेण्याची घाई करीत आहे. म्हणून माझे चित्त ताळ्यावर नाही. माझे हे वैभव पुढच्या मुक्कामाला जाण्याची उत्कंठा असलेल्या वाटसरूच्या मुक्कामाप्रमाणे आहे. अगदी दुबळा

बनल्याने आता मला दुसऱ्याचे काहीही सहन होत नाहीसे झाले आहे. हे सर्व तुमच्यापैकी कोणाच्या तरी शिरावर टाकून मी स्वर्गाकडे किंवा मोक्षाकडे जाण्यास तयार झालो आहे. युक्त्या-प्रयुक्त्या करण्यात पटाईत असलेला आणि हजरजबाबी (?) असा तुझा सुंदर, सावत्र भाऊ (तुझ्यापेक्षा) लहान आहे. वयात आला असल्यामुळे तो मला अतिशय प्रिय आहे. पहा बरे, तो देखील या राज्याचा वाटा मिळावा अशी इच्छा करीत नाही. तू तर आपल्या गुणांनी श्रेष्ठ आहेस. सर्व जगावर राज्य करण्यास योग्य आहेस. कोणाबरोबर कसे वागायचे ते मंत्र्यांच्या संमतीने असावे. आदर्शवत् मंत्र्यांचा दृष्टिकोन ज्याच्या लक्षात येत नाही तो राजा राजपदास मुकतो, हे त्याचे नशीब म्हणायचे.

**प्रायो राजकुमाराणां गुणा एते सुदुर्लभाः । सवयोभिः संस्तुतानां स्तुतानाश्च पदे पदे।। ८२ एकस्यैकमिदं राज्यं द्वितीयश्च न विद्यते । शरीरस्येव सर्वस्य न विभागोऽस्य युज्यते ।। ८३ अतोऽमुष्यापरस्यापि यतेहमुपलब्धये । त्वदर्थं वा तदर्थं वा यत्सर्वमुपयोक्ष्यते ।। ८४ तेन फलैकोन्नेयकार्यस्य यावदागमनं मम । त्वं शृङ्गारपुरे तावत्तिष्ठ मन्निष्ठमानसः ।। ८५ तेन तातनिदेशेन वन्दनीयेन सर्वथा । अन्वाशासमहं सम्यक्तमेत्य विषयं यथा ।। ८६ तथा त्वमपि हे वत्स शृङ्गारपुरमास्थितः । शाधि प्रभावलीं सर्वां मन्नियोगानुसारतः ।। ८७ गर्हिते रैङ्गिरावस्मिन्गार्हेण कलिनाऽधुना । असहैर्बहुभिः सार्धं वसतिस्तव मध्यमा ।। ८८ यथा सेनासु सर्वासु यथा सेनाधिपेषु च। कोशाधिकारिषु यथा यथा राष्ट्राधिकारिषु।। ८९य थ ा चराचरचरेष्वखिलेषु चरेषु च । यथा च परिचर्येषु यथा परिचरेष्वपि ।। ९० अमित्रेषु च मित्रेषु यथा स्त्रीषु च मन्त्रिषु । यथा प्रजासु सर्वासु यथाऽऽयेषु व्ययेषु च ।। ९१ अन्यत्र च नरेन्द्रेण वर्तितव्यं यथा यथा । तथा तथाऽथ शिक्षेथास्त्वमाचार्यादतन्द्रितः ।। ९२**

**अर्थ** – साधारणपणे राजपुत्रांचे हे गुण अतिशय दुर्मिळ असतात. समवयस्क मित्र ज्यांची वारंवार स्तुती करतात, अशांपैकी एकाचेच एकच राज्य असते, दुसरे नसते. शरीराप्रमाणे सर्वच गोष्टींची वाटणी इष्ट नसते. तेव्हा याच नव्हे, तर दुसऱ्याही राज्याच्या प्राप्तीसाठी मी प्रयत्न करतो. ते तुला किंवा त्याला उपयोगी पडेल. या एकाच कार्यासाठी मी जाऊन परत येईपर्यंत तू माझ्या विचाराप्रमाणे राहून शृंगारपुरात मुक्काम कर. त्या वंदनीय पित्याच्या आज्ञेने मी या प्रदेशाचे सर्वथा उत्तम शासन केले. त्याप्रमाणेच बाळा, तूही शृंगारपुरात राहून माझ्या आज्ञेनुसार सर्व प्रभावळीवर प्रशासन कर. निंद्य अशा कलीमुळे रायगडावर नाठाळ अशा अनेकांबरोबर तुझे राहणे हे योग्य नाही. सर्व सेनेमधे, सेनापतींमधे, खजिनदारांमधे, राष्ट्राच्या अधिकाऱ्यांमधे, सर्व चराचरात फिरणाऱ्या हेरांमधे, सेवेला योग्य अशांमधे आणि सेवकांमधेही, शत्रूमधे तसेच मित्रांमधे, स्त्रियांमधे, मंत्र्यांमधे, सर्व प्रजेमधेच आयव्ययाच्या बाबतीत आणि इतरही बाबतीत राजाने कसे वागावे हे तू प्रयत्नपूर्वक आचार्यांकडून शिकून घे.''

**स्फुटमप्यस्फुटं लोके कठोरमपि कोमलम् । एवमाभाषमाणस्य भ्राजमानस्य भानुवत ।।९३ परिशुद्धमतिः सर्वं निशम्य वचनं पितुः । महाराजस्य सविधे सविधेयः समुल्लसन ।। ९४ अबाध-पदसम्बाधमगाधमपविस्तरम् । उपपत्तिमदत्यर्थं समर्थं वाक्यमब्रवीत् ।। ९५**

**अर्थ** – अशा रीतीने स्पष्ट असूनही (पूर्णपणे) व्यक्त न झालेले, कठोरपणाचे असूनही सौम्यपणे बोलणाऱ्या त्या सूर्यतेज पित्याचे सर्व भाषण अतिशय शुद्धबुद्धीने ऐकल्यावर आज्ञाधारक शंभूराजा महाराजांजवळ विरोध करता न येण्यासारखे पुष्कळसे गहन पण संक्षिप्त आणि युक्तीपूर्ण पण अतिशय परिणामकारक असे बोलला.



**शम्भुरुवाच । आदिशन्ति यदेतस्मै पिता माता गुरुस्तथा । तदनेन विधातव्यं कदाचिदपि नान्यथा ।। ९५ निशम्यांश्रुतपूर्वं हि भवदीयमिदं वचः । चिरेण जगतीपाल जनयित्री मया स्मृता ।। ९६**

**अर्थ** – शंभू म्हणतो, माता-पिता-गुरूंप्रमाणे आपण जे म्हणता त्याप्रमाणे मी वागावे, त्याविरुद्ध वागू नये. आपण जगावर राज्य करणारे आहात. आता जे बोललात असे पूर्वी आपण कधी बोलला नव्हतात. त्यामुळे बऱ्याच काळानंतर मला मोठ्या आईसाहेबांची आठवण झाली.

**न पिता न पुनर्माता न भ्रातापि सहोदरः । नियतिर्नियतं हेतुरसुखस्य सुखस्य च ।। ९७ भवानेवावनिं सर्वां प्रशास्तु शतशः समाः। स्वाराज्येऽपि न रज्येत त्वद्वियुक्तस्य मे मनः ।। ९८ येनार्जितमिदं राज्यमर्जयिष्यति चापरम् । स भवानस्तु मे नित्यमस्तु वा मास्तु वापरम् ।। ९९ समर्था एव जायन्ते समर्थानां कुले नराः । न बीजगुणमुज्झन्ति जातु दीपा इवाङ्कुराः ।। १०० असमर्थे सुते पित्रोर्वात्सल्यमधिकं यदा । स एव सचिवैः सार्द्धं प्रशास्ति पृथिवीं तदा ।। १०१ असमर्थः समर्थाच्चेत्समर्थश्चासमर्थतः । तर्हि तुद्धेतुदोपेण तावभव्यावुभावपि ।। १०२ यस्मादुत्पद्यते यस्तु तदन्यः स न सर्वथा । अत एतद्विभागार्था व्यवहारकथा वृथा ।। १०३ याचते पितरं यस्तु पित्र्यमर्थं सुतः स न । न प्रयच्छति यस्तस्मै तस्य तं स पितापि न ।। १०४ आद्यूनस्य महाराज गृहाः स्वेऽपि सुदुर्भराः । विजिगीषोऽस्तु सुभरा समग्रा सागराम्बरा ।। १०५ कातरस्य करः संस्थाः(करस्थास्तु) समस्ता अपि सिद्धयः । सम्पदश्च यथा कान्ताः क्लीबशय्यामुपागताः ।। १०६ धैर्यमात्रसहायस्याप्यसहायस्य भूपतेः । छेत्तुः प्रजाभयस्योच्चैर्वशे वर्वत्यसौ धरा ।।१०७ साभिमानं महामानी शिवराजः सुयुक्तिमान् । समाकलनसञ्जातहर्षोत्कर्षो बभूव सः ।। १०८ इत्याकर्ण्य गुणाग्रगण्यरचनां शम्भोः शुभंयोर्गिरं मेनेऽमुं स बताबलम्बमुचितं राजा स्वराज्यश्रियः।। मोहेनन्वितया तया ममतया व्यक्तीभवन्नन्तरा क्रूरात्मा तु कलिश्चकार सुतरां कालुष्यमेतद्धियः ।। १०९**

**इत्यनुपुराणे ।। अध्यायः ।।**

**अर्थ** – पिता-माता-भाऊ किंवा नियतीदेखील आपल्या सुखदुःखाला सर्वस्वी कारणीभूत नसते. आपणच शेकडो वर्षे या सर्व पृथ्वीवर राज्य करा. आपल्या अनुपस्थितीत माझे मन स्वराज्यात (रायगडावर) देखील रमणार नाही. तुम्ही हे राज्य मिळविले आणि दुसरेही मिळविणार आहात, असे आपण मला सदैव हवेच आहात. दुसरे काही असो किंवा नसो, मातब्बरांच्या वंशात मातब्बर पुरुषच जन्म घेतात. दीपाप्रमाणे किंवा अंकुराप्रमाणे ते आपले आनुवंशिक गुण टाकून देत नाहीत. ज्या दुबळ्या मुलावर आई-वडिलांचे प्रेम अधिक असते, तोच मंत्र्यांच्या साहाय्याने पृथ्वीवर शासन करतो. दुर्बल मनुष्य सबलाकडून व सबल मनुष्य दुर्बलाकडे साहाय्य घेत असेल, तर त्याच्या चुकीमुळे दोघेही दुर्दैवीच म्हणायचे. ज्यापासून एखादे व्यक्तिमत्त्व निर्माण होते, ते त्याहून सर्वस्वी भिन्न नसते. म्हणून या दोघांत भेद करणे व्यवहारात व्यर्थ ठरते. जो आपल्या पित्याला त्याची संपत्ती मागतो, तो पुत्रच नव्हे; आणि जो त्याला ती देत नाही, तो पिताही नव्हे. महाराज, खादाडाला आपले घरही पुरत नाही; पण विजिगीषूला समुद्र, आकाश, पृथ्वी हे अपुरे पडते. भित्र्याच्या हातातील सर्व सिद्धी आणि संपत्ती नपुंसकाच्या शय्येवर चढलेल्या कामिनीप्रमाणेच असतात. राजाला कोणीही साहाय्य करण्यासाठी आले नाही, तरी धैर्य हेच केवळ सहाय्यक म्हणून असल्यास प्रजेला भयापासून मुक्त करण्यास पृथ्वीच कायम त्याच्या ताब्यात असते.'' महामानी

आणि युक्तिमान अशा शिवराजांना हे ऐकल्यावर अभिमानाने आनंद झाला. त्या धन्य अशा शंभूच्या गुणमंडित अशा वाणीने राजाला असे वाटले की, स्वराज्याच्या वैभवासाठी योग्य आधार मिळाला; परंतु त्याची ममता मोहग्रस्त असल्यामुळे तो क्रूर हृदयाचा कली त्याच्या बुद्धीमधे खूप कलुषता निर्माण करीत होता.

अनुपुराण । अध्याय ।

* * *



# प्रकरण ३

**छ. शिवाजी महाराजांचे कर्नाटक मोहिमेस प्रयाण, संभाजीराजे शृंगारपुरात, शृंगारपुरातील संभाजीराजांचे दिवस, कलशाभिषेक, संभाजीराजे-दिलेर संधान, शिवाजीराजे कर्नाटक मोहिमेवरून परत, शिवाजी महाराज-मंत्री संवाद, संभाजीराजांना सज्जनगडाकडे जाण्याचा आदेश, संभाजीराजे दिलेरच्या गोटात, भूपाळगड संग्राम.**

(मूळ संहितेतील विभाग ३, अध्याय ८, श्लोक १-१०१, वि.१, श्लो. ६१-६२, ६४-७५, वि.३, अ.९, श्लो. १-४७, वि.३, अ.१०, श्लो. १-६७, वि.३, अ.११, श्लो. १-४१, वि.३, अ.१२, श्लो. १-१८, वि.३, अ.१३, श्लो. १-६०)

---

**छ. शिवाजी महाराज कर्नाटक मोहिमेवर** (विभाग ३, अध्याय ८)

कवीन्द्र उवाच । अथ सह्यपतिर्जेतुं देशं कर्णाटमुद्यतः । सुदिने कारयामास प्रयाणपटहं प्रभुः ।। १ न्यस्य सूनुं कनीयांसं रैगिरौ गिरिपूजिते । यथार्हसैन्यसहिते रहिते स्वेतरैर्नरैः ।। २ आत्मनश्च प्रतापेन प्राप्तेन पदमुत्तमम् । द्विजातिजातिना तेन राहुणा प्रतिपालिते ।। ३ दिल्लीन्द्रादिकदैत्येन्द्ररिपुसङ्घसुदुर्गमे । सुमेरुप्रतिमे तुङ्गशिखरे वीरसङ्कुले ।। ४ ज्येष्ठं प्रतापिनं पुत्रं वचने स्थितमात्मनः । आदाय च समाधाय समं स्वेन महामना; ।। ५ दलेलप्रभृतीनां च दमनेऽनीकिनीवृत्तम् । मयूरं नाम सचिवं प्रौढधामपरिष्कृतम् ।। ६ नियोज्यान्यानपि पुनस्तत्र तत्राधिकारिणः । वाजिनं विजयं नाम समारूढो महोद्यमः ।। ७ द्विजानां मङ्गलाशीर्भिः केवलं परिनन्दितः । चकर्ष च महत्सैन्यं ददर्श च भृगूद्वहम् ।। ८ स्नातः शुचिरलं तत्र रामतीर्थे महातपाः। तत्तद्दरिद्रदारिद्र्यविद्रावि द्रविणं ददौ ।। ९ उभाभ्यां कालकामाभ्यां भ्रातृभ्यामथ भूषितम् । ब्राह्म्या श्रिया भ्राजमानं ब्रह्मण्यं ब्राह्मणैर्वृतम् ।। ९ सम्यगभ्यर्च्यमभ्यर्च्य प्रणम्यापि च भार्गवम्। इन्द्रद्युम्न इव द्युम्नं भौरिकैर्भूरि दापयत् ।। १०

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, नंतर सह्याद्रीचा राजा कर्णाटक देश जिंकण्यासाठी तयार झाला. शुभमुहूर्तावर सूचक नगारा दुमदुमला. दुर्गदुर्गेश्वर रायगडावर धाकट्या मुलाला ठेवून आपल्या खास लोकांखेरीज इतरांना वगळून योग्य प्रमाणात सैन्य बरोबर घेऊन व दुसऱ्या अधिकाऱ्यांना त्या ठिकाणी नेमून विजय नावाच्या घोड्यावर तो महापराक्रमी राजा आरूढ झाला. ब्राह्मणाच्या जातीत जन्माला आलेला, स्वतःच्या पराक्रमाने उत्तम पद प्राप्त केलेला राहूजी (राहूजी सोमनाथ) यांना नेमले. सुमेरूतुल्य वीरांनी उत्तुंग शिखरांचे रक्षण जसे केले तसे दिल्लीश्वरादी महादैत्यरूपी शत्रुसंघाला पोचण्यास कठीण अशा शत्रूने वेढलेल्या शिखरांचे (किल्ल्यांचे) रक्षण केले होते. पराक्रमी व आज्ञाधारक अशा ज्येष्ठ पुत्राला त्या मोठ्या मनाच्या राजाने बरोबर घेतले आणि आपला मनसुबा अमलात आणला. दलेलादिकांच्या पारिपत्यासाठी निवडलेले सैन्य व मोरोपंत या मुख्य सचिवाला वाड्याजवळ सज्ज ठेवले होते. ब्राह्मणांच्या मंगल आशीर्वादानेच संतुष्ट होऊन त्यांनी मोठ्या सैन्याचे नेतृत्व केले होते. परशुरामाचे दर्शन घेतले, स्नान केले, त्या रामतीर्थावर शुचिर्भूतपणे गरिबांचे दारिद्र्य निवारण्यासाठी मोठे द्रव्यदान केले. काल आणि कामरूपी दोन भावांनी (=वृत्तींनी) भूषित

झालेल्या ब्राह्मणाने घेरलेल्या, ब्राह्मतेजविराजित आणि सन्मान्य अशा परशुरामाची पूजा करून त्यास वंदन केले. इंद्रद्युम्नाने तेज द्यावे त्याप्रमाणे (?) खजिनदाराकडून भरपूर द्रव्य घेऊन दान करविले.

**संभाजीराजे शृंगारपुरात -**

**अथैष धीनिधानेन प्रधानेन द्विजन्मना । विश्वनाथाभिधानेन सावधानेन साधुना ।। ११ मुदितैर्दानमानाभ्यामात्मप्रत्ययितात्मभिः । जनैः कतिपयैर्युक्तं तथा परिचरैर्नरैः ।। १२ अहर्दिवं द्रवद्दानद्रवार्द्रैर्भद्रजातिभिः । दन्तिभिर्हरिदश्वाश्वसमैरश्वैश्च कैश्चन ।। १३ परार्घ्यैर्भूषणैस्तैस्तैरम्बरैश्च यथोचितैः । कियतापि च कोशेन सम्भाव्यश्लाघ्यविक्रमम् ।। १४ प्रश्रितं तनयं ज्येष्ठं नयं मूर्तमिवात्मनः । निधाय श्रृङ्गारपुरे श्रृङ्गारमिव सम्पदाम् ।। १५ समुद्धृत्य च वात्सल्यरसे मज्जन्निजं मनः । महाभागः स्वयं भागानगराभिमुखोऽभवत् ।। १६ शम्भुस्तु तादृशीं तत्र पितुराज्ञां प्रमाणयन्। अचीकरज्जगत्यत्र यशसामिव सञ्चयम् ।। १७ महाटवीमयेऽमुष्मिन्विषमे विषये वसन् । अन्वभूदन्वहं धन्वी धन्वविद्यामयं रसम् ।। १८ अह्नः म आदिमे यामे व्यभाद्व्यायामलीलया । उद्यत्तनुतमस्वेदकणभुक्तागणश्रिया ।। १९ दशचाष्टौ पुराणानि क्रमेण श्रुतवानयम् । नयं कामन्दकाद्युक्तमितिहासानपि स्वयम् ।। २० प्रयतीकुर्वता लोकं स्वेन वृत्तेन सर्वतः । अमोघेन महौघेन स्वःस्रवन्त्याः प्रसर्पता ।। २१ परिपालितयात्यर्थं धर्मवत्सम्प्रसूतया । भूतानुकम्पया कामसौरभेय्या गृहे गृहे ।। २२ करेण कल्पतरुणा वचनेनामृतेन च । व्यधत्त शम्भुः शृङ्गारपुरमेवामरावतीम् ।। २३**

**अर्थ** – नंतर सज्जन, बुद्धिमान अशा विश्वनाथ नावाच्या ब्राह्मण प्रधानाने काळजीपूर्वक दान-मानादी साधनांनी समाधान झालेल्या आणि स्वामिनिष्ठ अशा सेवकांकडून, सतत गळणाऱ्या मदस्रावाने आर्द्र झालेल्या उत्तम जातीच्या हत्तींनी, सूर्याच्या घोड्याप्रमाणे तेजस्वी घोड्यांनी, नानाप्रकारच्या भूषणांनी, उचित वस्त्रांनी आणि काही द्रव्याने प्रशंसनीय असा पराक्रमी विनम्र, नीतिमंत अशा ज्येष्ठ पुत्राला शृंगारपुरात ठेवले आणि धनविभूषित अशा त्या पुत्राचा अतिशय वात्सल्यपूर्ण असा निरोप घेऊन महाराज भागानगराकडे निघाले.

शंभूराजांनी आपल्या पित्याची आज्ञा प्रमाण मानून जणू जगात महान कीर्ती प्राप्त केली. निबिड जंगलाच्या त्या क्लेशदायक प्रदेशात राहून संभाजीराजांनी धनुर्विद्येची साधना करून त्यातील गोडी अनुभवली. दिवसाच्या पहिल्या प्रहरात व्यायामप्रकारामुळे अंगावर आलेल्या घामाचे बिंदू मोत्याच्या सरीप्रमाणे शोभून दिसत. अठरा पुराणे तो नियमितपणे ऐकत असे. स्वतः कामन्दकादिकांनी सांगितलेली राजनीती व इतिहास याचा अभ्यास करीत असे. स्वतःच्या आचरणाने इतरांनाही तो कार्यप्रवृत्त करी. आपल्या अमोघ अशा वाणीच्या मोठ्या प्रवाहाने धार्मिक वातावरण निर्मिती होण्यासाठी जोपासलेल्या भूतदयेने घरोघरी दिलेल्या कामधेनूनी कल्पवृक्षांच्या हातानी आणि आपल्या अमृतमय भाषणाने शंभूराजांनी शृंगारपूर म्हणजे अमरावतीच करून टाकली.

**ततोऽतिमृदुना राजभागधेयेन सम्भृतम् । सुदृष्ट्या शम्भुराजस्य प्रपन्नावनकारिणम् ।। २४ यथर्तुगुणसम्पन्नप्रसूनफलशालिनम् । यथावेलचलद्वर्षप्रहर्षितकृषीवलम् ।। २५ स्वस्वधर्मसमा-सक्ततत्तद्वर्णपरिष्कृतम् । परिस्तीर्णापणाकीर्णं विस्तीर्णामरमन्दिरम् ।। २६ अमुं प्रभावलीदेश-मन्तरीयान्तरादपि । आस्थावन्तः किलास्थातुमिभ्यास्ते ते समाययुः ।। २७ इहान्तरे शिवामा-त्यैर्दस्युवृत्तैरुपप्लुताः । प्रजाः समागतास्तत्र यत्र शम्भुरवस्थितः ।।**



**२८ असावतीव भीताभ्यस्ताभ्यः स्वमभयं प्रभुः । अदात्तदावदाताभिः कीर्तिभिः श्रियमावहन् ।। २९ अथ बाधकबाधाय साधकः साधुसम्मतः । कृती काल्लीं किलाराद्धुं प्रावर्तत स सुव्रतः ।। ३०**

**अर्थ** – शंभूराजांच्या दयादृष्टीमुळे ज्यांचे रक्षण झाले आहे, ज्यांना थोडाफार राजसहवास लाभला आहे, अशा प्रभावली सुभ्याच्या पलीकडून काही बोलके लोक आपुलकीने जमा होऊ लागले. ऋतू पुष्पफलादी समृद्धीने गुणसंपन्न होता. वेळेवर पडलेल्या पावसामुळे शेतकरीही आनंदी होते. सर्वधर्मपरायण असे लोक कर्तव्यदक्ष व सुसंस्कृत होते. सर्व प्रदेशात दुकाने थाटली होती. मोठमोठी मंदिरेही होती. इतक्यात शिवाजी महाराजांच्या प्रधानमंडळाने दिलेल्या गुंडांच्या बातम्यांनी त्रस्त झालेली प्रजा शंभूराजांच्या निवासस्थानी उपस्थित झाली. भयग्रस्त अशा त्या प्रजाजनांना संभाजीराजांनी अभय दिले. पराक्रमामुळे ते प्रसिद्धीस पावले होते. नंतर उपद्रवी लोकांचा पाडाव करणे त्या साधुसंमत मार्गाचा अवलंब करण्यासाठी सुव्रती साधक बनून कालीदेवीची उपासना करण्यास ते प्रवृत्त झाले.

**तदा तत्र महासत्रे यन्त्रे मन्त्रे च कोविदः । सितयाऽसितयातीव सितैः शबलितैस्तिलैः ।। ३१ खाद्यैः समधुभिर्मांसैः सर्पिषा पायसेन च । चम्पकैर्बकुलैर्बन्धुजीवैरम्बुरुहैरपि ।। ३२ नागवल्लीदलैः पूगैर्नारङ्गैः कदलीफलैः । कूष्माण्डैरिक्षुकाण्डैश्च कन्दरालैर्मनोहरैः ।। ३३ ताम्रैर्दाडिमबीजैश्च जम्बीरैर्जाम्बवैरपि । आम्रैर्द्राक्षाफलैरार्द्रैर्नारिकेरैस्तथोत्तमैः ।। ३४ काश्मीरजेनागरुणा निशाचूर्णेन चारुणा । पिष्टातकेन कस्तूर्या चन्दनेन सुगन्धिना ।। ३६ बहुभिः सुरभिर्द्रव्यैर्होमार्हैरपरैरपि । सप्ताश्व इव तेजस्वी सप्तार्चिषमतर्पयत् ।। ३६ अथ राजकुमारस्य पश्यतो योगमुद्रया । अभयाशंसिनी साक्षात्कमनीयवरा भवा ।। ३७ मणिमन्दिरमध्यस्थ-स्वर्णसिंहासनस्थिता । योगिनीभिः परिवृता कौसुम्भवसनावृता ।। ३८**

**अर्थ** – तेव्हा तेथे महासत्रात यंत्राला मंत्रानी, काळ्या साखरेने (गुळाने), अतिशुभ्र पांढऱ्या चित्रविचित्र तिळांनी, खाद्यपदार्थांनी, मधुयुक्त मांसाने, तुपाने, खिरीने, चंपक, बकुल, बंधुजीव, कमळ अशा फुलांनी, विड्याची पाने, सुपारी, नारिंग, केळ, भोपळा, उसाची कांडे, लाल डाळिंबाचे दाणे, जम्बीर, जांभळे, आंबे, द्राक्षे, उत्तम ओले नारळ तसेच केशर, अगरू, सुंदर हळद, गुलाल, कस्तुरी, चंदन आणि इतर सुंदर पुष्कळ सुगंधी द्रव्ये इ. होमास युक्त अशा पदार्थांनी सुविद्य आणि सूर्यतेज अशा शंभूराजांनी अग्नीला हवन करून तृप्त केले. तेव्हा राजकुमाराला योगमुद्रेद्वारा अभय सूचित करणारी अत्यंत सुंदर, साक्षात विद्या,रत्नखचित मंदिरात मध्यभागी सुवर्णसिंहासनावर ती बसलेली होती. योगिनी तिच्याभोवती होत्या. कुसुंबी रंगाचे वस्त्र ती नेसली होती.

**रञ्जिताशेषदिक्कोणैः शोणैः पदनखांशुभिः । नमतोऽस्य बतोष्णीषपटलक्ष्मीं वितन्वती ।। ३९ त्विषा चक्षूंषि मुष्णद्भिः पुष्णद्भिः पुण्यवच्छ्रियम् । दिव्यैराभरणैर्युक्तापदप्रपदवर्तिभिः ।। ४० कणत्किङ्किणिकोद्दामरशनादामजन्मभिः । पूरयन्ती प्रसर्पद्भिर्नाभीकुहरमंशुभिः ।। ४१ प्रत्यङ्गुलिदलन्यस्तचित्ररत्नाङ्गुलीयका । हीरवैदूर्यकिर्मीरहेमकेयूरकङ्कणा ।। ४२ ललन्मुक्तामणि-मयग्रैवेयकललन्तिका । मार्तण्डमण्डलद्योतिसरत्नस्वर्णकुण्डला ।। ४३ सायुधाष्टादशभुजा प्रसन्नवदनाम्बुजा । मृदुग्रीवा कम्बुकण्ठी कलकण्ठी समस्वरा ।। ४४ कीटकोटीररत्नार्चिमण्डलेन विसारिणा । आबिभ्रती शिरस्युच्चैरातपत्रमिवापरम् ।। ४५ किरीटाग्रोल्लसद्रत्नप्रभापटलमात्मनः। प्रोल्लासयन्ती मार्तण्डबिम्बप्रस्पर्द्धिविभ्रमैः ।। ४६**

शुद्धाञ्जनातिसंशुद्धनीलेन्दीवरलोचना । ज्योत्स्नाहरद्युतिभरमुक्ताभासुरनासिका ।। ४७

अर्थ – तिच्या पायांच्या नखांच्या लाल किरणांनी सर्व दिशा प्रभावित झाल्या होत्या. तिला नमस्कार करीत असता ती आपल्या मुकुटाच्या वस्त्राची शोभा वाढवीत होती. आपल्या तेजाने पाहणाऱ्यांचे नेत्र आकर्षून घेत होती. आणि आपले अलौकिक (पुण्यमय) वैभव वाढवीत होती. तिची पावले दिव्यालंकारयुक्त होती. कंबरपट्ट्याच्या घंटांच्या किणकिणीटाने तसेच किरणांनी नाभीचा खोल भाग भरून टाकून किणकिणाट व किरण पसरत होते. प्रत्येक बोटात विविध रंगाच्या रत्नांच्या अंगठ्या घातल्या होत्या. हिरे, प्रवाळयुक्त सोन्याची बाहुभूषणे आणि कंकणे घातली होती. मानेवर मोत्याची हालणारी माळ होती. रत्नजडित सोन्याच्या कुंडलांना सूर्यमंडळाची दीप्ती होती. आपल्या अठरा हातात तिने शस्त्रे धारण केली होती. मुखकमल प्रसन्न होते. मान कोमल, मधुर स्वरांचा कंठ, चकाकणाऱ्या मुकुटावरील रत्नांच्या पसरणाऱ्या तेजोमंडलाने मस्तकावर जणूकाही दुसरे छत्र धारण केले आहे असे वाटत होते. मुकुटावर शोभणारे रत्नांचे प्रभापटल आपल्या सूर्यबिंबाशी स्पर्धा करणाऱ्या विभ्रमांनी अधिक तेजस्वी भासवीत होते. शुद्ध अंजनाने अतिशुद्ध झालेले असे नेत्र नीलकमलाप्रमाणे दिसत होते. नासिका चांदण्याप्रमाणे तेज असलेल्या मोत्यामुळे शोभिवंत झाली होती.

मल्लिकादामसम्बद्धधम्मिल्लालिमनोहरा । अरुणारुणविभ्राजत्कुङ्कुमाञ्चितगोधिका ।। ४८ विद्या विश्वस्य जननी वत्सेऽस्मिन् प्रस्नुतस्तनी । कुन्दकुड्मलसङ्काशरदा श्रीभरदायिनी ।। ४९ प्रादुरासीत्प्रतिनिधिप्रदीप्त्या जातवेदसः । सहसोद्भासितनभा तडित्कोटिसमप्रभा ।। ५० नेत्रत्रयेण वर्षन्ती सुधाधारां हसन्मुखी । प्रणमन्तं समुत्थाप्य बाहुभिर्बहुभिः स्वयम् ।। ५१ सा चमत्कृतिदां चारुवाचमुच्चैरवोचत । आनन्दकन्दजननीं भक्ताभीष्टचमत्कृतीम् ।। ५२

अर्थ – जास्वंदीच्या हाराने बांधलेल्या वेणीवरील भुंग्यामुळे ती मनोहर दिसत होती. अत्यंत लालभडक अशा शोभायमान कुंकुमाने ती वक्र झालेल्या विश्वजननी, वत्सासाठी पाझर फुटलेली, कुंद कळ्यांनी शोभणारी, समृद्धीदात्री, अग्निरूपी प्रतिनिधीच्या झळाळीने अकस्मात आकाश प्रकाशमान करणाऱ्या विजांप्रमाणे, दिव्यप्रभा असणाऱ्या देवीने त्यांना दर्शन दिले. स्मितमुखी असून आपल्या तीन नेत्रांनी अमृतप्रवाहाचा वर्षाव ती करीत होती. नमस्कार करणाऱ्याला ती आपल्या अनेक हातांनी स्वतः उठवीत होती. ती अत्यंत आश्चर्यकारक आनंदकंद निर्माण करणारी आणि भक्तांची अभीष्टपूर्ती करणारी अशी गोड वाणी मोठ्याने बोलू लागली.

देव्युवाच । परिपाल्य पितुर्वाचं शम्भुराज विराजसे । मद्दयासत्त्वतः सत्त्वगुणः स त्वयि राजते ।। ५३ घटाकाश इवाकाशात्पृथक्भूतोऽप्युपाधिना । न भिद्यते पितुः पुत्रस्तयोर्नान्तरमान्तरम् ।। ५४ कार्याणां सुरकार्याणामन्तरायीभवन्स्वयम् । न स्थाता चिररात्राय वत्स वां कलिरप्ययम् ।। ५५ लोभक्रोधादिभिर्ग्रस्तास्त्वत्पितुः सचिवा इमे । धर्मे स्थितस्य हन्तेह न सहन्ते स्थितिं तव ।। ५६ कृतकृत्याः प्रयोगास्ते कृतकृत्या इवाधुना । भवत्यपचिकीर्षन्ति मद्भक्ते प्रभवत्यपि ।। ५७ अतस्तूर्णमितो गत्वा पश्य दिल्लीपतेर्बलम् । हर्षयेः पृथिवीं सर्वां दर्शयेः स्वस्य पौरुषम् ।। ५८ ददामि मोहिनीं विद्यामिमां परिचरान्वहम् । अयि त्वयि महाबाहो वत्से स्वे वत्सलास्म्यहम् ।। ५९ गमयेस्त्वमये तत्र समयं वत्स कञ्चन । पुनरेष्यसि निर्विघ्नं मन्निघ्नं तावकं मनः ।। ६० तत्रस्थस्तेजसा स्वेन तत्तेजांसि हरिष्यसि । अथात्र पुनरागत्य तान्मृधे संहरिष्यसि ।। ६१ भवान्साम्राज्यविभवान्लब्ध्वा पितुरनन्तरम् । उरीकरोतु कारुण्यादुर्व्या मृदुतरं करम् ।। ६२ येऽद्य सह्याद्रिणात्यर्थं युध्यन्ते यवना इमे । हन्तामून्विनिहन्तासि गन्तासि तुलनां निमेः ।। ६३



अर्थ – देवी म्हणाली, ''हे शंभूराजा, पित्याचे शब्द पाळल्याने तू शोभतोस. माझ्या कृपाप्रभावाने तुझ्यामधे हे सत्त्वगुण उठून दिसत आहेत. उपाधीमुळे घटाकाश जरी आकाशातून वेगळे झाले तरी पिता-पुत्रात भेद नसतो, मनामनांत अंतर नसते. (घटामधील मर्यादित झालेले अवकाश – घड्यामधील मोकळी जागा आणि आकाशभर पसरलेले अवकाश भिन्न वाटले तरी एकच असते.) वत्सा, तुमचा हा कलीदेखील स्वतः दैवी कार्याच्या आड आला, तर जास्त काळ टिकणार नाही. तुझ्या पित्याचे सचिव लोभ-क्रोधादींनी ग्रस्त झाले आहेत. तू धर्माच्या बाबतीत पक्का असल्याने त्यांना तुझी अवस्था असह्य झाली आहे. माझा भक्त प्रभावी असूनही त्यांची कारस्थाने सध्या यशस्वी झाल्याने ते तुला अपाय करू इच्छितात. तेव्हा तू आता लवकरच इथून निघून दिल्लीपतीच्या सैन्याचा विचार कर. आपला पराक्रम तू दाखववावास आणि सर्व पृथ्वीला आनंद द्यावास. मी तुझ्या परिचरांना मोहिनी विद्या देते. जरी तू बाहुबली असलास, तरी मी माझ्या बाळाच्या बाबतीत वत्सलच आहे. अरे बाळा, तू आता वेळेवर तिकडे जा. तू पुन्हा निर्विघ्नपणे परत येणार आहेस. तुझे मन माझ्यावर विसंबून आहे, हे मी जाणते. तिथे गेल्यावर तू आपल्या तेजाने त्यांच्या तेजावर मात करणार आहेस आणि पुन्हा इथे येऊन त्यांचा युद्धात संहार करणार आहेस. पित्याच्या मागे साम्राज्य, वैभव मिळवून पृथ्वीदेवीचा कोमल हात स्वीकार. हे जे यवन इथे आता सह्याद्रीबरोबर झुंजत आहेत, त्यांना मारून तू निमि राजासारखी कीर्ती मिळवशील.''

कलिग्रहग्रहाविष्टा न्प्रविष्टान्राक्षसैरिव । पितुः प्रधानान्कुमतीन्नियन्तासि नियामकः।। ६४ ये ये तवाहिते युक्ताः सक्ता दुर्मन्त्रमन्त्रिते । शम्भुराज क्षपयिता भवान्भुवि भविष्यसि ।। ६५ मद्रहस्यं प्रशस्यं च यशस्यं पल्लविष्यसि । मद्भक्तिभावनिरतो मदर्चायां रतः कृती ।। ६६ विहाराहारलीलासु तृप्तिमुच्चैः समेष्यसि । कालं लीलावतीलोलललितैर्गमयिष्यसि ।। ६७

अर्थ – तुझ्या पित्याच्या प्रधानास कलीरूपी दुष्ट ग्रहाने राक्षसाप्रमाणे पकडून त्याच्यात प्रवेश केला आहे. तू नियामक आहेस. त्या दुष्ट बुद्धीचे नियमन कर. जे जे तुझ्या वाईटावर आहेत आणि दुष्ट सल्लामसलत करीत आहेत त्यांचा तू विनाशक होशील. माझ्याविषयी भावभक्तीने आकृष्ट होऊन माझ्या पूजेत मग्न झालास तर माझे प्रशंसनीय आणि यशोदायक रहस्य पल्लवीत करून धन्य होशील. आहार-विहार-क्रीडामधे अतिशय तृप्ती मिळेल आणि विलासिनींच्या चंचल क्रीडांमधे तुझा काळ जाईल.

तेजसा भास्करः साक्षाद्बुध्या जितशतक्रतुः । प्रतापतापितारातिर्बृहद्भानुरिव स्वयम् ।। ६८ धर्मे समधिको धीमान्धीरः पुण्यजनाश्रयः । निजदण्डाग्रदमितदुष्टो दण्डीव भासुरः ।। ६९ प्रचेताश्चेतसा स्वेन प्रचेतृविजयोद्धुरः । प्रभञ्जनो विपक्षाणां वृक्षाणां वा प्रभञ्जनः ।। ७० धनदः पण्डितकविविप्रवृन्दस्य सर्वदः । ईशो महेशपत्पद्मसेवाभरसमुत्सुकः ।। ७२ नारायण इव श्रीमान्महामानी जितक्लमः । विजयी विनयोपेतो नयोपेतो जगत्स्तुतः ।। ७३ मान्धातेव क्षमाक्षेमदक्षो दक्षिणलक्षणः । रक्षको द्विजदेवानां गवामाश्रमिणामपि ।। ७४

अर्थ – तू तेजोभास्कर आहेस, बुद्धीने साक्षात इंद्राला जिंकणारा आहेस, स्वपराक्रमाने शत्रूला ताप देणारा अग्नी आहेस, धर्माचरणात विशेष आहेस. बुद्धिमान आणि धैर्यशील अशा सज्जनांचा तू आश्रयदाता आहेस. आपल्या दंडाच्या टोकाने दुष्टांचे दमन करणाऱ्या सेनापतीप्रमाणे

तेजस्वी आहेस. आपल्या बुद्धीच्या जोरावर विजय मिळवून देणारा धुरीण आहेस. वृक्षांप्रमाणे शत्रूवर घोंघावणारे वादळ आहेस. पंडित, कवी आणि ब्राह्मण यांच्या समूहाला सर्वकाही देणारा कुबेर आहेस. महेशाच्या पदकमलाची अतिशय सेवा करण्यास उत्सुक असा तू राजा आहेस. विष्णूप्रमाणे वैभवसंपन्न, महामानी, आळसावर विजय मिळविलेला, शिस्तप्रिय, न्यायी आणि जगात ज्याची स्तुतीच होते असा आहेस. मान्धात्याप्रमाणे क्षमा आणि प्रजेचे कल्याण याविषयी तू दक्ष आहेस. उत्तम लक्षणांनी युक्त असून देव, ब्राह्मण, गाई आणि संन्यासी यांचा रक्षक आहेस.

**अनन्तसन्तः प्रथितो जिताऽखिलपरिश्रमः । नलवन्नरपालस्त्वं कृपालुः करुणानिधिः ।।७५ दानोत्कर्षप्रकर्षेण घोषितो जितरोषणः । शोषणः शत्रुवदनतोयस्य नहुषो यथा ।। ७६ पोषणो यज्ञचैत्यादियतिपङ्ग्वन्धमण्डलेः । ययातिरिव धर्मिष्ठः सुशर्मिष्ठः प्रियः सताम् ।। ७७ आजमीढ इवातीव निरूढो धर्मसम्पदम् । विरूढकीर्तिः सर्वत्र रूढो विनयमण्डलम् ।। ७८**

**अर्थ** – सर्व कारस्थानांवर विजय मिळविलेला असा कृपाळू, नलासारखा करुणानिधी असा प्रजापालक आहेस. दानाच्या परमोत्कर्षाने नावाजलेला, क्रोध जिंकलेला नहुषाप्रमाणे शत्रूच्या तोंडचे पाणी पळविणारा तू आहेस. यज्ञ, चैत्य, संन्यासी, पंगू आणि अंध यांचे पोषण करणारा आहेस. ययातिप्रमाणे, धर्मनिष्ठ, कल्याणकारक, सज्जनप्रिय अजमेरच्या राजाप्रमाणे (?) धर्मसाधनेत व्यस्त आणि शिस्तीच्या चक्रात स्थिर झाल्याने तुझी कीर्ती सर्वत्र प्रस्थापित झाली आहे.

**रक्षोगणानिवाशेषान्श्यामलानामलम्बलम् । क्षपयिष्यसि ताम्राणां रामो रक्षोगणानिव।।७९ म्लेच्छानां यवनानां च खशपारसिनामपि । खुरासनानामुग्राणां मोगलानां तुरुष्किणाम् ।। ८० सेखसय्यदमुल्लाणपीरजादतुराणिनाम् । इराणिनां पठाणानां फैरङ्गाणां कसायिनाम्।।८१ आरब्बानामिङ्ग्रजानां वलन्देजादिनामपि । अम्भोधिदुर्गदुर्गाणामम्भो-धावेव गामिनाम् ।। ८२ किरातानामभीराणां सागरानूपवासिनाम् । काटकानां कठोराणां ...महर्निशम् ।। ८३ असतामतिसाङ्कर्यजातीनामतिनिग्रहम् । करिष्यसि कुमाराभो विक्रमी निग्रहं दृढम् ।। ८४ कर्णाटान्ध्रमहाराष्ट्रचोलकोङ्कणमूरकान् । गौडद्रविडसावन्तपत्तनानि सहस्रशः।।८५वैराडपुण्यमगधकऱ्हाडकरवीरकान्। वैजापुरीयान्यान्कांश्चित्पुण्डा-न्देशाधिपानपि ।। ८६ पालेगारान्नरपतीन्कांश्चिद्ग्रामाधिपानपि । महाह्रदभरो-दग्रनानास्थानाधिपानपि।। ८७ दरीदुर्गाश्रयान्कांश्चित् कांश्चिदारण्यदुर्ग्रहान् । कांश्चित्सेनापतीन्कांश्चिदधिपान्दुर्धरानपि ।। ८८ पालयिष्यसि विक्रम्य शक्रस्तु त्रिदिवं यथा । शम्भुराज महाराज स्तुत्यामात्यैरभिष्टुतः ।। ८९ विचित्रगुणसंम्पन्नं पुत्रश्चाधिगमिष्यसि । सर्वसाम्राज्यपदवीमतीवानुभविष्यसि।। ९० अलं होमविधानेन तपसाऽपि जपेन च । सर्वेऽर्थास्तव संसिद्धा मत्प्रसादादितःपरम् ।। ९१**

**अर्थ** – रामाने राक्षसगण मारले, त्याप्रमाणे तूही श्यामलांचे आणि ताम्रांचे भरपूर सैन्य खलास करशील. तसेच म्लेंच्छांचे आणि यवनांचे, खश आणि पारसी यांचे उग्र खुरासनांचे, मोगलांचे, तुरुष्कांचे, शेख, सय्यद, मुल्ला, पीरजादे, तुराणी, इराणी, पठाण, कसाई, अरबी, इंग्रज, वलंदेज या सर्वांचे भरपूर सैन्य तू मारशील. जलदुर्ग, भूदुर्ग, जंजिरे, किरात, आभीर, सागरावर आणि पाणथळ जागी काटक आणि कठोर, दुर्जन, वर्णसंकर झालेल्या जाती यांचा तू पराक्रमी असल्यामुळे दृढनिश्चयाने चांगला बंदोबस्त करशील. कर्नाटक, आंध्र, महाराष्ट्र, चौल, कोकणातील यवन (सिद्दी), गौड, द्राविड तसेच सावंतवाडी यातील सहस्रशः गावे, वऱ्हाड, मगध, कऱ्हाड, करवीर,



पुणे, विजापूर येथील पुंड अधिकारी, पाळेगार, राजे, काही पाटील, मोठाली सरोवरे आणि वाढणारे पाणवठे, दरीखोरी, किल्ले यात आश्रय घेतलेले, अरण्यात पकडण्यास कठीण बनलेले काही सेनापती आणि काही अनावर झालेले अधिकारी, या सर्वांचे, इंद्राने स्वर्गाचे ज्याप्रमाणे पालन केले, त्याप्रमाणे तू पराक्रमाने त्यांचे पालन करशील. संभाजी महाराज, अमात्यांनी स्तुतिस्तोत्रे गाऊन प्रशंसनीय बनविलेल्या तुला विविध गुणसंपन्न असा पुत्र प्राप्त होईल आणि सर्व सम्राटांच्या चांगल्या दर्जाला तू पोहोचशील. होमविधान, तपश्चर्या, जपानुष्ठान पुरे झाले. यापुढे माझ्या प्रसादाने तुझे अभीष्ट पूर्ण होईल.'' असे सांगून आपला वत्स शंभूराजा समाधीत गुंतलेला पाहून कौतुकाने, करुण हृदयाने शोभणारी कालिकादेवी श्रेष्ठ अशा कदम्बानी (?) त्याला खूश करून पुढच्याच क्षणी आपल्या सखीबरोबर गुप्त झाली.

**इति विहितसमाधिं शम्भुभूपं स्ववत्सं सकरुणहृदयश्रीःकालिका कौतुकेन । प्रवरवर-कदम्बैश्छन्दयित्वा तदानीं सपदि निजसखीभिः सा तिरोभावमैच्छत्।। ९२ तस्मिन्ध्याने प्रकामं प्रथिततमगुणस्तोमलक्ष्मीन्दधानो राज्यश्रीः साभिमानः क्षितिपतितिलकस्याग्रजन्मा तनूजः । लब्ध्वा नानावरौधं निजहृदि सततं सस्तुवंश्चामिवन्दन् प्रेम्णा देवीमुदारामतिमुदमधिकामाव-हन्काञ्च शोभाम् ।। ९३**

**अर्थ** – तो राजा पूर्णपणे ध्यानमग्न असता अतिशय प्रसिद्ध गुणांची राज्यश्री धारण करणारा स्वाभिमानी, एका तिलकभूत राजाचा ज्येष्ठ मुलगा, अनेक वर सतत आपल्या हृदयात बाळगून स्तुती आणि वंदना करणारा, प्रेमाने उदार देवीला आणखी आनंद देऊन विलक्षण शोभत होता.

**दत्वा दत्वा प्रशस्तानभिमतविभवान्कांश्चिदुच्चैर्वरौघान् यातायां स्वं निकेतं झटिति निकटतः कालिकायामजस्रम् । भक्त्या सन्दर्शनार्थी चकित इव भवद्(न्) वञ्चितं तद्वियोगात् स्वात्मानं प्रौढमानी बत महिततमो भावयामास भूपः ।। ९४ अन्तर्भावं गतायामभिमतफलदानोद्धुरायां भवान्यां वह्नेः पूर्णाहुतिं तां समुचितसुरभिद्रव्यमिश्रैः सुपक्वैः। मद्यैर्मांसैस्तथान्नैरपि परिकलयन्होमशेषं समाप्य प्रत्येकं ऋत्विजानाम-ददद‍भिनवान्मेरुवत्स्वर्णपुञ्जान् ।। ९५ ऋत्विग्भ्यो दक्षिणां तां कनकमणिमयीं सन्ददानोऽतिवेलं दक्षो दाक्षिण्यशीलः सुरभरविटपिश्रीभरं सम्बभार। तत्रत्यं तान्त्रिकं तत्सकलमपि परं पूर्णतां प्रापयित्वा विप्रेभ्यो भूरि भूयो द्रविणमपि चिराद्दापयामास भक्त्या ।। ९६ दत्वान्नं ब्राह्मणेभ्यस्तदनु च विलसच्छ्रीभरोदग्रकर्मा सद्धर्मासक्तचित्तः समधिकविभवो धर्मवद्धर्ममूर्तिः । अश्नन्निष्णातबुद्धिः परममृतमिति क्षुण्णशास्त्रैकतत्त्वः सत्त्वोद्रिक्तो विरेजे रघुरिव सुलघूभूतदुर्दान्तशत्रुः ।। ९७ इत्थं सर्वं समाप्य प्रथिततममतौ शम्भुराजे स्वराज्यं प्राज्यं पित्रा प्रदत्तं किमपि च विभवैः शासति प्रौढधाम्नि । दिल्लीन्द्राय प्रगल्भाः प्रतिनगरमहो सञ्चरन्तश्चरास्ते प्रापुर्वृत्तान्तजातं किल कलिकलितं स्वामिनोऽग्रे प्रशंसुः ।। ९८ कर्णाटान्सुभटान्महाप्रतिभटान्जेतुं प्रयाते शिवे क्षोणीन्द्रैकशिरोमणौ स ममतामोहेन सम्मोहिते । उद्विग्नोऽपि सुरेन्द्रतुल्यमहिमा श्रीशम्भुराजःकृती सङ्गच्छामि(च्छेय) कदा मुदाद्य यवनैरित्थं मनः सन्दधे ।। ९९**

**अर्थ** – प्रशंसनीय आणि इष्ट वैभव पुन्हापुन्हा देऊन उच्चकोटीचे काही वरही देऊन कलिकादेवी झटकन आपल्या स्थानाकडे निघून गेल्यावर भक्तीमुळे दर्शनाची आस निर्माण झालेल्या, (परंतु) तिच्या वियोगामुळे दर्शनाला मुकलेला, आश्चर्यचकित झाल्याप्रमाणे स्वतःला प्रौढपणा आलेला

असल्यामुळे आपण अत्यंत भाग्यशाली आहोत असे मानू लागला. इष्ट फलाचे दान करण्यास उद्युक्त झालेली भवानी देवी अंतर्धान पावल्यावर उचित अशा सुगंधी द्रव्यमिश्रित, शिजलेल्या मद्यमांस अन्नाची पूर्णाहुती देऊन, होमाचा उरलेला भाग संपवून, ऋत्विजांना प्रत्येकी अभिनव असे मेरूप्रमाणे मोठाले सोन्याचे गोळे दिले. त्यांना सोन्याच्या मण्यांची दक्षिणा देऊन दक्ष, दाक्षिण्यशील अशा त्याने कल्पवृक्षाचे वैभव धारण केले. तिथल्या तंत्रनिपुणाला ते सर्व पूर्णपणे स्वाधीन करून ब्राह्मणांना पुन्हा पुष्कळसे धनदेखील भक्तीने पुष्कळवेळा देत होता. ब्राह्मणांना अन्नदान केले व नंतर तो वैभव आणि पराक्रम याने विलसू लागला. त्याचे चित्त सद्धर्माकडे लागले. वैभव इतरांपेक्षाही अधिक होते आणि धर्माप्रमाणेच तो धर्ममूर्ती होता. त्याची बुद्धी निष्णात होती. श्रेष्ठ अमृताचे तो प्राशन करीत होता. शास्त्रांतराची सर्व तत्त्वे त्याने आत्मसात केली होती. सत्त्वगुणाने तो वरचढ होता. आपल्या दुर्दमनीय अशा शत्रूला अगदीच क्षुद्र करून टाकणाऱ्या रघुराजाप्रमाणे तो शंभूराजाही शोभला. याप्रमाणे सर्व कार्यभाग संपल्यावर विशाल बुद्धीच्या शंभूराजावर वडिलांनी खूप मोठे स्वराज्य सोपविले होते. तो विलक्षण वैभवाने जणू प्रौढतेचा निवासच असा प्रशासन करीत असता गावागावांत संचार करणाऱ्या चतुर हेरांनी दिल्लीश्वराला सर्व वृत्तांत कळविला आणि कलीने घडवून आणलेल्या घडामोडींची आपल्या स्वामींसमोर स्तुती केली. प्रतिपक्षाच्या समरधुरंधरांना जिंकण्यासाठी शिवाजीराजे कर्नाटकाकडे गेल्यावर ममता मोहाने ते मुग्ध झाले असता इंद्राप्रमाणे महिमा असलेला धन्य असा शंभूराजा विमनस्क झाला तरी माझी आज यवनांशी गाठ पडेल अशा विचाराने मनात आनंद मानू लागला.

**क्षणक्षणमनुक्षणं ललितलक्षणं सुन्दरं स्वयं मनसि भावयन्गिरिसुताप्रयुक्तं वचः। तदेव हि तमुच्चकैः परिविचिन्त्य नुत्यो बुधैः रक्ष सकलाः प्रजाः प्रणयवान्नरेन्द्रात्मजः ।। १०० किल कलिरपि लीलामित्थमुच्चैर्वितन्वन् शिवनृपतितनूजे सम्भ्रमाविष्टचित्तः । अनुपमममताया व्याजमालम्ब्य भूयो निजविजयसमुत्कः स्वीयचित्ते ननन्द ।। १०१**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरकवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां शुभलक्षणलक्षितायाम-ध्यायशतसम्मितायां वैयासिक्यामध्यायः ।**

**अर्थ** – क्षणोक्षणी पार्वतीचे मृदुलक्षणयुक्त सुंदर शब्द स्वतःच्या मनात आणून त्याच श्रेष्ठ शब्दातून विद्वानाने स्तुती केलेला प्रेमी असा राजपुत्र सर्व प्रजेचे रक्षण करीत होता. कलीसुद्धा आपली उच्च अशी कपटक्रीडा करीत असता शिवाजीराजांच्या अनुपम अशा ममतेच्या मनात प्रवेश करून आपल्या विजयाविषयी उत्कट औत्सुक्याने आनंदित झाला.

अनुपुराण सूर्यवंशातील नेवासकर कवींद्र परमानंद यांनी प्रकाशित केलेला शुभलक्षणकारक शतसंहितेतील वैयासिक अध्याय.

**विभाग १ –**

**यन्त्रं त्रिलोहात्मकमात्रिलोक्याऽऽख्यातं स्वतन्त्रे गिरिशोक्ततन्त्रे । त्रियन्तृयन्त्रेऽखिल-ब्रह्मयन्त्रे नियन्त्रणा यस्य नियन्त्रणास्ते ।। ६१**

**अर्थ** – स्वतंत्र अशा शाक्त तंत्रात सोने, चांदी, तांबे या तीन धातूंनी बनविलेले यंत्र सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्याच्यावर नियंत्रण म्हणजे अखिल ब्रह्मांडावर नियंत्रण. अशा या यंत्रात तीन नियन्ते असतात.



**कलशाभिषेक -**

**युग्माम्बरा रक्षति वृत्तिचित्रे चैत्रे सिते वत्सरकालयुक्तके (क्ते) । काम्यातिथौ तत्कलशाभिषेकः कामं चमत्कारततिश्चकार ।। ६२**

**अर्थ** – कालयुक्त संवत्सरातील चैत्र शुक्ल पक्षाची द्वितीया या शुभ तिथीला यंत्र रक्षण करीत असता केलेला कलशाभिषेक अनेक चमत्कार करून गेला.

(कालयुक्तसंवत्सर म्हणजे एप्रिल १६७८ ते एप्रिल १६७९)

**अवत्यारण्यसङ्गेन पुरश्चरणसङ्गिना । कथितः पूर्ववृत्तान्तश्छन्दोगामात्यमन्त्रिणा ।। ६५**

**अर्थ** – अरण्यात आणि पुरश्चरणात बरोबर राहिलेल्या छन्दोगामात्य मंत्र्याने (कविकलश) पूर्ववृत्तांत सांगितला.

**यद्गिरोक्तं समागत्य गणेन शिवयो रहः । तत्प्रकाशत्वमायातं मर्म जन्माननतरोद्भवम्।।६६**

**अर्थ** – शंकराच्या आणि शिवाजीच्या अनुचराने जे जन्मंतरातील रहस्य येऊ घातले होते तेच प्रकाशात आले.

**तद्वंश एव राजन्योऽप्यसौ प्राक्सम्बभूव ह । तेनार्यशिष्यसम्बन्धः सुसम्बद्धः शुभावहः।।६७**

**अर्थ** – त्याच कुलामध्ये तो एक क्षत्रिय म्हणून जन्मला होता आणि त्याने शुभकारक असा आर्य-शिष्य संबंध उत्तम रीतीने निर्माण केला.

**द्वयोरप्येकचित्तत्वमभवत्किं तदद्भुतम् । सिद्धसाधकतां प्राप्तौ सम्प्राप्ते जननान्तरे ।।६८**

**अर्थ** – दोघांचे (शंभू आणि छंदोगामात्य यांचे) आश्चर्यकारक असे जे एकचित्त झाले होते, तेच नवीन जन्मात सिद्ध (कविकलश) आणि साधक (शंभूराजे) असे निर्माण झाले.

**अत्र सम्मतिमाह । सिद्धसाधकयोर्भेदः स्त्रीपुंसोरिव दृश्यते ।**
**तयोस्तु भेदसम्प्राप्तौ चपला चञ्चला भवेत् ।। ६९**

या ठिकाणी आधार असा की -

**अर्थ** – सिद्ध साधकातील भेद स्त्री-पुरुष भेदाप्रमाणे असतो. त्यांच्यात भेद निर्माण झाला तर लक्ष्मी अस्थिर होते.

**तत्सङ्गमः सङ्गमेऽस्मिन् श्रीचक्रोद्धारसम्भवे ।**
**अवश्यं सम्भवत्येव भाविसम्बन्धियोग्यता ।। ७०**

**अर्थ** – श्रीचक्राचा उद्धार या संगमेश्वरी झाला तर त्यांची (सिद्धसाधकांची) मैत्री अवश्य भावी संबंधांची अनुकूलता दाखविते.

**सूचनामात्रसम्बन्धो दिङ्मात्रेण प्रदर्शितः ।**
**मनोज्ञवर्णनीयांशे वर्णनीयोऽनुवर्ण्यते ।। ७१**

**अर्थ** – अशा संबंधांची फक्त संभाव्यता या ठिकाणी दिशा दर्शन रूपाने सुचविली आहे. त्यातील वर्णनयोग्य असा मनोज्ञ अंश नंतर वर्णन करू.

**राज्यं प्राज्यमवाप्य शम्भुनृपतिः श्रीशम्भुभक्तौ दृढं नित्यं श्रीजगदम्बिकाभजन-कृद्धानैकशौण्डः सदा । संसेवन् विषयाननेकविधया कार्याण्यनेकान्यलं शेमुष्या सुसमीकरोति विषमाण्याहो विचित्रा गतिः ।। ७२**

**अर्थ** – एवढे मोठे राज्य मिळाल्यानंतर शंभूराजे श्रीशंकर भक्तीत मग्न झाले. ध्यानामध्ये खूप

प्रवीण होऊन नित्य जगदंबिकेचे भजन करू लागले आणि अनेक प्रकारांनी विषयांचे सेवन करीत अनेक कठीण कार्ये बुद्धीच्या जोरावर मार्गास लावली. (परिस्थितीला मिळालेले) हे वळण किती आश्चर्यकारक आहे ना?

**प्राग्भावाद्गणनागुणाद्गजपतेः सिंहासनं साधितं नित्यानित्यविवेकसम्मतिसर-न्नित्यात्मयन्त्रान्वितम् । यन्त्रश्रीपरिवेष्टितं परमनुल्लङ्घ्यं परं पार्थिवैः सह्यस्याभरणं ह्यसह्यमनिशं दिल्लीश्वरस्याशये ।। ७२**

**अर्थ –** अनेक गुणांनी विवेकपूर्वक पूर्वीच्या प्रभावाने स्वतःच्या यंत्रासह गजपतीचे (शंकराचे) सिंहासन प्राप्त केले; परंतु इतर राजांना अनुल्लंघ्य असे श्रीयंत्राने परिवेष्टित आणि सह्याद्रीच्या प्रदेशाला भूषण असलेले राज्य दिल्लीश्वराच्या मनात अतिशय सलू लागले.

**यावच्छम्भुमहीपतिर्महितधीर्दुर्मन्त्रिदुश्चेष्टितादात्मानं परिपालयेदनियताद् दुर्योग-भोगोद्भवात् । सूर्यं श्यामलकान्तिसंहतिसरन्नभ्रंलिहाभ्रं यथा जन्तूनामशनिस्तु तावदनिशं छत्रं समागाच्छनिः ।। ७३**

**अर्थ –** जोपर्यंत शंभूराजे जागृत राहून दुष्ट मंत्र्यांच्या दुष्कृत्यापासून आणि त्यामुळे प्रसंगानुसार निर्माण झालेल्या दुःखापासून स्वतःचे रक्षण करतील तोपर्यंत तेजोहीन मेघांनी व्याप्त झालेल्या सूर्याप्रमाणे आणि प्राण्यांना वज्राप्रमाणे असलेला शनी त्यांच्या छत्रामागे सदैव राहील.

**सेहे तस्य बलं बलेर्बलवतो वैकुण्ठनाथादिवत् शम्भुर्दैवबलेन पङ्क्तिरथवत्तीर्णस्तदीयां गतिम् । आश्चर्यं सुमहत्तरं नरपतेश्चर्यानुचर्यानुगः प्राक्चर्यां बहुधाऽन्यथा नरपतेर्दृष्ट्वैव दृष्ट्याऽकरोत् ।। ७४**

**अर्थ –** विष्णूने बळीचे सामर्थ्य सहन केले तसे आपल्या बलवत्तर दैवाने बलवान शंभूराजानी दशरथाप्रमाणे त्याची (शनीची) गती सहन केली. याहूनही आश्चर्य असे की, इतर राजांच्या अनेक हालचाली व वागण्याच्या पद्धती पाहूनच आपल्या आचरणाचा क्रम ठरविला.

**धिष्ण्येषु दैवज्ञविकल्पितेषु यथा यथा सप्तसु सप्तधाऽभूत् । तथा तथा सप्तसु पार्थिवानामङ्गेषु वैषम्यभरं बभार ।। ७५**

**अर्थ –** ज्योतिष्यांनी सुचविलेल्या सात उत्तम स्थानात सात प्रकारे विभागणी व्हावी त्याप्रमाणे राज्याच्या सात अंगात असलेला कठीण भार त्यांनी वाहिला.

### दिलेरखानास औरंगजेबाचा आदेश, संभाजीराजे-दिलेरखान संधान-

**(विभाग ३, अध्याय ९)**

**कवीन्द्र उवाच । शिवराजात्पृथक्भूतं पृथुमेघमिवाम्भसः । शम्भुराजमथाकर्ण्य छिद्रा–न्वेषी दुराशयः ।। १ उत्कः स्वां ककुभं नेतुं केतुं सह्याचलश्रियः । सूनुः शाहाजहानस्य दलेलाय समादिशत् ।। २ दलेलः शम्भुराजाय शृङ्गारपुरवर्तिने । सद्यः सम्प्रेषयामास वर्णदूतममुं प्रभुः ।।३**

**अर्थ –** कवीन्द्र म्हणतात, 'एखादा मेघ पाण्याविना उरावा त्याप्रमाणे शिवाजीराजांपासून शंभूराजा वेगळा झाला हे कानी पडताच छिद्रान्वेषी अशा दुष्ट बुद्धीच्या शहाजहानच्या मुलाने (औरंगजेबाने) सह्याद्रीचे वैभव आपल्याकडे खेचून आणण्यासाठी उत्सुक होऊन दिलेरखानाला आदेश दिला. मातब्बर दलेलाने शृंगारपुरात असलेल्या शंभूराजांकडे पत्र घेऊन दूत रवाना केला.''

**दलेल उवाच ।यं हीश्वर इति प्राहुर्मानुषाणामधीश्वरम् । यः स्वयं सार्वभौमोऽपि तपश्चरति दुश्चरम् ।। ४ अनुजस्याग्रजस्योच्चैः पितुः स्वस्य सुतस्य च । अनये वर्तमानस्य न दाक्षिण्यमधत्त यः ।। ५ आमहेन्द्रादामलयादाविन्ध्यादाहिमालयात् । जागर्ति जागरूकस्य शासितुर्यस्य शासनम् ।। ६ सोऽपि तुभ्यं स्पृहयति स्पृहणीयगुणश्रिये । तदिहोपेत्य सपदि श्रयणीमयममुं श्रयेः ।। ७ अद्य ते ह्यद्यते तात मर्यादामिह कामपि । विश्वं हिताधायि यथा दिल्लीन्द्रोऽ-प्यभवत्तथा।।८ जिघृक्षुः सह्यमचलं दिदृक्षुस्तव पौरुषम् । स तेऽद्य दित्सते तावत्स्वां समृद्धिं समर्धुकः ।।९**

**अर्थ –** दिलेर म्हणतो, ''ज्या राजाला साक्षात ईश्वर समजतात, जो स्वतः सार्वभौम असूनही घोर तपश्चर्या करतो, ज्येष्ठ आणि कनिष्ठ भाऊ, आपला पिता, पुत्र यांच्यावर त्यांचे अन्यायाचे वर्तन पाहून तो त्यांचा मुलाहिजा राखत नाही. मलय पर्वत, विंध्य पर्वत, हिमालय पर्वत यांच्याप्रमाणे जागरूक असे प्रशासन ज्याचे आहे तो गुणसंपन्न राजासुद्धा आपली इच्छा करतो, तेव्हा येथे या व त्यात सामील व्हा. आज कोणती गोष्ट विश्वासार्ह समजली जाते. (?) दिल्लीश्वरही असेच थोर झाले आहेत. सह्याद्री घेऊ इच्छिणारा तुझा पराक्रम पाहू इच्छित आहे आणि तुला परमोत्कर्ष मिळवून देऊन तुला समृद्धी देऊ इच्छितो. (तुझे ऊर्जित करू इच्छितो.)

**सह्याचलमनादाय भग्नं तस्य प्रभोर्मनः । सन्धत्स्व सपदि स्वेन साहाय्येन बतामुना ।। १० पत्रमत्र स्वमुद्राङ्कं द्विरदा बिरुदानि च । तरलास्तुरगास्ते ते रत्नोत्तंसाश्च केचन ।। ११ कोशाश्चित्राणि वस्त्राणि शस्त्राणि च भवत्कृते । प्रहितं प्रभुणा सर्वमिदं तेन मदन्तिके ।। १२ धारा इवाम्बुवाहस्य तारा इव विहायसः। ता राजन्तितरां यस्य सेनाः सेनाः सहस्रशः ।। १३ एष तस्य त्वयि प्रेमा हेमाचलसमश्रियः । स्थितोऽसि बत किं तत्र विनिश्चिन्तो विनिष्क्रियः ।। १४ स्वदेहमिव मां मत्वा सन्देहं बत मा वहेः । इहोपेत्य वसेः स्वैरं स्ववशे मयि विश्वसेः।।१५ कृत्वा त्वदार्यस्त–कार्यमेति यावदिह स्वयम् । आददेमहि सह्याद्रिं ददेमहि च ते वयम् ।।१६ मध्येकृत्य स मां तावत्त्वामिहानेतुमीहते । प्रबोधमन्तराधाय योगीवात्मानमात्मनि ।।१७**

**अर्थ –** बादशहाचे मन सह्याद्री न मिळाल्यामुळे भग्न झाले आहे. तुम्ही वेळ न घालविता साहाय्य करून ते तुमच्याबरोबर जुळवून घ्या. हे पत्र आपल्या मुद्रेने अंकित करून हत्ती, चपळ घोडे, काही उत्कृष्ट रत्ने, पदव्या, खजिन्याच्या पेट्या, रंगीबेरंगी वस्त्रे आणि शस्त्रे ही तुझ्यासाठी बादशहाने माझ्याकडे दिली आहेत. मेघांच्या धारा आणि आकाशातील तारका याप्रमाणे सहस्र प्रकारांनी शोभा देणारी त्याची सेना आणि हेमाचलाप्रमाणे वैभव असलेला बादशहा तुझ्यावर प्रेम करीत असताना तू तिथे कशाला राहतोस? निश्चिंत होऊन सर्व उद्योग सोडून मला आपल्याच देहाप्रमाणे मान आणि इकडे रहावयास ये. कोणतीही शंका बाळगू नकोस. मोकळेपणाने माझ्यावर स्वतःवर ठेवतोस तसा विश्वास ठेव. तुझे पिताजी त्यांचे कार्य उरकल्यावर स्वतः इथे येतील. तोपर्यंत आपण सह्याद्री घेऊ आणि तो तुला देऊन टाकू. ज्याप्रमाणे योगी आपले ज्ञान स्वतःमधे ठेवतो, त्याप्रमाणे बादशहा माझ्या मध्यस्थीने तुला इकडे आणू इच्छित आहेत.''

**इत्युदश्चद्वर्णलेखे लेखं मनसिकृत्य सः । अस्मरत्तां गिरं प्राह या प्रिया कृत्तिवाससः ।। १८ ततः प्रकटितप्रायप्रचुरप्रणयाय सः । प्रजिघाय दलेलाय यथार्हं लेखमात्मनः।। १९ दलेलस्तु स्वलेखस्य प्रतिलेखमुपागतम्। पश्यन्सम्भावयामास शम्भोः शीघ्रतरं नरम् ।। २० अथैष सस्मयस्तत्र निःशलाकं स्थितः स्वयम् । उद्घाट्य वाचयामास शम्भुवाचिकहारकम् ।। २१**

अर्थ – अशाप्रकारे पत्रातील वर्णलेखन वाचून त्याने पत्राचा अर्थ मनामधे जाणला आणि शंकराची प्रिया पार्वती जे शब्द बोलली त्याचे स्मरण केले. नंतर प्रेमभाव प्रकट करून आपणास योग्य वाटलेल्या मजकुराचे पत्र पाठविले. दलेलाने आपल्या पत्राचे आलेले उत्तर पाहिले आणि शंभूराजांच्या दूताची चांगली संभावना केली. नंतर तो स्वतः आश्चर्यचकित झाला आणि शंभूराजांच्या तोंडी संदेश असलेले पत्र त्याने उघडून वाचले.

**यदात्थ मद्धितं मह्यमिदानीं संविदा स्वयम् । तत्तथा भविता सर्वं नान्यथा हि ममाशयः।।२२ एक एवान्तरात्मास्ति सर्वेषामिति यच्छ्रुतम् । तन्मया मन्मताभिज्ञत्वल्लेखालोकनात्स्मृतम्।। २३ किन्तु विन्यस्य यः सर्वममुं स्वविषयं मयि । निर्विशङ्कः स्वयमगाज्जिगीषुर्विषयान्तरम् ।। २४ तस्मिन्ननागते सह्यपतौ सह्यममुं प्रति । भवदुक्ताय यानाय मन्मतिर्न हि सम्प्रति ।। २५**

अर्थ – "माझ्या हितासंबंधी जे बोललात तो करारच असेल. त्यात बदल होणार नाही. सर्वांच्या अंतरंगात एकच आत्मा असतो असे ऐकण्यात येते. हे तुम्ही लिहिलेले माझेच मत आहे, असे माझ्या लक्षात आले. परंतु हा सर्व विषय मी माझ्या मनामधे साठवून निःशंक होऊन जिंकण्याच्या इच्छेने दुसऱ्या पक्षात आपणहून गेलो. परंतु सह्याद्रीचे स्वामी सह्याद्रीकडे परत येत नाहीत, तोपर्यंत तुमच्याकडे येण्यासाठी माझी बुद्धी मला सांगत नाही.

**विगणय्य निजं श्रेयो नावज्ञेयो गुरुर्मया । किन्त्वमुं प्रीणयिष्यामि स्वभुजा जितया श्रिया।।२६ मदीयं पदमादातुं मम कःस्यात्परिश्रमः । किं पुनर्यदि मत्पक्षे दिल्लीन्द्रोऽद्य महोद्यमः।।२७ मत्पक्षी भवता पत्रं प्रहितं भवतात्र यत् । तत्पत्रमेव मे प्रेमपथपान्थत्वमीयुषः ।। २८ तस्य मां प्रति तत्पत्रान्मम तं प्रति च स्वतः । यदभूः प्रतिभूस्तस्मादुभयत्र प्रभूयसे ।। २९ मह्यं मदीयमावेद्य तदीयमपि तत्कृते । मध्यस्थेनेव भवता माध्यस्थमुररीकृतम् ।। ३० निर्दिष्टं यत्त्वयोद्दिश्य स्नेहस्यामत्रमत्र माम् । घटेत न घटेतेति संशयस्तेऽस्तु तत्र मा ।। ३१**

अर्थ – आपले श्रेय बाजूला ठेवून मी गुरूची अवज्ञा करायला नको. आपल्या बाहुबलावर जिंकलेल्या ऐश्वर्याने मी त्याला आनंदित करीन. मला माझे स्थान प्राप्त करण्यास कोणते परिश्रम करावे लागणार आहेत, त्यातही दिल्लीश्वरच माझ्या बाजूने काम करीत आहेत. माझ्याकडे तुम्ही जे पत्र पाठवलेत, ते पत्रच आपल्या प्रेमपथावरील प्रवासी होऊन ते पत्र व त्या पत्राच्या बाबतीत (खात्री देण्याच्या दृष्टीने) स्वतः तुम्ही जामीन राहिलात, मला माझी बाजू कळवून त्यांनाही माझी बाजू कळावी यासाठी तुम्ही मध्यस्थ झाला. स्नेहपूर्ण रीतीने तुम्ही माझ्याकडून ते काम होईल किंवा नाही याची शंका बाळगू नका."

**दलेलः शम्भवे शम्भुर्दलेलाय च दर्पिणे । स्वं स्वं लेखमिमं गुप्ततमं प्राहिणुतां मिथः ।।३२ तत्रानयोः पुनर्लेखास्तथाऽन्योन्यमुपाययुः । यथा सन्धिरसन्देहः स एव दृढतां दधौ ।। ३३ शम्भुः स्वेभ्यः सखिभ्योऽपि तमुदन्तमपालयत् । दलेलोऽ वेदयं दिल्लीदयितश्च दृढाशयः ।। ३४**

अर्थ – दिलेर शंभूराजांकडे आणि शंभूराजे त्या गर्विष्ठ दिलेरखानाकडे गुप्त अशी संदेशपत्रे एकमेकांना पाठवू लागले. त्यांची पुन्हा पत्रोत्तरे एकमेकांना जाऊ लागली. त्यायोगे त्यांच्यातील तडजोड संशयापलीकडे अशी दृढ झाली. शंभूराजांनी ही बातमी आपल्या पत्नीपासूनही गुप्त राखली. दिल्लीश्वराच्या विश्वासातला आणि निश्चयी अशा दिलेरखानाला हे माहीत होते.



**अत्रान्तरेऽतिविक्रान्तमाक्रान्तानीकनीवृतम् । युद्धाभिमानिभिर्धन्वपाणिभिर्बहुभिर्वृतम्।।३५ बहलोलस्य सुहृदं देवभूदेवदुर्हृदम् । सम्पराये पराभूय लोदिनं कूटयोधिनम् ।। ३६ दण्डयित्वा च दंशार्हान्द्रविडान्दर्पशालिनः। पाण्ड्यांश्च पाण्डवसमः समस्तान्हस्तयोधिनः।।३७ केरलानपि च क्रूरकर्मामरुवरानपि । अन्यानपि नृपानुच्चान्कावेरीकूलवासिनः ।। ३८ पराजित्य तपादित्यतेजाः परपुरञ्जयः। तांस्तान्जनपदान्दुर्गाण्यपि चाक्रम्य विक्रमी ।। ३९ वैमात्रेयं चैकराजं दृतविदृतमाहवात् । निरपेक्ष इवोपेक्ष्य प्रेक्षणीयां श्रियं वहन् ।। ४० तस्याशेषस्य देशस्य कार्यशेषस्य चाखिलाम् । धुरं क्रियाश्चातिनिजे रघुनाथाभिधे द्विजे ।।४१**

अर्थ – मध्यंतरी अतिशय पराक्रमी आणि आक्रमण करून अनेक सैनिकांना कोंडीत पकडलेल्या युद्धाभिमानी, धनुष्यबाण घेऊन सज्ज झालेल्या सैनिकांनी वेढलेल्या, देवब्राह्मणांचा शत्रू असलेल्या बहलोलखानाच्या कुटिल युद्धनीती वापरणाऱ्या शेरखान लोदी या मित्राचा युद्धात पराभव करून दंश करण्यास योग्य अशा द्रविडांना शिक्षा करून पांडवाप्रमाणे राहून हत्तींवरील पुंडपाळेगारांना तसेच क्रूरकर्मी अशा केरळी लोकांना आणि कावेरी तीरावर राहणाऱ्या राजांचाही त्या इंद्राप्रमाणे पराक्रमी असलेल्या, तपसूर्याचे तेज असलेल्या विक्रमी शिवाजीराजांनी पराभव करून अनेक गावांवर आणि किल्ल्यांवर आक्रमण केले. सावत्र भाऊ एकोजीराजा युद्धातून पराभूत होऊन माघार घेऊन पळाला. त्याकडे निरपेक्षपणे दुर्लक्ष करून त्याची मोठी दौलत ताब्यात घेतली. त्या सर्व देशाची व उरलेल्या सर्व कार्याची धुरा आणि कामगिरी कनिष्ठ अशा रघुनाथपंत नावाच्या ब्राह्मणावर सोपविली.

## छ. शिवाजी महाराज कर्नाटक मोहिमेवरून परत आले -

**निधाय पूतनां काञ्चिदपि च स्वां प्रभाविनीम् । श्रीरङ्गपत्तनाधीशात्तथा बिन्दुपुराधिपात्।।४२ बहलम्बलिमादाय बलीयान्यवनान्तकः । शिवः शिवेन मार्गेण प्रणालाद्रिमुपागमत् ।। ४३ अथ तं मन्त्रिणः सर्वे खर्वेतरदयादृशम् । चिरेणाभ्येतमभ्यर्णे भ्राजिष्णुं जिष्णुविक्रमम् ।। ४४ पारिबर्हकराः प्रह्वतराः प्रेमभरात्प्रभुम् । प्रत्युद्गम्याशु ददृशुर्मूर्तिमन्तमिवोत्सवम् ।। ४५ उद्वेल्लद्भुजकल्लोलः प्रसरद्वीचिबाहुभिः । समगंस्त स तैस्तत्र नदैरिव महोदधिः ।। ४६ जगज्जाग्रत्तत्तत्कृतिभिरतिनम्रप्रकृतिभिः कृती कुर्वन्वार्ताः कतिचन मयूरप्रभृतिभिः । हसन्मूर्ति–र्मौहूर्तिकनिगदितेऽनेहसि शुभे प्रणालाद्रेर्मौलिन्थरणिमणिरारुह्य शुशुभे ।। ४७**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरकवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां शुभलक्षणलक्षितायामध्यायशतसम्मितायां वैयासिक्यां संहितायामध्यायः ।**

अर्थ – स्वतःच्या आधिपत्याखाली असलेली सेना श्रीरंगपट्टणच्या राजाकडून तसेच बिंदुपूरीय राजाकडून पुष्कळशी खंडणी घेऊन तो बलसंपन्न, यवनांतक शिवाजीराजा सुरक्षित मार्गाने पन्हाळगडाकडे आला. तेव्हा सर्व मंत्री दयाळू दृष्टीच्या विजयी, तेजस्वी अशा त्या बऱ्याच काळानंतर परतलेल्या शिवाजीराजाला नम्र होऊन, सुवासिक अत्तरे देऊन प्रेमभराने आपल्या स्वामीला सामोरे गेले. त्यांना मूर्तिमंत आनंद झाल्याने उचललेल्या बाहूंचा कल्लोळ झाला. पुढे येणाऱ्या लाटारूपी बाहूंनी मोठ्या नद्यांनी समुद्राला आलिंगन द्यावे, त्याप्रमाणे तो त्यांच्यामधे मिसळला. जागृत अशा कृतीनी अतिनम्र स्वभावाच्या मोरेश्वरादिकांशी थोडेसे बोलून तो धन्य राजा हसतमुखाने ज्योतिष्याने सांगितलेल्या शुभमुहूर्तावर पन्हाळगडाच्या शिखरावरील मणीच, असा तो आरोहण करता झाला.

अनुपुराणे सूर्यवंश निवासकर कवींद्र परमानंद प्रकाशित शुभलक्षणकारक शतसंहितेतील

वैयासिक अध्याय ।

**छ. शिवाजी महाराज व मंत्री संवाद -**

विभाग ३, अध्याय १०

**कवीन्द्र उवाच । अथासीनः स पर्यङ्के सरोरुहविलोचनः । पश्यन्पुरो मयूरादीनवादीद्वदतां वरः ।। १**

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, ''नंतर तो श्रेष्ठ वक्ता कमललोचन पर्यंकावरून पुढे मोरेश्वरादिकांना उद्देशून म्हणाला,

**राजोवाच । मयेदमिव तद्राज्यं श्रृणुत प्राज्यमर्जितम् । अनयोः कतरत्कस्मै कुमाराय प्रदीयताम् ।। २ ज्येष्ठे ज्येष्ठं कनिष्ठे च कनिष्ठमिति यः क्रमः । प्रकृते स न भारो हि राज्ययोरनयोः समः ।।३ वर्तमानेऽपि वर्षेऽस्मिन्नवमेऽनवमद्युतिः । क्षीरकण्ठः स वत्सो मे न दूरे स्थातुमर्हति ।।४ शम्भुरेव ततस्तस्मिन्निवेश्य इति मे मतिः । निश्चिता स्यान्मतिमतां भवतां यदि सम्मतिः ।।५ इत्थं तेनाऽनुयुक्तेषु मयूरस्तेषु मन्त्रिषु । विमर्शभरनिर्मृष्टामुद्दिष्टामगमद्गिरम् ।। ६**

अर्थ – राजे म्हणतात, ''मी या राज्याप्रमाणे तिथेही मोठे राज्य मिळविले आहे. यांपैकी कोणते कुमाराला द्यावे? ज्येष्ठाला मोठे व कनिष्ठाला लहान अशी परंपरा आहे. याबाबतीत दोन्ही राज्ये समान भाराची नाहीत. चालू नवव्या वर्षीदेखील श्रेष्ठ तेज असलेला माझा छोटा बाळ दूर राहणे बरे नाही. शंभूराजाला त्या ठिकाणी ठेवावे असे माझे मत आहे. तुम्ही बुद्धिमंतांनी यास संमती दिली, तर मला निश्चितपणे निर्णय करता येईल. याप्रमाणे त्या मंत्र्यांना विचारल्यावर पुष्कळ विचारपूर्वक, उद्दिष्टपूर्ण अशा शुद्ध विचाराने मोरोपंत म्हणाले.

**घटदण्डे घटं स्वेन करोति च करोति न । तथा कर्तुमकर्तुं च प्रभुणैवxकादयस्तत्र परवन्तो न किञ्चन ।। ७ परवद्भिः सहायैः XXXXX । तं च देशमिमं चौच्चैः शम्भुःवxभवतास्तु तद्यशो नानुभूयते ।। ८ अमुष्मै महतेऽर्थाय XXX जिघृक्षति ।जिता सर्वंसहा येन सहायेन सुपर्वणाम् दिल्लीन्द्रश्चदिदृक्षति ।। ९ तत्सुतः स्पृहयत्यद्य साहाय्याय XXXX । ----- XXXXX द्रुहाम् ।। १० तितीर्षति बत ह्येष दिल्लीन्द्रपृतनार्णवम् । नयेन यानपात्रेण न येन युयुजे स्वयम् ।। ११ अश्लीलभावं बिभ्राणा किंवदन्तीयमुत्थिता । हेपयत्यद्य सह्याद्रिं नाथस्य तव पश्यतः ।। १२ महाराजकुमारं तं महाराजमिवापरम् । मन्यामहे वयं सर्वे खर्वेण शिरसान्वहम् ।। १३**

अर्थ – याबाबतीत आपणच कर्तुमकर्तुम् समर्थ आहात. तो देश आणि हाही मोठा देश शंभूराजांकडेच राहू द्यावा. ज्याच्या साहाय्याने देवांची ही पृथ्वी जिंकली, त्याचा मुलगा साहाय्यासाठी याचना करीत आहे आणि दिल्लीश्वर पहात बसला आहे. दिल्लीश्वराचा सेनासागर युक्तीने आणि वाहनांनी तरून जाईल. तो स्वतः मात्र वापरू शकत नाही. अत्यंत ओंगळ अशी ही वदंता उठली आहे. आपण स्वामी हजर असतानाही आज सह्याद्रीला नामुष्की आली आहे. युवराजांना आम्ही सगळेजण दुसरे महाराजच मानतो आणि मस्तक खाली करून वंदन करतो.

**अपश्यतः पश्यतामूनमात्यान्पश्यतोहरान् । इत्थं परिहसत्यस्मानेष नन्तुमुपागतान् ।।१४ प्रजा इव प्रजाः पाति समन्तादभयप्रदः । अथ कः स्यात्समुद्धर्ता राजभागस्य मज्जतः ।। १५ न केवलेनाभयेन प्रजाः प्रददते धनम् । सम्यग्भयं प्रदर्श्याऽपि ताभ्य आदीयते धनम् ।।१६ न धनेन विना सैन्यं न सैन्येन विना जयः । न जयेन विना राज्यं न राज्येन विना सुखम् ।।१७ अनुयुङ्क्तेऽनुयोक्ता यद्युक्तायुक्तोपपत्तिषु । तत्र व्यक्तं वदेद्वक्ता न त्वव्यक्तं कदाचन ।।१८**



**प्रसिद्ध एव दिल्लीन्द्रः संसिद्ध्या स दुरासदः । किं पुनस्तेजसानेन भवदीयेन सङ्गतः ।।१९ साहसी सहसोपेक्ष्य समृद्धां श्रियमात्मनः । अहो अनुसरत्येष यवनानाततायिनः ।।२० यावदत्याहितं नैति तावत्प्रतिविधीयते । न कूपखननं स्थाने दह्यमाने निकेतने ।।२१ इति विज्ञाप्य तं भूपमन्योन्यमुखदर्शिभिः । तन्मतस्थायिमतिभिर्जोपमस्थायि मन्त्रिभिः ।।२२ तदुक्तामुक्तिमाकर्ण्य स तु नीतिमदग्रणीः । लेखनीमादित करे साश्रूणी दधदक्षिणी ।।२३ प्रजाभ्यो ह्यभयं दत्वा निरुणत्सि धनागमम्।अवजानासि चामात्यान्ममात्मान इवान्वहम् ।।२४**

अर्थ – आपणच पाहा की, आम्ही मुजरा करण्यास आलो असताना या अमात्यरूपी चोरांकडे पाहण्याचे टाळून हा जणू आमची हेटाळणी करीत आहे. अभय देणारा सर्व बाजूंनी प्रजेचे प्रजा म्हणूनच रक्षण करतो, मग राजभाग बुडत असता तो कोण उद्धरणार? केवळ अभय मिळते म्हणून काही रयत कर भरीत नाही. भय दाखवून देखील चांगल्याप्रकारे कर वसूल करता येतो. कराच्या पैशांशिवाय सैन्य, सैन्याशिवाय जय, जयाशिवाय राज्य आणि राज्याशिवाय सुख मिळत नाही. योग्य-अयोग्य याच्या परीक्षणानंतर विचारणारा जो विचारतो त्याबाबतीत बोलणाऱ्याने स्पष्ट बोलावे, केव्हाही अस्पष्ट असे काही नको. दिल्लीश्वराला चांगले विजय मिळून तो आवरण्यास कठीण झाला आहे हे सर्वज्ञात आहे. आपल्या तेजाने युक्त, साहसी (युवराज) आपल्या समृद्ध वैभवाची एकाएकी उपेक्षा करून तो आततायी अशा यवनांचा आश्रय करू पाहात आहे. मोठे संकट जोवर कोसळत नाही, तोवरच त्यावर उपाय केला जातो. घर जळू लागल्यावर विहीर खणावी हे योग्यच नव्हे. याप्रमाणे राजाला निवेदिल्यानंतर सर्व मंत्री एकमेकांच्या तोंडांकडे पाहत ज्यांनी त्या मतावर दृढ राहून मौन स्वीकारले, त्या नीतिशास्त्राचा अग्रणी अशा त्या राजाने त्यांचे भाषण ऐकून लेखणी हातात घेतली व त्याचे डोळे अश्रूंनी भरून आले. ''प्रजेला अभय देऊन तू पैशाचा आवक रोखून धरत आहेस आणि अमात्यांची अवज्ञा करतोस. माझ्या आत्म्याप्रमाणेच मी त्यांना मानतो.

**संभाजीराजांना सज्जनगडावर जाण्याचा आदेश -**

**उत्तिष्ठ शृङ्गारपुरात्तिष्ठ सज्जनपर्वते । इङ्गितज्ञाय कषया किं सौजात्यवतेर्वते ।। २५ पद्यद्वयमिदं सम्यग्विलिख्य स्वयमीशिता । शम्भवे प्रापयामास पुरुषेण विजानता ।। २६ तन्मुद्राङ्कमदः पत्रमातपत्रमिवात्मनि । मन्यमानो महाराजकुमारोऽयं व्यराजत ।। २७**

अर्थ – शृंगारपुरातून निघ आणि सज्जनगडावर रहावयास जा. जातिवंत घोड्याला सूचना समजतात. त्याला चाबकाचा उपयोग नसतो.'' ही दोन चांगली पद्ये लिहून स्वतः राजाने सुज्ञ माणसामार्फत ती शंभूराजांकडे पाठविली. पत्रावरील महाराजांची मुद्रा कमळाप्रमाणे युवराजांनी मानली.

**प्रस्थितः सज्जनगिरिं शम्भुराजः स्वयं यदा । मेने श्रृङ्गारनगरं नगरं न जनस्तदा ।। २८ अथोपकण्ठमायातमकुण्ठमतिवैभवम् । चरेणावेदितचरं प्रमोदितचराचरम् ।। २९ तनयं स्वामिनः शम्भुनामकं धनदायकम् । प्रत्युद्गम्य प्रणम्यापि सपदि प्रभुशासनात् ।। ३० स्थायुकस्तस्य दुर्गस्य दुर्गमादपि दुर्गमम् । पुरःसरैः परिचरैस्तथा सहचरैर्नरैः ।। ३१ सुधिया विश्वनाथेन नाथनिर्देशवर्तिना। द्विजैरन्यैश्च सहितं तत्तद्विद्योपजीविभिः ।। ३२ पिनद्धकवचं सज्जं सायुधं सपरिच्छदम् । सपताकं सपटहं सवाहं नरवाहनम् ।। ३३ सुविनीतः पुरोभूय पुरःसर इव स्वयम् । प्रापयामास शनकैः सज्जनाद्रिशिरोगृहम् ।। ३४ असुभिः सम्मतेऽमुष्मिनसज्जनाद्रिमिते सुते । असज्जनमिवात्मान-ममंस्तात्मनि पार्थिवः ।। ३५**

अर्थ – जेव्हा शंभूराजे सज्जनगडाकडे निघाले, तेव्हा लोकांना शृंगारपूर हे नगर वाटले नाही. अरण्यवत् उजाड वाटले. अकुंठित बुद्धिवैभव असलेला, श्रीमंत युवराज शंभूराजा जवळ पोहोचला आहे, असे दूतांनी सांगितल्यावर सगळीकडे आनंदिआनंद झाला. त्यांना सामोरे जाऊन व मुजरा करून किल्लेदाराने नम्रपणे पुढे येऊन हळूहळू युवराजांना गडावरील उच्चस्थानी असलेल्या निवासस्थळी आणले. गडाचा उंच भाग दुर्गम असा होता. सेवक आणि सहकारी पुढे चालत होते. स्वामींच्या आदेशावरून विद्वान असे विश्वनाथ व काही ब्राह्मण आणि काही विद्योपजीवी असे बरोबर होते. शंभूराजांनी चिलखत घातले होते, जवळ शस्त्रे होती. परिवार होता. पताका, नगारे, भोईचलित पालख्या होत्या.....

**सज्जनाद्रिर्जनाल्हादविधाननिधिनाऽमुना । अधिरूढेन समभादुदयाद्रिरिवेन्दुना ।। ३६ कदाचिदर्धरात्रेऽमुं सुप्तं तत्र निकेतने । नियोगेन किलेश्वर्याः प्राह वागशरीरिणी ।। ३७**

अर्थ – सज्जनगड हा आनंददर्शक अशा स्थानांचा जणू स्वामी. येथे आल्यावर उदयगिरीवर चंद्रमाच चढल्याप्रमाणे वाटले. नंतर केव्हातरी मध्यरात्री वाड्यात झोपलेल्या राजांना जणूकाही देवीच्या आज्ञेने आकाशवाणी ऐकू आली–

### संभाजीराजे दिलेरच्या गोटात –

**वत्स गच्छ द्रुतं तत्र यत्र दिल्लीपतेर्बलम् । प्रस्थितस्य तवाध्वानं प्रतिबद्धुं न केऽप्यलम् ।।३८ प्रत्यूषे तु समुत्थाय स पूषेव द्युतिं वहन् । न्यगदद्द्रुतमानाय्य सज्जनाद्यधिकारिणम् ।। ३९ महातीर्थं खलु महाबलिसङ्गमनामकम् । यदुद्धरति न स्नानमात्रेण बत नामकम् ।। ४० अद्य तद्याम्यहं तावत्त्वं तारकबलं महत् । प्रस्थापय मया साकं स्थापयात्राऽपि किञ्चन ।। ४१**

अर्थ – ''वत्सा, दिल्लीपतीचे सैन्य जेथे आले आहे, तेथे तू त्वरित जा. मार्गाने चालू लागल्यावर तुला कोणीही प्रतिबंध करू शकणार नाही.'' पहाटेस जाग आल्यावर तो सूर्याप्रमाणे तेजस्वी दिसू लागला. त्याने सज्जनगडाच्या किल्लेदाराला बोलावून घेतले आणि म्हटले, ''महाबलि संगम (माहुली) नावाचे महातीर्थ केवळ स्नानानेच उद्धार करीत नाही. (?) आज मी तिकडे जात आहे. तोपर्यंत तुम्ही मोठे संरक्षक सैन्य माझ्याबरोबर पाठवा आणि थोडेसे इथेही राहू द्या.''

**अस्त्यन्तिके हि महती ताम्रास्यानामनीकिनी । अथवा किं तया कार्यं मय्यस्त्याहवकारिणि ।। ४२ महोत्साहस्तमित्युक्त्वा कृत्यवित्कृतिनां वरः। निरगात्सदनात्त–स्मात्सज्जः स्वजनसंवृतः ।। ४३ दुर्गपालमनुज्ञाप्य तोरणोपान्तचत्वरात् । स त्वरावान्महासत्त्वः पुरोभूत्स पुरःसरः ।। ४४ तं यान्तमनुयान्ति स्म तदीयाः सर्व एव हि । इन्दिन्दिरा इवामोदमरविन्दवनोद्भवम् ।। ४५ पदे पदे च तुरगस्तुरगस्तस्य गच्छतः । न्हेपयामास मुदिरं न्हेषमाणो मनोजवः ।। ४६ किकीदिविप्रभृतिभिः शकुनैः शकुनावहैः । मरुता चानुकूलेन मृदुशीतसुगन्धिना ।। ४७ सपदि स्थितयाभ्येत्य माहेय्या च सवत्सया । कुम्भेन चाम्भःपूर्णेन मन्वानो मुदमुन्नताम् ।। ४८ यत्र कृष्णा च वेण्या(णी) च नद्यौ द्वे सङ्गते मिथः । तत्(हि)तीर्थं सारसदृक् स स्वदृग्गोचरं व्यधात् ।। ४९ अथो यथावदाप्लुत्य सम्भेदे तत्र निर्वृतः । व्यतरद्विपुलं वित्तं विप्रेभ्यो विश्वविश्रुतः।।५० अथ वीररसावेशभरायत्तो मदोद्धतः । सन्निवर्त्ती सप्तसप्तितेजाः कङ्कटकावृतः ।। ५१ गौरगौरवभृद्‌द्वर्व्या मौर्व्या योजितकार्मुकः । उपासङ्गमुखाकृष्यमाणबाणः सुदुर्धरः ।। ५२ निदिष्टाननुयानाय दुर्गपालेन धीमता । राजपुत्रान्महाराजपुत्रस्तत्र वचोऽब्रवीत् ।। ५३**



अर्थ – मोगलांचे बरेच सैन्य जवळच आहे किंवा ते राहू द्या. मीच युद्ध घडविणारा असल्यावर त्या सैन्याचा तरी काय उपयोग? मोठ्या उत्साहाने त्याला असे म्हणून कर्तव्याचे ज्ञान असणारा आणि कृतीने श्रेष्ठ असा तो (शंभूराजा) आपल्या लोकांनी वेढलेला, सज्ज होऊन त्या निवासापासून निघाला. किल्लेदाराला परवानगी देऊन तोरणे बांधली होती. त्याच्या जवळजवळ चौकातून त्वरेने तो महाधीर (राजकुमार शंभू) पुढे निघाला. त्याच्या पाठोपाठ त्याची सर्व माणसे जात होती. कमळांच्या वनातील सुगंधामागे जसे भुंगे जातात, तसे ते लोक वाटत होते. तो जात असताना जणू पावलोपावली खिंकाळणारा घोडा (मनाच्या वेगाने जाणारा) मंदगती ढगाला लाजवीत होता.

चातक वगैरे पक्ष्यांच्या, चांगले शकुन आणणाऱ्यांच्या शकुनांसह, सौम्य, शीतल, सुगंधी, अनुकूल वाऱ्याने तत्काल सवत्स उपस्थित राहणाऱ्या गायीने, पाण्याने भरलेल्या कुंभाने अत्यानंद मानीत, कृष्णा आणि वेण्णा या दोन नद्या जेथे एकत्र मिळतात, ते सरोवराप्रमाणे असलेले (?) तीर्थ त्याने स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले. नंतर मोकळ्या मनाने तीर्थावर मनसोक्त डुंबल्यावर त्या विश्वविश्रुत (राजाने) ब्राह्मणांना विपुल वित्त दिले. वीररसाच्या आवेशाने भरून सज्ज झाल्यावर तो रुबाबदार दिसू लागला. घोड्यावर बसलेल्या, सूर्याप्रमाणे तेजःपुंज, चिलखत घातलेला, गौरवर्णी युवराज धनुष्याला मोठी दोरी जोडून तोंडाजवळ बाण आणून, हुशार किल्लेदाराकडून सुचविल्याप्रमाणे मागे येण्यास सांगून दुसऱ्या सरदारांना म्हणाला,

**शम्भुराज उवाच । कृतं बतानुयानेन भवतामवतामिह । यतो यातः परावृत्य यदि प्राणितुमिच्छथ ।। ५४ एष व्रजामि दिल्लीन्द्रवाहिनीमवगाहितुम् । एष्यामि च पुनः स्वीयं सह्याद्रिं सहसार्दितुम् ।। ५५ मत्सन्देशमिमं स्वाय दुर्गपालाय शंसत । अथवा शिवराजाय महाराजाय संसदि ।। ५६ अमुष्योक्तिमिमां श्रुत्वा ययुस्ते च यथागतम् । प्रत्युद्ययुश्च दिल्लीन्द्रसैन्यानि तमुदङ्मुखम् ।। ५७**

अर्थ – शंभूराजे म्हणाले, ''या ठिकाणाहून गेलेले परत आल्यावर आपण जिवंत राहू अशी इच्छा करीत असाल, तर संरक्षण करणारे तुम्ही आता मागोमाग येऊ नये. मी आता दिल्लीश्वराच्या सैन्यास मिळण्यासाठी जात आहे. पुन्हा या माझ्या सह्याद्रीला तुमची विचारपूस करायला केव्हातरी अकस्मात येईन. माझा हा निरोप आपल्या किल्लेदाराला सांगा. किंवा शिवाजी महाराजांना दरबारात सांगा.'' हे ऐकून ते तसेच दिल्लीश्वराच्या सैन्याकडे उत्तराभिमुख होऊन सामोरे झाले.

**सङ्गमे शम्भुना स्थेयं सज्जेन स्वजनैः समम् । दलेलेन च सम्प्रेष्य मुदेऽमुष्य निजम्बलम् ।।५८ समयः पूर्वमेवासीदयं शम्भुदलेलयोः । स्वस्वकार्यानुरोधेन मिथः सञ्जातहार्दयोः ।।५९ आडम्बराडम्बरेण दारिताम्बरगव्हरा । दिल्लीन्द्रसंज्ञया नाम सा ननाम पताकिनी।।६० शिवराजसुतं तत्र सर्वराजसु पूजितम् । बले बलेन सदृशं कपाटपृथुवक्षसम्।।६१ कृष्ण–सारसदृक्षाक्षं मुकुराभमुखत्विषम् । पृथुभालं महाबाहुं सभालङ्कारमुज्ज्वलम्।।६२ वाचा मृदुतरं वाचामाचारेण मनोहरम्। शिवराजात्मजं वीक्ष्य राजा वज्र(व)दात्मजः(जम्) ।।६३ साम्ब–न्धिकस्य सान्निध्यात्साम्यसम्बन्धमावहन् । अहंयुरभिसङ्गम्य न्हीत न्हीत इवाऽजनि ।।६४**

अर्थ – शंभूराजांनी सज्ज होऊन आपल्या माणसांसह संगमावर रहावे आणि दिलेराने त्यांच्या संतोषासाठी आपले सैन्य पाठवावे. आपापल्या कार्याच्या अनुरोधाने आपसात मित्रता झालेल्या शंभू आणि दिलेर यामधे हा करार पूर्वीच झालेला होता. विस्तृत अशा देखाव्यासह आकाशविवर फोडूनच जणूकाही दिल्लीश्वराची सेना नतमस्तक झाली. सर्व राजांत मान्य झालेला शिवराजपुत्र त्या

सैन्यात सैन्याला साजेशा रीतीने, विशाल छातीचा, कृष्णवर्णीय सारसाप्रमाणे डोळे असलेला, जणू आरशासमोर राहिल्याप्रमाणे स्वच्छ सौंदर्य असलेला, विशाल कपाळाचा, महाबाहू, दरबारी अलंकार घातल्याने तेजस्वी दिसणारा, वागण्यात मनोरम अशा शिवराजकुमाराला पाहून बादशहाचा जणू वज्र असलेला (दिलेरखान) अत्यंत नम्र स्वरात आपुलकीचे संबंध आणि तुल्यबल असल्यासारखे समोर गर्वोन्नत असे युवराज भेटताच लाजेने चूर झाला.

**शिवमिव युधि भीमं सम्यगुत्तीर्णभीमं प्रहितबलसमेतं राजलक्ष्मीनिकेतम् । तमथ निरवहेलः प्रेमशाली दलेलः श्रितहितनिजपद्यः प्रत्युदेति स्म सद्यः ।। ६५ क्लृप्तोपचाररचनासुषमाश्रयाय तत्तन्नृपालसमुदायचिरोषिताय । शम्भुं निजाय शिबिराय मनोहराय दिल्लीदिवस्पति-चमूपतिरानिनाय ।। ६६ अजनि हृदि यदीये कोऽपि हर्षोऽतिवेलः स किल यवनसेनाधीशधुर्यो दलेलः । सपदि सदुपचारं कारयामास पार्श्वे स्वशिबिरसमवेशं शम्भुसेनानिवेशम् ।। ६७**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरकवीन्द्रपरमानन्दप्रकाशिताया मध्यायशतसंमितायां-शुभलक्षणलक्षितायां वैयासिक्यां संहितायामध्यायः ।**

**अर्थ –** शिवाजीराजांप्रमाणे युद्धप्रसंगी भयप्रद भीमा नदी सहजरीतीने ओलांडलेला, पाठविलेल्या (?) सैन्याच्या बरोबर असलेल्या, राज्यलक्ष्मीचे निवासस्थान असलेल्या अशा शंभूराजाला दिलेराने मनात किंतु न बाळगता त्याचवेळी आपल्या (?) हिताचा विचार (आश्रय) करून सामोरा गेला. औपचारिक भाषणातील सौंदर्याचा आश्रय केलेल्या, तसेच त्या त्या राजसमुदायाला बराच काळ थांबवून ठेवलेल्या शंभूराजांना दिल्लीन्द्राचा सेनापती आपल्या मनोहर शिबिराकडे घेऊन आला. ज्याच्या हृदयात विलक्षण निस्सीम हर्ष निर्माण झाला, त्या यवनांच्या सेनेचा मातब्बर सेनापती दिलेराने लगेच औपचारिक व्यवस्था असलेल्या आपल्या शिबिराजवळच शंभूराजांच्या सेनेची छावणी वसविली.

अनुपुराण सूर्यवंश निवासकर कवीन्द्र परमानन्द प्रकाशित शतसंहितांमधील शुभलक्षणकारक वैयासिक अध्याय.

**अध्याय ११**

**मनीषिण ऊचुः । अथार्थशास्त्ररीतीनां नीतीनामपि वेत्तरि । अभेत्तरि स्थितीनां च छेत्तरि द्विषि मर्मणाम् ।। १ शुद्धेन यशसा दिक्षु विदिक्ष्वपि च विश्रुते । राज्याधिकारिणि सुते प्रश्रिते सुबहुश्रुते ।। २**

**अर्थ –** पंडित म्हणाले, ''अर्थशास्त्रातील पद्धती आणि राजनीती त्यांना माहीत होती. परिस्थितीला धक्का न लावणारे ते शत्रूच्या मर्मावर आघात करणारे होते. आपल्या शुद्ध कीर्तींच्या जोरावर ते सर्व दिशोपदिशांत विख्यात होते. अशा स्थितीत राज्याधिकारी बहुश्रुत पुत्राने (शत्रूचा) आश्रय घेतला.

**वञ्चयित्वा जनं सर्वं विषयात्स्वाद्विनिर्गते । चिन्तामणाविवाकस्मात्करात्क्वचन विच्युते ।। ३ सिद्धमन्त्र इवोपेत्य दैवात्सपदि विस्मृते । अध्वनोऽर्धेऽध्वनीनस्य वीते वीताविवोद्धते ।।४ पोते सांयात्रिकस्येव न तत्क्रेतव्यसंयुते । प्रतिकूलेन मरुता द्वीपाद्द्वीपान्तरं श्रिते ।। ५ युक्तो मयूरप्रमुखैर्मन्त्रिभिर्मन्त्रवेदिभिः । शिवराजः कृती तत्र कमुपायमचिन्तयत् ।। ६ स च शम्भुर्महाभागः प्रागल्भ्यमधिकं वहन् । अन्वहं यवने तस्मिन्नहंयुरपि विश्वसन् ।। ७ अवर्तत कथं सोऽपि शम्भौ स्वां भुवमागते । परमानन्द तत्सर्वं शंस सम्प्रति नः प्रति ।। ८**

**अर्थ –** सर्व लोकांना फसवून आपल्या प्रांतातून निघून गेला. अकस्मात हातातील चिंतामणी रत्न निसटून जावे तसे झाले. मंत्रसिद्ध झालेला असतानाही दैवयोगाने एकदम विसरून जावा किंवा अर्ध्या वाटेतच प्रवाशाची मोठी शिदोरी संपून जावी अथवा विक्रीचा माल असलेल्या विदेशांशी व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्याचे जहाज वारा उलटा झाल्यामुळे इष्ट द्वीपाहून दुसऱ्या द्वीपाकडे जावे तसे झाले. योग्य सल्ला जाणणारे मोरोपंतादी मंत्री जवळ असताना त्या कर्तबगार शिवराजांनी काय उपाय मनात आणला? शंभूराजात प्रौढ बुद्धी अधिक होती, व तो अभिमानीही होता. तरीही त्याने दैनंदिन व्यवहारात यवनांवर विश्वास ठेवला. शंभू आपल्या भूमीवर आल्यावर तो यवनही कसा वागला? हे परमानंदा, हे सर्व तुम्ही आम्हाला आता सांगा.''

**कवीन्द्र उवाच । सज्जनाद्रेर्विनिर्गत्य सत्यसन्धे महाशये । सद्यः पौरुषमात्मीयं प्रदर्शयितुमुद्यते ।। ९ सन्धाय दिल्लीपतिना शम्भौ तन्नीवृतं श्रिते । कर्तर्या कर्त्यमानेषु स्वेष्वन्त्रेष्विव कातरः ।।१० वत्सलः सच्छलान्म्लेच्छबलादतिबलाद्भयम् । तस्मिन्सम्भावयन्भूरि शिवराजोऽन्वतप्यत ।। ११**

**अर्थ –** कवीन्द्र म्हणाले, ''सज्जनगडाहून निघाल्यावर त्या सत्यप्रतिज्ञ महाशयाने लगेच आपले पौरुष दाखविण्यास प्रारंभ केला. दिल्लीश्वराशी संधान बांधून शंभू त्याच्या आश्रयाला जाताच कात्रीने आपले आतडे कापावे अशा भयभीत मनःस्थितीत तो वत्सल शिवराज अतिशय अनुतप्त झाला. म्लेच्छांचे मोठे सैन्य आणि निश्चित दगाबाजी, शंभूवर घाला घालणार अशी त्यांना जबरदस्त कल्पना आली.''

**शिवराज उवाच । मयाऽवरधिया शम्भुर्नोपकण्ठे निवेशितः । संसिद्धयैव विशुद्धात्मा न च कण्ठमणीकृतः ।। १२ मुषिता मन्त्रिभिः सर्वैर्मदीया शेमुषी तथा । स आत्मजो ममात्मेव सपत्नानाश्रयद्यथा ।। १३ यदर्थं राज्यमेतन्मे स किमर्थं श्रितः परान् । नानुबध्नाति ह स्वार्थोऽप्यभिमानवतो नरान् ।। १४ उत्सृज्यः यः सिद्धमर्थमसिद्धं लब्धुमिच्छति । लब्ध्वापि स इमं दैवात्सद्यस्तमिव हास्यति ।। १५ यदसावतिवैयात्याद्यवनाज्जातिवैरिणः । अश्रयच्छ्रेयसे स्वाय तेन मे दूयते मनः ।। १६**

**अर्थ –** शिवाजीराजे म्हणाले, ''मला अशी कशी कुबुद्धी झाली आणि शंभूला जवळ ठेवले नाही. स्वाभाविक बुद्धीने मी त्या शुद्धात्म्याला माझा कंठमणी केला नाही. माझा आत्माच असा तो माझा मुलगा शत्रूचा आश्रय घेतो याचा अर्थ सर्व मंत्र्यांनी माझ्या बुद्धीचा अपहारच केला म्हणावयाचा ! ज्याच्याकरता हे माझे राज्य आहे त्याने दुसऱ्याचा आश्रय कशाकरिता करावा? अभिमानी मनुष्याला स्वार्थही जोडून ठेवत नाही! हातात आलेली गोष्ट टाकून देऊन न मिळालेली जो प्राप्त करू इच्छितो, त्याला ती वस्तू दैवाने मिळाली तरी तो झटक्यात ती टाकून देईल. अतिदांडगेपणाने आपले जातिवैरी असलेल्या यवनांचा आपल्या कल्याणाच्या इच्छेने आश्रय घेतला हे पाहून मनाला क्लेश होतात.

**आभ्यन्तरेण कलिना बलिना स उपप्लुतः । पश्यतो मे बतोड्डीय करात्कीर इवागमत् ।।१७ स्वया बालतया तासु तासु लीलासु लालसन् । अहो अनागसं तं प्रत्यवोचं परुषं वचः ।। १८ तत्तच्चिन्ताचयाम्भोधिवीचिविह्वलितात्मना । इत्थं बतानुतेपे च तेपे च प्रभुणाऽमुना ।। १९ अथ तं स्वीयसाम्राज्यस्थितिनैश्चिन्त्यनीरधेः । सेतुं सद्यःसमानेतुं शक्तः प्रायतत प्रभुः ।। २०**

शम्भुरप्यनुभावेन स्वेन तां धुरमुद्वहन् । तृणायामन्यत तदा यवनानीकिनीगणम् ।। २१ दलेलस्तु स्वयं नीत्वा शिबिराय शिवात्मजम् । रहः प्राह महाबुद्धिः स्वासनार्द्धोपवेशितम् ।। २२

अर्थ – आत शिरलेल्या बलवान कलीने त्याला वेढले आहे. पाहता पाहता तो माझ्या हातातून पोपटाप्रमाणे निघून गेला. त्याच्या बाल्यावस्थेत त्याच्या विविध लोभस क्रीडांमधे त्या निष्पाप जिवाला मी कठोर शब्दांनी बोललो का?'' अनेक चिंतारूपी सागरातील लाटांनी विव्हल होऊन स्वामींनी अशाप्रकारे पश्चात्ताप केला व त्रास करून घेतला. नंतर आपल्या साम्राज्याची स्थिती चिंतामुक्त समुद्राप्रमाणे असावी म्हणून, त्या समुद्राला लवकरच सेतू तयार करण्याचा प्रयत्न समर्थ अशा शिवप्रभूंनी आरंभिला. शंभूराजांनीही ती धुरा वाहून यवनांच्या सैन्याला खिजगणतीत लेखले. दिलेर स्वतःहून शिवपुत्राला शिबिराकडे नेऊन व आपल्या अर्धासनावर बसवून हुशारीने एकांतात त्याच्याशी बोलला.

दलेल उवाच । निधाय मयि विश्रम्ममायातोऽसि वरं कृतम् । गुरुणा त्वामनादृत्य स्वं गौरवमनादृतम् ।। २३ श्रेयसा भूयसावाप्य स्वसमान्विषमाशयाः । अहंयुतायुताः केचिन्न सहन्ते सुतानपि ।। २४ न मदीयाः श्रियः किन्तु तावकीना इमा श्रियः । इह मावह सन्देहं पुत्रादप्यसि मे प्रियः ।। २५ न दानेन विना सम्पन्न शीलेन विना वधूः । न सत्येन विना वाणी राजते राजनन्दन ।। २६ धन्ववाटं विदर्भश्च लब्धान्यानपि नीवृतः । प्रयच्छ प्रक्रियास्तास्ताः क्रियाश्चाभिमताः क्रियाः ।। २७ महाप्रभुरिमं यस्मै सक्रियां त्वय्यविक्रियाम् । क्रियावति करोत्यद्य कार्यमार्य कुरुष्व तत् ।। २८ त्वद्धिताय प्रवृत्तस्य यद्यपि स्यान्ममाहितम् । तथापि तन्महाबाहो मया सम्यगुरीकृतम् ।। २९ आभिर्वाग्भिः प्रगल्भाभिः स प्रोक्तस्तेन वाग्मिना । समवोचत पीयूषसरःसहचरं वचः ।। ३० उड्डीय नीडात्स्वार्थाय जातपक्षाः खगा यथा । पितुः सनीडात्क्रामन्ति तथा पुत्राः सुशिक्षिताः ।। ३१

अर्थ – दिलेर म्हणाला, ''माझ्यावर विश्वास ठेवून तुम्ही आलात हे फार चांगले केलेत. तुमचा आदर न केला तर माझाही मान राहणार नाही. मोठे यश प्राप्त केले तरी अहंकारी व मनात किल्मिष असल्याने पुष्कळजणांना आपले मुलगेही बरोबरीचे झालेले सहन होत नाही. माझ्याजवळ काही वैभव नाही. हे वैभव तुमचेच आहे. या बाबतीत संशय बाळगू नका. माझ्या मुलापेक्षाही तुम्ही मला प्रिय आहात. हे राजश्रेष्ठा! दानाशिवाय संपत्ती, शिलाशिवाय स्त्री आणि सत्याशिवाय वाणी शोभत नाही...

महाप्रभू आपणाला ज्या कोणत्या क्रिया (युद्धतंत्रे) माहीत असतील, त्या निष्फळ न होता आपण त्यायोगे कार्य करून दाखवाल. जरी आपल्या हितासाठी मी प्रवृत्त झालो आणि त्यात जरी माझे अहित असले तरी ही गोष्ट मी स्वीकारली आहे.'' अशाप्रकारे वाक्पटू अशा दिलेरखानाने प्रौढ वाणीत शंभूराजांना सांगितले. अमृतमय गोड सरोवराच्या जवळ असल्याप्रमाणे अतिशय गोड शब्दात तो म्हणाला, ''पक्ष्यांना पंख फुटले की स्वहितार्थ घरट्यातून उडून जावे, त्याप्रमाणे सज्ञान झाल्यावर मुले पित्याच्या सान्निध्यातून निघून जातात.

प्रवसेल्लब्धविद्यश्चेद्विधित्सुः स्वाम्प्रसिद्धताम् । जानता गुरुणा तर्हि कुतः स विनिवार्यताम् ।। ३२ वाहयित्वा धुरं धुर्यं परीक्षन्ते परीक्षकाः । अस्य नैष गुणः किन्तु तस्य वित्तोस्त्यसौ यतः ।। ३३ केन लोकेन नाज्ञायि यथा दिल्लीपतिस्तथा । इह कर्तुमकर्तुं वा भवानेवाधिभूः स्वतः ।।३४ लङ्घते किल कल्पान्ते मर्यादां मकरालयः । न तु जातु विलङ्घन्ते भारतीं स्वां



भवादृशाः ।।३५ हितानामहितानां वा हितार्थं यः प्रवर्तते । तस्योपकृतिशीलस्य नाहितं जातु जायते ।। ३६ अहितीभूयते येन हितस्य हितकारिणः । द्रुह्यन्ति द्युसदस्तस्मै कृतघ्नायापकारिणे ।। ३७ स्वत्तः सर्वमताभिज्ञे त्वयि विज्ञापना तथा । स्फटिकैर्घटिते सौधे दह्यमाना सुधा यथा ।। ३८ इमां दलेलः सरसाममुष्य वाणीमुदारां मनसा विमृश्य । भूयांसि भूपालमणेः शिवस्य श्रेयांसि मेने स्थगितश्चिरस्य ।। ३९ अथैष तस्मै द्विरदांस्तुरङ्गान् दिल्लीश्वरेण प्रहितानुदग्रान् । श्रृङ्गारितान्स्वा–भरणोपपन्नान् समर्पयामास कृतोरुमानः ।। ४० तं तं प्रपद्य परिबर्हमनेकमर्हं सम्भावितानि बिरुदानि च तानि तानि । सद्यो दलेलविनियोजितसन्निवेशं शम्भुस्ततो निजमियाय चमूनिवेशम् ।। ४१

इह्यनुपुराणे सूर्यवंशे निवास अध्यायः ।

अर्थ – तसेच सुविद्य झाल्यावर शंभूराजा स्वतःची ख्याती कशी होईल ही इच्छा बाळगून बाहेर पडला. जाणत्या गुरूलाही त्याला आवर कसा घालता येईल? जो नेता होणार तो, त्यांच्यावर जबाबदारी सोपवून परीक्षक त्याची परीक्षा करतात. हा त्याचा गुण नव्हे, तर त्याला जाणणाऱ्याचा गुण म्हटला पाहिजे. दिल्लीपतीला कोण ओळखत नाही? या ठिकाणी तुम्ही स्वतःच कर्तुमकर्तुम प्रभू आहात. कल्पान्ती सागरसुद्धा मर्यादा सोडतो असे म्हणतात; परंतु आपल्यासारखे प्रभू स्वतःचा शब्द मोडत नाहीत. हितकारक आणि अहितकारक विचार करून दोघांच्याही हितासाठी जो प्रवृत्त होतो, त्या उपकर्त्याचे अकल्याण कधीच होत नाही. परोपकारी मनुष्याच्या हिताला जो विरोध करतो, त्या अपकारकर्त्याचे, कृतघ्नाचे, स्वर्गातील देव शत्रू बनतात. आपण सर्व गोष्टींचा विचार करता. मी आपणास सांगणे म्हणजे स्फटिकाने बनविलेल्या गच्चीवर अमृताचा दाहच (?) होय. दिलेरखानाने रसपूर्ण आणि उदार अशा भाषेने मनात विचार करून राजश्रेष्ठ शिवाजी महाराजांच्या कल्याणाचा मात्र विचार बराच वेळ थांबविला. त्यानंतर बादशहाने पाठविलेले दर्जेदार असे शृंगारलेले हत्ती–घोडे सन्मानपूर्वक शंभूराजांना अर्पण केले. त्या बहुमूल्य देणग्या स्वीकारून आणि विविध पदव्यांचा आदर करून तयार करविलेल्या छावणीकडे लगेच शंभूराजे आपल्या सैन्यासह निघाले.

अनुपुराण सूर्यवंश निवासकर कवीन्द्र परमानन्द प्रकाशित शतसंहितांमधील शुभलक्षणकारक वैयासिक अध्याय.

अध्याय १२

कवीन्द्र उवाच । ततो दिने दिने तत्र शम्भुराजः प्रतापवान् । अनुसारविदः सारवतः पर्वतवत् स्थिरान् ।। १ सत्वरान्स्वामिकार्येषु पद्भ्यामपि च गत्वरान् । तत्तद्धेतिधरान्धीरान्धुरीणान्धुर्यकर्मणि ।। २ संसप्तकान्परिज्ञातानभिज्ञातान् यशस्विनः । उदारप्रकृतीन्भव्याकृतीनविकृतीन्कृती ।। ३ समग्रहीत्सङ्ग्रहार्थी सैनिकान्ससिवाहिनः। शिखावदोजसां येषां विशिखाः शब्दवेधिनः ।। ४ अभ्याहवाभिमानिन्यः फलकिन्यः स्मयोद्धताः । अमुं पर्यचरंस्तत्र पत्तिचम्बः सहस्रशः ।। ५ सत्वन्वहं मदोन्मत्ते भद्रजातौ मतङ्गजे । शृङ्गारिते मदोदग्रे समग्रानीकमध्यमे ।। ६

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, नंतर कर्तृत्ववान, शक्तिशाली, पराक्रमी, पर्वताप्रमाणे स्थिर असलेले, सेवकत्व जपणारे, स्वामिकार्यासाठी त्वरा करणारे, प्रसंगी पायीदेखील जाणारे, विविध शस्त्रे धारण करणारे धैर्यशील, महत्त्वाच्या कामात अग्रेसर, प्रसिद्ध असे यशवंत, उदार, धिप्पाड देहधारी, अत्यंत निकोप अशा घोडेस्वारांना एकत्रित आणले. युद्धाला सामोरे जाण्याचा अभिमान

असणारी, ढाली घेतलेली गर्वोन्नत अशी सहस्रावधी पायदळे शंभूराजांच्या भोवती सेवेसाठी सज्ज होती. तो मात्र दररोज मदोन्मत्त अशा जातिवंत, सालंकृत व मदामुळे भयंकर दिसणाऱ्या सर्व सैन्याच्या मध्यभागी असलेल्या हत्तीवर दिलेरखानाबरोबर बसला.

दलेलेन सहासीनः पीनस्कन्धः सुलोचनः । नमतो नमयन्मौलीन्यवनानामनेकशः ।। ७
मुष्णन्तेजांसि सर्वेषां जिष्णुप्रतिमविक्रमः । गृह्णन्प्रणामं केषांचित्कांश्चित्पश्यन्कृपादृशा ।।८
हसन्कैश्चिद्विलासेन कांश्चित्कुर्वन्कथां मिथः । स्वजनेन समं साक्षात्सुधासहचरोन्नतः ।। ९
अखर्वगर्वैरर्वस्थैः प्रासपट्टिशपाणिभिः । अनुवीतो महाशूरैः शक्रोऽमरवरैर्यथा ।। १०
अन्यान्यायुधजातानि तानि तानि समन्ततः । सज्जीविधाय धावद्भिः पुरः परिजनैरलम् ।। ११
वृतो महोदग्रधामप्रधानैः प्रधनोद्धतैः । अनुवीतो विनीतात्मा महाराजात्मजः कृती ।। १२
सैन्यमध्येऽतिशुशुभे षण्मुखः सुमुखो यथा । तदा दलेलः प्रोद्वेल्लभुजधामसमुन्नतः ।। १३
शम्भुराजं समुद्वीक्ष्य वचनं किञ्चिदब्रवीत् । सुवर्णघटितं चेतोहारि पीयूषसुन्दरम् ।। १४
शक्रप्रस्थैकश-क्रेणावक्रेण प्रधनप्रथः । प्रार्थितस्त्वं महाराजासह्यं सह्यमुपद्रुतुम् ।। १५

अर्थ – बळकट खांदे व सुंदर डोळे असलेल्या संभाजीराजापुढे शिरस्त्राणधारी मोगल सैनिक नतमस्तक होत होते. इंद्राप्रमाणे पराक्रमी असल्यामुळे सर्वांचे तेज तो हरण करीत होता. कोणाच्या मुजऱ्याचा स्वीकार करीत, कोणाकडे कृपाकटाक्ष टाकीत खेळकरपणाने, कुणाबरोबर स्मितहास्य करीत, कुणाबरोबर आपसांत गप्पा करीत, स्वजनांच्या बरोबर साक्षात सुधासहचर चंद्राप्रमाणे उन्नत होऊन अतिशय गर्वाने घोड्यावर बसलेल्या प्रास व पट्टा हातात असलेल्या देवांसमवेत असलेल्या इंद्राप्रमाणे तो नेतृत्व करीत होता. सभोवती विविध शस्त्रे सज्ज करून धावणाऱ्या सेवकांनी, अत्यंत उग्र तेजाने प्रमुख भासणाऱ्या, लुटीमुळे उद्धत झालेल्या, त्या धन्य व विनीत शिवपुत्रापुढे शिष्य होऊन नमले. सैन्यात तो सुमुख अशा कार्तिकेयाप्रमाणे शोभत होता. त्यावेळी दिलेरखान हात उंचावून हलवीत, डौलदारपणे शंभूराजाकडे पाहून म्हणाला. त्याचे बोलणे अमृतासारखे गोड, मनोहारी आणि सोन्याचा मुलामा दिल्यासारखे होते. (दिलेरखान म्हणाला) इंद्रप्रस्थावरील इंद्राप्रमाणे सरळसोट अशा बादशहाने मोठे पारितोषिक मिळवून कीर्तिमान झालेल्या आपणाकडे असह्य अशा सह्यगिरीवर स्वारी करण्याची प्रार्थना केली आहे.

स्वायत्तीकर्तुमप्युच्चैस्त्वर्द्धहस्तेन केवलम् । दातुं महाधिपत्यं च सत्यं किञ्चित्पुनस्तव ।।१६ त्यक्तलोकैकवृत्तस्य ममतामोहितात्मनः । शिवराजाधिराज्यं च प्रशासतु पुनर्भवान् ।। १७ सत्कर्म वाप्यसत्कर्म कर्तव्यं विजिगीषुणा । कीर्तिर्वाप्यपकीर्तिर्वा यथा स्याच्छाश्वतीः समाः ।। १८ राजराजं दशमुखोऽग्रजं पितृसमं स्वयम् । पराजित्याग्रहील्लङ्कां शङ्कातङ्कमिवार्जिताम् ।। १९ सत्यसन्धं कुशलवौ रामं दशरथात्मजम् । पराजित्य स्वजनकं राज्यश्रियमवापतुः ।। २०

अर्थ – आपल्या हातानेच तो उच्च सह्याद्री फक्त काबीज करून त्यावर अधिकार प्राप्त करून देण्यासाठी ही सत्य प्रार्थना आहे. जनतेचा काही भाग दूर करून, ममतेने मोहित झालेल्या शिवराजांच्या या अधिराज्यावर आपण शासन करावे. शुभ किंवा अशुभ याची इच्छा करणाऱ्यांनी कर्म करावेच मग कायमची कीर्ती होईल; किंवा अपकीर्ती होईल. दशाननाने पित्याप्रमाणे असलेल्या आपल्या राजश्री अशा थोरल्या भावाचा स्वतः पराभव करून निःशंकपणे लंका मिळविली. सत्यप्रतिज्ञ अशा दशरथराजाचा पुत्र राम याचा पराभव करून कुश-लवांनी राजवैभव मिळविले.



अजागलस्तन इवावध्येयमधिकृत्य सः । शौरिः स्वजनकं शूरं स्वयं राज्यमथाकरोत् ।।२१ दितिजान्दनुजानिन्द्रो ज्येष्ठान्प्रेष्ठतमान्गुणैः । प्राज्यसाम्राज्यपदवीं नियम्याचीकरत्कृती ।। २२ आचार्यमार्यं तं द्रोणं स निहत्य वृकोदरः । धृष्टद्युम्नं पुरस्कृत्य वीरलक्ष्मीमबीभरत् ।। २३ शिखण्डिकृतसाहाय्यो भीष्मं भीष्मतराकृतिम् । आजघानार्जुनः सङ्ख्ये राज्यलोलुभमानसः ।। २३ धर्मराजोऽपि धर्मात्मा मातुलं शल्यनामकम् । अभिहत्यैकसाम्राज्यपदवीं समदीधरत् ।।२४ घातयित्वा रामकराद्वालिनं बलिनां वरम् । सुग्रीवोऽग्रजमत्युच्चैः साम्राज्यमकरोद्वशी ।। २५ बिभीषणेन सम्भाष्यान्तरं भेदं रघूद्वहे । घातितः स्वाग्रजो नाम रावणो लोकरावणः ।। २६ क्षत्रियान्तकरो घोरो गाङ्गेयेन भृगूद्वहः । अवलिप्त इति ज्ञातो हेलितो विजितोऽपि च ।। २७ विघ्नेशानं विनिर्जित्य कार्तिकेयेन धीमता । सेनापतित्वमाप्राप्तं प्रताप्याखिलवैरिणः ।। २८ तातं साहिजहानं स्वङ्कारागारे सुदुःसहे । ओरङ्गशाहः संयम्य दिल्लीन्द्रत्वमुपागमत् ।। २९

अर्थ – अजागळ स्तनाप्रमाणे निरुपयोगी असलेल्या शूरांचा वध करून त्या कृष्णाने स्वतः राज्य केले. कर्तबगार, ज्येष्ठ आणि गुणांनी अत्यंत प्रिय अशा इंद्राने दैत्यांना आणि दानवांना आवरून मोठे साम्राज्यपद प्राप्त केले. भीमाने गुरुश्रेष्ठ अशा द्रोणाचार्यांचा धृष्टद्युम्नाला पुढे करून वध केला आणि शौर्य दाखविले. राज्यलोभाने अर्जुनाने अत्यंत शूर आणि भयानक अशा भीष्माचार्यांचा शिखण्डीच्या साहाय्याने युद्धात घात केला. धर्मराजानेही आपल्या शल्य नामाच्या मामाला मारून एकमुखी साम्राज्य मिळविले. संयमी अशा सुग्रीवाने रामाच्या हातून बलिश्रेष्ठ अशा वाली या थोरल्या भावाचा वध करून मोठे साम्राज्य मिळविले. थोरला भाऊ बिभीषणाने रघुश्रेष्ठ रामाकडे फितुरी करून लोकांनी कठोर म्हणून मानलेल्या रावण नावाच्या आपल्या थोरल्या भावाला मारले. क्षत्रियांचा अंत करणाऱ्या परशुरामास गर्व झाला आहे असे जाणून गंगापुत्र भीष्माने त्याची कुचेष्टा केली आणि त्याला जिंकले. सर्व शत्रूंना पीडा देऊन बुद्धिमंत अशा कार्तिकेयाने विघ्नेश गणपतीला जिंकून सेनापतीपद प्राप्त केले. औरंगजेबाने आपला बाप शहाजहान याला अत्यंत दुःसह अशा कारागृहात डांबून दिल्लीचे तख्त मिळविले.

इत्थं सुदुःसहं कर्माचरन्ति विजिगीषवः । भूमण्डलाखण्डलत्वं प्रथामनुभवन्ति हि ।। ३० जलबुद्बुदवत्सर्वं जीवितं मनुजा(देहिना)मिदम् । तस्मात्सर्वात्मना कार्यो विक्रमः प्रबुभूषणा ।। ३१ ज्ञाताः क्षितौ धरापाला ये विक्रमपराङ्मुखाः । नाम तेषां न केनाऽपि श्रूयते परिपठ्यते ।। ३२ यावन्नाम नरस्यास्ति तावद्देवा भजन्त्युत । तं सन्तश्च प्रशंसन्ति सङ्कथासु कथास्वपि ।।३३

अर्थ – याप्रमाणे विजयाची इच्छा करणारे वीर अत्यंत दुःसह अशी कर्मे करतात आणि पृथ्वीवर इंद्रपद अनुभवतात. मनुष्याचे सर्व जीवनच पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे आहे म्हणून प्रभावशाली होण्याची इच्छा बाळगणाऱ्यांनी सर्वप्रकारे पराक्रम करावा. पराक्रमाकडे पाठ फिरवणारे राजे पृथ्वीवर झाल्याचे प्रसिद्ध आहे; पण त्यांचे कुणी नाव घेत नाही किंवा घेतल्याचे ऐकिवात नाही. जोपर्यंत माणसाला नाव किंवा कीर्ती आहे तोपर्यंतच त्याच्याकडे देवसुद्धा लक्ष देतात आणि सज्जनही त्याची कथा-कीर्तनातून स्तुती करतात.

उद्यमेन विना नास्ति विक्रमो विक्रमं विना । सिद्धिः सिद्धिं विना ख्यातिर्विना ख्यातिं महद्यशः ।। ३४ महद्यशो विनावश्यं जगन्न जगतो विना। रतिः प्राज्यैकसाम्राज्यपदवी

नानुभूयते ।। ३५ त्वं समृद्धः समिद्धाग्निप्रतापस्तपनोज्ज्वलः । वर्धिष्णुजिष्णुरोचिष्णुधामाराम इवापरः ।।३६ पृथुकोदण्डनिर्मुक्तकाण्डमण्डलताडिताः । हृदि निद्रां दिवा रात्रौ न ते गच्छन्ति दुर्हृदः ।। ३७ भवत्प्रतापसन्तप्तस्तपनः प्रतिवासरम् । निमज्जनं तनोत्येव सायं सायं सरित्पतौ ।। ३८ भवत्कीर्त्या परित्रस्तः कुमुदाधिपतिः क्षयम् । प्रतिमासं कृष्णपक्षे सङ्गच्छति नृपात्मज ।। ३९ भवतो विश्वविजयप्रख्यातबलशोभिनः । अरालितां भ्रुवमपि कः सहेताहितं चरन् ।। ४० लोभादिदिविष्टैः सचिवैर्ममताहतचेतसः । पितुस्त्वं कलिवीतस्य पदं संसाधयिष्यसि ।। ४१ स्वभाषयेति सम्भाष्य दलेलो गर्वकुञ्जरः । अतिमात्रं धनुस्त्वीयं यथा तत्त्रैम्बकं (त्रैय्यम्बकं) धनुः ।।४२ स्वर्णपृष्ठं भारसहं कमनीयतराकृति । शार्ङ्गं हरेर्यथा शार्ङ्गं स्वर्णबिन्दु-विचित्रितम् ।। ४३

अर्थ – उद्योगाशिवाय पराक्रम होत नाही, पराक्रमाशिवाय यश मिळत नाही, यश मिळाल्याशिवाय नाव होत नाही आणि नाव झाल्याशिवाय मोठी कीर्ती मिळत नाही. मोठ्या कीर्तीशिवाय जग वश होत नाही आणि जग वश झाल्याखेरीज मोठ्या साम्राज्यपदाचा उपभोगही घेता येत नाही. आपण समृद्ध आहात, पेटलेल्या अग्नीप्रमाणे आपला प्रताप आहे, आणि तो सूर्याप्रमाणे धगधगता आहे, जणू वर्धिष्णू, जयिष्णू आणि तेजाप्रमाणे आपण प्रकाशित आहात. आपल्या मोठ्या धनुष्यातून बाहेर पडलेल्या बाणांच्या सपाट्याने मार खाल्ल्यावर शत्रूला रात्रंदिवस झोप येत नाही. आपल्या पराक्रमाच्या तेजाने तप्त होऊन सूर्यदेखील रोज सायंकाळी समुद्रात बुडी मारतो. आपल्या कीर्तीने अतिशय खिन्न होऊन कुमुदाधिपती चंद्रही कृष्णपक्षात क्षय पावतो. विश्वविख्यात कीर्ती मिळविलेल्या सेनेमुळे शोभणाऱ्या आपणाकडे भ्रुकुटी वाकडी करून आपलेच अकल्याण करून घेण्याची सहनशक्ती कोणात आहे? लोभादी विकारांनी प्रभावित झालेल्या सचिवांमुळे तुमच्या पित्याचे मन ममतेने हरण केले आहे, तरी त्यातील कली निघून गेल्यावर आपल्या पित्याच्या पदाची प्राप्ती आपणासच होणार आहे.'' गर्वाने मदोन्मत्त झालेल्या हत्तीप्रमाणे दिलेरखानाने याप्रमाणे बोलल्यावर आपले शिवधनुष्याप्रमाणे असलेले, विष्णूच्या धनुष्याप्रमाणे अतिशय सुंदर, वजनदार, सोन्याने मढवलेले आणि सुवर्णबिंदूंनी शोभणारे धनुष्य वाकविले.

लसद्गुणं वीरमनोहारि दारुणदारणम् । कारणं शौर्यसम्पत्तेर्युद्धरङ्गविभूषणम् ।। ४४ सारणं बलमत्तानां परवारणवारणम् । हसन्नु कोटियुगलाग्राभ्यां स्वर्णहिमाचलौ ।। ४५ विधात्रा विहितं किन्नु मेरुविन्ध्याद्रिणो(?)रलम् । तुलनाय महारत्नभूतं नूत्नतमं श्रिया ।। ४६ अग्रे चकार जिज्ञासुर्बलं तस्य महात्मनः । कुरु सज्जं राजपुत्रेत्युच्चैर्वाचमवोचत ।। ४७ पिता माता सुहृद्बन्धुर्वैमात्रेयः सहोदरः । नियन्तव्यो नरेन्द्रेणेत्युक्त्वा मौनमथादधे ।। ४८

अर्थ – त्याची प्रत्यंचा (दोरी) चकाकत होती. ते धनुष्य पराक्रमाचे मूळ मनोहारी साधन असूनही भयंकर शत्रूचा विनाश करणारे शौर्य, संपत्ती निर्माण करणारे आणि समरांगणाचे भूषणच होते. आपल्या सामर्थ्याच्या जोरावर उन्मत्त झालेल्यांना दूर करणारे शत्रूंच्या हत्तींना पळवून लावणारे आणि आपल्या दोनही अग्रांच्या जोरावर सुवर्ण व हिमाचल यांना हसत होते. (ते धनुष्य) मेरू पर्वत आणि विंध्याद्री या दोन पर्वतांबरोबर सौंदर्याच्या बाबतीत तुलना करण्यासाठीच की काय, असे आगळेवेगळे म्हणून जणू काय रत्नस्वरूप असे ब्रह्मदेवाने निर्माण केले असावे. शंभूराजांच्या समोर सैन्य उभे करून उत्सुकपणे दिलेरखान गर्जून म्हणाला, ''राजपुत्रा, सैन्याला सज्ज करावे. पिता, माता, मित्र, बंधू आणि सावत्र व सख्खा भाऊ यांना राजाने आपल्या नियंत्रणात ठेवावे.'' व तो



गप्प बसला.

महामानी महासत्वो महोत्साहो महोद्यमः । निशम्य वचनं सर्वं विज्यं वीक्ष्य परं धनुः ।।४९ शम्भुराजो निजग्राह तरुणोऽरुणलोचनः । जानन्बलं दलेलस्य महद्दलविलासिनः ।। ५० आचकर्ष यथा रामो भार्गवाद्रेणुकात्मजात् । विचकर्ष यथा राजकुमारो राजमण्डले ।। ५१ चकर्ष तेजस्तत्रौच्चैर्दलेलस्य दलात्मनः । शमला कापि सुषमा तन्मुखे स्थितिमातनोत् ।। ५२ ररक्ष जीवितं तस्य ताम्रसेनापतेरलम् । ऊर्ध्वं मुमोच तं बाणं मित्रत्वं भावयन्हृदि ।। ५३ अवीवदत्तदा तत्र दलेलं बलिनां वरम् । सत्यमुक्तं दलपते तेजः सम्वर्धितं त्वया ।। ५४

अर्थ – महामानी, महाधैर्यशाली, महाउत्साही, अत्यंत उद्योगी अशा शंभूराजांनी सर्व भाषण ऐकून आपल्या श्रेष्ठ धनुष्याची काढलेली दोरी पाहून त्यांचे डोळे लाल झाले. दिलेरखानाचे प्रचंड सैन्यबळ लक्षात घेऊन त्यांनी निश्चय केला. रेणुकापुत्र परशुरामापासून (दाशरथी) रामाने ज्याप्रमाणे त्याचे धनुष्य हिसकावून घेतले त्याप्रमाणे युवराज शंभूराजाने राजमंडलात सर्वांना दूर सारले आणि सेनापती दिलेरखानाचे जणू तेज हिरावून घेतले आणि त्याच्या मुखावर शांत, सुंदर अशी एक भावावस्था दिसू लागली. त्याने मोगलांच्या सेनापतीच्या जीविताचे रक्षण केले. हृदयात मित्रत्वाची जाणीव ठेवून बाण वर सोडला आणि म्हणाला, ''तुम्ही सांगितले ते खरेच आहे. तुम्ही सामर्थ्याला उजाळाही दिला आहे.

निजाहितान्कुमतिनो नियमिष्यामि सर्वथा । तथा यत्नं विधास्यामि यथा स्याद्विजयो मम ।। ५५ विशन्ति यदि पातालं व्रजन्ति सुरपर्वतम् । भ्रमन्ति यदि दिक्प्रान्ते नियमिष्ये तथाप्यमून् ।। ५६

अर्थ – माझ्याकडच्या दुष्ट बुद्धीच्या शत्रूंना सर्वप्रकारे आवरणे हे माझ्याकडे लागले. त्यात मला यश प्राप्त होईल, असा मी प्रयत्न करीन. ते पाताळात गेले, स्वर्गात गेले किंवा सर्व दिशांना फिरले, तरी मी त्यांचे नियंत्रण करीन.

त्वयि सख्यत्वमायाते न्यूनं किं स्यान्ममाधुना । करस्था एव दृश्यन्ते सन्नद्धाः सर्वसिद्धयः ।। ५७ भवदालम्बमात्रस्यातिमात्रबलपौरुषः । शक्रस्यापि पदं प्राप्तुं भूयात्को नु मम श्रमः ।। ५८ लब्ध्वा सहायं सुग्रीवं प्लवङ्गानामधीश्वरम् । निहतो रामचन्द्रेण रावणो राक्षसाधिपः ।। ५९ वानराणामधिपतिः सुग्रीवो नाम वानरः । कृत्वा सहायं श्रीरामं वालिनं हतवान्पुरा ।। ६० कृष्णं सहायमाकल्प्यानल्पं सद्गुणशालिनम् । धनञ्जयो रणे कर्णमाजधान स्मयोद्धतः ।। ६१ माधवैकसहायेन सुराधिपतिना बलात् । हतो वृत्रो विचित्राणि चरित्राणि कृतानि च ।। ६२ वह्निमात्रसहायेन रुद्रेण मदनः पुरा । स्निग्धमुग्धतनुर्दग्धोऽसाधि कीर्तिर्दिगन्तरे ।। ६३ बिभीषणसहायेन सौमित्रेयेण धीमता । जीवितादभ्रंशितो मेघनादो बत मदोद्धतः ।। ६४ अनलेनानिले सख्यं मुख्यं सम्भाव्य सर्वदा । दन्दह्यते वनं घोरमसह्यममरैरपि ।। ६५ खाण्डवे पाण्डवं लब्ध्वा सहायं कृष्णमप्युत । अकरोत्ताण्डवं वह्निराखण्डलमहेलयन् ।। ६६ अरुणं सारथिं कृत्वा भास्करेण प्रभाभरैः । व्यापिता भुवनश्रेणी निःश्रेणी श्रेयसकृता ।। ६७ चतुर्भिर्भ्रातृभिः सार्धं द्रुपदाद्यैर्नराधिपैः । लब्ध्वा साहाय्यकं धर्मराजो राज्यमथाकरोत् ।। ६८ बृहन्नडासहायेनोत्तरेण प्रविजानता । विजिताः कौरवाः सर्वे भीष्मद्रोणपुरःसराः ।। ६९ देवसेनासखित्वेन विशाखेनाखिलाहितः। तारको निहितो सङ्ख्ये मुख्येनामित्रघातिना ।। ७० पुष्पवद्भ्यां सुधापाने राहुर्बहुमदोद्धतः । घातितो विष्णुचक्रेण वक्रदैत्यविदारिणा ।।

७१ सन्ध्यामात्रसहायेन नृसिंहेनासुरद्विषा । हिरण्यकशिपोर्वक्षो दारितं नखरैः खरैः ।। ७२

अर्थ – तुमच्या मित्रत्वामुळे मला आता काय कमी पडणार आहे? तुमचा नुसता आश्रय मिळाल्यावर अत्यंत मोठे सैन्य, पराक्रम आणि माझी कृती यामुळे सर्वसिद्धी माझ्या तळहातावर सज्ज झाल्याचे दिसत आहे. यामुळे मला इंद्रपदही मिळेल. वानराधीश्वर सुग्रीव मित्र झाल्यावर राक्षसाधीश्वर रावणाचाही रामाने वध केला. वानरांचा मुख्य सुग्रीव याने रामाला मित्र करून वालीला ठार मारले. सद्गुणशाली, सामर्थ्यवान अशा श्रीकृष्णाची मैत्री संपादन करून स्वाभिमानी अर्जुनाने युद्धात कर्णाला मारले.

देवराज इंद्राने विष्णूशी मैत्री केली आणि वृत्राला मारून अनेकविध पराक्रम केले. रुद्रानेसुद्धा अग्नीशी मैत्री करून प्रेमळ आणि तरुण असलेल्या मदनाला जाळले आणि दिगंतकीर्ती मिळविली. लक्ष्मणाने बिभीषणाच्या साहाय्याने चतुराईने मदोन्मत्त अशा मेघनादाला मारले. अग्नीतर नेहमीच वाऱ्याशी मैत्री करून देवांनाही अशक्य असे भयानक अरण्य पुनःपुन्हा जाळून टाकतो. अग्नीने खांडव वनामधे पांडवांना कृष्णासारखा मित्र मिळताच इंद्राला गोंधळून टाकणारे असे खांडव-दहनाचे कृत्य केले. अरुणाला सारथी बनवून सूर्याने आपल्या किरणांनी सर्व जग व्यापून टाकले आणि पृथ्वीचा वरचढपणा काढून टाकला. धर्मराजाने चार भाऊ आणि द्रुपद वगैरे राजे यांच्याबरोबर सलोखा करून राज्य केले. बृहन्नडेच्या साहाय्याने उत्तराने जाणीवपूर्वक भीष्म-द्रोणादी सर्व कौरवांना जिंकले. शत्रुघाती अशा कार्तिकेयाने देवांच्या सैन्याच्या जोरावर सर्वांचा शत्रू असलेल्या तारकासुराला युद्धात मारले. अमृतप्राशनाने अत्यंत गर्व झालेल्या व सूर्य-चंद्रावर वक्रदृष्टी ठेवणाऱ्या राहूला दैत्यांना मारणाऱ्या विष्णूच्या सुदर्शनचक्राद्वारे मारले. संध्येच्या साहाय्याने (?) नृसिंहाने देवद्वेष्ट्या हिरण्यकश्यपूचे वक्षस्थल तीक्ष्ण नखांनी फाडले.

इत्यादि(वि) चिन्त्य हृदये दिल्लीश्वरचमूपतिः । कल्पद्रुमिव राज्यार्थी श्रितोऽस्मि भवदाश्रयम् ।। ७३ मनोरथा मदीया ये ते सिद्धा इति भावये । पथ्यामुतथ्यानुजवदवादीस्त्वं यतो गिरम् ।। ७४ तथ्यपथ्यस्य को लोके वक्ता स्यात्त्वां विना मम । त्वमेव मित्रं मित्राभतेजःपुञ्जसमुद्धरम् ।। ७५ जनकेन विहीनोऽस्मि ममताग्रस्तचेतसा । वैमात्रेयेण शनिना विदूरमभिलक्षितः ।। ७६ मयूरादिप्रभृतिभिः प्रजाविप्लवकारिभिः । राक्षसैरिव दुष्प्रेक्ष्यैर्दूराद्दुष्टैः कुमन्त्रिभिः ।। ७७ जनकौ मोहममताग्रस्तावपि चमूपते । कलिगौरवतो यर्हि तर्हि पूज्यतमौ मम।।७८ प्रजानामेवकारुण्याद्दुष्टान्दमयितुं बलात् । शासितुं सचिवान्सेनापती-न्स्तेयादिमोहितान् ।। ७९ मदीयमेव तद्राज्यं तत्र कः स्याच्छ्रमो मम । केनचिद्धेतुना सेनापतेः सख्यमुरीकृतम् ।।८० जनकानन्तरं राजा ज्येष्ठपुत्रो भवत्युत । पण्डिताः कथयन्त्युच्चैर्देशे देशे सभास्वपि ।। ८१ अहं ज्येष्ठो गरिष्ठश्च कलाभिर्बहुभिर्गुणैः । महाराजस्य पदवीमहं भोक्ता गुणाकरः ।। ८२ त्वत्सहायेन दिल्लीन्द्रप्रसादेन मयाऽधुना । देशदुर्गाणि बहुधा पत्तन्नानि सहस्रशः ।। ८३ साधयिष्ये दिवारात्रं रिपूणामिति चिन्तये । इति लालप्य तं तत्र दलेलं शम्भुभूपतिः ।। ८४ महावीररसावेशश्चित-फुल्लतनूरुहः । बभौ सूर्य इव श्रीमान् राजपुत्रो महाद्युतिः ।। ८५

अर्थ – या सगळ्यांचा विचार करून दिल्लीश्वराच्या सेनापतीस हृदयात स्थान देऊन मी राज्याची इच्छा करीत आहे. कल्पद्रुमाप्रमाणे असलेल्या तुमचा आश्रय मला हवाच आहे. माझे मनोरथ सिद्ध झाले असे मी मानतो. कारण तुम्ही उतथ्याचा अनुज जो बृहस्पती त्याच्याप्रमाणेच हितकर असे बोलत आहात. सत्य आणि हितकर असे मला या जगात दुसरे कोण सांगणार?



सूर्याप्रमाणे तेजस्वी आणि उद्धारकर्ते असे तुम्हीच माझे सच्चे मित्र आहात. मला वडील नाहीत, ममतेने त्यांचे चित्त ग्रासलेले आहे. शनीप्रमाणे असलेल्या सावत्र भावालाही मी दूरचा आहे असे वाटते. प्रजेमध्ये हाहाकार माजविणाऱ्या राक्षसांप्रमाणे भयानक दिसणाऱ्या व त्यापेक्षाही दुष्ट असणाऱ्या वाईट मंत्र्यांमुळे माझे आई-वडील हे सेनापती महोदय, मोह आणि ममता यांनी ग्रासून गेले आहेत. हे जर कलीच्या प्रभावाने असेल, तर त्यांना मी अतिशय पूज्य मानतो. प्रजेविषयी दया असल्यामुळेच दुष्टांचे जबरदस्तीने दमन करण्यास आणि सचिव व सेनापती यांचा चौर्यादी अपराधांचा मोह झालेल्यांना हे माझेच राज्य असल्यामुळे शासन करण्यास मला कसले श्रम होणार? काही हेतू बाळगूनच मी सेनापतींशी मैत्री स्वीकारली आहे. पित्यानंतर ज्येष्ठ पुत्र राजा होतो असे म्हणतात. देशोदेशी होणाऱ्या पंडितांच्या सभांमधून हेच ठासून सांगितले जाते, मी ज्येष्ठ असून अनेक कलागुणांनीही वरिष्ठ आहे. गुणनिधी म्हणून महाराजांच्या स्थानावर मीच विराजमान होणार व त्याचा उपभोग घेणार.

दिल्लीश्वराच्या कृपेने आणि तुमच्या साहाय्याने शत्रूंचे पुष्कळसे किल्ले, प्रदेश आणि हजारो गावे रात्रंदिवस मिळविण्याचा मी आता विचार करीत असतो, शंभूराजे दिलेरखानाजवळ असे सतत गोड गोड बोलत होते. मोठ्या वीररसाच्या आवेशात त्यांचे शरीर रोमांचित होत होते. तो श्रीमान युवराज सूर्याप्रमाणे तेजःपुंज भासत होता.

ततो मौनमुपागच्छद्विचक्षणकृतक्षणः । कुमार इव तेजस्वी कुमारः शिवभूपतेः ।। ८६ श्रुत्वा दलेलः सकलमकलङ्कतरं वचः । ओरङ्गशाहसन्देशवर्णदूताननुस्मरन् ।। ८७ महाप्रेमभरारम्भं दर्शयन्वचसाधिकम् । अस्तुवच्छम्भुनृपतिं पारितोषिकमाददत् ।। ८८ दिने दिने गजारूढौ श्रीदलेलशिवात्मजौ । कथयन्तः(न्तौ) कथा इत्थं दिनानि नयतश्चिरम् ।। ८९ ओरङ्गशाहसन्देशा-द्विजयाव्हपुरं प्रति । प्रस्थानमकरोच्छम्भुमग्रे कृत्वा चमूपतिः ।। ९०

अर्थ – नंतर आनंददायी अशा तेजस्वी शिवपुत्राने मौन धारण केले. दिलेरखानाने संभाजीराजांचे ते सर्व निर्दोष असे भाषण ऐकून त्याला औरंगजेबाच्या संदेशाचे स्मरण झाले. त्या भाषणामुळे शुभारंभ झाल्याचे समजून बक्षिसे देऊन त्याने शंभूराजांची खूपच प्रशंसा केली. रोज हत्तीवर बसून गप्पागोष्टीत दिलेरखान आणि शिवपुत्राचे दिवस जाऊ लागले. सेनापती दिलेरखानाने शंभूराजांना पुढे करून औरंगजेबाच्या संदेशाप्रमाणे विजापुराकडे प्रयाण केले.

भूपालदुर्गदुर्धर्षे शिवराजस्य धीमतः । शम्भुराजकरेणोच्चैरभिमर्द्याग्रहीत्कृती ।। ९१ अन्यान्यपि च दुर्गाणि राजपुत्रपुरःसरः । अकरोत्स्वकरस्थानि सुस्वस्थानि धनादिभिः ।। ९२ इत्थं शम्भुनृपो दलेलकटकाग्रे सञ्चरन्सर्वदा युद्धक्रुद्धविरुद्धराजपटलीं निघ्नन्कृतघ्नानपि । तं भूपालगडं क्रुधा विकथातामानीय मानी स्वयं धीरः सान्द्रकृपाम्बुधिः समधिकं प्रेम्णा दलेलेऽर्पयत् ।। ९३ योद्धा योद्धा समिद्धानलसमविलसच्चण्डबाहुप्रतापो निर्दग्धारातिरण्यः समधिकधिषणः शूरसेनाशरण्यः । सानन्दं नन्दनन्दप्रतिमनवयशस्तोमसोमादयः श्रीः पश्यन्दिल्लीन्द्रसेनापति-मतिमहितो राजसूनुश्चकासे ।। ९४ भूपालादिगडाः फुडा अपि तथा श्रीशम्भुसाहाय्यतः स्वायत्तीरचिता अनीकपतिना श्रीमद्दलेलेन यत् । तत्संश्रुत्य विचिन्त्य विक्रमभरं चित्तेन नन्दोच्चकै दिल्लीन्द्रः शिवभूमिपालविषये नृत्यानि तेने कलिः ।। ९५ इति विहितजयश्रीः संश्रितो वीरसङ्घैः समधिकपदबन्धैर्मागधैःस्तूयमानः । शिवनरपतिपुत्रश्चारुचञ्चच्चरित्रः प्रतिसमरमजस्रं द्योतति स्मातिदृप्तः ।। ९६

अर्थ – बुद्धिमान अशा शिवाजीराजांचे हल्ला करण्यास कठीण असे भुईकोट किल्ले गर्जना करीत दिलेरखानाने शंभूराजांच्याकरवी स्वारी करून घेतले. युवराजांना पुढे करून व पैसे देऊन, दुसरेही किल्ले, धनादी त्याने आपल्या ताब्यात आणले. अशा रीतीने दिलेरखानाच्या सैन्याच्या अग्रभागी राहून, क्रुद्ध होऊन प्रतिपक्षाच्या राजमंडळास आणि कृतघ्नास मारून स्वाभिमानी, धैर्यशील आणि करुणेचा सागर असले, तरी रागाने स्वतःच्या नावाला न शोभणाऱ्या कृतीने भूपालगड अधिकच प्रेमपूर्वक दिलेरखानाला अर्पण केला. योद्धा म्हणून लढणारा, पेटलेल्या अग्नीप्रमाणे आपल्या भयावह बाहुप्रतापाने विलसणारा, शत्रूच्या वीरांना जाळणारा, प्रखर बुद्धी असलेला, शूर सेनेच्या आश्रयस्थानी असलेला नंदकुमार जो श्रीकृष्ण, त्याच्याप्रमाणे अभिनव कीर्तिसंपदा प्राप्त करणारा आणि आनंदाने दिल्लीश्वराच्या सेनापतीच्या बुद्धीने गौरविला गेलेला तो राजपुत्र प्रकाशमान झाला होता. भूपालादी गड आणि इतर किल्लेसुद्धा सेनापती दिलेरखानाने शंभूराजांच्या साहाय्याने आपल्या घशात घातले. हे कानावर येताच दिल्लीश्वर आणि कलिपुरुष यांनी आपल्या पराक्रमाचा आता विस्तार होणार व शिवाजीराजांचा पराजय याविषयी आनंद होऊन ते नाचू लागले. अशा रीतीने वीर पुरुषांच्यात वावरणारा, भाटांकडून ज्याची अतिशयोक्तीने स्तुती होत आहे, असा रमणीय चरित्र असलेला, गर्विष्ठ असा शिवपुत्र प्रत्येक लढाईत चमकत होता.

**किल कलिरपि भूयो वीक्ष्य वृद्धिं स्वकीयां निजहृदि बहु मेने मोहपूर्वप्रधानान् । कृतमिति बत कृत्यं भावयन्भव्यभावैरधिकतमविलासः सम्भ्रमेणाजहर्ष ।। १७ तत्तत्कार्यपरम्पराविरचना–दुर्दान्तसम्मर्दनाद् वीराणां परिपालनाद्भुजबलात्तत्तत्कलाकल्पनात् । श्रीशम्भोः करुणाकटाक्ष–विभवाच्छ्रीमाञ् शिवस्यात्मजः शम्भुः प्रेष्ठतमो बभूव सततं दिल्लीन्द्रसेनापतेः ।। १८**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरकवीन्द्रपरमानन्दकृतावध्यायः ।**

अर्थ – कलीदेखील आपली वाढ होत असलेली पाहून आपल्या हृदयात, प्रधानांच्या मनातील मोहाने निर्माण केलेली कृत्ये जाणता झाला आणि स्वतःला कृतकृत्य समजून आनंदाच्या आवेशाने आणि भव्य भावनांच्या विलासाने भारून जाण्याने अतिशय हर्षभरित झाला. सतत कार्यरत राहिल्याने महापराक्रमाने आपल्या बाहुसामर्थ्यावर वीरांचे पालन केल्यावर विविध कलांचा उपयोग केल्याने श्रीशंकराच्या करुण कटाक्षांच्या वैभवाने श्रीमान शिवपुत्र शंभू दिल्लीश्वराच्या सेनापतीचा अतिशय लाडका झाला.

अनुपुराण सूर्यवंशे निवासकर कवीन्द्र परमानन्दकृत अध्याय.

## भूपाळगड संग्राम - अध्याय १३

**मनीषिण ऊचुः । अथ भूपालदुर्गं च पितुर्न परिपालितम् । बत तद्वर्ति चानीकं शम्भुना विकथीकृतम् ।। १ स तु शम्भुः शिवस्योच्चैः सुतः सर्वजनस्तुतः । अकरोद्यदनर्हं तत्प्रतिभाति न वस्तुतः ।। २ स हि तत्र स्वयं कर्तुमकर्तुं चाखिलं प्रभुः । अकरोदसदृक्कर्म क्रूरं तत्केन हेतुना ।। ३**

अर्थ – पंडित म्हणाले, "पित्याच्या भूपालगडाचे रक्षण झाले नाही. तेथील सैन्य शंभूराजांनी निरुपयोगी ठरविले. शिवाजीराजांचा ज्येष्ठ पुत्र, ज्याची सर्व लोक वाहवा करतात, असे असताना तो अशी अयोग्य गोष्ट कशी करील यातील सत्य समजत नाही. तो तेथे स्वतः सर्व कर्तुमकर्तुम समर्थ असताना त्याच्याकडून असे अकल्पित व क्रूर कर्म कोणत्या हेतूने घडले?"



**कवीन्द्र उवाच । पत्तिसेनापतिर्यावत्तावदेत्य शिवात्मजः । बतेदमादिशद्दूतो द्वास्थं ग्रामाधिकारिणम् ।। ४**

अर्थ – कवीन्द्र म्हणाले, "पायदळाचा सेनापती शिवपुत्र तेथे येतो न येतो तोच दूताने ग्रामाधिकारी दरवाजावर आल्याची बातमी दिली."

**दूत उवाच । नोदग्रता गिरावस्मिन्नच सैन्यसमग्रता । द्विषन्निग्राहकेऽमुष्मिन्दले चेयमुदग्रता ।। ५ दलेलः सत्यसन्धोऽयं निहत्य त्वां ससैनिकम् । गुरुरोषो गिरेरस्य शकलानि करिष्यति ।।६ उचितं तद्यदुज्झन्ति स्वामिनोऽर्थाय जीवितम् । अन्यथा तु स्वयं स्वाय बतानर्थाय केवलम् ।। ७ अतो दुर्गामिदं मुञ्च श्रयामुं च महाप्रभुम् । अलं युद्धेन ते मन्द बलं निजमपश्यतः ।। ८**

अर्थ – दूत म्हणाला, "या डोंगरावर कठीण असे काहीच नाही. तितकेसे सैन्य नाही. शत्रूला ताब्यात घेणाऱ्या या सैन्यात तेवढी ताकद आहे. दिलेरखान वचन पाळणारा आहे. तो सैनिकांसह तुम्हाला मारून मोठ्या रोषाने या पर्वताची शकले करील. म्हणून योग्य हेच होईल की, स्वामीच्या हितासाठी (अनुनायी) प्राण देतील, नाहीतर स्वतःच आपल्या अनर्थाला कारण व्हाल. म्हणून हा गड सोडा आणि बलवत्तराचा आश्रय करा. आपल्या सैन्याचा विचार केला तर युद्ध करण्याची गरज नाही.

**रामसिंहस्य तनयः कृष्णसिंहः सुदुर्धरः । जगत्सिंहमुखाश्चान्ये राजपुत्राः प्रतापिनः ।। ९ श्रीमाननूपसिंहश्च पद्मसिंहश्च विश्रुतः । तथैव केसरीसिंहः कर्णसिंहसुता इमे ।। १० अमुना शिवराजस्य महाराजस्य सूनुना । साधवः साधुना सार्द्धं हृद्यं हार्दमदीधरन् ।। ११ अभीः स्वभावतस्तत्र यद्यच्चक्रे स उद्धतः । ततत्सोढं दलेलेन परां वृद्धिमुपेयुषा ।। १२**

अर्थ – रामसिंहाचा पराक्रमी मुलगा कृष्णसिंह आणि जगतसिंहासारखे दुसरे प्रतापी राजपुत्र, श्रीमान अनुपसिंह, प्रख्यात पद्मसिंह, तसेच केसरीसिंह, कर्णसिंहाची मुले छ. शिवाजी महाराजांच्या पुत्राबरोबर म्हणजे सज्जनाबरोबर सज्जन असे मनोहर मित्रत्व करून आहेत. निर्भय स्वभावाच्या व उद्धत अशा त्याने जे जे केले, ते ते सर्व दिलेरखानाने स्वतःच्या प्रगतीसाठी सहन केले.

**शम्भुः सेनापतेर्वाक्यमकरोन्नाकरोदपि । सत्वस्य पृथुसत्वस्य व्यधत्तैव महामतिः ।। १३ अथ स्वार्थैकलुब्धेन मरुत्वत्प्रस्थभूभृता । तनयं सह्यपालस्य स्वायत्तमिव मन्वता ।। १३ समलेखि दलेलाय सेनाधिपतये यथा । कथयिष्याम्यशेषेण श्रूयतां विबुधास्तथा ।। १४ यद्यदर्थयते शम्भुस्तत्तदस्मै प्रदीयताम् । दाक्षिणात्यशिशावस्मिन्सर्वथैवावधीयताम् ।। १५ प्रस्थीयतां ततः सद्यः स्थीयतां न मनागपि । सन्नाह्य वाहिनी सर्वा सह्याद्रिं प्रति नीयताम् ।। १६ अत वा विजयाह्वं प्राङ्नगरं तन्नियम्यताम् । धत्ते यदवलम्बेन सह्यभूभृदजय्यताम् ।। १७ एनं(वं)स एनमादेशं नतेन शिरसावहन् । प्रतस्थे प्रमनाः सद्यः समग्रपृतनाग्रणीः ।। १८ स्वेन सेनासमूहेन व्यूढेन प्रौढविक्रमः। तदग्रे भूदुदग्रश्रीर्दुर्धर्षः शिवनन्दनः ।। १९ चलत्यस्मिंश्च भूपाले चतुरङ्गचमूत्थितैः । धूलिधाराभरैरन्तरधीयन्त धराधराः ।। २० तदानीमुन्मदानीकभरभारार्द्दिता धरा । दराद्दिवमिवाधावद्रेणुधोरणिदम्भिनी ।। २१ प्रथितागाधभावानामापगानां तद्ध्वनि । पयः प्रसृतिभिर्लभ्यमलभ्यमपि चाभवत् ।। २२ सैन्यैरध्युषितास्तस्य यवनस्यात्तवर्त्मनः । नद्यो न द्योतयामासुः स्वगमात्पतिमात्मनः ।। २३ अभीकः स बलोम्भोधिः शनैरभिसरंस्तदा । महामानं लघूकर्तुं सरितामभवत्प्रभुः ।। २४**

अर्थ – शंभूराजांनी सेनापतीच्या भाषणाकडे लक्ष दिल्यासारखे करून दुर्लक्ष केले. महामती

शंभूने केवळ धैर्याकडेच लक्ष दिले. फक्त स्वार्थाने लुब्ध होऊन सम्राटाने सह्याद्रीच्या राजाच्या पुत्राला आपल्या ताब्यात आता आला आहे असे मानून सेनापती दिलेरखानाविषयी काय भावना ठेविली, हे मी पुन्हा तुम्हा विद्वानांना सांगतो. 'शंभूराजांना जी जी गोष्ट हवीशी वाटेल, त्यांना ती ती गोष्ट द्या. दक्षिणेकडच्या या राजपुत्राकडे सर्वथा लक्ष द्या. तेव्हा आता लवकर निघा. थोडा वेळही थांबू नका. सर्व सैन्य सिद्ध करून सह्याद्रीकडे वळवा किंवा त्याअगोदर (विजापूर) ताब्यात घ्या. त्याच्याच आश्रयाने सह्याद्रीचा राजा आपण अजिंक्य आहोत असे समजतो.' असा आदेश नतमस्तक होऊन त्याने मानला आणि तो सरसेनापती लगेच दृढनिश्चय करून निघाला. आपल्या सर्व सैन्याच्या व्यूहामुळे पराक्रमाने वाढलेला तो अजिंक्य आणि वैभवशाली उग्र शिवपुत्र त्याच्यापुढे झाला. राजा निघाला असता चतुरंग सेनेच्या उडालेल्या धुळीच्या लोटाने पर्वत दिसेनासे झाले. त्यावेळी उन्मत्त सैन्याच्या वजनाने त्रासून जाऊन भीतीने धुळीच्या दिशेने पृथ्वी जणूकाही स्वर्गाकडे धावू लागली. प्रसिद्ध आणि खोल अशा नद्यांच्या मार्गावर मिळणारे पाणी दुर्लभ झाले. यवनांच्या सैन्याने मार्गातच तळ ठोकल्यावर नद्यांना मार्ग अडल्यामुळे आपला सागररूपी पतीही समजेनासा झाला. तो सैन्यसागर हळूहळू पुढे सरकत असता नद्यांच्या गर्विष्ठपणाला त्याने तुच्छ लेखले.

**श्रयमाण: शिवस्याथ सीमानं येदिलस्य च । दलेल: स्वामिवचनाद्विमुखोऽहिरिवाभवत् ।। २५ सेनान्याऽहनि कस्मिंश्चिद्दूरादभिमुखीभवन् । मुदिराणामिवोदग्र: शुश्रुवे ध्वनिरध्वनि ।।२६ अथैष शम्भुमाहूय हस्तियती हयस्थितम् । स्वयं वेदितवृत्तोऽपि पप्रच्छ परवीरजित् ।। २७ दलेल उवाच । विना मेघागमं मेघान्गार्जतोऽमून्विलोकय । तडितोऽपि च तेजोभि: परिदीपयतीदिवम् ।। २८ शेस जिज्ञासमानाय तदिदं वत्स वेत्सि चेत । पृच्छन्तामिति स प्राह प्रहसन्तं हसन्मुख: ।। २९ दिल्लीपरिवृढो येन युध्यते बहुश: समा: । तत्सैनिका: स्वयं ये ते भूपालगिरिवर्तिन: ।। ३० दीपयन्ति दिवं सर्वा हेतवोमू: सहेतय: । स्र काल एव सम्यातमदसीय सहेत य: ।। ३१ तमित्यभिदधावेस्मि(तस्मिन्नभिदधानेऽस्मिन्) दधाते वीरसम्पदम् । साभिमानेव सेनेयं तमेवाप शिलोच्चयम् ।। ३२**

**अर्थ** – शिवाजीराजांची आणि आदिलशहाची राज्यसीमा आल्यावर आपल्या धन्याच्या सांगण्याप्रमाणे दिलेरखानाने सर्पाप्रमाणे तोंड वळविले. एक दिवस सैन्य दूर असताना वाटेत मेघाप्रमाणे उग्र, गंभीर असा आवाज समोरून ऐकू आला. तेव्हा दिलेरखानाला सर्वकाही माहीत असतानाही शत्रूच्या वीरांना जिंकणाऱ्या अशा हत्तीवर बसलेल्या त्याने घोड्यावर बसलेल्या शंभूराजांना हाक मारून विचारले.

दिलेरखान म्हणाला, ''पावसाळा नसताना गडगडणाऱ्या या ढगांकडे पाहा. तसेच आपल्या तेजाने अंतरिक्ष उजळून टाकणाऱ्या विजा पण पाहा. हे जर समजत असेल तर जिज्ञासूला सांगा.'' हसतमुखाने तो स्मित करणाऱ्या त्याला म्हणाला, ''विचारा.'' ''पुष्कळ वर्षे दिल्लीश्वर ज्याच्याबरोबर युद्ध करीत आहे, त्याचे सैनिक भूपालगडावर उपस्थित आहेत. जो सशस्त्र अंतरिक्षाला दीपवून टाकतो, तो कालपुरुषच या सशस्त्र सैन्याला एकत्र करणारा असेल. तो असे बोलत असता आणि अंगी शौर्यलक्षणे धारण करीत असता ते सैन्य अभिमानाने त्याच सह्य पर्वताकडे (भूपालगडाकडे) गेले.''

**ततस्तद्भूमिभृद्दुर्गं सद्य एवाददित्सुना । स्वयं निविविशे तत्र सेनान्या सैन्यमात्मन: ।। ३३ हरिद्भिर्हरिदेवोच्चै: पीताभि: पीत एव च । नीलाभिर्नील एवाथ श्वेताभि: श्वेत एव च ।।**



**३४ शोण एव च शोणाभिश्चित्राभिश्चित्र एव च । अदभ्रतरसन्ध्याभ्ररेखाभिरिव तत्क्षणम् ।। ३५ आरोहन्तीभिरभितो बलिनामारुरुक्षताम् । द्विषतां वैजयन्तीभिरभूद्भूपालभूधर: ।। ३६ मरुत्प्रसरदाकुश्चत्ततत्केतुपटाश्चल: । स बभौ समये तत्र सपतत्र इवाचल: ।। ३७ अथादेशाद्दलेलस्य सैनिकास्ते सहस्रश: । असहन्त शिलावर्षं हन्त केचन संहता: ।। ३८ दुर्गमे गिरिदुर्गेऽस्मिन्दृषद्वर्षाणि वर्षति । आरोहन्त: स्वयं हन्त केऽपि चर्मासिपाणय: ।। ३९**

**अर्थ** – नंतर तो भुईकोट किल्ला लगेच हस्तगत करण्याच्या इच्छेने तेथे सेनापतीने आपले सैन्य स्वत: आणले. तेव्हा तो भूपालगड संध्याकाळच्या मेघकिरणांनी हिरवा, स्पष्ट हिरवा, पिवळ्यानंतर पिवळा, निळा, पांढरा, लाल किरणांनी लाल आणि रंगीबेरंगी किरणांनी रंगीबेरंगी असा क्षणोक्षणी बलिष्ठ व आक्रमक शत्रूच्या पताका सर्व बाजूंनी वर चढत असता दिसला. त्या ध्वजांची वस्त्रे वाऱ्याबरोबर फडकत आणि आकुंचित होत होती. त्यामुळे तो गड, त्यावर पक्षी बसल्यासारखा दिसत होता. तेव्हा दिलेरखानाच्या आज्ञेवरून ते हजारो सैनिक एकत्र गोळा होऊन आणि काही स्वतंत्रपणे शिलावर्षाव सहन करू लागले. त्या दुर्गम अशा किल्ल्यावर दगडांचा मारा होत असता काहीजण हातात ढाली आणि तलवारी घेऊन वर चढत होते.

**शूरा: क्षरदसृक्पूरा: क्षितिं दूरादरञ्जयन् । शीर्यमाणशिरस्कन्धकरकूर्परवक्षसा: ।। ४० आरुह्यारुह्य संश्लिष्टतटा: सन्नद्धकङ्कटा: । वीरा: केऽपि तदोत्तालास्तारा इव विरेजिरे ।। ४१ सोढ्वाभ्यापततां पातानश्मनां पृथुवर्ष्मणाम् । क्रुधा महायुधा: केचिदधिगत्याप्यधित्यकाम् ।।४२ खदिराङ्गारवर्षेण स प्रकर्षेण तत्क्षणम् । भस्मतां प्रत्यपद्यन्त पश्यतां पार्श्ववर्तिनाम् ।। ४३ अथ धीरैर्महावीरैर्गिरिदुर्गावलम्बिभि: । महत: स्वामिनोऽर्थाय जीवितं मोक्तुमुद्यतै: ।। ४४ केषुचित्पात्यमानेषु पातितेषु च केषुचित् । विद्रावितेषु विद्राव्यमाणेष्वपि च केषुचित् ।। ४५ गाढवर्मा तदा शम्भुवर्मा चर्मासिभृत्स्वयम् । धन्विभिर्गदिभिर्वीरै: प्रासिभिश्चन्द्रहासिभि: ।।४६ त्रिशूलिभिर्मुद्गरिभिर्बाणिभिर्वारबाणिभि: । मानिभि: सहितो मानी शम्भुराजोऽनुयायिभि: ।।४७ अधिरुह्य धरं सद्यस्तदा क्रुद्ध इवान्तक: । युध्यमानो विरुद्धानां व्यदधात्कदनं महत् ।। ४८ अलं भिया धियाऽलम्भि किमियं वो महायुधा: । द्विषतोऽमून्निगृण्हीत सङ्गृण्हीत यशो युधा ।। ४९ इति शम्भुवच: श्रुत्वा विद्रवन्तो न विद्रुता: । विद्रुतास्तु परावृत्य पुनर्युद्धाय संहता: ।। ५० स धन्वी धन्व धुन्वानस्तन्वान: शरमोक्षणम् । विपक्षान्क्षपयन्नैक्षि दुर्लक्ष: पार्थवत्क्षणम् ।। ५१ स तेषां युध्यमानानां समानानां सुरादिभि: । पार्ष्णीन्पाणीन्कफोणीश्च तथान्त्राणि त्रिकाणि च ।।५२ पृश्नीन्पृष्ठीवदस्थीनि सक्थीनि च भुजा: स्फिज: । क्रूरकर्मकृतां तेषां पृथक्पृथगथाकरोत् ।। ५३ इत्थं राजकुमारेण कुमारेणेव कुप्यता । शक्रारिषु समग्रेषु दुर्गरक्षेष्वनेकश: ।। ५४ इषुभि: शकलीकृत्य पातितेषु समन्तत: । स्वप्नदृष्टेष्विवाशेषेष्वपि नष्टेषु विव्हल: ।। ५६**

**अर्थ** – शूर सैनिक अंगातून रक्ताच्या धारा वाहत असताना व डोके, खांदे, हात, कोपर, छाती यांची चाळण होत असताना दूरवर रक्ताने भूमी रंगवीत होते. भिंतीच्या आडोशाने चिलखत घातलेले ते वीर चमचमणाऱ्या ताऱ्याप्रमाणे शोभत होते, चालून जाताना खाली आदळणाऱ्या दगडांचा मारा सहन करीत होते. काही मोठे योद्धे संतापून वरच्या पठारावर आल्याने खदिरांगासारख्या वर्षावाने तत्क्षणी बाजूचे लोक भस्म होऊन जात. अनेक धैर्यवान असे वीर किल्ल्याला चिकटून राहून आपल्या महान नेत्याच्या कार्यासाठी जीविताचा त्याग करायलाही तयार होते. काही पाडले

जात होते, तर काही शत्रूला पाडीत होते. काही पळून जात होते, तर काहींना पळवून लावत होते. घट्ट चिलखत घातलेला शंभूराजा स्वत: हातात ढाल-तलवार घेऊन धनुष्य-गदा-भाले-तलवारी घेतलेल्या वीरांबरोबर, तसेच त्रिशूळ-दंड-बाण-चिलखत असलेल्या स्वाभिमानी चेल्यांसह बाणेदार शंभूराजा गड चढून त्वरेने क्रुद्ध झालेल्या यमराजाप्रमाणे युद्ध करीत विरुद्ध पक्षाची कत्तल करीत होता. "महाशूरांनो, भिऊ नका, तुमच्या बुद्धीने हे काय आरंभिले आहे? शत्रूला पकडा आणि युद्धात यश मिळवा." असे शंभूराजांचे भाषण ऐकून पळणारे सैनिक पळायचे थांबले आणि पुन्हा परतून युद्धाला भिडले. तो धनुर्धर आपले धनुष्य फिरवीत बाणांच्या फेकी करीत शत्रूला हतबल करणारा असला, तरी क्षणातच अर्जुनाप्रमाणे दिसेनासा होई. सुरादिकांबरोबर होणारे युद्धासारखे हे युद्ध असले, तरी त्याने (एकट्याने) त्या क्रूर कर्म्यांच्या टाचा, हात, कोपर, आतडी, पाठीच्या कण्याच्या खालील भाग, पाठीची हाडे, मांड्या, बाहू आणि नितंब वेगवेगळे केले. कुमार कार्तिकेयाप्रमाणे राग प्रकटवीत त्या युवराजानेही त्या इंद्ररूपी शत्रूच्या (?) दुर्गरक्षकांची अनेक प्रकारानी बाणांनी शकले उडविली.

अपद्रुत्याचलादस्मादकस्मात्क्वापि निर्गतः । सकलं स्वस्य गर्वस्य फलं प्राप फिरङ्गजित् ।। ५७ प्रध्वनल्लोलकल्लोला क्रव्यकर्दमदुर्गमा । क्रूराकारा तदापारा प्रससारासृगापगा ।। ५८ आप्लुताः सकुलकं सदारैर्वीरलोहिततरङ्गवतीषु । मेदसा मसृणितानि तदानीमाशुराशु पिशितानि पिशाचाः ।। ५९ इत्थमेनमचलं युधि जित्वा शम्भुरेष विजयी पृथुसत्वः । साहसीसमुदितैर्मुदितैः स्वैः सैनिकैः सह दलेलमपश्यत् ।। ६०

इत्यनुपुराणे कवीन्द्र अध्यायः ।

अर्थ – फिरंगोजी नरसाळा, भूपाळगडचा किल्लेदार, याने या सर्वांना पाहिले आणि आपण जणू स्वप्नच पाहात आहोत असे त्यास वाटले. तो व्याकूळ झाला आणि तो गड सोडून पळाला. त्याला आपल्या गर्वाचे फळ मिळाले. त्यावेळी क्रूर आणि अपार वाटणारी रक्ताची नदी वाहिली. तिच्यावरील लाटा आवाज करणाऱ्या व सतत तरंग उठणाऱ्या होत्या. मांसाचा चिखल झाल्यामुळे ती नदी दुर्गम झाली होती. लवकरच तो परिसर सहकुटुंब अशा पिशाचांनी भरून गेला. वीरांच्या रक्ताच्या तरंगात मेद मिसळून ती भूते आवेशाने मांस खाऊ लागली. याप्रमाणे तो किल्ला मोठ्या धैर्यशाली शंभूराजांनी जिंकला आणि या साहसामुळे आनंदित होऊन आपल्या सैनिकांसह त्यांनी दिलेरखानाची भेट घेतली.

* * *



# प्रकरण ४

## शिवाजी महाराजांचे महानिर्वाण, रायगडावरील कारस्थान, संभाजीराजांचे रायगड आगमन, संभाजीराजांचा राज्याभिषेक, संभाजीराजे राज्याभिषेक तिथी.

(मूळ संहितेतील विभाग १, श्लोक ५८-६०, वि.२, अ. १ व अ. २ पूर्ण, वि.३, अ.५, श्लो.१२६-१२७, वि.३, अ. १ ते अ. ४ पूर्ण, वि.३, अ. १४, श्लो. २४-४७ आणि श्लो. २-७, वि.१, अ.श्लो.६३)

---

### छ. शिवाजी महाराजांचे महानिर्वाण -

शम्भोः शिवाराधनतत्परस्य प्रसादचिन्हीकृतकन्धरस्य । सापत्न्यभावो बलवान्यथा तथा भवस्य भावो बलवत्तरोऽभूत् ।। ५८

अर्थ – शिवभक्तीत/शिवाजीच्या मनाप्रमाणे वागण्यात तत्पर असलेल्या संभाजीला आपल्या खांद्यावरील जबाबदारीविषयी प्रसादचिन्हे दिसू लागली व लगेचच सापत्न्य भावनेप्रमाणे राज्यरूपी संसारभावना बलवत्तर झाली.

सैन्यं न सङ्गे न धनं प्रसङ्गे मनोनुषङ्ग किल युद्धरङ्गे । एवं प्रसक्तेऽपि च दुःप्रसङ्गे राज्यैकसङ्गे शिवभक्तिरङ्गे ।। ५९

अर्थ – त्याच्या मनाची आसक्ती सैन्यावर नव्हती. प्रसंगविशेषी धनावरही नव्हती; परंतु युद्धाच्या आवडीवर होती. अशा रीतीने ती परिणामस्वरूपी राजसत्तेत संकटात आणि शिवाच्या/ शिवाजीच्या भक्तिरंगात होती. (या श्लोकातून संभाजीराजे युद्धसंमुख असल्याचे कवी लिहितो- मनोनुषङ्ग किल युद्धरङ्गे।)

हेला कदर्थीकृतसिन्धुवेला लीला कनिष्ठीकृतमन्त्रिखेला । शम्भोस्तदानीं जगदम्बि-काया निष्ठैव निष्ठां नयति स्म राज्ये ।। ६०

अर्थ – त्याच्या शृंगारेच्छारूपी (ऊर्मी आणि लीला) सागरमर्यादा तुच्छ मानून मंत्रिगणांच्या डावपेचांना गौण समजून संभाजीची जगदंबेवरील निष्ठा राज्य तारून नेऊ लागली.

श्रीमच्छ्रीशिवराजराजमुकुटालङ्कारचूडामणिर्माहात्म्यं निजमाप्रसार्य जगतीनाथेषु जाग्रत्प्रभम् । कैलासे दमनोत्सवाय गिरिशेनाकारितो नु स्वयं शीघ्रं संसृतिनाशनाय महसामाद्यं प्रतस्थे स्थलम् ।। ६१

अर्थ – राजमुकुटावरील श्रेष्ठ अलंकार अशा शिवाजीराजांनी आपल्या जागृत तेजाचा महिमा (सर्व) राजकुलात पसरवून आपल्या शांतिउत्सवासाठी (दमन सत्रासाठी) शंकराने कैलासावर बोलाविल्यामुळे महात्म्यांच्या आदिस्थळी सत्वर प्रयाण केले. मात्र पृथ्वीवर यामुळे स्थैर्यासाठी संकट ओढवले गेले.

नीलासपर्यां शिवलोकचर्यां कर्तुं शिवे भूमिपतौ प्रयाते । मार्गोऽशिवोऽभून्निजसेवकानां तथाऽपि शम्भुः शिवराज्यमाप ।। ६०

अर्थ – शिवलोकातील नीलापूजेसाठी शिवाजीराजे कैलासाला गेल्यावर त्यांच्या सेवकांचा

मार्ग अवघड झाला; परंतु शंभूराजांनी शिवाजीचे राज्य स्वीकारले.

**विभाग २, अध्याय १**

**कवीन्द्र उवाच । अथ कृताग्निसंस्कारा महाराजस्य धीमतः । पुरोहितप्रभृतयो मन्त्रिणो मन्त्रकोविदाः ।। १ प्रातर्द्वितीयदिवसे राजारामस्य मातरम् । ममतां नाम दैत्यानां मायां कार्यार्थमागताम् ।। २ दैवात्सम्पदितमनोरथां स्वार्थपथिस्थिताम् । आन्तरानन्दभरितां बहिः शोकपरिप्लुताम् ।। ३ शोचन्तश्चिररात्राय रुदन्तो घर्घरस्वरम् । परिवव्रुर्वचः किञ्चिदूचुरुच्चैः समाहितुम् ।। ४**

**अर्थ –** कवीन्द्र म्हणतात– बुद्धिमान शिवाजी महाराजांचे अग्निसंस्कार झाल्यानंतर पुरोहित आणि नीतिविशारद मंत्री यांच्याकडे दुसऱ्या दिवशी सकाळी दैत्यांच्या ममता नावाच्या मायावी कार्यासाठी राजारामाची आई आली. ती बाहेरून शोकव्याकुल दिसत असली, तरी तिला आतून आनंदाचे भरते आले होते. दैववशात तिला स्वार्थाच्या मार्गावर असलेले मनोरथ सफल झाले होते. रात्रभर शोक करीत असल्यामुळे रडव्या व दाटून आलेल्या आवाजात तिचे सांत्वन करण्यासाठी (पुरोहित आणि मंत्री) तिच्याभोवती जमून मोठ्याने बोलू लागले.

**मन्त्रिण ऊचुः। कष्टं कष्टं महत्कष्टं विधेर्विरचितं विधिम् । अनुगच्छन्ति मनुजाः पशुपक्षिमृगादयः ।। ५ धिगस्तु दृष्टिरस्माकं धिगस्तु ननु जीवितम् । यत्र जीवामहे सर्वे महाराजविनाकृताः ।। ६ अन्तवन्त इमे लोकाः शोकान्तकविकारिणः । अनुभूय प्रभूतातिधाम गच्छन्ति योगिनः ।। ७ प्रियां पुत्रीं प्रियं पुत्रं प्रियौ भ्रातरसोदरौ । पितरावपि हित्वाहो क्रूरवद्याति मानवः ।। ८ कृत्वा यज्ञांस्तपस्तप्त्वा जप्त्वा नत्वा सदाशिवम् । महापदोत्सवाः किं नन्वस्मान्न गणयन्त्युत ।। ९ परलोकप्रसक्तस्य स्वलोकैस्तस्य किं भवेत् । यथाऽमृतेन तृप्तस्य घटवारि किमाचरेत् ।। १० पारलौकिकसक्तानां कठिनं मानसं किल । बले ब(र्ब)लिकरो विष्णुस्तत्र लक्ष्मीं न पश्यति ।। ११ अशाश्वतमिदं सर्वमाशापाशनियन्त्रितम् । कलयन्ति किलात्यर्थं परलोकपरा नराः ।। १२**

**अर्थ –** मंत्री म्हणतात– विधीने हे काय अतिकष्टदायक कसे घडवून आणले? माणसे, पशू-पक्षी, हरणे सर्वच दैवाला शरण जातात. आम्ही मात्र महाराजांच्या मागे जिवंत राहिलो. अशा आमच्या दृष्टीचा आणि जीविताचाही धिक्कार असो. शोकापर्यंत सर्व विकारांनी व्यापलेले हे लोक नाशवंत आहेत हे सिद्ध झाल्याने योगीलोक मात्र त्या महत् पदाला पोहोचतात. एखाद्या क्रूर माणसाप्रमाणे सर्व लोक आपली लाडकी मुले-मुली, भाऊबंध आणि आई-वडिलांनाही सोडून जातात. एवढे यज्ञ, जप, तप, शिवाला नमन आणि मोठाले उत्सव करतात; पण आम्हाला मात्र विचारत नाहीत! परलोकाला प्रस्थान करणाऱ्यांचा इहलोकाशी काय संबंध राहतो? अमृताने तृप्त झालेल्याचे घटातील पाणी काय समाधान करणार? अशा परलोकाकडे वळलेल्यांचे मन तरी किती कठीण! बळीलादेखील बळी देणारा विष्णू तो लक्ष्मीकडे पाहत नाही. परलोकाला निघालेले हे लोक अशाश्वत पाशांनी बांधलेले जग केवळ निरर्थकच आहे असे समजतात.

**संस्कृतासंस्कृतं सर्वं विनाशमनुगच्छति । ब्रह्मविष्णुमहेन्द्रादिदेवता अपि तादृशाः ।। १३ दृश्यतेऽपि च यत्किंचिद्वस्तुजातश्चराचरम् । व्यत्यासभावं भजते सर्वमेव न संशयः ।। १४ अशोच्या एव ते सर्वे ये परं लोकमास्थिताः । भजन्ति पुण्यान् यान् शश्वत् स्वर्वेश्याः सतिलोत्तमाः ।। १५ परामृतैकसन्तृप्तान्परलोकप्रवासिनः । वृथा समनुशोचन्ति नराः पण्डितमानिनः ।। १६ असारे घोरसंसारे नानाक्लेशानुभाविनः । परलोके महोल्लासान्को नु शोचितुमर्हति ।। १७**

**अर्थ –** संस्कारित आणि असंस्कारित जे सर्वकाही आहे ते विनाशच पावते. ब्रह्मा, विष्णु, महेश हे देवसुद्धा तसेच. चराचर असे सर्व वस्तुजात उलटेपुलटे होऊन नष्ट झालेले दिसते, यात कोणतीही शंका नाही. जे परलोकाला गेले, त्यांच्याविषयी दुःख करू नये. तिलोत्तमा वगैरे अप्सरा अशा पुण्यवंतांची सदैव सेवा करतात. असे परलोकाचे प्रवासी श्रेष्ठ अशा अमृताने तृप्तच झालेले असतात. पंडित म्हणवून घेणारे लोकही त्यांच्याबद्दल विनाकारणच शोक करतात. नानाप्रकारचे भोग ज्यांना भोगावे लागतात, अशा संसारी लोकांना परलोकातील अत्यानंद दुःख देणारा असतो असे कसे म्हणतात?

**पुण्यद्रविणसम्पर्कान्नानाभोगोपभोगिनः । पुत्रमित्रकलत्राणि न स्मरन्त्यैहिकानि ते ।। १८ तरा मायाविनः सर्वे कृतघ्ना इव निश्चितम् । स्वनिष्ठान्सकलान्हित्वा परलोके वसन्त्यहो ।। १९ अनावरोऽयं प्रवरः कालः कालयति प्रजाः । जन्ममृत्युजराक्लेशानासहन्त्यपि शीलिनः ।। २० सुगन्धतैलैरभ्यक्तं(क्तः) सिक्तं(क्तः) कर्पूरवारिभिः । कृतघ्न इव देहोऽयं देहिनं त्यजति ध्रुवम् ।। २१ आब्रह्मभुवनान्लोकान्लोका आलोकयन्त्युत । धावतो नाशमेवात्र क(त)स्य का परिदेवनाः ।। २२ अतिमात्रविनिर्विं(ण्णा) जीर्णत्वचि मनस्विनः । देहिनोऽमरतां प्राप्य निवसन्ति सुखं दिवि ।। २३ जातानार्तान्जडानन्धान्निरीक्ष्यातिसुदुःखिताः । परलोकः परगृहमिवोरीक्रियते नरैः ।। २४ पुत्रमित्रकलत्रादिबन्धमुद्बुध्य केचन । परोक्षभावं गच्छन्ति नराः सुकृतकारिणः ।। २५**

**अर्थ –** पुण्य आणि संपत्ती यांच्या माध्यमातून नाना सुखोपभोग घेणारे पुत्र, मित्र आणि पत्नी या ऐहिकांना विसरून जातात. सर्व माणसे फसवी, कृतघ्नच असतात. आपल्यावर विसंबून राहणाऱ्या (आपल्यावर निष्ठा ठेवणाऱ्या) सर्वांना सोडून ते परलोकी जातात. प्रजाजन अशी कालक्रमणा करीत असते आणि जन्म-मृत्यू-जरा यांचे क्लेश सहन करीत असते. सुगंधी तेलाने माखलेला आणि कापराच्या पाण्याने स्नान केलेला हा कृतघ्न देह धारण करणाऱ्याला कायमचा सोडून जातो. ब्रह्मलोकापासूनच्या सर्व लोकांत सतत होत असलेला नाश प्रजा पाहत असते. मग त्याचा शोक तरी कशास करावा? जीर्ण झालेल्या देहाला कंटाळून गेलेले मनस्वी लोक देव बनून स्वर्गात सुखाने राहतात. दुःखी, जड आणि अंध असे जन्माला आलेले पाहून माणसे अतिशय शोकाकुल होऊन परलोक हेच आपले दुसरे घर आहे असे समजून त्याचा स्वीकार करतात. काही पुण्यवान पुत्र, मित्र आणि भार्या यांची मोहबंधने तोडून दिसेनाशी होतात.

**अकारणं व्याकरणं शास्त्राणि विविधान्यपि । इति मत्वा नु सुधियः परलोकपरायणाः ।।२६ विज्ञाताऽखिलसारस्याः प्रशस्याः संकथास्वपि । अमोहिनः परं लोकं नरा रोहन्ति केचन ।। २७ अर्थाननर्थवत्पश्यन्(वीक्ष्य) परमार्थसमुत्सुकाः । अपवर्गं प्रशंसन्ति परलोककृत(ते)क्षणाः ।। २८ देहिनामिह देहस्य पाञ्चभौतिकताभृतः । औपाधिकमपञ्चत्वं प्रकृतिः किल पञ्चता ।। २९ मृदेवाकारभेदेन घट इत्यभिधीयते । विकृतौ तु विनष्टायां प्रकृतिः किल तिष्ठते।।३०**

**अर्थ –** विविध शास्त्रांचे अकारणच स्पष्टीकरण केले आहे असे समजून शहाणे लोक परलोकाकडे लक्ष देतात. त्यातील सार माहीत होऊनही कोणतीही पर्वा न करणारे काही स्तुत्य

लोक परलोकावर जातील. परमार्थाविषयी उत्कंठा असलेले व परलोकाची अपेक्षा करणारे कित्येक सर्व गोष्टी निरर्थक मानून मोक्षाची प्रशंसा करतात. देह धारण करणाऱ्यांच्या दृष्टीने पाच भौतिक देहाचा पंचत्व हाच मूळ स्वभाव आहे आणि देहोपाधी पंचत्वाचा भाग नाही. मातीला वेगळा आकार दिला की, तिला घडा म्हणतात; परंतु ती कृती गेली म्हणजे मूळ प्रकृतीच शिल्लक राहते.

**भस्मसाज्जायतां कामे वपुर्यत्पाञ्चभौतिकम् । चेतनत्यास्ति चेदुच्चैस्तदनाशि यशोमयम् ।।३१ यस्य कीर्तिप्रतापभ्यामापूरितमिदञ्जगत् । क्षितीशोऽयं परोक्षोऽपि साक्षादेवेह वीक्ष्यते ।।३२ अद्य शोचति यः शोच्यं श्वस्तमन्योनुशोचिता । अनित्येऽस्मिन्भवे शोच्यशोचित्रोरनवस्थता ।। ३३ शुग्विरामं प्रपद्यस्व राजारामं त्वदात्मजम् । राज्येऽस्मिन्नभिपेक्ष्यामः स्रक्ष्यामः स्वमनोरथंम् ।। ३४ आया(य)त्ययफलालोकममुं शोकमनोकहम् । मातर्माऽतःपरं सिञ्चेरविवेकेन वारिणा ।। ३५ महाराजप्रतिनिधिं निधिं साम्राज्यसम्पदः । स्वाभिलाषद्रुमारामं राजारामं विलोकय ।।३६ त्वमार्ये प्रकृते कार्ये विषीदसितमां कथम् । आज्ञापय स्थितानस्मान्ज्ञापय स्वमनोरथम् ।। ३७ उपाया इव चत्वारः सहायास्त्वत्करे वयम् । वर्तामहे वसुमतीमहेन्द्रदयितेऽन्वहम् ।। ३८**

अर्थ – असे हे पंचभौतिक शरीर भलेही भस्मसात होवो, आत्म्याबरोबरच यश, कीर्ती असेल, तर ती मात्र अविनाशी असते. ज्याच्या पराक्रमाने आणि कीर्तीने सर्व जग व्यापलेले आहे, तो हा राजा नजरेआड झाला असला, तरी तो आम्हाला प्रत्यक्ष दिसतो आहे. दुःखी अशा या देहाचा आज जो शोक करीत असेल, त्याच्याविषयी दुसरा कोणीतरी उद्या शोक करणारच. अनित्य अशा या जगात शोच्य आणि शोककर्ता हेच फक्त बदलत असतात. तेव्हा आपण शोक थांबवावा. आपले सुपुत्र राजाराम यांना आम्ही राज्याभिषेक करू आणि आपले मनोरथ पूर्ण करू. आईसाहेब, नियतीने निर्माण केलेल्या या शोकरूपी वृक्षाला आपण यापुढे अविवेकरूपी पाणी घालू नये. महाराजांचा प्रतिनिधी आणि दौलतीचा निधीच असलेल्या राजारामावर लक्ष दिले पाहिजे. तोच आपल्या इच्छातरूंचे उद्यान आहे. आपण सुसंस्कृत आहात. या व्यावहारिक बाबीने आपण फारच दुःख करून घेत आहात. आम्ही येथे आहोत ना? आपण आज्ञा करावी आणि आपला मनोदय सांगावा. आम्ही चौघेजण राजनीतीचे चार उपायच असे आपल्या हाताशी आहोत. आम्ही नित्य राणीसाहेबांच्या सेवेतच आहोत.

**जनतान(नु)मतादद्य प्रभृति प्रभृ(भु)ताभृतम् । अनूनलक्षणोपेतं नूनं सूनुममुं तव ।। ३९ क उपेत्य परं लोकं बतामुं लोकमागतः । नोररीक्रियते जातु सुधीभिः शोकवागतः ।। ४० इत्थमुक्तवतस्तत्र सापत्रपमवागवाक् । स्थित्वा क्षणमियं राज्ञी न्यगदद्गद्गदस्वरा ।। ४१ यथार्हवस्तुसंसर्गवञ्चकाय विरिञ्चये । स्वजीवितमथानाथा बत नाथामि नात्मना ।। ४२ मन्ये मदहं(दंह)सामेव रंहसा सहसाभितः । प्रभ्रश्याभ्रमिदं सर्वमपतन्मम मूर्धनि ।। ४३ नितान्तमुद्यता येन ध्वस्तं दैन्यमयं तमः । तमधीशमपश्यन्त्याः सर्वमन्धमभूज्जगत् ।। ४४ भृशं विश्रम्भणीयेषु भवत्सु प्रभवत्सु च । विश्रब्धाहमसन्दिग्धाभिमतार्थपथार्थिनी ।। ४५ यदिदानीं मदभ्यर्णे भवद्भिरुरीकृतम् । कर्णाकर्णिकया सर्वं तदाकर्ण्य विमातृजः ।। ४६ क्रोधनः पृथुलं क्रोधं पातयेत्पृथुके मम । तदोपघ्नत्वमाधत्तां भावत्कभुजविक्रमः ।। ४७**

अर्थ – जनतेच्या संमतीने आजपासून श्रेष्ठ गुण असलेले आपले सुपुत्र स्वामी झालेले आहेत. परलोकवासी कोण या जगातून सुज्ञ लोकांकडून शोकाचा स्वीकार करणार नाही? असे मंत्री बोलत



असताना राणीला लज्जेमुळे बोलता येईना. आवाज सद्गदित झाला. अशा अवस्थेत ती म्हणाली, ''ब्रह्मदेव चांगल्यापासून लोकांना दूर सारतो. मी आता माझ्या जिवावर ताबा ठेवू शकत नाही. मी अनाथ झाले आहे. मला असे वाटते की, माझ्याच पापामुळे अचानक आणि झपाट्याने हे आभाळ माझ्यावर कोसळले आहे. ज्यांच्यामुळे मी खूप काही केले, त्या स्वामीला मुकल्यामुळे हे सर्व जग अंध झाले आहे. दैन्यरूपी अंधकार सगळीकडे पसरला आहे. आता इष्टमार्गाच्या शोधात खात्रीपूर्वक विश्वासार्ह अधिकाऱ्यावर अवलंबून आहे. आता आपण माझ्यापाशी जे काही मान्य केले आहे, ते कर्णोपकर्णी पसरल्यावर माझ्या सावत्र मुलांच्या कानावर जाईल आणि क्रोधित होऊन तो माझ्यावर संतापेल. तेव्हा आपण आपल्या बाहुबलाने त्यास धडा शिकवावा.''

## रायगडावरील कारस्थान -

**इदं निगद्य निर्वेदवतीं तूष्णीकतां गताम् । सा मन्त्रिमण्डली भूयोऽप्यनलीकमलीलपत् ।।४८ भवती जीवतु चिरं जीवनाय शिशोः परम् । जीवतात्सोऽपि जनताजीविताय शतं समाः ।। ४९ प्रभुः सर्वस्य लोकस्य यदन्तर्द्धिमवाप सः । न तवैवाम्ब तत्पापं किन्त्वस्माकमपि ध्रुवम् ।। ५० भवती भवतीमेव कथमेतर्हि शोचते । बतालोकमयं यस्याः स्तोकं त्रिभुवनं किल ।। ५१ विधेर्विधिर्यो विधिना त्वद्धस्तविधिनाऽधुना । आनायितो निजं धाम शाहराजात्मजः शिवः ।। ५२ पूज्या साहिजहानस्यात्मजस्य समरोद्धता । राजव्याघ्री यथा वीरललने लल भूतले ।। ५३ मधुकैटभसंहन्त्री हन्त्री दुःखस्य सर्वतः । कालीव कलयालोकान्त्वमेवाकलयिष्यसि ।। ५४**

अर्थ – असे म्हणून क्षणभर खिन्न झालेल्या तिला मंत्रिमंडळाने पुन्हा एकदा सत्य सांगितले, ''मुलगा अधिक जगावा म्हणून आपणही दीर्घकाळ जगावे, जनतेच्या जीवितासाठी तोदेखील शंभर वर्षे जगो. सर्व लोकांचा स्वामी अंतर्धान पावला, यात आपलाही आणि आमचाही काही दोष नाही. आपण स्वतःविषयीचा कसा शोक करता? सर्व त्रिभुवनच अंधकारमय झाले आहे. ब्रह्मदेवाच्या करणीने आणि आपल्या नशिबाने शहाजीराजांचे पुत्र शिवाजीराजे निजधामाला गेले. शहाजहानाच्या मुलाशी वीरललना, राजव्याघ्रीच (रायबागीण) जणू युद्धास सज्ज झाली, तशी मधुकैटभ (राक्षसांना मारणारी) काली! सर्व दुःखाचे निवारण करील असा प्रकाश आपणास दिसून येईल.

**अर्दिनी रिपुसङ्घानां यथा महिषमर्दिनी । तथा त्वं वीरजननि प्रभां प्रथय सुप्रभे ।। ५५ निशुम्भशुम्भदम्भस्य स्तम्भिनी भञ्जिनी यथा । तथा त्वं वीरतनये नयेष्वभिमुखी भव ।।५६ आहोपुरुषिकां काश्चिद्विवेकाद्भावयात्मनि । मातः प्रवीराग्रसुहृद्गणश्रेणिनिषेविते ।। ५७ अपि त्वं वीरभगिनि प्रपन्नां पालय प्रजाम् । राजारामं पुरस्कृत्य तनयं सनयं निजम् ।। ५८ अनाशी मायया यादृक् स शिवः पुरुषोत्तमः । तथा त्वया(म)प्यये माये प्राज्यं राज्यमुरीकुरु ।। ५९ अमी प्रोन्नमितग्रीवं समग्रा अग्रजन्मनः । आशंसयन्ति निःशङ्कं त्वत्तनूजस्य राज्यताम् ।। ६० समाराधयिषुर्लोकस्त्वामशोकः स्मयोन्नते । अकुण्ठोत्कण्ठया तिष्ठत्यतिनिष्ठाभरान्वितः ।।६१ तोरणे धोरणीभूय प्रभूता वीरमण्डली । द्रष्टुं प्रतीक्षते मातस्त्वपुत्रं राज्यसंस्थितम् ।। ६२ अनल्पतरलाः प्रेङ्खद्रत्नपल्याणभासुराः । चत्वरे तावकंसुतं द्रष्टुमभ्यागता हयाः ।। ६२ मदवारिस्रवद्गण्डाः शुण्डादण्डप्रहारिणः । प्राङ्गणे करिणस्तिष्ठन्त्यनुद्रष्टुं भवत्सुतम् ।। ६३ आलेखलेखसुभगा लेखकास्तावकं सुतम् । समीक्षितुं लक्षयन्ति कर्णालेखनिशोभिनः ।।६४ पत्तयः शौर्यपतयः सप्रश्रयकृताश्रयाः । भवत्याः सत्यसीमाया आशंसन्ति परां श्रियम् ।।६५**

**निशातायुधसन्नद्धाः प्रबुद्धाः शुद्धमानसाः। साटोपमिव यौष्माकीमृद्धिंमिच्छन्ति सर्वदा ।।६६**

अर्थ – महिषासुरमर्दिनीप्रमाणे शत्रुसंघाचा नाश करणाऱ्या आपण वीरजननी असून तेजस्वी आहात. तेव्हा आपण कीर्तिमान व्हावे. हे वीरजननी! निशुम्भ-शुम्भ-दम्भ यांना रोखणाऱ्या आणि त्यांचा भंग करणाऱ्या आपण आहात. हे वीरतनये, राजनीतीला सामोऱ्या व्हा. विवेकाने आपण पुरुषांपेक्षा अधिक पराक्रम दाखवावा. श्रेष्ठ, वीर आणि सहकारी वर्ग हे आपल्या सेवेला आहेत. आईसाहेब! आपण वीरभगिनीही आहात. आश्रयाला असलेल्या प्रजेचे रक्षण करावे. आपले नीतिमान पुत्र राजाराम यांना पुढे आणावे. पुरुषोत्तम शिवशंकर जगावर माया करतो. त्याप्रमाणे मायेने आपणही या विशाल राज्याचा स्वीकार करावा. ब्राह्मणवर्ग नतमस्तक होऊन आपल्या पुत्राला राज्य मिळावे अशी निःसंदिग्धपणे इच्छा करीत आहेत. शोक आवरून सर्व लोक अत्यंत स्वाभिमानी अशा आपणावर विश्वासाने, निष्ठेने आणि असीम उत्कंठेने आपल्याला विनंती करू इच्छित आहेत. आपल्या चिरंजीवांना राज्यावर आलेले पाहण्यास उत्सुक झालेले सर्व योद्धे राजद्वारावर एकत्रपणे पुढे आलेले आहेत. अतिशय चमकणाऱ्या रत्नांनी सुशोभित केलेल्या खोगिरांसह तेजस्वी दिसणारे चपळ घोडे आपल्या सुपुत्रांना भेटण्यासाठी चौकात जमा झालेले आहेत. गंडस्थळातून मदाचा स्राव होत असलेले आणि सोंडेने प्रहार करीत असलेले हत्तीही आपल्या चिरंजीवांना पाहण्यासाठी प्रांगणात उभे आहेत. हिशोब लिहिण्यात वाकबगार असलेले, कानावर लेखणी ठेवलेले, कारकून लोकही आपल्या चिरंजीवांना पाहण्यासाठी उत्कंठित आहेत. शौर्याचे धनी असे पायदळही विनयाने आपल्या आश्रयास राहून सत्यनिष्ठ अशा आपणाला श्रेष्ठ वैभव मिळावे अशी आकांक्षा करीत आहेत. तीक्ष्ण शस्त्र धारण केलेले प्रशिक्षित सैनिकही शुद्ध मनाने आपल्या वैभवाची अभिमानाने इच्छा व्यक्त करीत आहेत.''

**अखण्डपण्डापाण्डित्यपरिखण्डितपण्डिताः । दण्डीवाखिलवेतण्डी तुण्डीं मां दधतश्शिरम् ।। ६७ स्वविशेषैः शेषमपि भर्त्सयन्तो सुधीवराः । अशेषा भाष्यवक्तारो वैयाकरणिका अमी ।।६८ अतर्क्यतर्काकलित(ता)शेषब्रह्माण्डमण्डलाः । प्राकामकामाः सोत्साहा महान्तो बत तार्किकाः।।६९ प्रध्वंसितमहामायाविकारपरिलक्षिताः । स्वमतस्थापनस्वस्थाः केचिन्मीमांसका अमी ।।७० घोषणातोषणस्फीताः स्वरशिक्षाविचक्षणाः । स्वच्छन्दं छान्दसाः सर्वे स्वच्छाः प्रोच्छायतर्षुलाः ।। ७१ गण-यन्तोऽतिगणशो भगणङ्गुणरङ्गिणः । गणकाः शास्त्रगुणनागुणिनो गणितशियाः ।। ७२ इदं कार्यमकार्यं वाऽकृत्यं कृत्यमिदं खलु । समालपन्तः सततं प्रथिता धर्मशास्त्रिणः ।। ७३ नानातन्त्रार्थवेत्तारश्च्छेत्तारः कार्मणस्य च । शर्मणो निलयीभूताः सुलया बत मान्त्रिकाः ।।७४ असद्गुर्वक्षरनिदं लध्वसद्यतिवर्जितम् । इत्यालपन्तः परमछन्दोगा पैङ्गला ध्रुवम् ।। ७५ चारुसङ्गितविलसद्गीता गीताः किल क्षितौ । गायकाः सार्थभरिता गन्धर्वा इक सुस्वराः।।७६**

अर्थ – सर्व बुद्धी पणाला लावून पण्डित दण्ड घेऊन, जणू गणपतीनेच आपल्या सोंडेने पकडावे तसे मला पकडीत आहेत (?) हे सर्व व्याकरणाचे भाष्य करणारे प्रबुद्ध पण्डित आपल्या पाण्डित्य वैशिष्ट्याच्या जोरावर शेषाचीही जणू निर्भर्त्सना करीत आहेत. अत्यंत उत्साहपूर्ण प्रचंड योजनांची इच्छा धरणारे हे बडे तार्किक आपल्या अगम्य अशा तर्कांनी सर्व ब्रह्मांड जाणून घेत आहेत. यांच्यातील काही मीमांसक महामायेचे सर्व विकार नष्ट केलेले दिसत असून आपापल्या मतांच्या प्रस्थापनेत गर्क आहेत. सर्व वैदिक संगीतशास्त्रात निष्णात असून मंत्रघोषाने सर्वांना तुष्ट



करीत आहेत. ते (चारित्र्याने) स्वच्छ आहेत व आपल्या सावलीत राहण्यास इच्छुक आहेत. गुणांमधेच रंगून गेलेले, आकडेमोड करणारे गणितज्ञ हे ज्योतिषशास्त्राच्या चिकित्सेतून शुभ चिन्हे शोधत आहेत. हे कार्य आहे की अकार्य आहे, हे चांगले कृत्य आहे की अकृत्य, अशी चर्चा हे प्रख्यात धर्मशास्त्री सतत करीत असतात. तंत्रमार्गाचा अर्थ जाणणारे, जादूटोणा फोल ठरविणारे हे मांत्रिक विद्वानांच्या आश्रयाला राहून कामात तल्लीन झाले आहेत. पिंगल ऋषींचे उत्तम छंदशास्त्र जाणणारे हे येथे गुरुअक्षर नाही, लघू हे अक्षर येथे नको, येथे यति (विश्रामस्थान) नाही, अशी चर्चा करतात. **संगीताने विलसणारी गीते पृथ्वीवर सुस्वर आणि अर्थपूर्ण अशी गात आहेत.**

**कलाविदः कलकलाः सकलाः कमलाकुलाः । सलीलमखिलालोक-भूताश्चेतोविहारिणः ।। ७७ अचिन्त्यसाहित्यमहाप्रौढिमानमहोद्यमाः । विचक्षणाः केऽपि नवोजृम्भमाणसुलक्षणाः ।। ७८ कृतनाट्यश्रमा ज्ञाताधीतसरम्भृतनाटकाः । कार्णाटका नटाः स्पष्टप्रकटीकृतकौशलाः ।। ७९ कथानां कथकाः केऽपि विपश्चाः कृतकौतुकाः । सदस्यानां वयस्यानां प्रशस्यानां सतामपि ।। ८०**

अर्थ – सर्व लोकांच्या मनावर लीलया विहार करणारे हे सर्व कलाकार कमळाने भारून गेल्याप्रमाणे सुमधुर स्वरात बोलत आहेत. अचिंत्य अशा साहित्य गौरवासाठी प्रचंड उद्योग करणारे हे चतुर लोक नवविकसित गुणलक्षणांनी युक्त आहेत. कर्नाटकातले हे नटवर्य अनेक नाटकांचा अभ्यास करून, नाट्यशास्त्रही परिश्रमपूर्वक अभ्यासून, त्यात उल्लेखनीय असे कौशल्य प्राप्त केलेले आहेत. (राजमंडळाचे) सदस्य, सहकारी आणि गुणवंत लोकांकडून कौतुक झालेले असे हे अत्यंत चतुरभाषी आणि परिपक्व असे आहेत.

**इतिहासपुराणज्ञा विज्ञाः सूज्ञजनप्रियाः । पौराणिकास्त्यक्तशङ्का निष्कलङ्का गुणोज्वलाः ।। ८१ पाखण्डताण्डवाक्षण्डा वितण्डावादडिण्डिमाः । मण्डलीभूय मिलिता रत्नकुण्डलमण्डनाः ।। ८२ अपरेऽपि च विद्वांसो सहसोत्सवहेतवः । सेतवो ज्ञानविज्ञानसागरस्य जितश्रमाः ।। ८३ बौद्धाः सिद्ध इवासिद्धार्थालिप्रतिनिदर्शकाः । कर्कशा जठरापूर्तिमात्रोदर्काः प्रकामुकाः ।।८४ अनवद्यमहाविद्यागद्यपद्यप्रवर्तकाः । कवयः सवयोपेता नवयोगप्रदर्शकाः ।। ८५ उल्लसच्चारुपीयूषकरा दस्रानुकारिणः । चिकित्सकाश्चिकित्सासु सर्वासु कृतगौरवाः ।। ८६ ज्ञातकोकाः खड्गजहयलक्षणवेदिनः । अखर्वगर्वैकमहापर्वताः शर्वसेवकाः ।। ८७ नानायोगप्रवक्तारो योगिनो गतविभ्रमाः । ससम्भ्रममिहायाताः संयता यतवासनाः ।। ८८ अनेकरत्नकेयूरधारिणो वारबाणिनः । सभ्याः केऽपि महाशूरा इभ्या अपि समागताः ।। ९२**

अर्थ – हुशार, विद्वानात प्रिय, अभ्यासात निःशंक, निरागस स्वभावाचे, उज्ज्वल गुणसंपदा असलेले, इतिहास आणि पुराण यातील तज्ज्ञ, नास्तिक मतावर विवाद करणारे, संतापी, वितंडविवादाने स्वतःची डिंडिम पिटणारे, रत्न धारण करून शोभायमान झालेले असे वादविवादपटू चक्राकार मंडल करून भेटण्यासाठी आले आहेत. परिश्रमपूर्वक, ज्ञान-विज्ञानाचा सागर पार करणारे, (विद्येचे) मूर्तिमंत सेतूच असे आणखीही विद्वान आनंद व्यक्त करण्यासाठी अचानक येथे हजर झाले आहेत. सिद्धाप्रमाणे बौद्धही अप्राप्य विषयांचे निदर्शक, कर्कश असे आणि पोटपूजा हाच प्रमुख हेतू बाळगणारे असे अतिशय कामुक वृत्तीचे लोक पण आले आहेत. श्रेष्ठ अशा महाविद्येच्या संदर्भात गद्यपद्यात्मक लिहिणारे कवी आपल्या मित्रांसह नवीन प्रयोग दाखविण्यासाठी उत्सुक

होऊन या ठिकाणी उपस्थित आहेत. तसेच अतिउल्हासाने हातात अमृताचे पेले घेतलेले अश्विनीकुमारांचे शिष्यच जणू असे सर्वविध चिकित्सेत प्रतिष्ठा पावलेले वैद्यराजही आलेले आहेत. प्रीतिशास्त्राचे जाणकार, खड्ग, हत्ती, घोडे यांचे पारखी, गर्वाने पर्वतप्राय असे शिवभक्तही आले आहेत. वासनांवर विजय मिळवून संयत झालेले, योगशास्त्रावर प्रवचन करणारे असे योगी, जरी स्वतः भ्रमनिरस्त झाले असले तरी कुतूहलापोटी येथे आले आहेत. नानाविध रत्नालंकार घालून, चिलखते धारण करून अनेक नरशूर प्रतिष्ठेने आपल्या हत्तींवरून आले आहेत.

(८९, ९०, ९१ हे श्लोक मूळ पोथीत नाहीत)

**बालमातर्वीरपत्नि प्रतीक्षन्तः क्षणं क्षणम् । राजारामस्याभिषेकं वसन्त्यातोरणान्तरम् ।।९३ संसारेऽस्मिन्नसारेऽपि क्षणिकैकसुखास्पदे । स्वसंसारे स्वराज्येऽस्मिन्मा निर्वेदमुरीकुरु ।।९४ अशाश्वतमिदं सर्वं विगणय्याऽतिशाश्वतम् । वर्तितव्यं मनुष्येण नव्यभव्यप्रतीक्षया ।।९५**

**अर्थ –** "आपण बालमाता आणि वीरपत्नी आहात, राजारामाच्या अभिषेकाच्या क्षणाची वाट पहात (राजवाड्याच्या) द्वारापर्यंत लोक बसून राहिले आहेत. संसार निःसार असला तरी त्यात काही क्षण सुखाचे असतातच. स्वराज्य हाच आपला संसार आहे. त्यासाठी खेद न करणे. अशाश्वताकडे दुर्लक्ष करून सर्व शाश्वतच आहे असे गृहीत धरूनच माणसाने भव्य अशा भविष्यकाळाची अपेक्षा करीत राहावे.

**स्वायत्तो यावदात्मास्ति सर्वे परिचरा अपि । तावद्यत्नं समातिष्ठेद्यत्नाद्भद्राणि पश्यति ।।९६ स्वकृत्यरक्षणायासः प्रकर्तव्यो विपश्चितां । सत्कृत्य सकलं लोकं स्थिरायां स्थीयतां स्थिरम् ।। ९७ न धैर्येण विनोद्योगो नोद्योगेन विनाः धृतिः । धृत्युद्योगौ समारभ्य स्वार्थे कार्ये प्रसंज्नता ।। ९८ वैक्लव्यं क्लीबतां प्राहुर्महासाम्राज्यभञ्जनम् । अतो वृणु समुद्योगं सुयोगं वीरबान्धवे ।। ९९ राजनीतिरियं शश्वद्विश्वे विश्वविमोहिनी । विश्वेशेन विधातव्या सर्वदा राज्यतर्षुणा ।। १०० इतरेषां तु लोकानामन्यो धर्मः सनातनः । राजर्षीणां पुराणानामन्यदीयोऽस्ति सुव्रते ।। १०१ राजा विराजते लोके लोकरञ्जनकारणम् । अतोऽन्यथा विधातव्यः स्वधर्मो विजिगीषुणा ।। १०२ सन्धार्या क्लेशपदवी पामरैरेव सर्वथा । राज्ञोपज्ञानुवीतेन मह एव महा(महत्)सदा ।। १०३ असमर्थेन कर्तव्यो बत सादो दिने दिने । भाव्यं महीमहेन्द्रेण महाविक्रमिणावनौ ।। १०४ असमर्थः कथं स्वार्थं लभतेऽर्थं समर्थवत् । समर्थे सर्वथा सिद्धिरर्थिनोऽर्थन्त्यनेकदा ।। १०५ शाहराजस्नुषा वीरमहाराजशिरोमणः । शिवराजस्य रमणी स्मरणीयोल्लसद्गुणा ।। १०६ सर्वार्थसाधिनी वीरकन्या मोहितवंशजा । वीरमाता वीरबन्धुर्वीरव्रतपरायणा ।। १०७ भव प्रशाधि सकलान्किङ्करान्वशवर्तिनः । राजारामं पुरस्कृत्य महासाम्राज्यदीक्षितम् ।। १०८ सप्ताम्बुधिपरिभ्राजन्मेखलावलयान्विताम् । वसुन्धरां शास्तु चिरं राजारामस्तवात्मजः ।। १०९ सत्यं सत्यं पुनः सत्यमिदमेव न संशयः। यतामहे वयं सर्वे तव हेतोरनारतम् ।। ११० इति समभिहितार्थं प्रार्थिता मन्त्रिसार्थैः । प्रथिततमयशोभिः सऽथ तथ्यं सपथ्यम् । किल कलिविकलं स्वं मानसं संवहन्ती । किंमपि नरपपत्नी सम्भ्रमेणाननन्द ।।१११ इत्थं नानाहितार्थं हितमिव कलिना ग्रस्तचित्तैरुदग्रैः प्रेम्णा सम्बोधिता सा शिवनृपरमणी कारणीभूय किञ्चित् । ऐच्छद्वक्तुं विविक्ते(बुध)समधिषणा दैवयोगावतीर्णां वीस्तीर्णां क्षोणिमेतां निजशुभचरितैरिच्छती व्याप्तुमारात् ।। ११२**

इत्यनु. अध्यायः ।। १ ।।



**अर्थ –** आपण स्वतः आणि सर्व परिचर जोपर्यंत स्वायत्त आहेत तोपर्यंत प्रयत्नशील असावे. प्रयत्नातूनच कल्याण होते. शहाण्याने आपल्या कर्तव्याचे रक्षणासाठी यत्न करावेत. सर्व लोकांना सत्कृत्यासाठी निश्चयी करावे, धैर्याशिवाय उद्योग शक्य नाही आणि उद्योगाशिवाय धैर्य टिकणार नाही. धैर्य आणि उद्योग यांच्यायोगे इष्ट कार्यास सज्ज रहावे. दुर्बलता म्हणजेच निष्क्रियता त्यामुळे प्रचंड साम्राज्ये मोडली जातात. आपण शूरांच्या मित्रस्थानी आहात. तेव्हा उद्योगाचीच सुयोग म्हणून निवड करा. जगात राजनीती हीच कायम विश्वाला मोह घालीत असते. राजांनी राज्यलालसेने तीच अंगीकारली पाहिजे. इतरांसाठी वेगळा असा सनातन धर्म आहे. आपण दृढनिश्चयी आहात. पुराणकालापासून राजर्षींचा धर्म वेगळा असतो. लोकरंजनाचे कारण म्हणून राजास जगात मान्यता असते; परंतु महत्त्वाकांक्षी राजाने आपला तसा वेगळा धर्म आचरावा. कष्टप्रद मार्ग सामान्य पामरानेच स्वीकारावा. राजाने परिश्रमपूर्वक आपल्या नावावर नेहमीच महान कार्यात राजपदवीनुरूप आनंद मानावा. दुर्बलांनी आपले रोजचे काम करीत राहावे. शूरवीरांच्या या पृथ्वीवर सम्राटच हवा. दुर्बलाला समर्थाप्रमाणे आपली इच्छापूर्ती कशी करता येईल? समर्थाकडेच अनेक याचक आपल्या यशपूर्तीसाठी याचना करतात. शहाजीराजांची सून आणि संस्मरणीय अशी गुणसंपदा असलेल्या शिवाजी महाराजांची पत्नी, मोहिते घराण्यातील सर्व कार्य समर्थ अशी वीरकन्या, वीरमाता, वीरबंधू असलेली, शौर्यव्रताचे पालन करणारी अशा आपण, सर्व सेवकांवर वचक बसवून प्रशासन करा. आपले पुत्र राजाराम यांना पुढे अभिषेक करून सप्तसमुद्र उद्दिप्त करणाऱ्या, मेखला धारण करणाऱ्या पृथ्वीवर ते प्रदीर्घ काळ राज्य करोत. तुमच्या मनसुब्यासाठी आम्ही सदैव प्रयत्नात राहू. मंत्रिगणाने अशा प्रकारे विदित करून विनंती केल्यावर आपल्याला लाभदायक असे हे तथ्य या कलियुगात जरी अवघड वाटले, तरीसुद्धा राणीने ते आपल्या मनात घोळवीत आनंदयुक्त अशा संभ्रमात गढून गेली.

अशा रीतीने अनेकांच्या हितासाठी ग्रस्तचित्त आणि श्रेष्ठ अंशा लोकांनी हिताचा मार्ग म्हणून आपुलकीने सांगितल्यावर शिवाजीराजांची पत्नी काहीतरी निमित्ताने एकांतात विचार करू लागली. दैवयोगानेच असा प्रसंग आपल्यापुढे निर्माण झाल्याचे समजून विस्तीर्ण अशा पृथ्वीला व्यापून राहणारी अशी इच्छा धारण केली. शुभ असे काही बोलावे असे तिला वाटले.

**इति अनु अध्याय १**

**अध्याय २**

**कवीन्द्र उवाच । इत्थं राजकुमारस्य राजारामस्य सा प्रसूः । मन्त्रिप्रवरसम्प्रोक्तां व्यक्तामाकर्ण्य भारतीम् ।। १ आनन्दसिन्धुलहरीसम्मग्नहृदया सती । तत्कालोपहितं वाक्यमाजहार शुचिस्मिता ।। २ राजपत्न्युवाच । सत्यमुक्तं भवद्भिस्तु प्रभवद्भिरहर्निशम् । सनाथेवानुनाथामि बत राज्यमकण्टकम्।। ३ तथाऽपि मम चित्तस्य न पर्याप्तिः प्रदृश्यते । बलिना परिभोक्तव्यं बलिना निखिलञ्जगत् ।। ४ अन्वेषयन्ति सततं द्वेषिणश्छिद्रमप्यूरम् । राज्यस्याबलया तत्र यत्नः कीदृक्प्रकल्प्यताम् ।। ५ बलवानेव भवति राजा लोकेषु केवलम् । बुद्धिमान्नीतिमान् शश्वदाभुङ्क्ते परमम्पदम् ।। ६ नीतिरेव पुरस्कार्या कार्याऽकार्ये विजानता । आर्यवृत्तं विचार्याशु वर्तितव्यं प्रयत्नतः ।। ७ यत्नवान्विजयी लोके सङ्गच्छति महत्पदम् । शङ्खो मुरद्विषा मत्स्यजनुषा स्ववशीकृतः ।। ८ कपटैकपटाच्छन्नीभूय पात्यो बली रिपुः । सख्यं विधाय शक्रेण वृत्रोऽयं विनिपातितः ।। ९ सदसद्वापि कर्तव्यं निर्विशङ्कं बुभूषुणा । नृपेण राज्यं सम्प्राप्य वर्तितव्यं यथा तथा ।। १० सहजाः सुहृदः केचित् कृत्रिमाः केचन**

स्मृताः । उभाभ्यामनुकूलाभ्यां राज्यमुद्योतते चिरम् ।। ११

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, याप्रमाणे श्रेष्ठ मंत्रिगणांची वाणी ऐकून राजारामाची जननी आनंदसागरात गढून गेली आणि समयाला योग्य असे भाषण तिने केले. राजपत्नी म्हणाली– "आपण योग्य असेच बोलतात. आपला प्रभाव सदैव आहेच. आपला आधार असल्यामुळेच राज्य निष्कंटक राहील अशी मला अपेक्षा आहे. तरीही माझ्या मनाला एवढे पुरेसे वाटत नाही. हे सगळे जग बलवानानेच भोगायचे असते. शत्रू सदैव आपली वैगुण्ये पाहत आहेत. अशा अवस्थेत एक अबला राज्यासाठी काय करू शकणार? बलवान असलेलाच राजा बनतो आणि बुद्धिमान आणि नीतिवान राहून सदैव वरचढ ठरतो. कार्याकार्याचा आणि राजनीतीचाच पुरस्कार करावयास हवा. प्रतिष्ठितांच्या हालचालीवर लक्ष ठेवून चपळपणे आपल्या हालचाली कराव्यात. प्रयत्नामुळे माणूस महत् पदाला जाऊन विजयी होतो. मत्स्यावतार घेऊन विष्णूने शंखासुराला ताब्यात आणले. प्रबळ शत्रूचा पाडाव कपटनीतीने करायचा असतो. वृत्रासुराशी मित्रत्व जुळवून इंद्राने त्याचा संहार केला. चांगले–वाईट जे काही करायचे ते निर्धास्तपणे करावे. राज्यप्राप्तीनंतर प्रसंगानुरूप राजाने आपल्या हालचाली कराव्यात. काही मित्र हे स्वभावतःच सन्मित्र असतात. काहीजण प्रसंगानुरूप मैत्री दाखवितात. हे दोन्हीही जर अनुकूल झाले, तर राज्य नेहमी तेजस्वी राहते.

केचित्स्वपक्षमाश्रित्य परपक्षमुपासिनः । अदभ्रधिषणाभ्रंशमभ्रवजनयन्त्युत ।। १२ कृत्रिमा दुर्हृदः केऽपि तथा साहजिका अपि । राज्यक्षयाय महते सन्नद्धाः सन्ति सर्वथा ।। १३ बहिरुत्साहजनका अन्तर्भेदविकारिणः । नराः पिशुनवत्केऽपि घातयन्ति नृपश्रियम् ।। १४ उत्साहभङ्गिनः केऽपि कृतवाक्यैकरञ्जनाः । जनयन्ति नृपं भूयो वैक्लव्यैकनिकेतनम् ।। १५ केप्याशयैकज्ञानार्थं सावधानेन चेतसा । कथयन्ति कथाः काश्चित्क्षितीशानन्दहेतुकाः ।। १६ ललाटिकाः केऽपि नराः प्रजल्पन्तः स्वपौरुषम् । रञ्जयन्ति नृपश्रेष्ठं वृथा समनुजीविनः ।। १७ किञ्चिदुच्चावचं कर्माचरन्तः कैतवान्विताः । आघातयन्ति भूमीन्द्रचन्द्रं परिचराः क्वचित् ।। १८ मायामोहमदाविष्टा दिष्ट्या दिष्टाः क्वचित्क्वचित् । साकमेवात्मना नाथं मज्जयन्त्यसुहृज्जले ।।१९ हिताय यततः कांश्चित्स्वामिनो यतमानसान् । आतन्वन्त्यपरे केचिद्भेदं मिथ्याप्रलापिनः ।। २० सहस्रभानुप्रतिमाः प्रतापप्रथितौजसः । कांश्चित्स्वामि–हितात्केचिद्भ्रंशयन्ति मतिभ्रमैः ।। २१ उत्कर्षमपि केषांचिदसहन्तो नृपगृहे । राजानमन्यथा बुद्धिं दर्शयन्ति मुखप्रियाः ।। २२ मिथ्या केचित्प्रशंसन्ति राजानमनयोद्यतम् । साधयन्ति परं स्वार्थं समर्थां इव सर्वथा ।। २३ नानाशृङ्गारभङ्गीभिः सुभगाभिरितस्ततः । व्यामोहयन्ति राजानं जनाः केऽपि प्रियंवदाः ।। २४ आज्ञामात्रप्रतिज्ञातप्रतिज्ञाः प्राज्ञवज्जनाः । पातयन्ति नराधीशं सत्यमत्याहिते परे ।। २५ केचिद्वितथमर्यादां दर्शयन्तः कृतार्थवत् । विवदन्तः कथा भूपं दुःखकूपे क्षिपन्त्यहो ।। २६

अर्थ – काही लोक आपल्या बाजूस असूनही दुसऱ्या बाजूचा आश्रय करणाऱ्यांविषयी मोठा संभ्रम निर्माण करतात. काही शत्रू देखील वरवरचे असतात, तर काही स्वाभाविक असतात; आणि ते राज्याचा ऱ्हास करण्याकरिता सज्ज असतात. काही लोक बाहेरून उत्तेजन देत असतात; पण आतून फितुरी करतात. असे लोक चहाडखोरांसारखे राज्याच्या ऐश्वर्याची हानी करीत असतात. उत्साहभंग करणारे व सुमधुर भाषणाने रंजन करणारे काहीजण राजाला पुष्कळ वेळा माघार घ्यावयास लावतात. काही लोक सावध चित्ताने आपल्या भाषणाचे स्पष्टीकरण करताना राजाला आनंद वाटेल



अशा कथा सांगतात. चेहऱ्यावरून मनातील विचारांचा अंदाज करणारे काही लोक स्वतःच्या शौर्याची बढाई मारून राजाला खूश करतात. पण ते खरे सेवक नव्हेत. लबाडीने दुष्कृत्य करून काही सेवक राजावर केव्हातरी आघातही करतात. खोटेपणा, आमिष आणि गर्व यांनी पछाडलेले काही तथाकथित भाग्यवान केव्हा केव्हा स्वतःबरोबरच राजालाही शत्रूच्या जाळ्यात अडकवितात. वायफळ बोलणारे दुसरे काही स्वामिनिष्ठ व संयमी अशा सेवकांत फूट पाडतात. सहस्र सूर्यांप्रमाणे तेज असलेले, पराक्रमाने प्रसिद्ध पावलेले, संभ्रम निर्माण करून स्वामीच्या हितापासून सेवकाला दूर नेतात. राजगृहात कुणाचा तरी उत्कर्ष सहन न होणारे, गोड बोलून तोंडपुजेपणाने राजाला बदसल्ला देतात. राजा अनुचित गोष्टीला उद्युक्त झाला असता त्याची खोटी स्तुती करून इतर वरिष्ठांप्रमाणेच आपला स्वार्थ साधून घेतात. काही गोडबोले शृंगारिक गोष्टींनी राजाला मोहात पाडतात. आज्ञा होताच प्रतिज्ञा करून शहाण्याप्रमाणे मोठ्या संकटप्रसंगी राजालाही बुडवितात किंबहुना खोटी मर्यादा दाखवून कृतार्थ झाल्यासारखे बोलत राजाला दुःखरूपी विहिरीत ढकलतात.

अप्रधानाः प्रथावत्सु प्रथयन्तः प्रधानताम् । असन्धानेऽनुसन्धाय भूमीन्द्रं मज्जयन्त्यमी ।।२७ मुखदाक्षिण्यमासाद्य सद्यः स्निग्धतराक्षराः । केचित्क्षोणीन्द्रहृदयं हरन्ति सदयं बत ।। २८ नानानतिमतिप्रौढिसेवाभिः पुरतोऽधिपम् । रञ्जयन्ति पुनः पश्चाद्विहसन्त्यप्यलक्षितम् ।। २९ स्वामिनोऽग्रे प्रतिज्ञाय महत्कर्मापि मन्त्रिणः । मिथ आमन्त्र्य सम्मन्त्र्य समुपेक्षां चरन्ति ते ।। ३० आदिष्टाः क्षोणिचन्द्रेण क्षीणारातिपराजये । विवर्धयन्ति तं द्रव्यैर्मन्त्रिणः स्वार्थदर्शिनः ।। ३१ स्वस्वाभिमानहान्यर्थं व्यर्थं शत्रुपताकिनीम् । समानयन्ति नयतोऽनयतो मानपूजिताः ।। ३२ वृत्तान्तजातमखिलं खलाः केचन मन्त्रिणः । आवेदयन्ति रिपवे स्वाम्युत्कर्षपराङ्मुखाः ।। ३३ अनल्पं स्वामिनाक्षिप्ताः प्रज्वलन्तश्चिरं हृदि । जनयन्ति मिथो भेदं छेदयन्ति नृपश्रियम् ।। ३४

अर्थ – कनिष्ठ पदावर असूनही मोठा शिष्टाचार दाखवून नको त्या ठिकाणी, नको ते संधान बांधून, राजाला बुडवितात. मुखचातुर्याने, गोड गोडबोलून राजाचे कोमल मन आकृष्ट करतात. अनेकजण मोठ्या प्रौढबुद्धीची सेवा राजापुढे दाखल करून त्याला खूश करतात आणि त्याच्या माघारी नकळत अशा रीतीने हसतात. मंत्रीलोक राजापुढे मोठ्या योजनांच्या प्रतिज्ञा करतात आणि नंतर एकमेकांना बोलावून आपापसांत सल्लामसलत करून त्याची उपेक्षा करतात. राजाने आपल्या दुर्बल शत्रूला पाडावयाची आज्ञा केली असता मंत्री स्वतःच्या स्वार्थाकडे लक्ष देऊन त्या शत्रूला पैसे देऊन उलट प्रबळ करतात. पूज्य मानलेले असे लोक शत्रूच्या सैन्याला उगीचच योग्य–अयोग्य मार्गांनी आणतात आणि आपापला स्वाभिमान घालवून बसतात. काही दुष्ट मंत्री आपल्या धन्याच्या उत्कर्षाकडे दुर्लक्ष करून आपल्या बाजूच्या सर्व बातम्या शत्रूला कळवितात. धन्याने चांगलीच कानउघाडणी केली असता मनात बराच काळ जळफळत राहून आपसात फूट पाडतात आणि राजाच्या वैभवाला छेद देतात.

इत्थं महादुःखभारं प्राज्यं राज्यं नराधिपः । रुन्धन् छिद्राणि सर्वाणि स वशीकुरुते चिरम् ।। ३५ क्षोणीन्द्रचूडामणिना बलिनातिसुबुद्धिना । ज्ञात्वा सर्वस्य हृदयं वर्तितव्यं यथायथम् ।।३६ अयं मे तनयो बालो हरिणो हरिणेक्षणः । कथं भारं समर्थः स्याद्वोढुं सोढुमरेर्बलम् ।। ३७ दिल्लीन्द्रः सततं सान्द्रच्छिद्रान्वेषी दुराशयः । निःसंशयं भ्रंशयिता बालकं मामकम्बलात् ।। ३८ शम्भुराजापि मेधावी क्रुद्धः क्रूरः कृतान्तवत् । नूनं कृतान्तः पुत्रं मे

कृतान्तं प्रापयिष्यति ।। ३९ अहमेव निजान्प्राणांस्त्यक्ष्यामि हतदुःखिता । कदाऽपि नैव शक्ष्यामि वैमात्रेयाल्पशासनम् ।। ४०

युष्मान्समाराध्य.......

अर्थ – अशा रीतीने मोठ्या राज्याचा मोठाच दुःखभार रोखण्यासाठी राजा सर्व छिद्रे लवकरच स्वतःच्या ताब्यात आणतो. (उणिवा भरून काढतो.) राजश्रेष्ठ, पराक्रमी, प्रखर बुद्धिमान असूनही त्याला सर्वांचे मनोगत जाणून घ्यावे लागते आणि त्याप्रमाणे वागावे लागते. हा माझा मुलगा बाल असून हरिणाप्रमाणे मनमोहक असे सुंदर डोळे असलेला आहे. त्याला शत्रुसैन्य अंगावर घेण्याइतके ओझे कसे सहन होईल? तो दुष्ट हृदयाचा आणि सतत छिद्रान्वेषी असलेला दिल्लीपती माझ्या मुलाला चकवा दिल्याशिवाय राहणार नाही. शंभूराजादेखील बुद्धिमान आहे. तरीपण रागावल्यावर साक्षात यमाप्रमाणे क्रूर बनतो. माझ्या मुलालाही खात्रीने यमसदनास पाठवील. सावत्र मुलाचे अल्पशासनही केव्हाच मी सहन करणार नाही. दुःखाच्या कचाट्यात बिचारी दुःखी अशी मी मात्र स्वतःचा प्राण देईन....''

## पन्हालगडावर छ. शिवाजी महाराजांचे अंत्यसंस्कार,संभाजीराजांचे राज्यारोहण -

**(विभाग ३, अध्याय १)**

**श्रीगोविन्दाय नमः । कवीन्द्र उवाच । एकमेवेश्वरं स्वस्य बतेश्वरममन्यत ।। १ तदा निर्विद्यमानेन विद्यमानेषु वस्तुषु । अतर्कि गन्धर्वपुरप्राकाराकारतामुना ।। २ आचार्ययत्तमतिना पटुना कर्मठात्मना । एतेनाकारि कृतिना तत्कृत्यं पितुरन्तिमम् ।। ३ दिनानि विधिना तेन तदा तानि निनाय सः । तथाध्यात्मविदध्यात्मकथया ताश्च शर्वरीः ।। ४**

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, एकच ईश्वर आपला स्वामी आहे असे त्यांनी मानले. वस्तू पुष्कळ असताना त्यात नसलेली गंधर्वनगरे व त्यांच्या प्राकारांचा आकार त्यांना दिसला. चतुर आणि कर्मठ, गुरूवर विश्वास ठेवून आपल्या पित्याचे अंत्यसंस्कार पार पाडले. त्यानंतर त्यांनी दिवस धर्मकृत्यात व रात्री आध्यात्मिक कथात घालविले. ते अध्यात्म जाणणारे होते.

**अथैष मङ्गलस्नातः सुवासाः सुपरिष्कृतः । चन्दनेनानुलिताङ्गः सुमनोभिर्मनोरमः ।। ५ पुरोहितप्रभृतिभिर्विहितस्वस्तिवाचनः । वित्तविश्राणनैर्विप्रान्विदधन्मुदितात्मनः ।। ६ स्वनन्निःसाणनिस्वानपूरितान्द्रिदरीमुखः । सुमुखः सैनिकैः स्वीयैः साकमास्थानमासदत् ।।७**

अर्थ – नंतर मंगल स्नान करून, चांगली वस्त्रे घालून, अंगाला चंदन लावून परिष्कृत झाल्यावर फुलांनी व चांगल्या मनाने त्या सुंदर राजपुत्राने पुरोहितादिकांच्या साहाय्याने स्वस्तिवाचन केले व आनंदित अशा विप्रांना धन वाटले. आपल्या आवाजाने पर्वतांची दरीमुखे भरून टाकून व आपल्या सैनिकांकडे अभिमुख होऊन तो आपल्या आसनावर बसला.

**अथ सम्प्रेषितचराश्चरास्तस्य तदन्तिके । सर्वमावेदयामासुर्वृत्तं रैङ्गिरिवर्तिनाम् ।। ८ यस्य यद्यन्मतं तत्तद्भूतमित्येव ते पुनः । नोदिताः क्षोभिताशेषवृत्तास्तमिदमब्रुवन् ।। ९ अभिषिच्य पदेऽमुष्मिन्राजारामं कुमारकम् । आसमुद्रं वसुमतीमवितारः स्वयं वयम् ।। १० इदमुद्दिश्य मनसा मयूराद्यैः कुमन्त्रिभिः । सन्दोहयद्भिः पृतनां वितीर्णोचितवेतनाम् ।। ११ ससज्जे शम्भुवैराय ललज्जे न मनागपि । जनाः सर्वे वदन्तीमां किंवदन्तीं गृहे गृहे ।। १२ द्विषि दिल्लीश्वरे दर्पाद्युध्यमाने दिवानिशम् । न वरं बालिशो राजा सह्यस्यास्य वरं विषम् ।। १३ क्रियावतामधिभुवे प्रभूतप्रभुताभुवे । हन्तामी स्पृहणीयाय स्पृहयन्ति न शम्भवे ।। १४**

अर्थ – नंतर सर्वत्र पाठविलेले हेर त्याच्याजवळ येऊन आपापल्या भ्रमण प्रदेशातील सर्व बातम्या सांगू लागले. ज्याला जे वाटले ते नवलच समजून अतिशय उत्साहाने प्रेरित होऊन ते म्हणाले, ''कुमार राजारामांना या पदावर अभिषेक करवून आम्ही समुद्रापर्यंत पृथ्वीवर फिरू लागलो असा उद्देश मनामधे बाळगून मोरेश्वरादी कुमंत्र्यांनी उचित वेतन देऊन सैनिकांत क्षोभ उत्पन्न केला आणि कोणतीही लज्जा न बाळगता शंभूराजांशी शत्रुत्व करावयास ते सिद्ध झाले. घरोघरी अशीच अफवा लोकांच्या बोलण्यात येते. दिल्लीश्वर दर्पाने द्वेष करीत युद्धाला रात्रंदिवस सिद्ध असतात. सह्याद्रीचा राजा बालिश असणे बरे नव्हे. कर्तृत्ववान लोकांचे जणू परमेश्वरच असे, प्रचंड सत्ताधीश म्हणून गौरविलेल्या शंभूराजांकडे ते येऊ इच्छित नाहीत.

## छ. संभाजीराजांचे मनोगत व हंबीररावांशी संधान -

**इत्थं मयूरप्रभृतीन्विनिन्दत्यः पदे पदे । प्रजास्त्वाशासतेऽद्य त्वां शासितारं दिने दिने ।। १५ शम्भुराजो नियन्तव्यो मन्तव्यो मन्तुमान्ध्रुवम् । अथवा हन्त हन्तव्यस्तत्र योधैरुदायुधैः ।। १६ इत्यन्वहमहं युत्वान्(श्रुत्वा)मयूरादीन्प्रशासती । जागर्ति ममताप्युच्चैः पुत्रे स्वे ममतावती ।। १७ सिंहासनस्य यो भर्ता स नो भर्ता भवेदिति । राद्धान्तितमिदं चित्ते तत्तद्दुर्गाधिकारिभिः ।। १८ अस्ति हम्बीरराजस्य ममता ममतात्मजे । तदप्यतितमां पक्षपातस्त्वयि महाभुजे ।। १९ उदन्तमेनमन्यच्च तेभ्यः श्रुतवताऽमुना । विविक्तवर्तिना मन्त्रनिधिना क्षात्रमूर्तिना ।। २० हन्त हम्बीरराजाय सेनान्ये शम्भुवर्मणा । अलेखि किल लेखोऽयं वर्णमुक्तामनोरमः ।। २१ मयि राज्यमिदं न्यस्य वैरं दिल्लीश्वरस्य च । परोक्षभावमभजत्प्रत्यक्षः परमेश्वरः ।। २२ पिता मम प्रतापी तत्कृच्छ्रं वाचामगोचरः । सुदुस्तरो ह्ययं कालः पापीयानुत्तरोत्तरः ।। २३ भवितव्यं भवत्येवेत्यवगत्य स्वया धिया । तदुपक्रम्य ते केन यत्र नास्ति प्रतिक्रिया ।। २४ उपजापप्रवृत्तानाममात्यानां दुरात्मनाम् । मामुद्दिश्य जिगीषा यत्तत्रैव स्वजिजीविषा ।। २५ दम्भोलिवदभेद्यानां मदर्थे वः समुद्यमे । अहीनविक्रमस्याद्य भवत्येव भयं न मे ।। २६ अनवाप्य भवत्पक्षं विपक्षास्ते ममाधुना । बत स्वाय निकेताय किमुत्पातं वितन्वते ।। २७ प्रबुभूषति यः स्वेन प्रभुं चाभिबुभूषति । स राजानमजानानमितरस्तु न काङ्क्षति ।। २८**

अर्थ – अशा रीतीने मोरेश्वरादी मंत्र्यांची पदोपदी निंदा करणारी प्रजा दिवसेंदिवस आपणच राजा व्हावे म्हणून अपेक्षा करीत आहे. शंभूराजांना आवरायला हवे, ते बुद्धिमान असले तरी त्यांना सतत सल्ला द्यायला हवाय, नाहीतर ते शस्त्र उचलतील आणि सैनिकांना मारतीलही, असे रोज रोज कानावर आल्याने आपल्या पुत्रावर प्रेम करणारी तसेच मोरेश्वरांकडून सल्ला घेणारी ती माता पूर्णपणे जागृत आहे. किल्लेदारानी सिंहासनाचा जो मालक तोच आपला मालक आहे हे आपल्या मनात पूर्णपणे बिंबवले आहे. महापराक्रमी हंबीररावांचे आपल्या भगिनीवर अतिशय प्रेम असले तरी आपल्या पराक्रमाविषयी पक्षपाती भूमिका त्यांच्या मनात आहे. (संभाजीराजांच्या बाजूने ते उभे आहेत.) या आणि इतर बातम्या हेरांकडून ऐकल्यावर स्वतंत्र वृत्तीच्या सल्लागारांना मानणाऱ्या त्या क्षात्रमूर्ती शंभूराजांनी सेनापती हंबीररावांना मोत्यासारख्या सुंदर अक्षराने हे पत्र लिहिले, ''राज्य माझ्यावर सोपवून आणि दिल्लीश्वरासारखा शत्रूही ठेवून ईश्वरानेच पक्षपात केलेला आहे. माझे वडील पराक्रमी होते. आता हा काळ असा प्राप्त झाला आहे की, तो अत्यंत संकटमय आणि वाच्यता न करण्यासारखा तर आहेच; पण तो निस्तरण्यास कठीण असा झाला आहे. होणारे ते

होऊन जाते हे लक्षात घेऊन स्वतःच्या बुद्धीच्या जोरावर ज्यावर कोणतीच प्रतिक्रिया होणार नाही असा उपाय कोण व कसा करणार? दुर्बुद्धी झालेले मंत्री माझ्यावर कुरघोडी करण्याच्या उद्देशाने गुप्त मसलत करू लागतात! मला तर यामुळे जगण्याचीच इच्छा राहिली नाही. वज्रासारखे अभेद्य असणारे तुम्ही माझ्या पाठीशी उभे राहिलात, तर मला मुळीच भीती वाटणार नाही. माझा पराक्रमही कमी नाही. माझे शत्रू तुमच्या पक्षाला आता मिळाल्याशिवाय स्वतःच्या आश्रयासाठी कोणता मोठा अनर्थ घडवू शकतात?

अजाण (अल्पवयीन) राजा स्वतः प्रभावी होऊन प्रभावी असलेल्यालाच तो सामोरा जातो, तोच त्याचा मित्र. जो स्वतःच्या जिवावर दुसऱ्यावर प्रभाव पाडू इच्छितो आणि जो समोरच्या समर्थ राजाला आवाहन देतो, तो अजाण (अल्पवयीन) राजा असून त्याला इतर काही नको वाटते.

शम्भुः कनीयसोऽमुष्य द्विषन्नेवेति किश्चन । अज्ञापयन्नतीवाज्ञास्तन्मात्रेऽमी कुमन्त्रिणः ।। २९ प्रशास्ता त्वस्य राज्यस्य मद्दत्तस्यार्भकः स वा । अमर्षणामसौ ताम्राननाश्चेन्न जिघृक्षवः ।। ३० राज्यं नार्जति राजानं राजैव तु तदर्जति । तृणवद्गणयन्त्येतत्केचित्तदतिगुर्वपि ।। ३१ सद्यः शृङ्खलिता एव मयात्र निखिलाः खलाः । ते तु त्वया विभागे स्वे विनिग्राह्याः कुमन्त्रिणः ।। ३२ आहूय यवना नमवमाः स्वामिविद्विषः । मज्जयेयुरिमं सह्यमसह्यो मय्यमी रुषा ।। ३३ येषां हि महती माया त्वमायाहि मदन्तिके । पालनायास्य राजस्य सेनानीः सेन वा सह ।। ३४ इदमानन्दराजाय योध्द्रे मानजिते तथा । प्रबोधनीयं भवता दोःप्रतापभृता मिवः ।। ३५ विसृष्टं शम्भुराजेन संश्रितप्रश्रया श्रिया । सेनापतिः स्वयं लेखममुं सम्यगलोकत ।। ३६ मम त्वन्यत्र विज्ञाप्यमाज्ञया भवदीयया । द्रुतमागत एवास्मि सन्नद्धः सेनया मया(म) ।। ३७ एवं सिंहासनार्हाय शम्भुराजाय सस्पृहः । सद्यः स्वेन जननैष सन्देशं समदेशयत् ।। ३८ उदारमतिरानन्दरा–जाद्यैरनुमोदितः । अवोचदपि चामात्यचरं प्रच्छन्नवर्तिनम् ।। ३९ लेखावलोकनाज्ज्ञातं मतमण्णमयूरयोः । विवक्षुरसि चेदन्यदपि तत्केन वक्षि न ।। ४० अण्णाय च मयूराय प्रल्हादाय च राहवे । सद्यः सन्देशमेनं च मदीयं विनिवेदय ।। ४१ तत्र तत्र समेष्यामि यत्र यत्रागमिष्यथ । पथिकीभूयतेऽस्माभिर्मवन्मुक्तस्य(क्तेन) किं पथः(था) ।। ४२ सन्दिष्टमेतदय ते सचिवाः समेताः सेनापतिप्रहितमाशुचरान्निशम्य । रोद्धुं प्रणालमचलं प्रचुराभिमानाः स्थानान्निजादुदचल–न्वरवारवाणाः ।। ४३

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवास क. कवी. अध्यायः ।।

अर्थ – "या धाकट्याचा (राजारामाचा) शंभूराजा द्वेष करीत असेलच या कल्पनेने दुष्ट मंत्र्यांनी आईसाहेबांकडे कागाळी केली असणार. तो तर बिचारा बाळ आहे. त्याला दिलेल्या या राज्याचा मीच उत्तम प्रशासक आहे. मुसलमान जर त्याचे ते राज्य घेऊ इच्छित नसतील, तर तो आपला राग कशावर काढणार? राज्य राजाला मिळवीत नसते, राजाच राज्य निर्माण करीत असतो. ते किती जरी मोठे असले, तरी काही लोक त्याला तृणवत् मानतात. नुकतेच मी उपद्रवी मंत्र्यांना बेड्या घालून बंद करून ठेवले आहे. तुम्ही तुमच्या विभागातील दुष्ट मंत्र्यांना पकडावे. आपल्या स्वामीचा द्वेष करणारे हे बेशरम यवनांना बोलावतील आणि माझा राग कितीही असह्य झाला तरी ते सह्याद्रीला बुडविण्यास कमी करणार नाहीत, असे त्यांनी मायाजाल तयार केले आहे. तुम्ही माझ्या बाजूला सेनापती म्हणून ससैन्य राज्याच्या रक्षणासाठी यावे. आपण युद्धास प्रवृत्त झालेल्या त्या मानी राजाला येऊन मिळावे व आपल्या भुजा कमी पराक्रमी नाहीत हे राजाला पटवून द्यावे."



शंभूराजांनी अधिकारवाणीने सविनय निरोप दिला. सेनापतींनी ते पत्र स्वतः पूर्णपणे वाचून पाहिले. "मला याहून वेगळे काही सांगायचे नाही. आपल्या आज्ञेवरून मी माझ्या सैन्यासह त्वरित येत आहे." याप्रमाणे सिंहासनस्वामी शंभूराजे यांनी अत्यंत आशेने स्वतःच्या दूताकरवी निरोप पाठविला. उदार बुद्धी असलेल्या त्या राजाने आपल्या जवळच्या अमात्याकरवी सांगितले, "पत्र पाहिल्यावर अण्णाजीपंत आणि मोरोपंत यांचा आशय समजला. आणखी काही सांगायचे असेल, तर ते मात्र कोणाला सांगू नकोस. अण्णाजीपंत, मोरोपंत, राहूजी (सोमनाथ), प्रल्हाद (निराजी) यांना माझा हा निरोप त्वरित सांग की, जेथे जेथे तुम्ही जाल, तेथे तेथे मी असेन. तुम्ही मुक्त केलेल्या मार्गावरचेच आम्ही प्रवासी आहोत. हुशार, चतुर हेराकडून सेनापतींनी पाठविलेला संदेश ऐकून सचिवांनी एकत्रितपणे आपल्या ठाम अशा व्यूहरचनेला गुप्तता राखण्यासाठी कणखरपणे त्या ठिकाणातून प्रयाण केले.

।। अनुपुराणे सूर्यवंशे निवास क कवी अध्यायः ।।

## संभाजीराजांना कैद करण्याचा मनोदय - अध्याय २

कवीन्द्र उवाच । अथ प्रस्थितमात्रस्य तुरगारोहणक्रमे । मयूरस्य शिरोवेष्टः पपात धरणीतले ।। १ पिचिण्डिलस्य त्वण्णस्य याप्ययानाधिरोहिणः । निरुष्णीषो नरः कृष्णो दृशोरभिमुखोऽभवत् ।। २ अनाल्हादहृदस्तावत्प्रल्हादस्य च गच्छतः । अमन्दमन्दं पस्पन्दे तत्र चक्षुरदक्षिणम् ।। ३ तस्योपरिष्टात्सैन्यस्य व्यूढस्य प्रौढिमीयुषः । मण्डलान्यपसव्यानि गृध्रवृन्दैर्विदधिरे ।। ४ एत्य दक्षिणतः स्फारमारटन्तः कटुस्वनम् । प्रजाः सत्कृतप्रजानां चाप्यव्राजिषुरदक्षिणम् ।। ५ निमित्तान्यशुभाशंसीन्यमून्यन्यानि चाभितः । पश्यताथ मयूरादीन्प्रल्हादेनाभ्यधीयत ।। ६ प्रल्हाद उवाच । भवन्ति हन्त नास्माकं शकुनाः शकुनावहाः । दशां द्रक्ष्यामहे कां नु बलिना कृतविग्रहाः ।। ७ ममता मन्मता नेयं ममताममतामते । यत्कृतेऽद्य प्रवृत्ताः स्थ पथि सद्भिरसत्कृते ।। ८ तत्र गत्वाऽतिसत्त्वाढ्यो दिल्लीन्द्रा–दाप्तवाञ्छ्छ्रियम् । पित्रे दिदृक्षमाणाय दर्शयन्निजपौरुषम् ।। ९ सन्धिविग्रहयानादिवेदिना प्रौढकर्मणा । अहो युष्माभिरारेभे विरोधः शम्भुवर्मणाः ।। १० मतं सेनापतेर्नैव स्वमतेर्विषयीकृतम् । न चाद्रिदुर्गपालानां स्वतन्त्राणामिवाधुना ।। ११ मन्ये हम्बीरराजाद्याः पृतनापतयोऽधुना । बलिना शम्भुना स्वस्य विहिताः पक्षपातिन ।। १२ तस्मादद्य प्रपद्यध्वमनवद्याय शम्भवे । परथा(तो) भवदीयानाम्भवताञ्च न शम्भवेत् ।। १३ इत्थमुद्यन्नीतिभारवती प्रल्हादभारती । नान्वमोदि मयूराद्यैर्दिष्टादिष्टानुवर्तिभिः ।। १४ अथा–ण्णमुखमालोक्य मयूरो वाक्यमब्रवीत् । प्रल्हादं तत्तथा मन्ये नान्यथाऽत्र यदब्रवीः ।।१५

अर्थ – नंतर निघतानाच घोड्यावर स्वार होतेवेळी मोरोपंतांची पगडी जमिनीवर पडली. त्याच वेळी (घोड्यावर चढत असताना) लठ्ठ अशा अण्णाजी (दत्तो)च्या समोर एक काळा बोडका मनुष्य आला. मनात कसलाच आल्हाद नसलेला, निघण्याच्या तयारीत असलेल्या प्रल्हाद (निराजी) यांचा डावा डोळा जोराने स्फुरण पावू लागला. त्यांच्यापुढे रुबाबदारपणे व्यूहबद्ध असलेले सैन्यपथक गिधाडांच्या टोळ्यांनी उलटेपालटे करून टाकले. दक्षिणेकडून कर्कश्श असे ध्वनी येऊ लागल्यामुळे प्रजाजनही आपल्या डावीकडे झटकन वळले. अशा प्रकारे आणि इतरही काही अशुभ असे शकुन पाहून प्रल्हादपंत मोरोपंतादिकांना म्हणाले.

प्रल्हाद (निराजी) म्हणाले, "बलवानांनीच अशी फूट पाडल्यावर झालेली आपली अवस्था

आपण पहात आहोत. शुभाशुभ शकुन आपल्या दृष्टीने काहीच नव्हेत. वाटेत सज्जनांनी संमती दिली नाही, तरी जिच्यासाठी आपण कार्यप्रवृत्त झालो आहोत, ती ममता माझ्या मते ममता की अममता असा प्रश्न नाही. आपल्या पिताजींनी त्या ठिकाणी (दिल्लीला) जाऊन अतिशय सात्त्विक बाणा जपून दिल्लीश्वराकडून आपले वैभव मिळविले व पराक्रम दाखविला. तोच पिताजींना पहायचा होता, संधी-विग्रह-यान इ. राजनीतीतील कर्तव्ये जाणणाऱ्या आणि प्रगल्भ कर्तृत्व असणाऱ्या शंभूराजाला तुम्ही विरोध आरंभिला आहे हे आश्चर्यच म्हणावयाचे. डोंगरी किल्ल्यांच्या स्वतंत्र अशा किल्लेदारांच्या मताप्रमाणे हे सेनापतींच्या मताप्रमाणे नव्हे, तर आपल्याच मताप्रमाणे झाले आहे. हंबीररावांसारखे सेनापती बलवान शंभूराजांनी आपल्या पक्षाकडे वळवून घेतले आहेत. तेव्हा आता निर्दोष अशा शंभूराजाला जाऊन मिळा, नाहीतर तुमचे आणि तुमच्या लोकांचे कल्याण होणार नाही.'' अशा प्रकारे नीतियुक्त भारदस्त असे प्रल्हाद (निराजी) यांचे भाषण असले, तरी शकुन मानणाऱ्या मोरोपंतादिकांना ते पसंत पडले नाही. तेव्हा अण्णाजी (दत्तो)च्या चेहऱ्याकडे पाहून मोरोपंत प्रल्हादपंतांना म्हणाले, ''तसे असेल, त्याशिवाय तुम्ही असे बोलला नाहीत.''

**सेनापती हंबीरराव मोहिते संभाजीराजांच्या पाठीशी -**

**दिगन्तान्वा दिवं तां वा पातालं वावलम्बताम् । तथापि न जनस्यास्यान्यथा स्याद्वैधसी लिपिः ।। १६ कृतावदाताः सन्मानदानदूरीकृतश्रमाः । वयं कृताः कृतज्ञेन स्वामिना स्वात्मनः समाः ।। १७ अनेन सहसा दैवाद्यातुमुन्मनसा दिवम् । यस्तु न्यास इव न्यस्तः शिशुरस्माकमन्तिके ।। १८ तस्य राज्यमिदं सर्वं त्वदीयस्य यवीयसः । त्वं तु कर्णाटकं देशं शाधि तातनिदेशतः ।। १९ अदो वदोचितं तस्मै न श्रृणोत्युद्धतो यदा । ऋते दिल्लीश्वरं तस्य नावलम्बान्तरं तदा ।। २० इत्युक्त्वा प्रहितस्ताभ्यामुभाभ्यामपि सन्मतिः । सताङ्गतिमसौ शम्भुवर्माणं प्रत्यपद्यत ।। २१ अथ हम्बीरराजेन प्रहितः स्वहितः स्पशः । पश्यन्नण्णं मयूरश्च मध्येसभमभाषत ।। २२ कार्यं तदतिसंसक्तं यदव्यक्तं हितं भवेत् । अतो द्रक्ष्ये विवक्षुर्वां विविक्तस्थावुभावपि ।। २३ एनं सन्देशमाकर्ण्य पृतनाधिपतेरमू । सपदि प्रतिसन्दिश्य तत्र प्राहिणुतां चरम् ।। २४ अथ पञ्चाननगतिः सेनापतिररिन्दमः । तत्क्षणोत्स्फारितश्मश्रुरेखो रूक्षारुणेक्षणः ।। २५ पिनद्धवर्मा चर्मासिपाणिः सानीकिनीगणः । वृषस्कन्ध-समस्कन्धप्रतिष्ठितशरासनः ।। २६ प्रत्युद्व्रजद्भ्यामभितो रुद्धाभ्यां सह सेनया । ताभ्यां तत्र तथाऽलोकि भवत्येवं यथा स न ।। २७ कौ युवां किमनीकं वां कं प्रत्ययमभिक्रमः। कृतो मर्कटकाभ्यां किं भवद्भ्यामयमुद्यमः ।। २८ यस्यान्नमत्तमाजन्म तस्मिन्नसति तत्सुतम् । विनियन्तुं प्रवृत्ताः स्थ दुर्वृत्ताः स्थ न संशयः ।। २९ निगदन्निति निग्राह्यौ व्यग्राहयदुभावपि । अधिपद्विषदुत्थायी प्रतापी पृतनापतिः ।। ३० ततः स्वस्वशिरोवेष्ट-नियन्त्रितभुजावमू । उभौ ह्रीतौ दुर्विनीतौ नीतौ दीनां दशामिमाम् ।। ३१ तदवस्थीकृतां तद्वत्तदीयाननुबन्धिनः । सम्बन्धिनश्च सुहृदः सोदरान्बान्धवानपि ।। ३२**

**अर्थ -** दिगंतापर्यंत जा, पाताळात जा, स्वर्गात जा; परंतु ब्रह्मदेवाची वाणी खोटी होईल असे मला वाटत नाही. पराक्रम करून, सन्मान आणि पुरस्कार प्राप्त करून आमचे श्रम दूर झाले आहेत. कृतज्ञ अशा स्वामींनी आम्हाला स्वतःसारखेच मानले आहे. यामुळे अचानक दैवावर भरवसा ठेवून आणि उद्विग्न होऊन स्वर्गालाच जाण्यासाठी का तयार व्हावे? वडिलांच्या आदेशानुसार तुम्ही कर्नाटक प्रांत सांभाळावा. तेव्हा तुम्ही योग्य वाटेल ते त्यांना सांगा. ते जर उद्धटपणाने ऐकत



नसतील, तर दिल्लीश्वराकडे धाव घेण्यावाचून अन्य मार्ग रहात नाही.'' असे म्हणून सुविचारी, विवेकी अशा (प्रल्हादपंतांनी) त्या दोघांचा निरोप घेतला आणि सज्जनांच्या आश्रय स्थानी असणाऱ्या शंभूराजांकडे आश्रय घेतला. हंबीररावाने स्वतःचा पाठविलेला दूत, अण्णाजी आणि मोरोपंत यांजकडे पाहून सभेमधे म्हणाला, ''स्पष्ट न झालेले परंतु हितप्रद असलेले काम अतिशय जवळचे असते. म्हणून आपण दोघे जेव्हा मोकळे असाल तेव्हा मी आपणाला भेटेन. मला काही सांगायचे आहे.'' सेनापतीचा हा संदेश ऐकून दोघांनी लगेच दूताकरवी उलट निरोप पाठविला. शत्रूचा पाडाव करावयास समर्थ असलेल्या सिंहासारख्या त्या सेनापतीच्या डोळ्यांत लालभडक अंगार निर्माण झाला. त्याच्या मिश्या विस्फारल्या. त्याने आपले कवच घट्ट केले. बैलाप्रमाणे खांदे असलेल्या त्याने हातात ढाल-तलवार घेतली. धनुष्यबाण घेऊन सज्ज असलेला तो आपल्या सैन्यासह आपल्या सामोऱ्या येणाऱ्या ससैन्य अशा त्या दोघांना तो दिसला. 'तुम्ही दोघे कोण आहात? हे बरोबर आणलेले सैन्य तुमचे आहे का? कोणावर रोख आहे? हे माकडचाळे तुम्ही कशाकरिता करीत आहात? जन्मापासून ज्याचे अन्न खाल्ले त्याच्या पश्चात त्याच्या मुलाला पकडण्यासाठी तुम्ही निघाला आहात. निःसंशयपणे आपले हे दुराचरणच आहे.' असे म्हणत त्यांना पकडले व त्या दोघांना वेगळे केले. त्यानंतर त्या उत्साही व पराक्रमी सेनापतीने राजद्रोही अशा त्यांना त्यांच्याच स्वतःच्या फेट्याने त्यांचे हात बांधले. दुर्नीतीमुळे त्यांची अशी दुरवस्था झाली. त्यांची अशी दशा केल्यावर त्यांच्याबरोबर आलेल्या संबंधित, मित्र, भाऊबंद यांचीही शस्त्रे काढून घेण्यात आली.

**हतायुधान्कृतक्रोधान्योधानपि च कांश्चन । प्रदाय रक्षणार्थाय पृतनां स्वां प्रजाग्रतीम् ।। ३३ विधाय रक्षितान्शश्वत्स्वया पृतनया नयी । स्वामिभक्तो महासत्त्वः सत्वरं कार्यलालसः ।। ३४ पुरः प्रस्थापयामास प्रणालमचलं प्रति । करहाटात्किल क्षिप्रं प्रस्थितः पृतनापतिः ।। ३५ मनीषिण ऊचुः । विसृष्टः शम्भुराजाय प्रविष्टोऽपि च तं किल । यद्दूत्यमकरोत्तत्र प्रल्हादस्तदुदीरय ।। ३६**

**कवीन्द्र उवाच । स तु मन्तुमतां तेषां शम्भुद्वेषान्धचेतसाम् । श्रेयसः समुदायेन समुदाये वसन्नभूत् ।। ३७ ज्यायस्तु ज्यायसः श्रेयो यवीयस्तु यवीयसः । चिरं निरचिनोदेतदयं तु निजचेतसि ।। ३८ अतो दूत्योपधिस्तावत्प्रल्हादः सुधियां वरः । शम्भुवर्माणमभजत्भ्राजमानः स्वया श्रिया ।। ३९ कमपि वसुधालोकेऽमुष्मिन्सुधामयदीधितिं तनयमकनीयांसं पश्यन् प्रभोः शिववर्मणः। स किल पृतनापालस्तावत्प्रणालमहीधरे मुदमतितमां लेभे देहेऽपि चाप्यधिकां श्रियम् ।। ४० विश्वव्यापि भुजोद्यमे शिवमहीपाले प्रयाते दिवं कः स्यादस्य पदस्य सम्प्रति महाबाहुर्नियन्तेति यः । सन्देहः स्वमनोऽतिथिः स नुनुदे श्रीशम्भुराजाभिधं दृष्ट्वा मानुषदैवतं प्रमुमुदे चानन्दराजादिभिः ।। ४१**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे कवी. अध्यायः ।।**

**अर्थ -** त्यांच्या सैन्यातील काहींना राग आलाच. त्यांना संरक्षण देण्याकरिता आपल्या जागरूक सैन्याच्या हवाली करून त्यांना लगेच आपल्या सैन्यात सामील करून घेतले. तो स्वामिभक्त, महाबलवान व कार्यतत्पर असा सेनापती ताबडतोब पुढची कारवाई करण्यासाठी कराडहून लगेच रवाना झाला.

विद्वान/जिज्ञासू श्रोते म्हणाले, ''शंभूराजाकडे पाठविलेला आणि त्यांच्यापर्यंत पोहोचलेला प्रल्हाद याने कोणता निरोप सांगितला ते स्पष्ट करावे.''

कवीन्द्र म्हणतात– तो त्या शंभूद्वेषाने अंध झालेल्या सल्लागारांच्या घोळक्यात आपले भले व्हावे म्हणून बसला. ज्येष्ठांचे कल्याण ज्येष्ठ, कनिष्ठाचे कनिष्ठ असे तो मनाशी सतत घोकत होता. नंतर तो हुशार प्रल्हाद खोटाच संदेश मनात धरून आपल्या मनानेच शंभूराजांकडे गेला. या पृथ्वीलोकावर चंद्राप्रमाणे (शीतल व अमृतप्रद असलेला) शिवप्रभूंच्या ज्येष्ठ पुत्रास पाहून तो सेनापती त्या कार्य-धुरंधराजवळ अतिशय संतुष्ट झाला आणि त्याच्या अंगावर तेज चढले. विश्वव्यापी, पराक्रमी बाहू असलेले शिवाजीराजे स्वर्गस्थ झाल्यावर आता या स्थानाचा कोण पराक्रमी नियंता असा मनात संभ्रम असतानाच श्रीशंभूराजांना पाहून मनुष्यरूपी दैवतच समजून राजांच्याबरोबर तोही अत्यानंदित झाला.

।। अनुपुराण सूर्यवंशे कवी अध्यायः ।।

## संभाजीराजांचे रायगडला आगमन - अध्याय ३

कवीन्द्र उवाच । इत्थं विनिगृहीतेषु मन्तुकारिषु मन्त्रिषु । अपरेष्वपि पापेषु ममतामतवर्तिषु ।। १ तप्ततैलकटाहान्तः क्काथ्यमानेषु केषुचित् । निशातकरपत्राग्रैः कर्तितेषु च केषुचित् ।। २ चूर्णतां भृगुपातेन गमितेषु च केषुचित् । द्विरदोदग्रदन्ताग्रदारितेषु च केषुचित् ।। ३ प्रकृतिष्वनुकूलासु विषयेषु वशेषु च । सेनाधिपेषु सर्वेषु विविधेषु विशेषतः ।। ४ सर्वदुर्गेषु निर्विघ्नं निघ्नतां प्रापितेषु च । चकितेष्विव ताम्रेषु तटस्थेषु च सर्वशः ।। ५

अर्थ – कवीन्द्र म्हणतात,अशा रीतीने सल्लागार मंत्र्यांना आणि ममतेच्या बाजूने असलेल्या इतर दुष्टांना पकडले. काहीजण तापलेल्या तेलाच्या कढईत उकळले जाऊ लागले, तीक्ष्ण करवतीने कापले जाऊ लागले, काहीजणांचे कडेलोट केल्यामुळे तुकडे-तुकडे होऊ लागले. कराल अशा हस्तिदंतांनी काहीजण फाडले जाऊ लागले. प्रजाजन अनुकूल असल्यामुळे अनेक बाबी सेनाधिकाऱ्यांच्या ताब्यात आल्या. सर्व किल्ले निर्विघ्नपणे ताब्यात आले. मोगल सर्व बाजूंनी तटस्थ राहून आश्चर्यचकित झाले.

श्रीरङ्गपत्तनाद्बिन्दुपुराच्च मलयाचलात् । सिंहलादन्तरीपाच्च सेतुबन्धाच्च दुर्जयात् ।। ६ तथैव भागानगरात्पुराच्च विजयाह्वयात् । गजवाजिप्रभृतिषु प्राभृतेष्वागतेषु च ।। ७ भूयिष्ठभुजमाहात्म्यममात्यपदवीं स्पृशन् । शम्भुराजमिदं प्राह कलशः सरसं वचः ।। ८

अर्थ – श्रीरंगपट्टणापासून मलय पर्वतातील बिंदुपुराहून, श्रीलंकेवरून भूशिरातून, दुर्जय अशा सेतुबंधातून भागानगरातून, विजापुरातून, हत्ती, घोडे इत्यादी नजराणे आले. पराक्रमी अशा श्रेष्ठ शंभूराजांच्या अमात्य पदवीला स्पर्श करू लागलेल्या कलशाने मधुर भाषण केले.

कलश उवाच । स्थितोऽसि चिररात्राय हिताय जगतामिह । महामतेऽतिमहते द्विषतामहिताय च ।। ९ अथ राज्याभिषेकाय स्वाय रैङ्गिरिमाव्रज । भजतां राज्यलक्ष्मीस्त्वां सङ्गतां त्वं च तां भज ।। १० सद्यः शिववियोगोत्थं वैक्लव्यं विजिहासती । तत्र त्वां क्ष्मामणे सिंहासनलक्ष्मीः प्रतीक्षते ।। ११ गुरौ गते शिवे राज्ञि लघुतां लघुतां गताः । त्वया भजन्तु गुरुतां भूधरा रैधरादयः ।। १२ सूनुं मूर्धाभिषिक्तस्य त्वामनूनं गुणश्रिया । अनूचानजनेनोच्चैस्तत्तत्तीर्थाहृतेर्जलैः ।। १३ महाभाग महाभागं भगीरथमिवानघम् । तत्राभिषिच्यमानं द्रागानन्दभरमेदुरः ।। १४ आभ्यां दृग्भ्यां कदा द्रष्टेत्यभिलाषमहो वहन् । निद्राणोऽपि महाराज निद्रां नापलभेन्वमहम् ।। १५ एनामनलसो ह्येष कलशोदीरितां गिरम् । निशम्य रम्यविषयां प्रयाणाभिमुखोऽभवत् ।। १६ तत्र सेनां सुमहतां न्यस्य युद्धाभिमानिनीम्



। स प्रास्थितपृथुप्रख्यः सत्रानीकेन भूयसा ।। १७ अथ तस्याध्वनीनस्य भवन्दुन्दुभिरध्वनि । दिक्तटानधिकाभ्यर्णेन यः कर्णे जयध्वनिः ।। १८ ततः कतिपयैरेव दिवसैर्भूदिवस्पतिः । सुखान्यनुभवन्नुच्चैर्वासवीं वसतिं प्रति ।। १९ उपलभ्याभिलाषर्हविषयोऽतिशयोज्वले । बलेनात्मजुषा चान्तकल्पान्तहुतभुक्बले ।। २० प्रतापिनि प्रतापाद्री पृथुलोन्नतमेखले । स्थितामास्थावतीं तुष्टामुत्सृष्टतुलजापुराम् ।। २१

अर्थ – कलश म्हणाला, "हे महामते, आपण जगाच्या कल्याणासाठी आणि शत्रूंच्या अहितासाठी खूपच मोठा काळ घालविला आहे. आता आपल्या राज्याभिषेकासाठी रायगडावर यावे. राज्यलक्ष्मीचा आश्रय करावा. ती तुमच्याबरोबर आहे, तिचा उपभोग घ्या. हे राजन्, सध्या शिवाजीराजांच्या वियोगाने झालेले दुःख बाजूस सारा. तिकडे सिंहासनलक्ष्मी वाट पहात आहे. आपले वडील शिवाजीराजे गेल्यानंतर रायगडासारखे पर्वतही लहान-लहान झाले आहेत. आपल्यामुळे त्यांना मोठे होऊ द्या. गुणसौंदर्याने युक्त आणि मूर्धाभिषिक्त असे आपण तीर्थक्षेत्रावरून आणलेल्या जलाने हे सुदैवी महाभागा, निष्पाप अशा भगीरथाप्रमाणे आनंदभराने भरून जाऊन लवकरच विद्वज्जनांकडून आपणास अभिषेक होईल तो पाहण्यासाठी मला निद्रासुख मिळेनासे झाले आहे. आनंददायी विषयासंबंधीचे कलशाचे हे भाषण लक्ष देऊन ऐकल्यावर त्यांनी (संभाजीराजांनी) मुक्काम हलविण्याचे ठरविले. युद्धाला उत्सुक झालेली अशी मोठी सेना घेऊन, ज्याप्रमाणे पृथुराजा अनेक सैन्यरूपी यज्ञ पुन्हा पुन्हा करीत होता, त्याप्रमाणे सेनेसह ते निघाले. ते मार्गस्थ झाल्यावर वाटेत अगदी जवळूनच कानाच्या दोन्ही बाजूवर नगाऱ्यांचे जयध्वनी येऊन पडले. त्यानंतर थोड्याच दिवसांनी तो भूसूर्य सुखानुभव घेत इंद्रनगरीतच वस्तीला पोहोचला. अतिशय उज्ज्वल अशा आत्मबलाने अग्नीचे सामर्थ्य असलेल्या कल्पांतापर्यंत उग्र अशा प्रतापगडाजवळ इच्छा करावी, अशी सुखे मिळालेला तो विस्तृत आणि उंच प्रदेशावर असलेल्या श्रद्धापूर्ण आणि संतुष्ट करणाऱ्या तुळजापुरास आला.

शिवराजस्य हस्तेन विध्वस्ताफजलासुराम् । सद्यः प्रसादाभिमुखीमुच्चप्रासादमध्यगाम् ।। २२ तत्तदाभरणद्योतद्योतिताभ्यर्णदीपिकाम् । अतुलां तुलजां नाम वरदां परदेवताम् ।।२३ सिंहपृष्ठागतामष्टभुजामभयदायिनीम् । पुरोहितेन सहितःसहितः प्रोल्लसन्मनाः ।। २४ स्वदृशोर्गोचरीकृत्य सर्वदां सर्वमङ्गलाम् । अमंस्त स्वाय राज्याय सर्वमङ्गलमङ्गलम् ।। २५ चन्दनागरुकाश्मीररक्षोदेन मृगनाभिना । वज्रवैदूर्यमाणिक्यमुक्तामणिभिरक्षतैः ।। २६ सौगन्धिकैरनेकैश्च सुमनोभिः सुगन्धिभिः । धूपैर्दीपैश्च नैवेद्यैरुपहारैश्च भूरिभिः ।। २७ अभ्यर्च्य देवीमभ्यर्च्यामुषितोऽपि च तां निशाम् । यथोचितव्रताचारपरः परपुरञ्जयः ।। २८ पुरः प्रयातुमुदितो मुदितो मोदितद्विजः । नासीरध्वनदुद्दामदवद्दानद्विपव्रजः ।। २९ घोरपत्तिघटोद्घोषत्सङ्घट्टितककुप्तटः । सोऽद्राक्षीद्रैङ्गिरिं दूराद्विदूराद्रिरिवागतः ।। ३० अथ धरमधिरुह्य तं प्रतापी सह पटुना ध्वनितेन दुन्दुभीनाम् । सपदि सदसि पश्यते जनाय व्यतनुत मङ्गलमात्मदर्शनेन ।। ३१

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरकवीन्द्र परमा. अध्यायः ।

अर्थ – शिवाजीराजांच्या हातांनी अफजलरूपी असुराला उद्ध्वस्त करणारी, अल्पावधीत कृपा करणारी, उंच प्रासादाच्या मध्यभागी सिंहासनावर बसलेली, विविध अलंकारांच्या तेजाने जवळच्या दीपांना उजळणारी अतुलनीय, वरदा आणि श्रेष्ठ, अष्टभुजा, अभय देणारी देवता,

पुरोहितांच्या वेढ्यातून त्याने अत्यंत उल्हसित मनाने पाहिली. आपल्या राज्याला ती सर्व मंगलकारक आहे असे त्यास वाटले. चंदन, अगरू, केशर यांच्या चूर्णाने, कस्तुरीने, पोवळे, माणिक, मोती इत्यादी अक्षत रत्नांनी, अनेक सुगंधी द्रव्यांनी, अनेक सुवासिक फुलांनी धूप-दीप-नैवेद्य आणि पुष्कळ उपहारांनी देवीची मन:पूर्वक पूजा केल्यावर जणू दुसरा इंद्रच असा तो यथोचित व्रताचरण करून त्या रात्री तेथेच राहिला आणि आनंदित होऊन व ब्राह्मणांना संतुष्ट करून तो पुढे निघाला. आघाडीस उद्दाम असे हत्तींचे समूह, भय निर्माण करणाऱ्या पायदळांचे घोष, शिखरांच्या कड्यांवर आदळणारे प्रतिध्वनी अशा थाटात चालत असताना दुरून रायगड पोवळ्याच्या पर्वताप्रमाणे दिसला. पायउतार होऊन मोठमोठ्या नगाऱ्यांच्या ध्वनीत त्या प्रतापी शंभूराजाने त्याच्या दर्शनासाठी आतुर झालेल्या जनतेला आपले मंगल दर्शन दिले.

।। अनुपुराणे सूर्यवंशे निवासकर कवीन्द्र परमानन्दकाव्य अध्याय: ।।

अध्याय ४

**श्रीगोविन्द । कवीन्द्र उवाच । अथ शम्भुर्महातेजा: स्वकीयमविकारिणम् । व्यधत्त पर्वते तस्मिन्यथार्हमधिकारिणम् ।। १ तेषु तेषु पदेष्वेव स्वकीयानधिकारिण: । यथायोग्यान्किला-कार्षीत्प्रकर्षेण विचक्षण: ।। २ वैमात्रेयश्च सम्भाव्य वसनाभरणादिभि: । तन्मातरं तथान्याश्च मातृस्तास्तास्सदुक्तिभि: ।। ३ असामान्यमतिर्मान्यानन्यानपि महामना: । कुबेरभवनाकारं कोशागरं व्यलोकत ।। ४ तत्र रैङ्गिरयेऽमुष्मै सौहार्दगरिमस्पृशे । प्रणयात्प्रहितानीव प्रस्थानि स्वानि मेरुणा ।। ५ पुञ्जीकृतानि रत्नानि स्वर्णानि च सहस्रश: । सप्रभाव: स्वनयनाति-थिभावमुपानयत् ।। ६**

अर्थ - श्रीगोविन्द कवीन्द्र म्हणाले, महातेजस्वी शंभूराजांनी स्वामिनिष्ठ अशा अधिकाऱ्यास गडावर नेमले. योग्यतेनुरूप त्या त्या पदावर कटाक्षाने त्याने आपले अधिकारी नेमले. आपल्या सावत्र भावाचा (राजारामाचा) वस्त्रे व अलंकार देऊन सत्कार केला. तसेच आपल्या आईचे व इतर मातांचे गोड शब्दांनी सांत्वन केले. असामान्य व कुशाग्र बुद्धीच्या, मोठ्या मनाच्या शंभूराजांनी इतरही मान्यवरांची भेट घेतली व कुबेराच्या प्रासादाप्रमाणे असलेल्या खजिन्याचे अवलोकन केले. मित्राने (राजे किंवा सरदार किंवा परराष्ट्र वकील) भेट किंवा नजराणे म्हणून दिलेली हजारो रत्ने व सुवर्णालंकार एका ठिकाणी ठेवलेले किल्लेदाराने त्यांना दाखविले. ते पाहून ते प्रभावित झाले.

### संभाजीराजांचा राज्याभिषेक -

**अथ राज्याभिषेक(केऽस्य) प्रक्रान्ते पृथिवीपते: । क्रमान्मह: प्रववृते महीयान् रैंमहीधरे ।। ७ ततस्ते तेऽग्रजन्मानो बाहुजाश्च सहस्रश: । आर्या: शूद्राश्च बहुश: स्वस्वचर्याविशारदा: ।। ८ तत्तद्देश्यास्तथा वेश्या: शैलूषा अप्यनेकश: । कुशीलवाश्च कुशलास्तत्तदातोद्यवादका: ।। ९ वैतालिकाश्चारणाश्च बिरुदावलिपाठका: । मार्दङ्गिका वैणिकाश्च गायन श्चारुगायनी: ।।१० बव्हाश्चर्यवहेऽमुष्मिन्महेऽमुष्य महीभुज: । आययु: सह्यमचलं प्रस्थित: (ता): स्वस्वनीवृत: ।। ११ अथाभ्यर्हितवेशेषु तत्तद्देश्येषु राजसु । चिरस्यास्थानमास्थाय स्थितेषु स्थिरमूर्तिषु ।। १२ मागधेषु च सूतेषु ब्रुवत्सु बिरुदावलिम् । श्रव:स्वाद्येषु वाद्येषु ध्वनत्सु पटहादिषु ।। १३ गायनैर्गीयमानेषु गीतेष्वपि च सुस्वरम् । नृत्यन्तीषु च वेश्यासु स्वर्वेश्यास्विव शोभनम् ।। १४ क्रियमाणपरिष्कारेष्वमन्दं मण्डपेषु च । देवेष्वाहूयमानेषु हूयमानेषु चाग्निषु ।। १५ उपक्रान्तेषु विधिवत्साङ्गग्रहमखेषु च । परिवारसमेतासु मातृकास्वर्चितासु च ।। १६**



**निशाचरघ्नमन्त्रेषु पठत्सु शुभहेतुषु । इदं ज्ञानमिदं ज्ञेयमिति जल्पत्सु केषुचित् ।। १७ इत्थमात्मा परात्मेत्थमभेद: शिवजीवयो: । वितण्डवादपाण्डित्यमालपत्स्वपि केषुचित् ।। १८ शतकुम्भमयै: कुम्भैर्गङ्गासागरयामुनै: । समाहृतै: पुण्यजलै:कृतमाङ्गलिकाप्लवम् ।। १९ कृतान्हिकं कृतमहानित्यदानमहोत्सवम् । कृतदेवार्चनं प्रेम्णा कृतसौरभिपूजनम् ।। २० कृतप्रणाममाचार्यपितृमातृपुर:सरम् । कृतकौलमहादेवस्मरणश्चारुभूषणम् ।। २१ कृतनान्दीमुखश्राद्धं श्रद्धावन्तं यतव्रतम् । नानारत्नकृतापीडं समस्तायुधभासुरम् ।। २२ प्रतपन्तमिवादित्यं दिनमध्यमुपागतम् । विप्राशिषा वेदघोषैर्मङ्गलैरपरैरपि ।। २३**

अर्थ - नंतर राजाच्या राज्याभिषेकाला रायगडावर प्रारंभ झाला. त्यावेळी स्वकार्य प्रवीण असे ब्राह्मण, क्षत्रिय, हजारो वैश्य आणि शूद्र मोठ्या संख्येने, तसेच विविध देशांतील वेश्या, नट, गायक, कुशल वादक, भाट, शाहीर, बिरुदावली म्हणणारे, मृदंग आणि वेणू वाजविणारे, मधुर गायक आश्चर्यकारक अशा मोठ्या समुदायाने सह्याद्रीकडे सस्वर निघाले. प्रतिष्ठित वेशधारी विविध देशांतील राजे अगोदरपासूनच आसनस्थ झाले होते. मागध आणि सूत बिरुदावली म्हणत होते, वाद्ये वाजत होती, नगाऱ्यांचा ध्वनी होता, गायक सुस्वर गीते म्हणत होते. अप्सरांप्रमाणे वेश्या कौशल्याने नृत्य करीत होत्या. सभामंडपामधे सत्कारासाठी देवांना उच्च स्वरात आवाहन केले जात होते, अग्नीला हवन केले जात होते आणि आता यथासांग विधिवत ग्रहमखाला आरंभ झाला. सपरिवार मातृका पूजन झाले. कल्याणार्थ असुरांना दूर ठेवणारे मंत्र म्हटले जाऊ लागले. काहीजण ज्ञान आणि ज्ञेय याविषयी बोलत होते. काहीजण आत्मा-परमात्मा आणि जिवशिवांचे ऐक्य यावर वाद घालून पांडित्य प्रदर्शन करीत होते. सुवर्णकुंभातून आणलेल्या गंगा-यमुना आणि सागर यांच्या पुण्यदायक जलाने स्नान केले जात होते. आन्हिक उरकल्यावर नित्याप्रमाणे दानाचा उत्सव झाला. देवपूजा आटोपली. प्रेमपूर्वक गायींचे पूजन झाले. गुरुजी, माता व वडीलधारी मंडळी यांना नमस्कार केला. कुलदेवता श्रीमहादेवाचे स्मरण केले. सुंदर वस्त्रे धारण केली, नांदीश्राद्ध झाले, श्रद्धेने व्रत धारण केलेल्या, नाना रत्नालंकार घातलेल्या, सर्व शस्त्रांमुळे तेजस्वी दिसणाऱ्या मध्यान्हीच्या सूर्याप्रमाणे तळपणाऱ्या, उत्साहपूर्ण आणि पुण्याहवाचन केलेल्या शंभूराजांना ब्राह्मणांनी वैदिक आणि पौराणिक आशीर्वादांचा घोष केला.

**राजन्नेत्रनभोङ्गभूभिभरिते रौद्रा दृते रौद्रके । माघे मासि सिते रथोत्सवदिने मुख्ये मुहूर्ते शुभे। शम्भुर्भूमिपतिस्त्रिवर्षसमये सिंहासने भ्राजते ।संशोभच्छिवयोरभीतिसुकर-च्छत्रप्रभाभास्वरे ।। ६३**

अर्थ - शके १६०२च्या माघ शुक्ल पक्षात रथसप्तमीच्या मुख्य शुभमुहूर्तावर भीषण अशा तंत्रमार्गीय अनुष्ठानाने राजा शंभू (शंकर आणि शिवाजी) दोन्ही शिवांना शोभणाऱ्या निर्भय आणि सुकर अशा राजछत्राच्या तेजाने लखलखणाऱ्या राजसिंहासनावर विराजमान झाला.

**अनुवीतं महोत्साहं कृतपुण्याहवाचनम् । दक्षिणैर्लक्षणै: पूर्णं दीक्षोत्कर्षप्रदीक्षितम् ।।२४ पुरोहितपुरन्ध्रीभि: कृतनीराजनक्रियम् । आनन्दसम्भृतैर्लोकैरालोकितमनारतम् ।। २५ उपात्तपूर्णपात्रीभि: पूजिताभिरनेकधा । सुवेषाभि: सुवस्त्राभि: सकुतूहलमादरात् ।। २६ आलक्षितं मृगाक्षीभि: स्वाक्षै: साक्षात्क्षमापतिम् । सम्भावयन्तं भव्यै: स्वै: सभ्यान्संवीक्षणैरलम् ।। २७ अभ्यसिञ्चन्महाराजं शम्भुराजं महौजसम् । विप्रपूर्वा: समस्तास्ते परिपूर्णमनोरथा: ।। २८ समन्त्रैरौषधिक्वाथैर्नदीनदजलैरपि । वपुस्तस्याभिषिक्तस्य तत्तदानीं**

**व्यराजत ।। ३० विधिना प्रेमनिधिना विधिना सुरराइ यथा । अभिषिक्तोऽतिशुशुभे शम्भुः समधिकोज्वलः ।। ३१ तमन्तःकरणैर्भेजुरन्तःपुरनतभ्रुवः । अवापुरधिकं मानं मानसे काश्च नायिकाः।।३२ वसानो मङ्गलक्षौमे दधानो द्युतिमद्भुतः । काश्मीरक्षोदकलितत्रिपुण्ड्रललितालिकः ।। ३३ चन्दनेनोपदिग्धाङ्गः सुमनस्स्रगलङ्कृतः । अथ स्फुरत्स्वर्णशिरोवेष्टरोचिर्वेष्टितदिक्तटः ।। ३४ महार्हाभरणोपेतो निकेतो वीरसम्पदः । तेजःपुञ्जस्तपन्भूयो द्वितीयमिव भास्करः ।। ३५ सतनुत्रः सफलकः सकृपाणः सकार्मुकः । हेमसारसनोन्नद्धमध्यभागमनोहरः ।। ३६ नवातपनिभाकार–प्रावारपरिशोभितः । उदश्चितसितच्छत्रश्चारुचामरवीजितः ।। ३७ यथाक्रमश्रितश्रेणी–पुरोभागद्वयस्थिरैः । बद्धपाणिपुटैस्तैस्तैः क्षितीक्षिद्भिस्ससस्तवः(रुदीक्षितः) ।। ३८ इत्याकर्ण्य कलेर्वाचं मनोवाचामगोचरः । करुणावरुणावासस्तमुवाच महेश्वरः ।। ३९**

**महेश्वर उवाच । चिरस्य नागतः सोऽत्र प्रथितः प्रमथो मम । शप्तेन येन सम्प्राप्तो भूयो भूयो भवभ्रमः ।। ४०**

**अर्थ –** उत्तम लक्षणांनी युक्त आणि दीक्षा घेतल्यामुळे सामर्थ्यवान अशा त्याला पुरोहितांच्या स्त्रियांनी ओवाळले. आनंदाने ओसंडणाऱ्या नजरेने लोकांनी इकडेतिकडे न बघता थेट त्याचे दर्शन घेतले. सन्मानिलेल्या, सुवेषधारिणींनी पूजापात्रे हातात घेऊन सुंदर स्त्रियांनी त्याला कौतुकाने पाहिले आणि त्यांना तो साक्षात विष्णूच भासला. आपल्या भव्य नेत्रांनी त्यांनी दरबाराकडेही कटाक्ष टाकला. ब्राह्मणांसह समस्तांच्या मनोकामना पूर्ण होऊन महातेजस्वी शंभूराजाला अभिषेक केला. समंत्रक औषधी काढे दिल्यामुळे नद्यांच्या आणि सागराच्या जलाने अभिषेक झाल्यावर त्याचे शरीर अधिक शोभायमान झाले. इंद्राप्रमाणे विधिवत प्रीतिपूर्वक अभिषेक झाल्यावर तो आणखीनच प्रकाशमान झाला. अंतःपुरातील स्त्रिया त्याला अंतःकरणपूर्वक भजू लागल्या. काही नायिकांनी त्याला आपल्या मनात अत्युच्च स्थान दिले. त्याने मंगलकारक रेशमी वस्त्रे परिधान केली होती. अंगावर तेज असल्यामुळे तो विस्मयकारक वाटत होता. केशरयुक्त त्रिपुण्ड्रामुळे त्याचा भालप्रदेश सुंदर दिसत होता. चंदनाचा शरीरावर लेप होता. फुलांच्या माळांनी तो अलंकृत झाला होता. सोन्यामुळे चकाकणाऱ्या त्याच्या जिरेटोपाने सर्व दिशा वेढून टाकल्या होत्या. शौर्याचे आश्रयस्थानच जणू असा तळपणारा तो दुसरा सूर्यच भासला. चिलखत, ढाल, कृपाण आणि धनुष्य यामुळे सुवर्णाने घडविल्याप्रमाणे त्याचा मध्यभाग मनोहर दिसत होता. कोवळ्या सूर्यकिरणांप्रमाणे उत्तरीयामुळे तो शोभून दिसत होता. पांढरे राजछत्र त्याच्यावर होते. सुंदर चवऱ्यांनी त्याला वारा घातला जात होता. दोन्ही बाजूंना श्रेणीनुसार आसनस्थ झालेले राजेलोक हात जोडून स्तुती करीत त्याच्याकडे पहात होते. याप्रमाणे (विभागाच्या शेवटी दिलेले) कलीचे भाषण ऐकून मनाला व वाणीला अगोचर आणि करुणाजलाचे वस्त्र घातलेले महेश्वर त्याला म्हणाले, ''बराच वेळ झाला. माझा प्रसिद्ध प्रमथ येथे आला नाही. त्याने शब्द दिल्यामुळे पुन्हा पुन्हा भवभ्रम होत आहे.''

### विकृत कविकल्पना -

**कम्पते न तरोः पत्रं मशकोऽपि न चेष्टते । शासनेन विना यस्य तं कालं कोऽनुलङ्घते ।। ४१ स्थिरः स्थिरायां स्थितये स्थास्यत्येष चिरं यदि । तर्हि मङ्क्ष्यति भूयोऽपि जराजन्मभरापदि ।। ४२ अनेन देवीवचनात्प्रायेणाधिगतं फलम् । अतःपरमिमं स्वीयं प्रापयिष्यावहे स्थलम् ।।४३ प्रशाधि भारतं वर्षं समयो यावदस्ति ते । लोभमोहादयः सर्वे सहायास्त्वां ह्युपासते ।।**



**४४ यथा दशरथस्यासीत्पत्नी केकयवंशजा । तथैव तस्य नृपतेर्मोहितान्वयसम्भवा ।। ४५ यास्ति प्रियतमा कापि देवैर्मायेव निर्मिता । महामोहस्य भगिनी मानुषीरूपमास्थिता ।। ४६ ममता नाम सा तत्र तामसी तामसीनिभा । दैवादिष्टैव सपदि त्वदभीष्टं विधास्यति ।। ४७ भवानप्यधिकारं स्वं वर्षे भारतसंज्ञिते । यथाविधि विधायान्ते स्वं स्थानं प्रतिपत्स्यते ।। ४८ इत्युक्तः किल कण्ठोक्त्या श्रीकण्ठेन कृपालुना । कलिरागम्य कैलासादिलातलमलोकत ।। ४९ लोभमोहादयोप्येनं वज्रन्तमनुवव्रजुः । सैनिका इव राजानं याचका इव भूरिदम् ।।५०**

**मनीषिण ऊचुः । प्रमथानामधिपतेः प्रथितः प्रमथ पुरा । स आसीदिति शर्वोक्त्या कवीन्द्र ज्ञापितं त्वया ।। ५१ केन पापविपाकेन कश्च शापमवाप सः । किञ्च नामास्य तत्सर्वमिच्छामः श्रोतुमञ्जसा ।। ५२ न हि शप्तुममुं कोऽपि शर्वपारिषदः प्रभुः । ऋते स्वामिनमीशानं पार्वतीं वा मनस्विनीम् ।। ५३**

**कवीन्द्र उवाच । स तण्डिरिव नामासीद्वितण्डिरिति विश्रुतः । पार्श्ववर्ती पशुपतेर्नन्दिप्रेष्ठः पृथुस्मयः ।। ५४ पीयूषसमपीयूषपरिपूर्णे मनोहरे । अतलस्पर्शतास्पर्शस्पष्टपन्नगविष्टपे ।।५५**

**अर्थ –** ज्याच्या आज्ञेविना झाडाचे पानही हलत नाही; किंवा चिलटंसुद्धा हालचाल करीत नाहीत, त्या कालाचे उल्लंघन कोण करणार? अशी स्थिती जर कायम राहिली तर पुन्हा जरा-जन्माच्या आपत्तीत सर्वजण बुडू लागलीत. देवीच्या वचनानुरूपच बहुधा हे फल त्याला मिळाले आहे. यापुढे मी त्याला स्वतःचे स्थान दाखवून देईन. तू जितका कालावधी मिळेल तितका काळ भारतवर्षावर शासन कर. लोभ, मोहादी हे सर्व तुझे सहाय्यक होऊन तुझी सेवा करीत आहेत. दशरथाला ज्याप्रमाणे केकयी वंशातील पत्नी (कैकयी मिळाली, त्याचप्रमाणे त्या राजाला मोहिते घराण्यातील पत्नी (सोयराबाई) मिळाली. ती त्याची अत्यंत आवडती म्हणून देवांनीच मायेने निर्माण केली. महामोहाची ती भगिनी मनुष्यरूप घेऊन आली आहे. ममता नावाची ती तामसीच आहे; परंतु दैवाने ती अनुकूल बनून तुझे अभीष्ट करील. तू देखील भारतवर्षात यथाविधी अधिकार गाजवून आपल्या स्थानाप्रत जाशील.'' महादेवाने कृपाळू होऊन असे म्हटले. तेवढ्यात कैलासाहून कली येऊन त्याने पृथ्वीलोकावर दृष्टी टाकली. तो चालत असताना लोभ-मोहादीसुद्धा त्याच्या पाठोपाठ आले. जणूकाही ते एखाद्या राजाचे सैनिक किंवा याचकच होत.

विद्वज्जन म्हणाले, ''तो पूर्वी प्रमथाधिपती शंकराचा प्रमुख प्रथम (गण) होता, हे शंकराच्या भाषणावरून, कवीन्द्र, तुम्ही आमच्या लक्षात आणून दिले. कोणत्या मोठ्या पापाने त्याला कोणता शाप मिळाला, आणि त्याचे नाव काय? हे सर्व सरळपणे आम्ही ऐकू इच्छितो. त्याला शाप देण्यासाठी प्रभू शंभू किंवा स्थिरबुद्धी पार्वती यांखेरीज कोणीही गणसमुदायात समर्थ नाही.''

कवीन्द्र म्हणाले, ''तंडीप्रमाणेच वितंडी या नावाने तो प्रसिद्ध आहे. तो पशुपती शंकराच्या बाजूला असणारा, नंदीला अत्यंत आवडणारा, अत्यंत अभिमानी असा आहे. अमृताप्रमाणे मधुर जलाने परिपूर्ण अशा एका महासरोवरात निर्भयपणे तो व्रतविधान करीत होता. (सप्तपाताळांपैकी एक) अतलाला स्पर्श करणाऱ्या नागलोकांत फुललेली कमळे, त्यावर भुंगे फेऱ्या घालीत आहेत.

**भ्रमदिन्दिन्दिरे फुल्लदरविन्दपरम्परे । तपनोपलसोपानकिरणश्रेणिकर्बुरे ।। ५६ तरत्कादम्बकवके चरच्चक्रकदम्बके । तनुरिङ्गत्तरङ्गान्तः प्रतिमानितपुष्करे ।। ५७ व्रती व्रतविधानार्थी महासरसि निर्भयः । अवाचिनोत्सरोजानि स जातु सह भार्यया ।।५८ अत्रान्तरे द्रवत्सान्द्रमरन्दमसृणात्मना । कदम्बचम्पकाशोकवनलग्नेन वर्त्मना ।। ५९ जयाद्याभि–**

र्वयस्याभिः समेत्य निकषा स्थिताम् । गन्धर्वसुन्दरीवृन्दगीतसङ्गीतसादराम् ।।६० विचेतुमब्जखण्डानि सद्यस्तत्र समुद्यताम् । झाङ्कारकारिमधुपी झम्पासम्पातकातराम् ।। ६१ देवीं दाक्षायणीं नैष मनागपि ननाम ताम् । अथ सा सहसा किञ्चित्सहसा तमवोचत ।। ६२

देव्युवाच । मदमन्दमतेऽकारि बत मन्तुरयं त्वया । तदस्य दीयते तुभ्यं सान्दृष्टिकमिदं मया ।। ६३ दृष्ट्वा जन्मान्यनेकानि सृष्ट्वा धर्माननेकधा । प्लुष्ट्वा पापमशेषं च स्पृष्ट्वा तीर्थानि सर्वशः ।। ६४ भवान्दक्षिणदिग्वर्ती चक्रवर्ती भविष्यति । निहत्यैनस्विनो म्लेच्छान्सुरकार्यं करिष्यति ।। ६५ जले स्थले च विजने वने निरवनेऽपि च । प्रपाते वज्रपाते च हेतिपाते च सर्वतः ।। ६६ ग्रहाणां सन्निपाते च तद्वदत्याहितेष्वपि । किं बहूक्तेन सर्वत्र त्वत्पार्श्वे पार्श्ववर्तिनी ।। ६७ सततं पालयिष्यामि स्मृतमात्रैव सर्वथा । पावयिष्यति लोकश्च तवैषा प्रथिता कथा ।। ६८ तमंहसो निवृत्त्यर्थमित्युदीर्य दयावती । प्रशशास प्रसादेन सती न तु शशाप सा ।। ६९ सोऽथ तेनांहसा स्पृष्टः परिभ्रष्टः पदात्ततः । स्वरूपमात्मनो हित्वा विस्मृत्य च महीतले ।। ७० भ्रमन्मानुषदेहेन लब्ध्वा जन्मानि कानिचित् । वितण्डिर्जनुषानेन शिवराजो व्यजायत ।। ७१ मया भवत्प्रयुक्तस्य वाक्यस्यार्पितमुत्तरम् । श्रूयतां चातिदुर्वृत्तेः कलेर्वृत्तं तदुत्तरम् ।। ७२ स तदानीं रटदटद्यवनानीकसङ्कटम् ।। ७३ विलुप्तयजनस्थानं जनस्थानं विलोकयन् । विकत्थमानोऽतितमां मोहादीनिदमब्रवीत् ।। ७४

अर्थ – सूर्यकांत मण्याच्या किरणांनी रंगीबेरंगी झालेले, तोंडात काहीतरी धरून हंस पोहत आहेत, चक्रवाकांचे कळप फिरत आहेत, लहान लाटांतून वाढत जाणाऱ्या मोठ्या लाटांचे नर्तन होत आहे, अशा महासरोवरात तो व्रती आपल्या पत्नीसह कमळे गोळा करीत होता. तेवढ्यात पाझरणाऱ्या मधाने चिकट झालेल्या, कदंब-चंपक-अशोक वनाजवळील एका मार्गाने जया-विजया वगैरे सख्यांसह गंधर्वांच्या सुंदर स्त्रियांच्या गायनाकडे लक्ष देणारी, झंकाराच्या नादासह पुष्पमधू सेवन करणाऱ्या भुंग्यांच्या हल्ल्याने गांगरून गेलेली, कमळे वेचण्यासाठी अकस्मात तेथे आलेली देवी दाक्षायणी, (न पाहिल्यामुळे) तिला मुळीच नमस्कार केला नाही.''

तेव्हा ती जोरात त्याला म्हणाली, ''अहंकारामुळे बुद्धी मंद होऊन तू माझा अपराध केला आहेस. म्हणून मी तुला हे भविष्य सांगत आहे. अनेक जन्मांचा अनुभव घेतल्यानंतर सर्व तीर्थांच्या स्पर्शाने सर्व पापं धुऊन गेल्यावर तू दक्षिण दिशेला चक्रवर्ती होशील. पापी म्लेच्छांना मारून देवकार्ये करशील. जळीस्थळी, निर्जन जंगलात, जंगलाखेरीज नगरात, धबधब्यांच्या ठिकाणी, वज्रपात किंवा शस्त्रपात होताना देखील सर्व ग्रह एकत्र आले तरी अतिसंकटात देखील माझे स्मरण करताच बाजूला उभी राहून तुझे रक्षण करीन. तुझी ही प्रसिद्ध होण्यासारखी कथा लोकांना पावन करील. पापाच्या निवृत्तीसाठी त्या कृपाळू देवीने प्रसन्न होऊन त्याला प्रशासनासंबंधी उपदेश केला. परंतु त्याला शाप दिला नाही. त्या पापाचा स्पर्श झाल्याने तो आपल्या (प्रमथ) पदापासून भ्रष्ट झाला. आत्मरूप विसरला. पृथ्वीवर त्याला काही जन्म मिळाले. तोच वितंडी या जन्मात शिवराजा झाला. तू विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर मी दिले आहे. त्यानंतरची अतिदुष्ट कलीची हकिकत आता ऐक. त्यावेळी बडबडत व भरकटत, यवनांचे संकट पाहून यज्ञभूमीतून लुप्त होऊन, जनस्थान पहात असता मोहाने अतिशय बडबडू लागला.

कलिरुवाच । हे हे मोहकामलोभमानक्रोधमदादयः । भवतामेव हस्तेऽद्य विद्यते जगतीजयः ।। ७५ कुलयोषिदिव स्पृष्टा यवनैर्दुष्टचेष्टितैः । अतीव बत निर्वेदवती गोदावरी नदी ।। ७६ इदानीं कलुषीभूता प्रभूतावर्तवर्तिनी । न भाति सुकृताद्भ्रष्टा परित्यक्ता द्विजातिभिः ।। ७७ जग्ध्यर्थं बध्यते धेनुर्विष्ट्यर्थं बध्यते द्विजः । पचार्थं चात्र भज्यन्ते यवनैर्यज्वनां गृहाः ।। ७८ म्लेच्छाः सर्वे मम बलं म्लेच्छानामप्यहं बलम् । अत एतैर्मयाप्युच्चैराक्रान्तमवनीतलम् ।। ७९ अविद्धधर्मप्रोल्लासपरित्रासमयेऽर्णवे । मया वाराणसी नाम नगरी विनिमज्जिता ।।८० गुप्तमेव द्विजाः स्नान्ति न जपन्ति तपन्ति न । यथा भागीरथीतीरे तथा बत मया कृतम् ।। ८१ त्याजितैस्तुलसीदाम नाम चाप्रतिमं हरेः । माथुरैर्यवनत्रासाज्जीविताशा व्यमुच्यत ।।८२ दत्वा वरमविद्धेभ्यः पश्चात्तापमुपेयुषी । क्वापि ज्वालामुखी देवी गुप्तैवाद्यापि तिष्ठति ।। ८३ स्ववृत्तिमेव कुर्वाणाः श्ववृत्तिं संश्रयन्ति ये । अधर्म एव तैर्नूनं क्षत्रियैरद्य शिश्रिये ।। ८४ दृष्टो गौडश्चाहुवाणस्तथा विन्ध्यस्य चाधिपः । कतमः क्षत्रियोऽमीषां म्लेच्छैःसह युयुत्सति ।। ८५ ये ये सुकृतिनोऽभूवन् कृतिनोऽपि दिने दिने । ते तेऽमज्जान्क्षितिभुजःक्षुभिते मयि सागरे ।। ८६ अविद्धपतिना ह्यद्य क्षत्रियाः काल एव ते । कालरूपेण विध्वस्ताः शिव एको विशिष्यते ।। ८७ आराधितचरा दत्तवरा भगवती यतः । अतः सर्वजितानेन ताम्रवक्त्राः पराजिताः ।। ८८ त एते सह्यमादातुं प्रागल्भन्त यदा यदा । अपराद्धपृषक्त्वमन्वभूवंस्तदा तदा ।। ८९ अविद्धविहितावर्त-दार्यावर्तादुपद्रुताः । अद्य सह्याद्रिमासाद्य सुखिन्यः सान्ति देवताः ।। ९०

अर्थ – कली म्हणतो, ''हे काम, क्रोध, लोभ, मोह, मदादी विकारांनो! जगावर विजय मिळविणे तुमच्याच हातात आहे. गोदावरी नदीला यवनांच्या दुष्ट अत्याचाराचा स्पर्श झालेल्या कुल स्त्रीप्रमाणे अतिशय उद्वेग वाटला. द्विजातीनी बहिष्कार घातल्याने कलुषित झालेली व अनेक भोवरे निर्माण झालेली असूनही ती नदी पुण्यापासून भ्रष्ट झालेली वाटत नाही. खाण्यासाठी गाई मारल्या जातात, वेठबिगारीसाठी द्विजांना पकडले जाते आणि यज्ञ करणाऱ्यांची घरे यवनांकडून भटारखाने बनविण्यासाठी पाडली जातात. सर्व म्लेंच्छ हेच माझे बलस्थान आहे आणि मी देखील सर्व म्लेंच्छांचे बलस्थान आहे. त्यांच्याकरवी मीही पृथ्वीतलावर जोरदार आक्रमण केले आहे. म्लेंच्छ धर्माच्या प्रसारासाठी मी वाराणसी नगरी देखील बुडविली. त्या नगरीत भागीरथीच्या तीरावर ब्राह्मण चोरून स्नान, जप-तप करतात असे मी घडवून आणले आहे. तुळशीची माळ आणि अप्रतिम असे हरिनाम मथुरेच्या लोकांना टाकावे लागले. इतकेच काय, पण यवनांच्या भीतीमुळे त्यांनी जीविताची आशाही सोडली आहे. म्लेंच्छांना वर देऊन पश्चात्ताप पावलेली ज्वालामुखी देवी अजूनही गुप्तपणेच रहात आहे. केवळ उपजीविकेसाठी जे कुत्र्याचे जिणे जगतात, त्या क्षत्रियांनी खरे म्हणजे हल्ली अधर्माचा आश्रय केलेला आहे. गौड पाहिला, चव्हाण पाहिला, विंध्याचा अधिप पाहिला. यांपैकी कोणता क्षत्रिय म्लेंच्छांबरोबर लढू इच्छितो? जे जे कोणी पुण्यवान आणि धन्य झाले ते सर्व राजे मी रोजच्या रोज क्षुब्ध होणाऱ्या सागरात बुडवून टाकले. म्लेंच्छ स्वामीने ते क्षत्रिय आज काळरूपाने उद्ध्वस्त करून टाकले आहेत. एक शिव तेवढा शिल्लक आहे. बरीचशी आराधना करून वर मिळाल्याने भगवतीमुळे सर्वत्र जय मिळवणाऱ्या त्याने मोगलांचा पराजय केला. ते जेव्हा जेव्हा सह्याद्री घेण्यासाठी प्रबळ होऊ लागले, तेव्हा तेव्हा त्यांना अपराधीपणाची टोचणी लागली. म्लेंच्छनिर्मित वादळामुळे आर्यावर्तातून (= उत्तर भारतातून) पळून आलेले देव सह्याद्रीला पोचल्यावर सुखी झालेले आहेत.

या विनिर्मितपूर्वा हि मया मद्धर्मपद्धतिः । साऽस्मिन्सह्याद्रिखण्डेऽद्यप्रभृति प्रचरिष्यति

।। ९१ यत्र कार्मणसंसिद्धिः सिद्धीनां सिद्धिरुत्तमा । सम्यगङ्गमृजास्नानं ध्यानं नेत्रनिमीलता ।। ९२ परसेवा महाभाग्यं कृषिवृत्तिः कुलीनता । सम्बन्धिभोजनं धर्मः पितुःश्राद्धमुदारता ।।९३ पाखण्डवादः पाण्डित्यं नास्तिक्यं ब्रह्मवादिता । अदाक्षिण्यं परिच्छेदः ।।९४ पशोर्विशसनं यागः कुटुम्बभरणं यशः । परापकर्ष उत्कर्षो गृहत्यागो कार्पण्यमुचितज्ञता ।।९४ पशोर्विशसनं यागः कुटुम्बभरणं यशः । परापकर्ष उत्कर्षो गृहत्यागो विरक्तता ।। ९५ क्लीबता स्वगृहे वासः प्रतिष्ठा श्वशुराश्रयः । जरार्तजनकानुज्ञाकरणं करुणारसः ।। ९६ प्रयोजनाय महते ब्रह्मास्त्रं वचनं स्त्रियाः । अर्थिने दक्षिणादानमनर्थानां परम्परा ।। ९७ इत्यादीनि रहस्यानि यत्र सन्ति सहस्रधा । मद्धर्मपद्धतिः साद्य पठ्यते पण्डितैः सदा ।। ९८ पठन्ति च पठिष्यन्ति राजानः प्रथितामिमाम् । व्रतिनां यतिनां किञ्च वणिजाञ्चातिवल्लभाम् ।। ९९ यश्चकास्ति पटुर्वादे काश्यां कौक्कुटिकाग्रणीः । भाट्टदेवीभट्टवंश्यः प्रथमो वेदपाठिनाम् ।। १०० प्रभाकरमताभिज्ञः श्रौतसागरपारगः । कार्कशस्तर्कशास्त्रेऽपि स्मृत्यर्थानां प्रवर्तकः ।। १०१ शृङ्गारः शब्दशास्त्रस्य गागाभट्टः स मे सखा । उपेत्य सद्यः सह्याद्रिमिमां विस्तारयिष्यति ।। १०२ इत्युक्तास्तेन तेऽप्यैनमूचुर्मोहमदादयः । साधयिष्यसि यत्तद्धि सद्यः सिद्धं न संशयः ।। १०३ परिवेष-विनिर्मुक्ताभ्युदितप्रायवाडवम् । क्षतव्रतप्रायसत्रिब्रह्मचारियतीश्वरम् ।। १०४ बलूलप्रायवृषभं कुरूपप्रायमानुषम् । प्रभ्रष्टप्रायधर्मिष्ठं नष्टप्रायाग्निहोत्रकम् ।। १०५

अर्थ – जी धर्मपद्धती मी पूर्वी तयार केली होती, ती सह्याद्री विभागात आजपासून प्रचारात येईल. ज्या ठिकाणी कर्मातून यश मिळत जाते किंवा जादू हस्तगत होते, तेच सर्वसिद्धीत उत्तम असे यश समजावे....

डोळे मिटून घेणे हेच ध्यान, दुसऱ्याची चाकरी म्हणजे परमभाग्य. शेतीवर जगणे हाच खानदानीपणा, नातलगांना भोजन देणे हाच धर्म, पित्याचे श्राद्ध करणे म्हणजे मोठीच उदारता. नास्तिकतेची बडबड म्हणजे पांडित्य आणि नास्तिक्य हेच परब्रह्मावरील प्रवचन, यज्ञाला विरोध हाच विवेक, कंजुषी म्हणजे औचित्याचा विचार. पशुहत्या हाच यज्ञ, कुटुंबाचे भरणपोषण हे सुयश, दुसऱ्याचा पाडाव म्हणजे उत्कर्ष, घर सोडून निघून जाणे म्हणजे वैराग्य. आपल्याच घरात स्वतःला कोंडून घेणे हे क्लैब्य आणि सासुरवाडीला जाऊन राहणे हीच प्रतिष्ठा. म्हातारपणामुळे विकल झालेल्या बापाची संमती हे कारुण्य. काही साध्य करावयाचे असले म्हणजे बायकोचे वाक्य हेच ब्रह्मास्त्र. याचकाला काही देणे ही अनर्थाची परंपरा. अशाप्रकारची हजारो रहस्ये जेथे असतील, ती माझी धर्मपद्धती. ती नेहमी पंडित पढत असतात. तीच प्रसिद्ध पद्धती राजेलोकही पढतात आणि पढत राहतील. व्रती, यती आणि व्यापारी यांची ही अत्यंत आवडती पद्धती आहे. काशीमधे जो वादपटू म्हणून प्रकाशात आला, तोच अहिंसावाद्यांचा किंवा (हीन कुळात जन्मास आलेला म्होरक्या), भट्ट वंशातील भाट्ट संप्रदायी, वेदपाठातील प्रमुख, प्रभाकरमत जाणणारा, वैदिक वाङ्मयसागर तरून गेलेला, तर्कशास्त्राचा कठोर प्रवक्ता, स्मृतीतील अर्थाचा प्रवर्तक आणि व्याकरणशास्त्राचे भूषण असलेला गागाभट्ट माझा मित्र आहे. तो येऊन झटकन सह्याद्रीचा (= येथील राज्याचा) विस्तार करील. कलीने अशाप्रकारचे भाषण ऐकविल्यावर मोह-मदादी देखील त्याला म्हणाले, "जे साध्य करणार म्हणता ते आधीच सिद्ध झाले आहे. अन्न वाटण्याच्या सेवेतून मुक्त होऊन जिकडेतिकडे घोड्यांच्या पागाच वाढल्या आहेत. यज्ञ करणारे (गृहस्थ), ब्रह्मचारी आणि यतिवर यांची व्रते संपल्यासारखीच आहेत. माजलेल्या बैलाचीच चलती आहे. माणसांना



रयाच राहिली नाही, धार्मिक लोकही भ्रष्ट झाले आहेत, अग्निहोत्रे नष्ट झाली आहेत.

नास्तिकप्रायनगरं स्मशानप्रायचत्वरम् । कुलटाप्रायनारीकं मृत्प्रायखनिभूमिकम ।।१०६ अस्तप्रायधनं धर्मध्वजिप्रायजनं जगत् । जितमायुष्मता सर्वमेवमेव व्यजायत ।। १०७ अशनार्थमुषःस्नानं द्वेषणार्थं जपो महान् । वादार्थमर्थ्यते विद्या दुग्धार्थं धेनुरिष्यते ।। १०८ प्रतिष्ठार्थं पुण्डरीको वृत्त्यर्थं साधुवृत्तिता । व्यायामार्थं देवयात्रानमस्कारपरिक्रमाः ।। १०९ निवृत्यर्थं गुरुत्वादेर्गदस्योदरवर्तिनः । शिवरात्रिव्रतं तद्वत्सम्यगेकादशीव्रतम् ।। ११० चान्द्रं तथा हविष्यान्नं नक्तमेकाशनं तथा । कृष्यर्थं वार्षभीमसेवा न तु धर्मार्थमात्मनः ।। १११ कले तव बलेनैव यवनैर्वृजिनात्मभिः । मज्जिता मथुरा नाम तथा वाराणसी पुरी ।। ११२ मज्जिता च बतायोध्या युद्ध्वा युद्ध्वाप्यनेकधा । मज्जितं च कुरुक्षेत्रं स्थाणुतीर्थसमन्वितम् ।। ११३ अद्यारभ्य मदाद्यैस्तु सह्याद्रिः परिभूयते । यमिना शिवराजेन यद्यप्यत्र प्रभूयते ।। ११४ धर्म एव प्रवर्तन्ते मन्त्रिणोऽस्य विचक्षणाः ।अतोऽमून्भ्रंशयिष्यामो यथामी स्युर्विलक्षणाः ।। ११५

अर्थ – नगरात बहुतेक सर्व नास्तिकच झालेत, चव्हाट्यांना स्मशानाची कळा आली आहे, स्त्रिया कुलटा झाल्या आहेत आणि खाणींच्या जागेत फक्त माती उरली आहे. वैभव संपत्ती अस्ताला गेली आहे आणि लोकांनी धर्माचा फक्त आव आणला आहे. असे हे जग तुम्ही जिंकले म्हणजे सर्वच जिंकले. भोजनासाठी उषःस्नान, द्वेष करण्यासाठी मोठे जप, वादासाठी विद्यार्जन आणि दुधासाठीच गायीची इच्छा, प्रतिष्ठेसाठीच श्वेतछत्र, उपजीविकेसाठी संभावितपणा, व्यायामासाठी देवयात्रा, नमस्कार, प्रदक्षिणा इ. ढेरपोटेपणा जावा म्हणून शिवरात्री व्रत, एकादशी व्रत, चांद्रायण, हविष्यान्न, नक्त आणि एकभुक्त राहणे, शेतीसाठी बैलांची सेवा, धर्मासाठी काहीच नव्हे. अशा रीतीने हे कलीपुरुषा! तुझ्याच बळावर पापी यवनांनी मथुरा आणि वाराणसी तसेच अयोध्या ही क्षेत्रे बुडविली. पुन्हा पुन्हा अनेक प्रकारे युद्धे करून स्थाणू तीर्थासहित कुरुक्षेत्रही बुडविलेस. आजपासून माझ्यासारख्याकडून संयमी शिवराजांचा येथे प्रभाव असला तरी सह्याद्रीला नामोहरम करू पाहत आहेस. त्याचे हुशार मंत्री धर्मनिष्ठ आहेत. त्यांना आम्ही भ्रष्ट करू. त्यामुळे ते बदलतील.

मन्त्रिणां लेखकानाञ्च सैनिकानाञ्च भूयसाम् । आश्रितानां श्रोत्रियाणां दीक्षितानां पुरोधसाम् ।। ११६ सामाजिकानां सर्वेषां तत्तद्दानाधिकारिणाम् । हृदयानि प्रवेक्ष्यामः करिष्यामः स्वमीप्सितम् ।। ११७ विलम्ब्यतां नापि मनाक्कर्त्तव्यमवलम्ब्यताम् । आदिश्यतां विवेकेन केन किं क्रियतामिति ।। ११८

अर्थ – मंत्री, लेखक आणि पुष्कळसे सैनिक यांचे आश्रित असलेले ब्राह्मण, दीक्षित (यज्ञकर्ते), पुरोहित, ज्यांना ज्यांना म्हणून दानाचा अधिकार आहे, अशा सर्व समाजातील प्रतिष्ठितांच्या अंतरंगात शिरून आम्ही, आम्हाला हवे ते करवून घेऊ. थोडादेखील विलंब नको. कर्तव्याचा अवलंब करायला हवा. कोणी काय काय करावे, याचा विचार करून आपण आज्ञा करावी."

कलिरुवाच । अये मोहमहो हन्त मनो हन्त त्वमाविश । मदीयेन प्रभावेण प्रपूरय दिशो दश ।। ११९ वशे ब्रह्मगिरिर्यस्य ब्रह्मविष्णुशिवात्मकः । ऋते त्वां तन्मतिभ्रंशं विधातुं प्रक्रमेत कः ।। १२० अधर्मः पण्डितंमन्यमण्णाजिं विशतु ध्रुवम् । दत्ताजिं द्विजविद्वेषो दम्भोः नीराजिनामकम् ।। १२१ मत्तं मयूरनामानममात्यं चापि मत्सरः । श्यामात्मानं श्यामजितं मदलोभावुभावपि ।। १२२

अर्थ – कली म्हणतो, "अरे प्रबल मोहा! तू त्यांच्या मनात प्रवेश कर, माझ्या प्रभावाने दाही

दिशा भरून टाक. ब्रह्मा, विष्णू, शिवात्मक, ब्रह्मगिरी ज्याच्या ताब्यात आला, अशा तुझ्याशिवाय त्या लोकांचा बुद्धिभ्रंश करायला कोण धजेल? अधमानें स्वतःला पंडित समजणाऱ्या अण्णाजीच्या अंतरंगात शिरावे. ब्रह्मद्वेषाने दत्ताजी, दंभाने निराजी, मत्सराने उन्मत्त अमात्य मोरोपंत, मद आणि लोभ या दोघांनाही कृष्णकृत्ये करणारा श्यामजी.

**क्रोधः पण्डितराजश्च दानधर्माधिकारिणम् । स्तेयं सेनापतिं सर्वं नास्तिक्यं च पुरोधसम् ।। १२३ राप्रतिनिधिं राहुरित्याहुर्यं विचक्षणाः । आविशत्वविवेकस्तमवसादितसज्जनः ।। १२४ समास्थाय पदं स्वं स्वं निधत्ताथ पदं स्थिरम् । अथवा ह्यद्य सर्वेऽपि सर्वान्विशत माचिरम् ।। १२५**

अर्थ – क्रोधाने दानाध्यक्ष पंडितराज, चौर्याने सेनापती, नास्तिक्याने पुरोहित, राहूने राजप्रतिनिधी याप्रमाणे ज्याला त्याला सांगितले आहे. त्या हुशार विकारांनी त्या त्या पुरुषांना वश करावे. अविवेकाने त्यांना भारून टाकून सज्जनांना क्षीण करावे, आपापल्या जागी राहून स्थिर पावले टाकावीत. किंवा सर्वांनीच आता सर्वांच्यात प्रवेश करावा. आता उशीर करू नका.''

**इति किल कलिना विनीय गाढं शिवनृपतौ मलिनात्मना नियुक्ताः । कथमपि निजकार्यभारभन्ते शिरसि निजेऽथ यथा विभागमूहुः ।। १२६ येन प्रोद्यन्नयेन त्रिगतिविजयी निर्जितः पञ्चबाणः किञ्च स्तब्धेन लोभोप्यहह विरचितो येन रेणुप्रमाणः । यश्छत्रैकाधिकारी शिव इति विदितो यः सुमेरोः समानस्तं लेभे विप्रलब्धुं किल कलिवचनात्कोऽपि मोहः समानः ।। १२७**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे क. अध्यायः ।।**

१२६-१२७ अर्थ – याप्रमाणे कलीने प्रभावीपणे आदेश देऊन शिवाजीराजांच्या मनात ठिकठिकाणी (?) मलिन बुद्धी स्थापिली. (उत्पन्न केली.) ते कसेतरी आपले काम सुरू करू लागले आहेत. शिरावर आपापल्या विभागाप्रमाणे भार वाहत आहेत. तीनही जगतात ज्याची गती विजयी आहे अशा त्या मदनाला नीतीच्या पुरस्कर्त्या शिवाने पूर्णपणे जिंकले. स्तब्ध राहून लोभालाही अणूप्रमाणे करून टाकले. जो शिव म्हणून, छत्रपती म्हणून सर्वज्ञात आहे, सुमेरूप्रमाणे विशाल आहे, त्याला कलीच्या आज्ञेने फसवू पाहणारा मोह महान समजायचा का?

।। अनुपुराणे सूर्यवंशे कवी कवीन्द्र अध्यायः ।।

**अध्याय १४**

**मूळ संहितेतील विभाग १ मधील पहिले दोन श्लोक गहाळ झाल्याचे म्हटले आहे, तसेच तिसऱ्या विभागातील या १४ व्या अध्यायातील पहिला श्लोक हा नमनाचा असल्यामुळे तो पहिल्या विभागातील नमनाचा, म्हणजे गहाळ झालेल्या श्लोकांपैकी असावा म्हणून तो आम्ही सुरुवातीला विभाग १ मध्ये घेतला आहे.**

**पुरोहितप्रभृतिभिर्वेदवेदाङ्गवेदिभिः । अनूचानैः प्रवचनैर्मन्त्रविद्भिश्च मन्त्रिभिः ।। २ श्रौतेन विधिना सम्यगभिषिक्तः शिवो यदा । बतातुर इवातीव कातरात्मा कलिस्तदा ।। ३ कैलासवासिनं देवं गिरीशं तेजसां निधिम् । भालस्थहुतभुक्कीलालीलाप्लुष्टमनोभवम् ।। ४ क्षणध्वस्तान्ध-कध्वान्तं त्र्यम्बकं त्रिपुरान्तकम् । स्वभावसिद्धविभवं भवं भवभयापहम् ।।५ भीममप्यभयाकार-मुग्रमप्यतिसुन्दरम् । अनादिमादिं सर्वस्य कृत्तिवाससमीश्वरम् ।। ६ जगदेकगतिं भूतपतिं मृत्युञ्जयं मृडम् । शङ्करं सर्वलोकानां शङ्करं प्रत्यपद्यत ।। ७**



**अर्थ** – पुरोहितादिकांनी आणि वेदांगांच्या जाणकारांनी, विद्वानांनी, प्रवचनकारांनी आणि उत्तम सल्लागार अशा मंत्र्यांनी, वैदिक विधीने शिवरायांना जेव्हा यथायोग्य अभिषेक केला, तेव्हा कलिपुरुष आजारी माणसाप्रमाणे अतिशय नाउमेद झाला. कैलासपती महादेव कपाळावरील नेत्रातील अग्निज्वाळांनी लीलया मदनाला जाळणारा, क्षणात अंधकासुराच्या तामसीपणाला उद्ध्वस्त करणारा, त्रिनेत्र त्रिपुरांतक स्वभावसिद्ध वैभवाचा भवभय घालवून देणारा, भयानक असूनही अभय देणारा, उग्र असुनी अतिसुंदर, अनादी सर्वांचा आदिपुरुष हत्तीचे कातडे पांघरलेला, ईश्वर, जगाचे आश्रयस्थान, भूतपती, मृत्युंजय, मृड (=दयाळू), सर्व लोकांना कल्याणकारक अशा शंकराला शरण गेला.

**अथ कल्पद्रुमलतामण्डपान्तर्निवेशिते । पूर्णेन्दुमंभिः । आवेद्यमानजननं स्वर्णवञ्जुल-पाणिभिः ।। २४**

टीप :- (श्लोक ८ ते २३ गहाळ झाले आहेत. मूळ संहितेतील पान २ व ३ वर ते असावेत म्हणजे ते पान १ला जोडून असावेत. २४ व्या श्लोकाची पहिली ओळ गहाळ आहे व दुसरी ओळच फक्त मिळते. त्यामुळे श्लोक क्रमांक २५ पासूनचा अनुवाद केला आहे.)

**द्वितीयमिव कैलासमधिकैलासमास्थितम् । दिदृक्षुर्दिविषल्लोकविलोकितमलोकत ।।२५ दवीयानेव देवाय नन्दिना स निवेदितः । सन्दानिताञ्जुलिपुटः प्रणनाम पुरःस्थितः ।। २६ अथो गदितुमाज्ञप्तः शर्वेणोन्नमितभ्रुवा । स तस्मै स्वविनिर्वेदहेतुमाचष्ट तत्वतः ।। २७**

**अर्थ** – त्यावेळी दुसरा कैलासच, कैलासावर बसलेला, स्वर्गातील लोकांची विलसिते पाहू इच्छिणारा, असा शंकर दिसला. कली दूर असतानाच नंदीने देवांना वर्दी दिली. हाताची ओंजळ करून, समोर उभे राहून त्याने देवाला नमस्कार केला. तेव्हा भुवया उंचावून शंकराने त्याला बोलण्यास उद्युक्त केले. कलीने आपल्या निराशेच्या कारणाचे स्पष्टीकरण केले-

**कलिरुवाच । यद्दत्तंपूर्वं भवता मह्यं माहेश्वरं युगम् । उदभूदधिभूस्तत्र मदन्य इति किं कृतम् ।। २८ पुराराते प्रसन्नेन यदुक्तं मे पुरा त्वया । पश्य सर्वज्ञ भगवन् राजते तदवज्ञया ।। २९ अनेन सा नैषधेन पर्यपालि यथा पुरा । अनेन सा तथा शाहसुतेन परिपाल्यते ।। ३० उच्चैः सुकृतिनानेन कृतिना कृतिभिर्युगम् । कृतमेवाकारि यदा गतिः काऽपि न मे तदा ।। ३१ महाकालस्य ते रूपं काल एष सनातनः । वत्सरान्तो निमेषादिश्चक्रवद्यो विचेष्टते ।। ३२ आब्रह्मस्तम्बपर्यन्तं यत्र लोकाः पुनः पुनः । भूत्वा भूत्वा प्रलीयन्ते समुद्र इव वीचयः ।। ३३ यत्र ब्राह्म्य(ह्म)महः सर्वं मनूनामन्तराणि च । युगान्येतानि च पुनः पुनरायान्ति यान्ति च ।।३४ यस्य यः समयस्तस्मिन्स वर्तेत यथाविधि ।। ३५**

**अर्थ** – कली म्हणतो, ''आपण मला यापूर्वी जी जबाबदारी सोपविली, त्या ठिकाणी दुसराच कुणीतरी बलवत्तर निर्माण झाला. हे आपण काय केले? हे शंकरा, आपण प्रसन्न होऊन मला जे काही पूर्वी सांगितले, त्याची सर्वत्र अवज्ञाच होत आहे. पूर्वी नैषध राजा जसा वागला, तसाच हा शाहूराजांचा मुलगा वागत आहे.(?) मोठ्याच पुण्यात्माने आपल्या कृत्याने हे कृतयुग बनविले व स्वतःला धन्य करून घेतले. त्यामुळे मला आता काहीच वाव नाही. काल सनातन असून आपलेही रूप महाकालाचेच आहे, निमेषापासून संवत्सरापर्यंत कालचक्राप्रमाणे फिरतोच आहे. सागरातील लाटांप्रमाणे, ब्रह्मापासून गवताच्या काडीप्रमाणे लोक आपले जन्माला येताहेत आणि नष्टही होत आहेत. ब्रह्मदेवाचा दिवस, मन्वंतरे आणि युगे येतात आणि जातात. ज्याचा जो समय ठरलेला

असतो, तो तो सार्थ होतो.

कृते युगे चतुष्पादस्त्रेतायां तु त्रिपादभूत् । द्वापारे तु द्विपाद्भत्वा धर्मः क्षमामवतिष्ठते ।।३६ स एकपात्पुनस्तिष्ये तिष्ठन्नपि न तिष्ठति । विधिना विहितास्त्येषा धर्मस्यास्य व्यवस्थितिः ।। ३७ प्रमथ्नाति प्रमत्तात्मा तामिमा प्रमथस्तव । यत्र प्रशासति मही धर्मस्यैवास्ति दीक्षितः ।। ३८

अर्थ – कृतयुगात धर्माला चार पाय होते. त्रेतायुगात तीन पाय आणि द्वापार युगात दोन पायांनीच तो पृथ्वीवर अवतीर्ण होतो. तो तिष्य नक्षत्रावर उभा असूनही उभा राहू शकत नाही. ब्रह्मदेवानेच धर्माची अशी व्यवस्था करून ठेवली आहे. तुझा अनुयायी प्रमत्त होऊन खळबळ माजवीत आहे. ज्या ठिकाणी पृथ्वीवर राज्य करावयाचे, तेथेच तो धर्मदीक्षित झाला आहे.

हेमसिंहासनासीनो हेमाचल इवापरः । महाबाहुर्महाराजः शम्भुराजौ व्यराजत ।। ३९ जामदग्न्येन रामेण बलिना दानवेन च । कल्पद्रुमेणापि च यश्चिरस्य निरकारि न ।। ४० दैन्यं द्विजातिजातीनां तदनेन दयालुना । प्रददानेन वित्तानि तदा द्रुतमयाकृतम् ।। ४१ पुरोहितास्तथाचार्या ऋत्विजः श्रोत्रिया अपि । तत्तत्कर्मण्यधिकृतास्ततोऽन्येऽपि च सूरयः ।।४२ आसमुद्रावनीभागवर्तिनो येऽवनीपकाः । धनदेनामुना सर्वे ते तदा धनदीकृताः ।। ४३

अर्थ – सुवर्णसिंहासनावर बसलेला जणू दुसरा हिमालयच असा महापराक्रमी शंभूराजा आहे. परशुरामाने, बळीने, दानवाने आणि कल्पवृक्षानेही बराच काळ ज्याचा निषेध केला नाही असे दैन्य या दानशूर आणि दयाळू राजाने धन देऊन लवकरच साध्य केले. पुरोहित, आचार्य, ऋत्विज, श्रोत्रिय अशाप्रकारचे त्या त्या कामी योजलेले विद्वान आणि आसमुद्र राज्य करणारे राजे या सर्वांना त्याने धन देऊन श्रीमंत केले आहे.

महोदयादहो तस्माद्दानशौण्डाद्द्यावतः । प्राप पञ्चसहस्राणि यः पञ्चाशदयाचत ।। ४४ स्वर्णरत्नादिवासांसि गोतुरङ्गमतङ्गजान् । अजाविकमदाच्छम्भूराजो राजसभास्तुतः ।। ४५ त्यागलीलामुदवहत्तथा तस्य प्रभोः शयः । यथा विपश्चितां लेप्सु(लिप्सु)गृहेषु स्वर्णराशयः ।। ४६ दिल्लीन्द्रप्रभृतिप्रतीपपृतनावस्कन्दनास्कन्दनस्पष्टस्कन्दसमानमानमहसः सम्पन्नधर्मस्थितेः । भूलोकैकगतेः सदाशिवदयोदञ्चत्प्रभुत्वोन्नतेः शम्भुच्छत्रपतेः सदोदितमिदं साम्राज्यमुद्योतते ।।४७

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरकवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायामध्यायशतसम्मितायां शुभलक्षणलक्षितायां वैयासिक्यामध्यायः ।

अर्थ – त्या दयाळू व दानशूर राजाला, पन्नास मागितले तर पाच हजार मिळाले. सुवर्णरत्ने, वस्त्रे, गाई, घोडे, हत्ती, शेळ्या, बकऱ्या राजसभेत स्तुती केल्यामुळे शंभूराजांनी त्यांना दिल्या. लोभी विद्वानांची घरे सुवर्णाच्या राशींनी भरली. अशी ही या राजाची दानलीला आहे. दिल्लीश्वरादिकांच्या शत्रुसैन्यावर चालून जाऊन हल्ले करणे, यामुळे कार्तिकेयाप्रमाणे सन्मान आणि कीर्ती असलेल्या, तसेच धर्मस्थितीने संपन्न असलेल्या भूलोकाचा मुख्य आश्रय असलेल्या शंकराच्या वाढत्या कृपेने आपले प्रभुत्व वाढविलेल्या शंभू छत्रपतींचे साम्राज्य सदोदित विलसत आहे.

अनुपुराण सूर्यवंशे निवासकर कवीन्द्र परमानन्द प्रकाशित शतसंहितांचा शुभलक्षणकारक वैयासिक अध्याय.

* * *



# प्रकरण ५

## शहाजादा अकबर आगमनागमन -
**विभाग १, श्लो. ७६–८२, श्लो. १२४–१४७**

---

### शहाजादा अकबर आगमन -

तद्योगादभयार्थमागतवता स्थातुं स्थलं याचितं । दिल्लीशस्य सुतेन शुद्धमतिना श्रेष्ठैः सह क्षत्रियैः । सोत्साहं ह्यभयङ्करं त्वकबरस्यादाच्च शम्भुः प्रभुः । देवस्थानविनाश–नोद्भवमनस्तापापनुत्यै स्थिरम् ।। ७६

अर्थ – त्या योगाने दिल्लीपतीच्या सुबुद्ध मुलाने वरिष्ठ क्षत्रियासह (दुर्गादास राठोड) शरण येऊन आश्रयासाठी याचना केली आणि देवस्थानांचा नाश केल्याने झालेला मनस्ताप घालविण्यासाठी आश्रयाला आलेल्या अकबराला आनंदाने चांगले आश्रयस्थान दिले.

दिल्लीशोऽपि यदा सुतोपरि रुषा क्षुब्धाब्धिवच्चुक्षुभे छन्नं तद्रविमण्डलं कुरजसा दिङ्मण्डलं च क्षणात् । शेषोध(द्य)त्फणिमण्डलं विदलितं भूमण्डलं कम्पितं त्वैकं ह्यप्रतिमं निरैक्षत तदा शम्भोर्न हृन्मण्डलम् ।। ७७

अर्थ – दिल्लीश्वर (औरंगजेब बादशहा) खवळलेल्या समुद्राप्रमाणे आपल्या मुलावर क्षुब्ध झाला आणि जणू काही सूर्यमंडळ आणि आकाश धुळीने भरून गेले. शेषाने उभारलेले फणिमंडळ विदलित झाले, भूमंडळ थरथरू लागले. यावेळी शंभूराजांचे मन मात्र अतिशय शांत दिसले.

न्य(वि)ग्राह्यावेकदैवेत्यतिरभसभरप्रोल्लसल्लीलया वा लोकानादर्शयन् किं निजबलविभवं प्रोल्लसद्वेलया वा । शम्भोस्तद्वत्तनूजस्य च समितिमतौ सम्प्रमूढो दिलीशः क्रोधान्धो वासनन्धः प्रकृतिमुपगतो वीक्षणं नो चकार ।। १२३

अर्थ – शंभूराजे आणि आपला मुलगा (अकबर) यांच्या मैत्रीने औरंगजेब अत्यंत दिङ्मूढ झाला. एकदमच मोठी ताकद लावून दोघांना सहजगत्या पकडावे किंवा उसळणाऱ्या प्रवाहात संधी साधून आपले सैन्यवैभव लोकांना दाखवावे, असा क्रोधाने अंध होऊन सर्पाप्रमाणे चवताळून, मूळ स्वभावावर आला; पण त्याने परिस्थितीचे योग्य निरीक्षण केले नाही.

सङ्क्रुद्धस्त्वथ सञ्चचाल दलितक्षोणीशदिल्लीश्वरश्चित्तं चेदिलशाहतत्कुतुपयो (?) र्दिक्दक्षिणं तत्रसे । गन्तुं सर्वदिगन्तराणि सततं हन्तुं साखान्यप्यलं साशङ्कं जगतीतलं समभवन्निःशङ्कमासीद्भयम् ।। ७८

अर्थ – अनेक राजांना पादाक्रांत करून अतिशय क्रुद्ध होऊन दिल्लीश्वर त्याच वेळी दक्षिणेकडे निघाला. दक्षिणेचे आदिलशहा व कुतुबशहा यांचे चित्त भयग्रस्त झाले. स्वतःच्या सुखांचा त्याग करून बादशहा पुढे निघाला आणि जग निःशंकपणे भिऊन गेले. (जगात सर्वत्र भीतीचे वातावरण निर्माण झाले.)

सामन्ताः शरणङ्गताः शशमिरे पुण्डाः प्रचण्डाः पृथक् । दैत्यांशा ववृधुस्तदा गजघटाशुण्डाभृशुण्डायुधाः ।। चामुण्डावररुद्धसम्भ्रमधरः श्रीशम्भुराजश्चलच्छात्रव्यापृत–पाणिपङ्कजतलः स्वैरं समाचेष्टते ।। ७९

**अर्थ** – मांडलिक राजे शरण आले. ठिकठिकाणचे बलवान गुंड शांत झाले. दैत्यांचा अंश वाढू लागला. त्यांच्याजवळ हत्ती आणि भृशुण्डाप्रमाणे शस्त्रे होती. परंतु शंभूराजे मात्र चामुण्डा देवीच्या वराने आपला संभ्रम आवरून आपल्या करकमलावर शस्त्रांचा पसारा घेऊन स्वैरपणे संचार करीत फिरत होते.

**सावन्तो वृकवद्वृकोदरनिभाः फैरङ्गिकाः सर्पवत् श्यामास्याः शुनवत्सदैव परितः कुर्वन्ति कोलाहलम् । दिल्लीशोऽपि पुरःप्रचण्डबलभृन्नायात एव स्फुरन् श्रीमद्रायगिरीश्वरो विजयते शम्भुर्नृसिंहप्रभः ।। ८०**

**अर्थ** – मांडलिक राजे कोल्ह्या-लांडग्याप्रमाणे, फिरंगी सापाप्रमाणे, सिद्दी (शामल) कुत्र्याप्रमाणे सतत भोवताली कोलाहल करीत असताना दिल्लीश्वर देखील प्रचंड सैन्य घेऊन समोरच्यांना स्फुरण देत चालला. परंतु श्रीमत् रायगडावर राहणारे शंभूराजे नरसिंहाप्रमाणे विजयी राहोत.

**हेलोत्खातविपक्षलक्षदलितप्रत्यब्धिसन्मेखलो वेलावेलविवर्जिताखिलजगद्देव-द्विजोत्सारणः । शम्भोः सन्महिमाप्रतापगरिमा वक्तुं न संशक्यते निःशङ्कोऽप्यवरङ्गशाहसदृशः शम्भुं नृपं शङ्कते ।। ८१**

**अर्थ** – लीलेने लाखो शत्रूंचा निःपात करून (पराक्रमरूपी दुसऱ्या समुद्राची) मेखला धारण करणारा, मर्यादा-अमर्यादा बाजूला ठेवून जगातील देवब्राह्मणांना दूर सारणारा शंभूच्या पराक्रमाचा महिमा वर्णन करण्याच्या पलीकडचा आहे. औरंगजेबासारखा बादशहासुद्धा शंभूराजांना भीत होता यात शंका नाही.

**मर्यादां भृगुवंशभूषणमणेरुल्लङ्घ्य सेनाभरैः सालीरीप्रमुखान्पुरन्दरयुतान्देशान्सहा-कोकणान् । सप्ताब्दावधि कालयन्नतितरां दुर्गाणि संसाधयन् शम्भुर्दुर्यवनो द्वयोर्यवनयोस्तूर्णीं गलेष्वापतत् ।। ८२**

**अर्थ** – सैन्याच्या प्रचंड आघाताने भृगुवंशाची भूषणभूत मर्यादा (परशुराम क्षेत्र ही मर्यादा) उल्लंघून साल्हेरी, पुरंदर आणि असे अनेक किल्ले तसेच कोकण प्रांत सात वर्षांच्या अवधीत ताब्यात घेऊन (यवनांना अजिंक्य असा शंभू) दोन यवनांच्या गळ्यात तो शांतपणे पडला. (कुतुबशहा आणि आदिलशहा यांच्याशी मैत्रीचे संबंध निर्माण केले.)

**प्रत्यूहप्रतिघातिकातिशुभदा शम्भो नृपे सर्वदा शम्भुस्नेहपरम्परैव नितरां वर्वर्ति सर्वोपरि । सर्वेऽपि प्रतिपन्थिनः प्रसरिता अन्तर्बहिःस्था जना जानाते जनतागतो जनपदः का नो गतिर्भाविनी ।। १२४**

**अर्थ** – शंभूराजे असताना अडचणी दूर करणारी आणि अतिशय शुभकारक अशी शंभूवरील प्रेमाची परंपराच सर्वदा विजयी असो. आतले आणि बाहेरचे सर्व विरोधक इकडे-तिकडे पसरले आणि देशातील जनता आपली अवस्था काय होणार याची चिंता करू लागली.

**स्थाने स्थाने सुखानाः प्रकृतिकपटिनः प्रेषिताः प्राक् पठाणाः प्राणानुत्सृज्य कार्येष्वभिमतमतयः स्थापितास्ते तुराणाः । श्यामास्या लोहितास्याः सलिलनिधिपथे प्रायशः सावधाना जोषं रोषं पिधाय ह्यकबरविषये धातुपोषं पुपोष ।। १२५**

**अर्थ** – स्वभावतःच कपटी असलेले असे पठाण ठिकठिकाणी पूर्वी पाठविले होते, ते विलासातच मग्न झाले. प्राणापेक्षाही कर्तव्यात दक्ष असलेल्या तुराणी लोकांची स्थापना झाली.



समुद्राच्या बाजूला असलेले काळ्या आणि लाल चेहऱ्यांचे (सिद्दी आणि फिरंगी) हे बहुतेक सावधान होते. आपला राग गुप्त ठेवून ते अकबराचे सामर्थ्य वाढवीत राहिले.

**प्रेमाविर्भावभेदं विविधविधितरं द्रागरब्बाधिनाथे नाथन् दिल्लीन्द्रनाथः स्वसुतविषयकं सामरस्यं समस्यन् । नित्यं सुन्तुष्टचेताः करतलविषयेप्यागतो नु प्रचेता अद्यश्वो दर्शनं नो ह्यकबरसुमतेर्भावि भव्यं बभाण ।। १२७**

**अर्थ** – अरबांचा प्रमुख हरएक प्रकाराने प्रेम प्रगट करून फूट पाडण्याचा प्रयत्न करीत असताना औरंगजेब आपल्या मुलाविषयी समेट करण्याच्या काळजीत राहून सतत संतुष्ट मनाने आणि शांत चित्ताने अकबराला सुबुद्धी प्राप्त होऊन ती करतलावर असल्यासारखी स्पष्ट होईल व आज ना उद्या त्याचे स्पष्ट रूप त्याला समजेल, असे तो मनात म्हणत असे.

**प्राज्यं राज्यमकण्टकं करगतं यद्वत्कुतूपस्य तत् तद्वत्सम्मनुतेऽवरङ्गयवनोऽरब्बाधि-पादात्मजाम् । नो जानाति दुराशया विदलितं दुर्गाद्धरामादिभिस्त्विन्द्रप्रस्थसमृद्धराज्यमखिलं ग्रस्तं प्रदत्तं शिशोः ।। १२८**

**अर्थ** – कुतुबशहाचे राज्य विशाल आणि निष्कंटक असतानाही आपल्या हातात आले, त्याप्रमाणेच अरबांच्या आधिपत्याखालील भूमीदेखील आपल्याला मिळेल असे औरंगजेब मानीत होता. परंतु आपल्या दुष्ट बुद्धीमुळे फुटून ते इंद्रप्रस्थासारखे समृद्ध असे सर्व राज्य दुर्गादासादिकांनी आपल्या मुलाला दिल्यानेही संकटग्रस्त झाल्यासारखेच आहे, हे मात्र त्याला समजले नाही.

**किं साध्या मम किं भवेत्किमु भवेत्किं वा भवेद्गर्हणा । विश्वख्यातनरेति(रस्य) काचिदपि नो दिल्लीश्वरे धारणा । तस्मादप्यनुमीमहे प्रियकृते प्रायेण पृथ्वीतले । कार्याकार्यविवेकमेव बहुधा पश्यन्ति न क्रोधिनः ।। १२९**

**अर्थ** – मला काय साधणार आहे? काय घडणार आहे? कसे घडणार आहे? किंवा निंदा होणार आहे? जगप्रसिद्ध मनुष्याची दिल्लीश्वराविषयी काहीही कल्पना नव्हती. त्यामुळे असा तर्क करता येईल की, या जगामधे चांगलं काही कार्य होईल असे राग आल्यावरसुद्धा रागीट लोकांना वाटून त्याबद्दल कार्याकार्य विवेक राहात नाही.

**कोपावेशभरात्तदा ह्यकबरो दिल्लीं प्रतस्थे बलाद्युद्धार्थं बलवत्तरं बहुबलं वेगाद्दिदेशासुरः। दुर्गादासमुखैर्धनाप्रभृतिभिः शूरैर्जितं शाम्भवैः सम्यक्सङ्गरमारचय्य रचना चित्राऽ-द्भुताऽऽसीत्तदा ।। १३०**

**अर्थ** – रागाच्या भरात दैत्यवृत्ती बनलेला अकबर दिल्लीकडे निघाला. जबरदस्तीने आणि त्वरेने सामर्थ्यवान प्रचंड अशा सेनेला त्याने युद्धासाठी आदेश दिला. दुर्गादास व शंभूराजांचा शूर सैनिक धनाजी यांनी व्यूह रचून ते युद्ध जिंकले. ती व्यूहरचना किती विविध आणि आश्चर्यकारक होती बरे!

**स्थित्वान्यत्रधिया त्रिभिर्दृढतरं सूत्रं त्रिधा सूत्रितं शम्भुश्छत्रपतिस्तथा ह्यकबरश्छन्दो-गमन्त्र्युत्तरः । सिन्धोर्मार्ग इतोधिकोत्तमगुणो विज्ञाय निर्धारितो येनासौ समवाप शाहसदनं दिल्लीन्द्रदर्पापहम् ।। १३१**

**अर्थ** – छत्रपती शंभूराजे, अकबर आणि छंदोगामात्य (कविकलश) या तिघांनी एक कणखर योजना तयार केली. समुद्रमार्ग हाच अधिक उपयोगाचा आहे, असे जाणून तोच निश्चित केला. त्याचा परिणाम असा झाला की बाहदशहाचा मुक्काम (= तंबू) त्याच्या गर्वाचे हरण करून गेला.

स्वल्पं स्वप्नवदाततं तमसकृत्सम्यक् निनाय क्षणाद्दाक्षिण्यात्परमेश्वरस्य करुणा जाग्रद्दशा दुर्दशाम् । आरब्बाधिपतोषमाब्बजनितं दिल्लीश्वरेणाऽप्यलं नानारूपवृथामनोरथशतैर्मोहा–त्समावर्धितम् ।। १३२

**अर्थ –** क्षणात तामसीपणाने निर्माण झालेले व स्वप्नाप्रमाणे पसरलेले दक्षिणेकडील राजनीती आणि परमेश्वराची कृपा यामुळे जागृत अवस्थेतच ते सर्व चांगल्याच दुर्दशेप्रत गेले. दिल्लीश्वरानेही नानाविध शतावधी खोट्या मनोरथांच्या मोहात पडून बापाने निर्मिलेला अरबाधीपतीचा आनंद पुरेसा वाढविला.

शम्भुच्छत्रपतेस्तदैव सुयशस्तोमैकसोमोदयो ह्याकैलासमथाधिमेरुसमभूदास्ता–द्रिपूर्वाचलम् । आवासं समवाप्तवानकबरस्त्वब्बासशाहस्य तच्छुत्वा वासनिवास एवमुदभूद्दुष्टस्य दुःखोदधिः ।। १३३

**अर्थ –** शंभू शिवछत्रपतींच्या यशकीर्तींचा चंद्रोदय कैलास–मेरू अशा पर्वतांकडे पूर्व दिशेस अस्ताचलापर्यंत पसरला. शहाअब्बासकडे अकबराने आश्रय मिळविला. या आश्रयाचे वृत्त ऐकून दुष्टांच्या मनात (= औरंगजेबाच्या मनात) दुःखाचा सागर उभा राहिला.

श्रीमच्छाहअकब्बरे गतवति प्रायेण विघ्नं विना स्वात्मानं कृतकृत्यमेव मनुते शम्भुः प्रतिज्ञान्तरम् । राज्यद्वन्द्वमहर्निशं रणभराद्दृह्वन्न(न्नु) निर्द्वन्द्वतः कृत्यं धिःकृतमेव सामि मनुते सर्वं तु दिल्लीश्वरः ।। १३४

**अर्थ –** शहजादा अकबर निर्विघ्नपणे निघून गेल्यावर शंभूराजांना आपली दुसरी प्रतिज्ञासुद्धा कृतकृत्य करणारी वाटली. युद्धाशिवायच दोन्ही राज्ये आपण घेऊ असा विचार करणाऱ्या औरंगजेबाच्या कृत्याचा धीक्कार करण्यासारखेच वाटते.

राज्यं यातु पुनः प्रयात्वकबरो निर्यान्तु संयान्तु वा । स्थानस्थाः प्रबलाः प्रचण्डयवना अर्हन्तु गर्हन्तु वा । स्पर्धन्तु प्रकटं प्रसह्य समरे सीमास्थसामन्तकाः । स्वस्तिक्षेमतया नयामि नमयन्सर्वानपि द्रोहिणः ।। १३५

**अर्थ –** राज्य जावो, अकबर पुन्हा एकदा दूर जावो, स्थानिक लोक बाहेर पडोत किंवा परत येवोत, बलवान आणि प्रचंड यवन सरदार योग्य काम करोत किंवा निंदा करोत, सीमेवरचे मांडलिक राजे उघडपणे स्पर्धा करोत, त्या सर्व अपराध्यांचा मी समाचार घेईन आणि त्यांना नमवीन.

कारागारनिषेवणाय निभृतं शूराः सुताः कल्पिताः स्वीयैरेव चरित्रकैः शुभतरैस्तातोऽति–सन्तोषितः । इन्द्रप्रस्थमुपेत्य पूर्वसुकृतैरौरङ्गजेबेन सत्कार्यं सर्वमकारि छद्मविधृता वन्ध्याः(ध्याः) कृता बान्धवाः ।। १३४

**अर्थ –** औरंगजेबाने पूर्वपुण्याईने (जे काही) सत्कृत्य केले ते म्हणजे आपल्या सत्कृत्यांनी संतुष्ट करणाऱ्या शूर मुलांना गुप्तपणे कारागृहात डांबावे, असे दिल्लीला गेल्यावर ठरविले आणि कपटाने धरून ठेवलेल्या आपल्या भावांना निष्फळ केले.

पुत्रं धर्तुमथेच्छति त्वकबरं वैरानुबन्धाद् ध्रुवं जीर्णं वारिवदास्तृतं निजवयो जानाति नित्यं नवम् । कालस्यातिथितां गतोऽपि कुरुते कां कां नवाश्चर्यतामश्वत्थः सततं प्रयाति सुतरां धात्रीफलस्याशया ।। १३५

**अर्थ –** आपले म्हातारपण रोज पाण्याप्रमाणे पाझरत आहे. (विस्तार पावत आहे.) आपण यमाचे अतिथी होऊ घातलो आहोत. अशा वेळी आपला प्रिय शहजादा अकबर याच्याशी सदैव



वैर बाळगून त्याला पकडण्याची इच्छा औरंगजेबाने सतत धरली आणि काय काय नवीन आश्चर्य आहे पहा– पिंपळ नाही का आवळ्याच्या इच्छेने (?) वाढत असतो.

आधिस्तैलकणोद्रताशय इतो वर्धिष्णुतां संययौ व्याधिः पुत्रविरोध एव ववृधे भूयस्तरा मानसे । यद्यप्यत्यतिरोषतः प्रकुरुतेऽप्यन्यत्र कोलाहलं सम्यग्दृश्यत एव साधु न तथा रङ्गोऽवरङ्गोद्भवः ।। १३६

**अर्थ –** मनात पुत्रशत्रुत्वाने अतिशय क्लेश निर्माण झाला. जणू पोटामध्ये तेलकटपणा (पित्त) साचून आजार वाढला आणि त्यामुळे औरंगजेब आरडाओरडा करू लागला. एकंदरीत त्याचा रागरंग काही ठीक दिसेना.

कीर्तिः सुप्रथिता तथैव चलिता सत्त्वाब्धिसीमास्वलं सम्प्राप्ते त्वनुकूलतामकबरे सप्तोत्तरे वत्सरे । राजा रायगिरौ रराज सुतरां सह्याद्रिसत्ताधने शम्भुः शम्भुकृपाभरादवभृथस्नानं प्रकुर्वन्निव ।। १३७

**अर्थ –** संभाजीराजे सह्याद्रीवर सत्तास्थान असलेल्या रायगडावर शंकराच्या कृपेने अवभृतस्नान करीत असल्याप्रमाणे विराजमान झाले. त्यांची कीर्ती पसरून ती सत्वरूपी समुद्राच्या तीरापर्यंत पोहोचली. त्यानंतर शहाजादा अकबर संभाजीराजांच्या आश्रयास राहिला.

राजानः शिबिराजराजसदृशा भूयोऽभवन्भूतले तत्कोटीसमतीत एव सहसा शम्भुः शरण्योऽभवत् । दुर्गादाससमन्वितं परिकरं बध्वा ररक्ष ध्रुवं निष्क्रान्तं कलिकाल–कालयवनक्रान्तं तदीयं सुतम् ।। १४०

**अर्थ –** शिबिराजासारखे अनेक राजे भूतलावर होऊन गेले. त्या कोटीच्या पलीकडचा शंभूराजा हा शरणागतांना आश्रयदाता झाला. औरंगजेबरूपी कलिकालातील कालयवनाने ग्रासलेल्या मुलाचे दुर्गादासाच्या साहाय्याने सज्ज होऊन बाहेर पडत असताना राजाने त्याचे चांगले रक्षण केले. (आश्रय दिला.)

एकैकं समनुक्रमेण सकलं चैकत्र नो दृश्यते शर्वाणीपतिशर्वशुद्धकृपया शम्भौ तु सर्वं त्विह । घोरेऽस्मिन्कलिकालके कलिमलक्लान्तातिलोकान्तरे मानुष्यं ह्यतिदुर्लभं तदनु सद्राज्यं ततः सद्यशः ।। १४१

**अर्थ –** क्रमाने एकेक करून सर्वच काही एकत्र येत असल्याचे दिसत नाही (परंतु) गौरीपती शंकराच्या कृपेने शंभूराजांच्या बाबतीत सर्व गुण एकत्र आले. कलिमलाने क्षीण झालेल्या या घोर कलियुगातील जगात मानवता आणि नंतर चांगले राज्य व त्यातून उत्तम कीर्ती दुर्मीळ आहे.

शम्भुच्छत्रपतेरकब्बरविधौ जीवे महोदारता राज्यस्याणुकथा नु का तदधुना केनोपमेय प्रभुः । धैर्यं धीरधुरन्धरस्य सुदृढं वीरस्य वीर्यं तथा देहत्यागविधिं विनाप्यपरया को नाम तर्तुं क्षमः ।। १४२

**अर्थ –** शंभू छत्रपतींचे अकबराच्या बाबतीत जिवावर उदार होणे यापुढे राज्याची स्वल्प गोष्ट ती काय? अशा प्रभूला कोणती उपमा द्यावी? धुरंधराचे धैर्य, वीराचे बलवत्तर शौर्य असले तरी प्राणत्यागाशिवाय कोण संकटातून तारून जाऊ शकला आहे?

यस्यास्तिक्यवशाद्वसन्ति सदनेष्वष्टौ महासिद्धयः सिद्धेवास्ति सरस्वती सुवदने सिद्धाः सदा सार्थिनः । सैवाशु प्रसरीसरीति हृदये भक्तिर्दृढा शाम्भवी शम्भुश्छत्रपतिर्दृढो दृढतरं छत्रं सुराज्यं दृढम् ।।

अर्थ – ज्याच्या श्रद्धेवर सदनात अष्टमहासिद्धी वास करतात, मुखावर सदैव सरस्वती सिद्ध असते, ज्याचे सहकारी सदैव तत्पर असतात, त्या शंकरावरील गाढ भक्ती हृदयात सतत पाझरत असते. म्हणून शंभू छत्रपती बलवान झाले आणि त्यांच्या सुराज्याला बळकट छत्र लाभले.

**मोदं नैव दधाति नो प्रकटयत्यानन्दसन्दोहिनीं वाचं काञ्चन साम्प्रतं नु पतितां मोहेऽपि सम्मोहिनीम् । गर्वादिव मुदाहतिर्विदलिताप्यष्टादशाक्षौहिणी मन्दाक्षं मनुते मनः स्म सुरराट् मन्दाक्षमामीक्षते ।। १४३**

अर्थ – आनंद स्रवणारी वाणी संमोहिनी असूनसुद्धा मोहात पडून प्रकट होत नाही. त्यामुळे आनंद होत नाही. आनंदाचे भाषण आणि अठरा अक्षौहिणी (सैन्य) विदीर्ण होऊन लाजले. इंद्राच्या मनातही लज्जा निर्माण झाली.

**विष्णुद्वेषसतृष्ण एव नितरामासीत्पुरा प्रेमतः शम्भुस्नेहपराङ्मुखोऽप्यतितरां मूढो वरीवर्तते । तद्वद्दुष्टदिलीश्वरोऽपि निवसन् लग्नोऽस्ति युद्धोद्यमे नो जानाति यथैव कालयवनः कालं शिरस्थं स्वकम् ।। १४३**

अर्थ – विष्णूचा द्वेष करण्याची तीव्र इच्छा बाळगणारा, पूर्वी शंभूराजांच्या मैत्रीला दुरावलेला (अकबर) दिङ्मूढ झाला. तसाच दक्षिणेत आलेला औरंगजेब युद्धात मग्न झाला आहे आणि त्याला कालयवन हाच आपल्या डोक्यावर यम म्हणून आल्याचे समजले नाही.

**सर्वेऽपि प्रतिपन्थिनः प्रसारिता अन्तर्बहिस्या जना जानीते जनतागतो जनपदः का नो गतिर्भाविनी । प्रत्यूहप्रतिपातिकातिशुभदा शम्भौ नृपे सर्वदा शम्भुस्नेहपरम्परैव नितरां वर्वति सर्वोपरि ।। १४४**

अर्थ – आतले आणि बाहेरचे असे सर्व विरोधक आहेत. जनतेतील जनपद (=जनतामय) यांना आपले भवितव्य काय आहे (=आपले काय होणार) याची कल्पना आहे. परंतु राजपदी शंभू (नृपति) असल्यावर नेहमीच विघ्ननिवारण करणारी, अतिकल्याणकारी आणि शंभूराजांवर स्नेह करणारी अशीच परंपरा सर्वतोपरी असणार.

**सर्वेऽपि प्रथिताः प्रतापभरिताः प्रौढाहवाडम्बराः प्रारब्धप्रचुरोत्सवं हरहरेत्याभाषमाणा भटाः । सानन्दं सकुतूहलं बव महामन्त्रोन्नता मन्त्रिणः शम्भोश्छत्रपतेः सहैव सकलाश्चकुः परं विस्मयम् ।। १४५**

अर्थ – सर्वजण कीर्तिमंत, प्रतापी, महायुद्धात गाजणारे आणि मोठ्या युद्धोत्साहाला आरंभ झाल्यावर सैनिक 'हर हर (महादेव)' अशी गर्जना करू लागले. मंत्रीदेखील (आनंदाने आणि कुतूहलाने) आपल्या श्रेष्ठ सल्ल्यामुळे अभिमान धारण करणारे शंभू छत्रपतींसह सर्वांना त्यांनी अत्यंत आश्चर्यचकित केले.

**शहाजादा अकबराचे गमन -**

**याते सागरमागरालिभिरभिव्याप्तं(प्ते) तनूजे निजे शम्भोश्छत्रपतेः प्रभावभरतो वीराग्रगण्येऽधिकम् दिल्लीन्द्रोद्धतचिन्तया परिवृतो निद्रां न लेभेऽनिशं श्रीपूर्णेऽकबरे क्रुधा हृदि धृढं सन्तापमापच्चिरम् ।। १४६**

अर्थ – आपला शूर मुलगा शंभूराजांच्या प्रभावामुळे समुद्रमार्गाने गेल्यावर (इराणला) औरंगजेबाची चिंतेमुळे झोप उडाली आणि त्याचे मन अकबरासंबंधी क्रोधयुक्त होऊन त्याचा संताप कमालीचा वाढला.



**दाता दानपरायणोऽधिकरणो नानागुणालङ्कृतः शम्भुश्छत्रपतिः प्रतीपदलनः सम्प्रेषयित्वोदधिम् । प्रेम्णाकब्बरमाशु मन्त्रिनिवहैः साकं स्वचित्ते मुदं दध्रेऽनन्तमतिः प्रतीतचरितः क्षोणीतले साम्प्रतम् ।। १४७**

अर्थ – दातृत्वामध्ये श्रेष्ठतम, सकलगुणालंकृत, शत्रूंचे निर्दालन करणारा, प्रखर बुद्धिमान, स्पष्ट चारित्र्याचा अशा छत्रपती शंभूराजांनी सामोपचाराने मंत्र्यांसह अकबराला लगेच समुद्रमार्गे पाठविले. पृथ्वीवर सर्वांची मने आनंदाने भरून गेली.

***

# प्रकरण ६

## औरंगजेब आदिलशाही व कुतुबशाही घेतो -

विभाग १, श्लो. ८३-१२३

---

### आदिलशाहीवर औरंगजेब -

**उत्पाता बहवो बभूवुरपरे कम्पो धरण्यामभूद्युद्धान्यप्यतिदुस्सहानि सुबहून्याहो ह्यभूवन्पृथक् । धृष्टो धैर्यधुरन्धरः प्रसृमरः पृष्ठे स्वयं चेष्टते सैन्यं तत्र महत्त्रिधोदधिरिव प्रत्यक्प्रतस्थे त्रिधा ।। ८३.**

अर्थ – अनेक उत्पात झाले, धरणीकंपच जणू झाला. अनेक युद्धे ठिकठिकाणी झाली. (तीन महासमुद्राप्रमाणे) धैर्यधुरंधर पुढे आणि धाडसी सैनिक मागे चालले. तीन प्रकारांनी स्वतंत्रपणे सैन्ये चालली.

**यन्त्रायन्त्रिकमद्भुतप्रतिभटं बाणार्धबाणायितं खड्गाखड्गिकमाबभूव तुमुलं युद्धं कटारावधि । दैवादुद्धुरयावनीयमखिलं सुन्दोपसुन्दायितं सैन्यं तद्बलवत्तरं समभवत्तूर्ष्णीं क्षयैकोन्मुखम् ।। ८४**

अर्थ – तोफा, बाण, तलवारी, कट्यारी घेऊन सैनिक समोरासमोर निकराने लढू लागले. दैवयोगाने बंडखोर यवनांच्या सुन्दोपसुन्दीत सैन्य बलवत्तर झाले व हळूहळू त्याचा जोर कमी झाला.

**धैर्योद्रेकवशात्तथैव युयुधुर्वैजापुरीयाः पुरा कृत्वा चक्रियमण्डलं बहुविधं सीमा समीपागतैः। पश्चाद्विप्रवरेण पूर्णमतिना मादण्णनाम्ना समं त्वासीत्तत्कलवर्गसीमसमयासङ्गो महान्सङ्गरः ।। ८५**

अर्थ – विजापूरच्या सैनिकांचे धैर्य वाढल्यामुळे अनेक प्रकारची व्यूहरचना सीमेजवळ असतानाही पूर्वीप्रमाणे त्या सैन्याने लढा दिला. नंतर विप्रवर, बुद्धिमान अशा मादण्णाबरोबर मोठे युद्ध झाले.

**दिक्कालं निभृता बभूव सुखिता विश्वम्भरा निर्भरा श्वासोच्छ्वासविशेषमाप सहसा शेषोऽप्यशेषं तदा । मोहान्मूढधियो मदोद्धतिभरा म्लेच्छा मिथो मङ्गलाश्चक्रुस्ते कुलपांसना बहुतरा नानाविधा दुर्दशाः ।। ८६**

अर्थ – सर्वकाळी व सर्वत्र शांत, स्वायत्त असे विश्व सुखी झाले आणि अचानक शेषदेखील मोकळा श्वास घेऊ लागला. परस्पर हितसंबंध दुर्मतीच्या गर्वाने भरलेल्या आणि आपल्या कुलाला मलिन करणाऱ्या यवनांनी मोहवश होऊन अनेक दुर्दशा केल्या.

**अभिबभार पदातिभरः पुरं यवनदुर्जनसङ्गतिसंवृतः । विकटसम्भ्रमसम्भरसन्धरो ह्यथ ससार शिकन्दरसङ्गरः ।। ८७**

अर्थ – प्रचंड पायदळाने यवन आणि दुर्जन यांच्यातील मैत्रीमुळे त्याने अनेक गावांवर हल्ले केले. खूपच मोठा संभ्रम होऊन जणूकाही सिकंदराची धाडच जणू चालून आली.

**कुटिलमस्तकवेष्टनकञ्चुकाः स्खलितवाग्वलिवक्रितकन्धराः । अपि महद्दिजुनद्दिनिभाः**



**शुभाः विजयदुर्गमलं दधति स्म ह ।। ८८**

अर्थ – आपल्या कुटिल मस्तकावर शिरस्त्राण घातलेले अस्पष्ट आणि भ्रमिष्ट वाणीचे, किंचित मान वळवलेले मुइज़ुद्दीनसारखे उत्तम सेनानी यांनी विजापूरच्या किल्ल्याला वेढा दिला. (या ठिकाणी विजयदुर्ग असे किल्ल्याचे नाव आले आहे ते चुकीचे आहे.)

### आदिलशहास संभाजीराजांची मदत -

**अभयहस्तमवाप्य दयादरान्नृपशिरोमणिशम्भुमहीपतेः । प्रकटमुद्भटतद्भटसङ्कुलः सुखमुवास शिकन्दरशाहकः ।। ८९**

अर्थ – नृपशिरोमणि शंभूराजांचा अभयहस्त कृपाळूपणे आणि सन्मानाने मिळाल्यामुळे दोन्ही बाजूंचे सैनिक (मराठे आणि आदिलशाही सैन्य) उघडपणे एकत्र आल्यामुळे सिकंदर आदिलशहाने सुटकेचा नि:श्वास टाकला.

**विकटतद्भटसङ्कट आगते सुपरिधौ परिखाभिविधौ स्थिते । स्थितिमवाप न कोऽपि तदा स्थिरां बलमयाचत शम्भुनरेश्वरम् ।। ९०**

अर्थ – किल्ल्याभोवतालच्या खंदकाच्या सभोवार आल्यावर भयानक असे सैनिकांचे संकट पाहून कोणालाही स्वस्थता लाभली नाही. त्यांनी शंभूराजांच्या सैन्याचे साहाय्य मागितले.

**बलमदान्निजदेशसुरक्षणं द्विजवरावरबाहुजमिश्रणम् । विजयदुर्गमवाप्य महत्तरं तुमुलयुद्धमचीकरदद्भुतम् ।। ९१**

अर्थ – आपल्या देशाचे उत्तम संरक्षण करणारे, उत्तम प्रतीचे व मध्यम प्रतीचे असे संमिश्र सैन्य राजाने दिले. ते प्रचंड सैन्य विजयदुर्गावर (विजापूरच्या किल्ल्यावर) येताच आश्चर्यकारक असे तुंबळ युद्ध झाले.

**अपि दिलीशदलं विपुलं तदा परमभूत्परितो भयतत्परम् । विनिहतं सुभटैर्बहुशो भृशं प्रबलशम्भुनृपस्य सुसैनिकैः ।। ९२**

अर्थ – दिल्लीश्वराचे संख्येने विपुल असलेले सैन्य अतिशय भयभीत झाले. शंभूराजांच्या उत्कृष्ट सैनिकांनी अनेक प्रकारांनी मोगलांचे पुष्कळ प्रमाणात सैन्य मारले.

**प्रतिदिनं त्वभिसङ्गसमुद्भवः सुमृधरङ्गमहो ववृधेतराम् । प्रतिभटं मरहट्टकराहतिं प्रतिरणं समदृश्यत एव हि ।। ९३**

अर्थ – प्रतिदिनी भिडल्यामुळे उत्पन्न झालेला युद्धाचा रंग वाढतच गेला. प्रत्येक झटपटीत मोगली सैन्याला मराठ्यांकडून मार खाण्याचे (दृश्यच) पाहावे लागले.

**जगति शुद्धशिकन्दरविक्रमो विषयमन्दतया विषयेष्वलम् । बहुविधैर्नु जनैरनुगीयते न विधिना विधिना परिणी(पी)यते ।। ९४**

अर्थ – सुखविलासात, विषयसेवनात धुंद झाल्यामुळे उत्तम अशा सिकंदर आदिलशहाचा पराक्रम जगात जनमानसामध्ये वर्णित असला तरी ब्रह्मदेवाला मात्र योग्य रीतीने तो स्वीकारता येत नाही.

**कृतभिदा त्ववरङ्गपरोज्ज्वलन् निजरुषा कवलीकृतविग्रहः । स्थलसमेतशिकन्दरनिग्रहे प्रकृतिविग्रहभेदमथो व्यधात् ।। ९७**

अर्थ – फूट पडल्यामुळे (फितुरीमुळे) औरंगजेबाविषयी सर्व शरीरात क्रोध संचारला आणि रागाच्या जळफळाटामुळे त्या ठिकाणी आलेल्या शिकंदराच्या निग्रहाबरोबरच त्याने नागरिकांतही

फूट पाडली.

**यदपि फेरुपदं प्रतिरोपितास्तदपि सिंहकनाम समेधिताः । प्रतिदिनं बहलोलमुखास्तदा यवनलश्चपराः सहसाऽभवन् ।। ९८**

**अर्थ –** कोल्ह्याची दशा आली असली, तरी सिंहाप्रमाणे चिडलेले बहलोलखानाचे सैनिक रोज मोगलांकडून एकाएकी लाच (नजराणे) घेऊ लागले.

**धृतिरगाद्धरणीतलतोऽखिला सकलशूरजनस्य रसातलम् । प्रचलितं खिलशम्भुबलं पृथक् सुविरला हि निदानपरा जनाः ।। ९९**

**अर्थ –** सर्व वीरश्रेष्ठींचे धैर्य पृथ्वीवरून रसातळाला गेले. शंभूराजांचे उरलेले सैन्य वेगवेगळे चालू लागले. परिस्थितीचे (नेमके) निदान करणारे लोक फारच थोडे असतात.

**यदपि दूत्यककर्मरतः स्थितस्तदपि नो बिभिये सुमहद्भये । कृतशिकन्दरसार्थसमुसुको नृपशिरोमणिशम्भुसुमन्त्रिकः ।। १००**

**अर्थ –** शिकंदराच्या सैन्याची उत्सुकतेने वाट पाहणारा शंभूराजांचा उत्तम मंत्री जरी वाहकाचे काम करीत असला, तरी तो भ्याला नाही.

**अपि कलत्रयुतोऽपि परम्परां न विजहौ निजधर्मपरम्पराम् । कतिपयैस्तु जनैरनुवेष्टितो ध्रुवमतीवदति(वि)ष्ठदुरासदः ।। १०१**

**अर्थ –** सपत्नीक असला तरी त्याने आपल्या धर्माची परंपरा टाकली नाही. काही लोकांच्या गराड्यात तो सदैव अतिशय दूर राहिल्याने त्याची भेट होणे कठीण झाले.

**प्रबलदुर्यवनोद्भवकृद्भये सुदयया दयति स्म दयानिधिः । अत उपागत आशु दयानिधिः प्रचुरमा दरमाप नृपान्तिके ।। १०२**

**अर्थ –** प्रबळ आणि दुष्ट अशा यवनांनी निर्मिलेल्या संकटात तो दयानिधी करुणेने वागत असे; म्हणून तो राजाजवळ जेव्हा जेव्हा येई, तेव्हा तेव्हा लगेच मोठा सन्मान मिळे.

**यवनसङ्गरमेव रक्ष यः स हि बभूव शिकन्दररक्षकः । अपि विधौ विपरीतपथि स्थिते किमिव नो विपरीततरं भवेत् ।। १०३**

**अर्थ –** यवनांच्या युद्धात ज्याने रक्षण केले तो सिकंदराचा रक्षक झाला. ब्रह्मदेवच मार्गात उलट झाला तर आणखी काय विपरीत घडणार?

**तदनुसारवशा द्विजदुर्जना यवनकौलरताः सुतरां धृतिम् । अपि भवानुभवे प्रभवे परं सुचरितं किल कौलरता यथा ।। १०४**

**अर्थ –** त्याला अनुसरणारे आणि वश झालेले दुर्जन असे ब्राह्मण यवनांच्या गोटात जाऊन खूप धृतिमान (विद्वान) झाले. जगाच्या प्रभावी अनुभवामध्ये कौल संप्रदायात रमले म्हणजे मोठेच कृत्य झाले.

**स्थलनिराशतया किमु तत्त्यजुः सुजनसेवकसत्प्रभुसम्मतिम् । विगतवासनया गृहमेधिनः सकललौकिकलम्पटतां यथा ।। १०५**

**अर्थ –** गृहस्थाने सर्व इच्छांचा त्याग करून, सर्व लौकिकार्थाची आसक्ती सोडून द्यावी, त्याप्रमाणे स्थानाविषयी निराश होऊन सज्जन, सेवक आणि उत्तम स्वामी यांची मर्जीही टाकून दिली. (?)

**प्रचलिताः प्रबलाः परिखोपरि द्रुतभिराणतुराणसमुद्भवाः । परिगृहीत शाहिति...**



**सुचुक्रुशुरद्धतुमुच्चकैः ।। १०६**

**अर्थ –** खंदकावर निघालेले इराणी आणि तुराणी सैनिक 'शहाला पकडले, शहाला पकडले' असे मोठ्याने ओरडू लागले.

**पारावारानुकाराः प्रबलदलभराः पातशाहस्य पश्चादातोषं घोषयन्तः प्रमुदितहृदया ह्यासमन्ताद्भ्रन्ति । नानाघोषानुसाराः समरजयभृतो वाद्यघोषाः समन्तात्तध्वानास्तप्रचारा इव घननिवहाः काण्डसङ्घाज्झरन्ति ।। १०७**

**अर्थ –** समुद्राप्रमाणे प्रबळ असे विशाल सैन्यदळ आनंदाने विजयघोष करीत बादशहाच्या मागून भोवताली पसरत आहे. युद्धात झालेला जय, वाद्यघोषांच्या माध्यमाने मेघांच्या समूहाप्रमाणे सैन्यांच्या तुकड्या जिकडे-तिकडे पसरवीत आहेत.

## कुतुबशाहीवर औरंगजेब -

**हस्तं वीजापुरे द्राक् प्रसभमुपगते रावणाभो दिलीशः प्रारेभे गोलकुण्डाधिपकुतुपकृते प्राक्समारम्भणानि । मूढस्तत्पुत्रमत्या प्रमुदितहृदयः सर्वकालं समास्ते नो जानात्येष पापः स्वकृतफलजुषां कर्मणां दुर्विपाकम् ।। १०८**

**अर्थ –** अल्पावधीत झटक्यानेच विजापूर हस्तगत झाल्यावर दिल्लीश्वर गोवळकोंड्याचा स्वामी असलेल्या कुतुबशहासाठी अगोदरच प्रयत्न करू लागला. आपल्या पुत्राच्या फिरलेल्या बुद्धीमुळे त्या पाप्याला सर्वकाळ आनंदित असला तरी आपण मिळवीत असलेल्या फळांना जोडलेल्या कर्माचा विषारी परिणाम समजला नाही.

**आसेतोः स्थानहेतोः कपटकृतकलोद्धाटणः किं कपाटो दौर्मन्त्र्याद्गोल-कुण्डाधिपकुतुपकृता कार्यभङ्गोत्कता वा । वीजापु(पू)र्यस्तभावो बहुविविधतया भावितो भाविकाग्र्यैः किं वा दिग्दक्षिणायाः कलुषकलुषिता व्यस्ततैवाविरासीत् ।। १०९**

**अर्थ –** रामेश्वरपासूनचा सर्व प्रदेश त्यांनी जिंकला. जणू काही कपटकलेचे दारच उघडावे असे झाले. गोवळकोंड्याच्या कुतुबशहाच्या दुष्ट मंत्र्यांमुळे कार्यभंग झाला. विजापूरचा पण पाडाव झाला. त्यामुळे अनेकांची मने प्रभावित झाली आणि अशा प्रकारे दक्षिणेत पापी बुद्धीने निर्माण झालेल्या, कलुषित भावनेने गोंधळ निर्माण झाला.

**भूदुर्गाण्येव पूर्वं कतिचिदभयकृत्प्रेममार्गैर्गृहीत्वा सेनां कार्णाटकेषु प्रकटकपट-युक्सूचनाभिः प्रसार्य । इन्द्रप्रस्थोत्थयात्रां विवृतिकृतिवशाच्छद्मयित्वा दिलीशो मूढं भीत्या निगूढं कुतुपकपटिनं क्रोधपात्रं चकार ।। ११०**

**अर्थ –** अगोदर सामोपचाराने अभय देऊन काही भुईकोट किल्ले घेतल्यावर उघड उघड कपटाने सूचना देऊन सैन्य कर्नाटकाकडे पाठवून इंद्रप्रस्थापासून (दिल्लीपासून) सुरू केलेली मोहीम स्पष्टीकरणे आणि कृती यायोगे लपवीत राहून, मूढ झालेल्या आणि भीतीने लपून बसलेल्या कपटी कुतुबशहाकडे आपल्या रागाचा पारा वळविला.

**चातुर्यं प्रागुपात्तं बहुदिवसनयाभ्यासयोगात्तुरीयं मादण्णा मारणीयो यवनकुलपतेः कोटिशोऽप्यर्पणीयाः । द्रव्यं वीजापुरार्थं किमपि करुणया रक्षणार्थं प्रदेयं दिल्लीन्द्रस्यैव हस्तादकबरसहितः शम्भुरामज्जनीयः ।। ११२**

**अर्थ –** अनेक दिवस राजनीतीचा अभ्यास केल्यामुळे त्याने महान चातुर्य संपादन केले होतेच. मादण्णाला मारायचे, यवनकुलपतीला काही कोटी रुपये अर्पण करायचे, दया दाखविण्यासाठी

थोडेसे द्रव्य विजापुरासाठी आणि स्वसंरक्षणासाठी ठेवायचे व दिल्लीश्वराच्याच हाताने अकबरासहित शंभूला संकटात पाडायचे.

एवं धाटीप्रपाटीं कपटविरचितां शम्भुभूपेऽनुसार्य प्रच्छन्नाश्वासनेन प्रबल-तरभटान्भेदयित्वा धनेन । विश्वासाघातपातप्रभवसुखमथो भोक्तुकामः प्रकामं कामाचारप्रचारः कुतुपकपटधीर्धीरतामुज्जहार ।। ११३

अर्थ – अशा प्रकारे शंभूराजांच्या बाबतीत कपटनीती अमलात आणून, भरघोस आश्वासने देऊन, जे बलिष्ठ शूरवीर असतील, त्यांना धनाच्या साहाय्याने फितवून, विश्वासघातापासून मिळालेल्या आनंदाचा उपभोग भरपूर घेण्याची इच्छा करणारा, स्वैराचाराचा प्रचार करणारा, कपटी बुद्धीचा कुतुबशहा घाबरून गेला.

नानावेषानुवेषानुसृतिकृतिपराः प्राणवन्तो दिलीशक्रोधावेशानुनीवै(चै)रुपरि च परितः प्रादुरासन्समन्तात् । लोकानादर्शयन्तः करकलितमिव द्राक्कलेः कर्मपाकं दुष्टा दुश्चेष्टयैव प्रसभमभिमुखं वेष्टयामासुरेनम् ।। ११४

अर्थ – नाना प्रकारचे वेश आणि कृती करणारे बलवान सैनिक दिल्लीश्वराच्या क्रोधाच्या झपाट्यात खाली, वर, बाजूला असे सगळीकडून व्यक्त झाले. कलियुगाचा कर्मपाक सत्वर आपल्या हातात आला आहे असे लोकांना दाखवीत त्या दुष्टांनी दुष्कृत्यांनीच जोरदारपणे त्याला समोरून गाठले.

युद्धारम्भेषु यन्त्रप्रभवरवभरः सार्धयामार्धयामं षड्ग्रामोद्देशमात्रं प्रलयसमयजां कां तु लीलां बभार । पश्चात्पाथोधियुग्मोन्मिलनसमयजः सेनयोस्तद्वदन्यः क्षुभ्यन्मन्था-द्रिमुह्यज्जलधि-समभवद्भाव एवोज्जृम्भे ।। ११४

अर्थ – युद्धाच्या सुरुवातीस दीड प्रहरपर्यंत फक्त सहा गावांच्या उद्देशाने केलेल्या तोफांच्या सरबत्तीमुळे निर्माण झालेल्या आवाजाने प्रलयकालाची लीला निर्माण केली. नंतर दोन समुद्र एकत्र यावेत तसा दोन्ही सैन्यांचा क्षुब्ध झालेल्या समुद्रमंथनाच्या पर्वताप्रमाणे उचंबळणाऱ्या समुद्राचा भाव पसरला.

भागापुर्यानुपुर्यावृतिषु विगलितप्राणसम्प्राणनाशा काचित्कार्यांशहीना समरजयविधी कान्तिरेवोत्ततार । सारासारं विवेकं तदनु च सहसोत्कृत्य दूरानुदूरादिन्द्रप्रस्थेन्द्रनाथं वरितुमिव पुरो ह्यासुरी श्रीः ससार ।। ११५

अर्थ – भागानगरच्या वेढ्यामध्ये प्राणहानी आणि विजय मिळविण्याच्या कामी कार्यांश किंचित कमी असलेली कोर वर आली. त्यामागून सारासारविवेक अकस्मात सोडून खूप दुरून इंद्रप्रस्थाच्या स्वामीला (= औरंगजेबाला) वरण्यासाठीच जणू आसुरी लक्ष्मी (?) समोर आली.

युद्धं त्वावर्षमात्रं दृढततरमतुलं यैस्तु नूनं प्रवृद्धं ध्वस्तं तैरेव नीचैः कुतुपनियमितेः पामरानामिकाग्र्यैः । धर्माधर्मादिकार्याकरणकरणकृद्भेदभावोज्झिताङ्गैर्ध्वस्तैरेवात्मघातो बिगलितमनसामग्र एवं बभूव ।। ११६

अर्थ – ज्याने अनेक वर्षांपर्यंत अतुलनीय आणि कणखरपणे युद्ध चालू ठेवले, त्याच कुतुबशहाच्या आधिपत्याखाली अट्टल मूर्खांनी आणि नीचांनी ते संपविले. धर्म-अधर्म, कर्तव्य-अकर्तव्य असा भेद टाकून देऊन मन गळून गेल्यामुळे उद्ध्वस्त होऊन शेवटी त्यांनी आत्मघात करून घेतला.



ब्रह्मस्त्रीघातपापक्षुभितहरधुरन्त्रेत्रवह्न्युत्थचक्रज्वालाजालवलीढं कुतुकपटिनो राज्यमाविर्बभूव । पश्चाद्दिल्लीन्द्रचक्रभ्रमणभरनतं तेजसा व्यापृतं तन्नष्टं चासेतुसीमा-वधिजनविदितं पप्रथेऽलं प्रतस्थे ।। ११७

अर्थ – ब्रह्मघात, स्त्रीघात इत्यादी पापांनी क्षुब्ध झालेल्या शंकराच्या स्फुरण पावलेल्या नेत्राग्नीने निर्मिलेल्या ज्वालांच्या जाळाने वेष्टून गेले आहे असे कपटी कुतुबशहाचे राज्य आहे असे स्पष्ट झालेच होते. त्यानंतर दिल्लीश्वराच्या वादळी मोहिमेने रामेश्वराच्या सेतूपर्यंत लोकांना माहीत असलेले, मोडकळीस आलेले ते, तेजाळलेले राज्य पूर्णपणे नष्ट होण्याच्या मार्गास लागले.

व्याली प्रोत्साहवार्याविंधुतिरशनिजा धैर्यभूमीरुहस्य द्रोहोद्रेकस्य जाया त्रिभुवनजननी कालचक्रस्य माया । क्रुद्धत्रस्तान्यलोकस्य च हृदयतले मोहमार्गानुसारा संसारध्वान्त-धाराहति-रतिशनकैर्निर्जगमाजगाम ।। ११८

अर्थ – धैर्यरूपी भूमीवर निर्माण झालेल्या प्रचंड द्रोहाची पत्नी, प्रोत्साहन वायुरूपी व्याघ्री, वज्राघात, त्रिभुवनातील कालचक्राची जननीरूप माया, क्षुब्ध आणि भीतिग्रस्त झालेल्या लोकांच्या हृदयात मोहमार्गाचे अनुसरण करावयास लावणारी संसाररूपी अंधकाराची धारा अशी ती (माया) हळूहळू आलीच.

चेष्टावन्तो विचेष्टाः प्रकटतरमथो केऽप्यभीष्टस्य नेष्टाः प्रेष्ठाः प्रमास्पदं नो दधति मतिहताः प्रेयसीषु प्रियासु । चिन्तासञ्चर्विताङ्गाश्चलनवलनजप्रक्रमप्रोज्झितांशाः प्रत्यक्षं प्रेतभावं सपदि परिगताः प्राणिनः प्रत्ययन्ति ।। ११९

अर्थ – सक्रिय असलेले निश्चेष्ट झाले, अभीष्ट उघडपणे पारखे झाले. अत्यंत प्रियतम असलेले मतिमंद होऊन आवडत्या प्रेयसीविषयी प्रेम बाळगीनासे झाले. चिंतेने सर्वांग व्यापून चलनवलन गमावून बसले. (थोडक्यात) भोवतालच्या प्राण्यांना एकदम प्रत्यक्ष प्रेतकळाच आल्याचा प्रत्यय येतो. (आला.)

एवं नानाप्रकारैरनुदिनमसकृज्जायमानेऽभ्युपाये प्राकारान्तुःपुरेषु प्रबलकृतभिदा विद्यमानेऽप्यपाये । पापौघे पूर्यमाणे परमविभुकृपावीक्षणे क्षीयमाणे तानासाहप्रधानो ह्यभवदभिमुखो नैव नीचो निदाने ।। १२०

अर्थ – अशा रीतीने सतत बहुविध उपाय होत असताना प्राकारात आणि अंतःपुरात प्रबळ फूट पडण्याचे संकट असताना, पापांच्या प्रवाहाला पूर येत असताना परमेश्वराची कृपादृष्टी कमी होऊन तानाशहाचा प्रधान (?) या सर्व परिस्थितीला कमी कारणीभूत नाही असे समोर आले.

सारं सारं समस्तं कृतमिह सहसा नीचविस्तारयोग्यं भोग्यं यद्वस्तु वामं तदपि विरचितं नाममात्राभिरामम् । ग्रामं ग्रामं प्रकामं प्रथिततरमथो ग्राम्यतैवाविरासीद्वामाचाराद्विधात्रा कुतुपवरपुरे वामतैवं प्रदर्शि ।। १२१

अर्थ – समस्त सारभूत वस्तू एकदम नीचांच्या क्रीडेला योग्य बनल्या. सुंदर अशा भोग्य वस्तू होत्या, त्याही नावालाच सुंदर झाल्या. गावागावांतून जोरदारपणे ग्राम्य आचरण होऊ लागल्याचे दिसू लागले आणि कुतुबशहाच्या नगरात वामाचरण वाढू लागल्यामुळे विधात्याने वामताच दाखविली.

दाक्षिण्यं दक्षिणातः सकलशुभकलावीक्षणं वीक्षणातः प्रोत्साहं चालनातः प्रकृतिकृतिविधौ प्राणनं प्राणनातः । नैर्मल्यं कल्पनातः सरसतरगुणः कोऽपि कान्ताङ्गनातः

किं किं न क्षीणमासीत्कुतुपवरपुरे क्षीयमाणे क्षणेन ।। १२२

अर्थ – दक्षिणेतून दाक्षिण्य गेले, नजरेतून सर्व शुभ कलांची दृष्टी हरपली. वागण्यातून प्रोत्साहन संपले. नागरिकांच्या जीवनातून प्राणच जाऊ लागला. कल्पनेतून निर्मळपणा नष्ट झाला. सुंदर स्त्रियांतून सरस गुण लोप पावले. अल्पकाळातच कुतुबशहाच्या नगरात काय काय बरे कमी झाले नाही?

**द्वाद्वं(द्वन्द्वे) पङ्के निमग्नद्विप इव सहसा ज्योज्जहारे विलग्नः कुर्वन्कार्याण्यनेकान्यति–विषमतराण्याशुसम्पत्कराणि । दैवोद्योगाभिधाभ्यां द्विरदनपदवीं प्रापिताभ्यामुभाभ्यां दिल्लीन्द्रो दारुणाभ्यां कुतुपवरपुरं भञ्जयामास नित्यम् ।। १२३**

अर्थ – चिखलात रुतलेला हत्ती अकस्मात पराक्रमरूपी ज्योतीने हीन बनावा, त्याप्रमाणे अत्यंत कठीण अशी झटपट संपत्ती मिळविण्याची इच्छा करणाऱ्या दिल्लीश्वराने दैव आणि प्रयत्न नावाच्या दोन दृढ (हस्तिदंताच्या) साधनांनी कुतुबशहाचे नगर उद्ध्वस्त केले.

**समय एवमभूदधिकोत्तम स्त्रिविधकूटमिवैक्यमुपागतम् । यवनदुर्जनसङ्गतिमोहितः कुतुप एव सलाहमथाऽकरोत् ।। ९५**

अर्थ – अशा रीतीने पुष्कळ काळ निघून गेला. तिन्ही प्रकारे कुटिलता साधली. दुष्ट यवनांच्या साह्याने कुतुबशहावर मोहिनी घातली आणि तो तहाचा विचार करू लागला.

**विनिहतो नु वृथा द्विजपुङ्गवः परिहतः परितोष इव श्रियः । प्रतिहताऽखिलकार्यविचारणा प्रतिगता किल कुत्सितधारणा ।। ९६**

अर्थ – विनाकारण आपला श्रेष्ठ ब्राह्मण (मंत्री मादण्णा) मारला गेला, जणू (वैभव) लक्ष्मीचा संतोष नाहीसा झाला. सर्व कारभाराची चिकित्सक बुद्धी नाहीशी झाली, निंद्य विचार मागे राहिले.

***



# प्रकरण ७

## शिवयोग्याचा इतिहास -

**मूळ संहितेतील विभाग ४ मधील – अध्याय १ – छ. संभाजीराजांची स्तुती, पुत्रकामेष्टीचा सल्ला – श्लोक १–१०१, अध्याय २ – कालीदेवीचे वर्णन व स्तुती – श्लोक १–८१, अध्याय ३ – बीजमंत्र – श्लोक १–६६, अध्याय ४ – शिवयोग्याचे माहात्म्य व दीक्षा – श्लोक १–९५, अध्याय ५ – शिवयोग्याची तपश्चर्या – श्लोक १–१४, शिवयोगी व शंभूराजे – श्लोक १५–२२, शिवयोग्याचे चमत्कार – श्लोक २३–७७, अध्याय ६ – गणेशभट्ट जांभेकर आणि मंत्रविद्या – श्लोक १–३०, अध्याय ७ – केशवपंडित – श्लोक १–२३.**

---

### छ. संभाजीराजांची स्तुती, पुत्रकामेष्टीचा सल्ला - अध्याय १

**श्रीगोविन्दो विजयतेतराम् । [R] श्रीमदानन्दभरितमोतप्रोतं जगत्रयम् । यत्र तत्परमं तत्त्वं सर्वदा समुपास्महे ।। १**

अर्थ – वैभवाने आणि आनंदाने ही तीनही जगते ओतप्रोत भरली आहेत. अशा या विश्वाच्या परमतत्त्वाची आम्ही सर्वदा भक्ती करतो.

**कवीन्द्र उवाच । अथ प्रोद्दामवीरश्रीः शम्भुराजो महाबली । सभामागत्य कस्मिंश्चित्समये परमोज्वलः ।। २ [2] प्रकृतीनां नतीर्गृण्हन्महानन्दभरालसः । सिंहासने विशेषेण विरराज सुरेन्द्रवत् ।। ३ ततः किञ्चिन्महोत्साही नानालक्षणलक्षितः । शिवराजात्मजः शम्भुः सार्वभौमश्रियं वहन् ।। ४ [4] लोके ययातिवल्लोकैरालोकितपराक्रमः । मान्धातारं परिहसन् लसन् स्वगुणसम्पदा ।। ५ उपाध्यायान् द्विजश्रेष्ठान् मान्त्रिकान् तान्त्रिकानपि । कवीश्वरान् पण्डितांश्च सिद्धान् योगविशारदान् ।। ६ [6] दैवज्ञान्मन्त्रिणोऽमात्यान् व्रतिनः सत्यवादिनः । मुनीश्वराञ्जापकांश्च यायजूकांस्तपस्विनः ।। ७ [7] आप्तान् सुहृद्बान्धवांश्च मातुलान् शालकानपि । श्वशुरान् गोत्रपुरुषान् कुलीनानथ मानवान् ।। ८ चातुर्वर्ण्यभवान् कांश्चिद् वृद्धान्मित्राणि कानिचित् । बहुश्रुतान् सभास्तारानाहूयावीवदद्वचः ।। ९**

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, नंतर बलशाली वीरश्री असलेले परमोज्ज्वल शंभूराजे एकदा दरबारात येऊन प्रजेचे मुजरे स्वीकारत सिंहासनावर आनंदाने इंद्राप्रमाणे विराजमान झाले. तेव्हा अतिशय उत्साही अनेक शुभलक्षणे असलेला शिवपुत्र शंभूराजा सार्वभौम वैभव भोगत होता. लोकांना त्याचा पराक्रम ययातीप्रमाणे भासला. आपल्या गुणसंपत्तीने शंभूराजाने मान्धात्यालाही हास्यास्पद मानले. उपाध्याय, श्रेष्ठ, ब्राह्मण, मांत्रिक, तांत्रिक, कवीश्वर, पंडित, सिद्ध योगविशारद, ज्योतिषी, मंत्री, अमात्य, व्रतधारी, सत्यवादी, जप-यज्ञ-तपश्चर्या करणारे मुनीश्वर, नातलग, मित्र, बंधू, मामा, मेहुणे, सासरे, स्वगोत्रीय लोक, कुलीन, मानी, चातुर्वर्ण्यातील काही, ज्येष्ठ मित्र आणि बहुश्रुत अशा दरबारी लोकांना उद्देशून तो म्हणाला.

**शम्भुराज उवाच । जिता भवत्सहायेन रिपवो युद्धदुर्मदाः। कर्बूरा इव दुःसाध्याः श्यामलाः सफिरङ्गिणः ।। १० [10] इङ्ग्रजाश्च वलन्देजा आरब्बाः काबलैः सह । पुरुत्कालैक–**

निलयाः शूराः परिजिताः पुनः ।। ११ [11] सावन्ताः फेरुपदवीमागताः शरणार्थिनः । राज्लूकराः करान्बध्वा मदाज्ञापरिपालिनः ।। १२ [12] शिरस्काः शीर्णसकलविक्रमा विगताक्रमाः । तुरुष्किकाः शुष्कमुखा दिगन्तारण्यमाश्रिताः ।। १३ वैजापुरीयाः साहाय्ये याचयन्ति बलं मम। भागानगरनाथोऽपि नाथते मद्दयां सदा ।। १४ समस्तपातशाहानां मूर्धन्यो मान्यविक्रमः । ओरङ्गशाह एकोऽसौ किञ्चिद्दर्पं वहत्यहो ।। १५ [15]

अर्थ – शंभूराजे म्हणतात, "युद्धाविषयी दुराभिमानी असे शत्रू आपल्या साहाय्याच्या जोरावर जिंकता आले. दुःसाध्य असे पोर्तुगीज, यवन, इंग्रज, अरब, काबुली आणि शूर पूर्णपणे जिंकले. सावंतांची गत कोल्ह्यासारखी झाली आणि ते शरण आले. राजपुरीकर (सिद्दी) हात जोडून माझी आज्ञा पाळू लागले. शिर्के, आपल्या पराक्रमाची खुमखुमी नाहीशी झाल्यामुळे तुर्की लोकांचे आक्रमण आवरते घेऊन, कोरड्या तोंडाने, निरनिराळ्या दिशेने घनदाट जंगलात पळून गेले. विजापूरचे लोक माझे साहाय्य मागू लागले आहेत. भागानगरकरपण माझ्या कृपेची याचना करीत आहेत, तरीपण आश्चर्य असे सर्व पातशहांचा अग्रगण्य, अशा त्याने पराक्रम मान्य केला आहे तो औरंगजेब मात्र एकटा असूनही मस्तीत आहे.

डिङ्मारा मद्भटाटोपनिरीक्षणभयाकुलाः । स्वबाहुतेजो निन्दन्तो ददत्याकरभूकरान् ।।१६ चिनेजाश्चिररात्राय वित्रासितपरा अपि । आहोपुरुषिकां काञ्चिन्न वहन्ति ममाग्रतः ।। १७ [17] ढोणाकाः प्रणयप्रव्हा बव्हालपविवर्जिताः । मद्भक्तिमनुगच्छन्ति प्रयच्छन्ति धनं बहु ।। १८ फरासिनः समाक्रान्ता विक्रान्ताः सङ्गरेष्वलम् । मामकैः सकलैः शूरैः सागरान्तरचारिभिः ।।१९ बसूनुरमङ्ग्रूल (बस्नूरमङ्गुल) चिनकोचगोमन्तपालजाः । वसयी(ई)चौलसुरतम–सलीमस्कतोद्भवाः।।२० चेनपट्टणघोगारभडोचदिवभूभवाः । भोबासमुम्बयी(ई)मोसम्बजा–दवणसम्भवाः ।। २१ महोसदाः सिंहलजा नागाजद्वीपजा भटाः । घटयन्ति खटाटोपाद्दास्यं मम महोत्कटम् ।। २२ गिरिकन्दरसञ्चारा भिल्ला मल्ला इवोद्धताः । मत्प्रथां प्रथयन्त्युच्चैर्वचसा मनसापि च ।। २३ पुण्डाः प्रचण्डदोर्दण्डकण्डूताण्डवखण्डिताः । अखण्डं खण्डशो दासभावमाकलयन्त्युत।।२४ सदा मदभरोदग्राः पालेगाराः प्रहारिणः । सन्दा–निताञ्जलिपुटास्तिष्ठन्त्यजिरके मम ।। २५ [25] मामकं कटकं वीक्ष्य काटकाः कठिना अपि । मामेवाशु प्रपद्यन्ते शरणं गलितोद्यमाः।। २६ [26] साष्टीसमाश्रया बारदेशस्थाः केऽपि भूभुजः । समालभन्ते नो निद्रां मत्प्रतापाग्नितापिताः।। २७ [27] सौनूरवासिनः केऽपि नरेन्द्रप्रवराः खराः। मोगला मद्भटैर्भूयः प्रगृहीता गलग्रहैः।। २८ [28] पञ्जाबिनस्तब्धपराक्रमतामागताश्चिरम् । समुद्रतीरञ्चारा आभीराः सेवनोन्मुखाः।।२९[29] बिन्दुराश्रयसञ्जातप्रतापप्रथितत्विषः । अहो प्रयच्छन्ति करं भीता मद्भटसङ्गरे ।। ३० [30] सोधेकरा नृपश्रेष्ठा जङ्गमा परमोद्धताः । प्रपूजयन्ति मामेव हित्वा पाखण्डमुत्कटम् ।। ३१

अर्थ – पोर्तुगीज माझ्या सैनिकांच्या पराक्रमाचा व्याप पाहून भयाकुल होऊन आपल्याच बाहूत तेज नाही अशी निंदा करीत सागरावरील आणि जमिनीवरचे कर देऊ लागले. चिनीदेखील अत्यंत त्रस्त केले गेल्यामुळे माझ्यासमोर पराक्रमाच्या गोष्टी करीत नाहीत. बंडखोरांनी वाचाळपणा सोडून प्रेमाने माझी सलगी करून माझ्या भक्तीत पडले आहेत, मला भरपूर संपत्ती देत आहेत. युद्धामधे अतिशय पराक्रम करणाऱ्या फारशी लोकांचा (फरासिनः) समुद्रामधे अतिशय खोल अशा भागात संचार करणाऱ्या माझ्या लोकांकडून पाडाव झाला आहे. बसरूर, मंगळूर व चीन ही बंदरे



व गोव्याची तसेच वसई, चौल ही बंदरे, सुरत, मच्छलीपट्टण, मस्कत, चेनपट्टण, भडोच, घोगार आणि दीव या ठिकाणचे भोबास, मुंबई, मोसंब, जादवण येथील महोसदी, सिंहल, नागाजद्वीप येथील सैनिक भरपूर खटाटोप करून शेवटी मला शरण येत आहेत. गिरिकन्दरात संचार करणारे मल्लाप्रमाणे जबरदस्त भिल्ल माझी कीर्ती मनापासून सगळीकडे सांगत आहेत. पुण्डपाळेगार आपल्या प्रचंड शक्तीची रग जिरवण्यासाठी आक्रस्ताळी प्रयत्न करीत असता मार खाऊन तुकड्यातुकड्यांनी मला शरण येत आहेत. सतत गर्वाने मत्त झालेले हल्लेखोर पाळेगार माझ्यापुढे हात जोडून अंगणात ताटकळत आहेत आणि मातब्बर असे काही महाभाग माझी छावणी पाहूनच गलितगात्र होऊन माझ्यापुढे शरण येत आहेत. माझ्या पराक्रमाच्या दाहाने भाजून गेल्यामुळे साष्टीचा आश्रय घेतलेल्या काही बारदेशी राजांची झोप उडाली आहे. मोगलांच्या सावनूर येथे असलेल्या मातब्बर राजाला माझ्या सैनिकांनी त्यांच्या माना पकडून बंदिवान केले आहे. बऱ्याच काळानंतर पंजाब्यांचा पराक्रम थांबला आहे. समुद्रकिनाऱ्यावर संचार करणारे आभीर लोक माझ्याकडे सेवेसाठी आले आहेत. अल्पमात्र सहवास लाभलेल्या माझ्या सैनिकांबरोबर लढताना त्यांचेही तेज प्रकाशित झाले आहे आणि भिऊन जाऊन ते मला कर देण्यास तयारही झाले आहेत, हे केवढे आश्चर्य! अत्यंत उर्मट, सतत फिरणारे, सौंधेकर राजे आपला कडक पाखंडीपणा सोडून माझी पूजा करू लागले आहेत.

केचिद्दुर्गमदुर्गेषु नरसिंहाः प्रहारिणः । भीताः शशकवच्छश्वद्भवन्त्यन्तर्हिता इव ।। ३२ [32] चञ्जीचञ्जावरपुरप्राकारान्तरवर्तिनः । मदीया एव सम्भूताः प्रभूतधनतोषिताः ।। ३३ [33] विलक्षणाः कोङ्कणकाः प्रतिक्षणमहर्निशम् । सुलक्षणान्यभ्यसन्ति मद्भटानां समागमात् ।।३४ नानेमावलकाः केऽपि शूराः परविडम्बकाः । मदग्रेसरिणो भूत्वा धावन्ति बत दासवत् ।।३५ [35] तथा पोवनमध्यस्थाः प्रशस्ताः सङ्गरेष्वलम् । वीराः प्रवीरा दुर्गाणि रक्षन्ति-च हितङ्कराः ।। ३६ खेडेबारगता वीरा वरा राजन्यमूर्धसु । मदाश्रयात्स्वाश्रमेषु विश्रमन्ति श्रियावृताः ।।३७ [37] कीराकीर्णतरुव्रातावृतं कीरातमावलम् । येऽवलम्ब्य बतोत्तंसा भूभुजां तेऽनुयायिनः ।। ३८

अर्थ – काही नरसिंह दुर्गम अशा किल्ल्यावर प्रहार करीत असताना भिऊन सशाप्रमाणे कायमचे दडून बसले आहेत. जिंजी आणि तंजावर या नगरांच्या तटबंदीवर असलेले पुष्कळ धन मिळाल्याने संतुष्ट होऊन आता माझेच झाले आहे. कोकणचे लोक विलक्षण, ते रात्रंदिवस सतत माझ्या सैनिकांशी संधान बांधून चांगल्या गोष्टींचा अभ्यास करतात. नाणेमावळातील काही शूर इतरांची नक्कल करणारे पण माझ्या पुढे होऊन नोकराप्रमाणे धावत आहेत. तसेच पवनमावळातील युद्धात प्रावीण्य मिळविलेले वीर योद्धे एकमेकांच्या साहाय्याने किल्ल्यांचे संरक्षण करीत आहेत. खेडेबारेमधील वीर क्षत्रियांमधे तगडे असले तरी माझ्या आश्रयामुळे आपल्या घरात राजलक्ष्मी वैभव उपभोगत आहेत. पोपटांचे थवेच्या थवे ज्या झाडांवर विखुरलेले आहेत, अशा अरण्यात किरातांच्या सैन्यावर अवलंबून राहून जे राजे भूषण मानतात, तेही माझे अनुयायी झाले आहेत.

देशमुख्याः खोपडा ये वृद्धरोहिडसंस्थिताः । जोधेकराः परे बालरोहिडेखोरवासिनः ।।३९ केचिद्ये लवणावासाः सदा समरलालसाः । कानन्दखोरसंवासा भानुप्रतिमतेजसः ।।४० मोसेखोरगृहाः पर्लीवारुण्तारलखोरजैः । कोयिनातीरजाः केचिज्जोरचाम्पलखोरिणः ।। ४१ इन्दापूरसिरोलस्था बारामतिजुनारजाः । नीराततटी पुण्यवायी(ई)सासवाडसुपेकराः ।। ४२ मानगोकर्णमिरजमनोलीकागलादिषु । देशेषु येषु ये भूपा मदाज्ञां मानयन्त्यरम् ।। ४३ चाकणग्रामसम्भूताः किराताः कीरभाषिणः । आकिरन्ति करं द्वारोपान्ते बद्धकराश्चिरम् ।।४४

मूठेखोरालया: पौडरवोरभूप्रभविष्णव: । मत्पक्षमनुरक्षन्त: क्षिण्वन्त्यहितमण्डलम् ।।४५ [45]
मूलसीकस्थितागुञ्जणसावासाश्चिकोडिजा: । मदीयेन प्रभावेन कुर्वन्ति भुवने यश:।।४६ [46]

अर्थ – जुन्या अशा रोहिडे खोऱ्यातील खोपडे–देशमुख तसेच जेधे–देशमुख नेहमी युद्धाची खुमखुमी बाळगणारे कानंद खोऱ्यातील देशमुख, मोसे खोऱ्यातील सूर्याप्रमाणे प्रतापी, परळी, तारळे खोऱ्यातील देशमुख, कोयना तीरावरील तसेच जोर चाफळ खोऱ्यातील, इंदापूर, शिरोळा, बारामती, जुन्नर, नीरेच्या तीरावरील, वाई क्षेत्रावरील, सासवड, सुपे, माण, गोकर्ण, मिरज, मनोली, कागल वगैरे ठिकाणचे राजे माझी आज्ञा मानतात. चाकण गावात जन्मास आलेले, पोपटाची भाषा जाणणारे, किरात (=पारधी) भाषा बोलणारे, हात बांधून माझ्या दारात येऊन कराची रक्कम भरतात. मुठे खोऱ्यातील आणि पौड खोऱ्यातील जमीनदार माझ्या बाजूचे रक्षण करीत शत्रुपक्षाचे नुकसान करीत आहेत. मुळशी आणि गुंजण मावळातील लोक तसेच चिकोडीचे लोक माझ्या प्रभावाने जगात यश मिळवीत आहेत.

कुडालखोरे प्रखरास्तथा हेटकुडालके । अभिख्यां कामपि मम प्रेष्या: प्रख्यापयन्त्यहो ।। ४७ [47] भूपा हीरडसोद्भूता: प्रभूताभिजनप्रिया: । मज्जैत्रयात्रा: कुर्वाणा: प्रोल्लसन्ति पदे पदे ।। ४८ [48] फोंडेकरा: सालसीकाश्चान्देरीसाङ्खलीकरा: । मणेरीमर्दनगडहेरेकरनिवासिन: ।। ४९ [49] वाडीडिचोलीनगरे ख्याता: सगरवद्गुणै: । राजपूरसमावेशा: परे सौदालजा नृपा: ।। ५० [50] पांसूपत्तनभूमिस्था वरा लाञ्जेकरा अपि । देवलग्रामसम्भूता देवरूखभवा: परे ।। ५१ सङ्गमेश्वरभूभूता दाभोलीदर्पदर्पिता: । सावर्डेकरनामानश्चिपोलणभवास्तथा ।। ५२ [52] फुणगूसकृतावासा धामणैकविलासिन:। हातखाम्बेकरा: केचिन्मत्ता: केलेकराभिधा:।। ५३ [53]

अर्थ – कुडाळ खोऱ्यात बलिष्ट असलेले सेवक हेटकुडाळ असे नाव देतात. हिरडसचे अतिशय लोकप्रिय असलेले लोक माझी विजययात्रा यशस्वी करीत पावलोपावली उल्हास वाढवीत आहेत.

फोंड्याचे, सालसीचे, चांदेरीचे साखळीकर, मणेरीकर, मर्दनगड्चे आणि हेरेकरचे, वाडी आणि डिचोली या नगरातील प्रसिद्ध असलेले तसेच राजापूरचे, सौंदळचे राजे, धुळ्याचे, श्रेष्ठ लांजेकरपण, देवलग्रामचे आणि देवरुखे, संगमेश्वर येथील दाभोळचा नक्षा उतरवणारे, सावर्डेकर, चिपळूण येथील फुणगूस व धामणचे विलासी, हातखांबेकर, काही मत्त केळकर,

वेलेकरोपनामान: पुत्रपौत्रोपबृंहिता: । क्षारपत्तनिकै: साकं राजपत्तननामका: ।। ५४ [54] साटोलीपुरसञ्जातास्तथा जेतापुरीयका: । प्रभावलीया: सोदर्का: सङ्गरारम्भकर्कशा: ।। ५५ [55] मूरेकरा: केलवलीजावलीया: प्रभाविण: । कशेलीकाहरचिरीमल्कापूरीयका भटा: ।। ५६ [56] प्रतिक्षणं क्षणपरा दक्षिणाश्चारुलक्षणा: । एते रक्षन्त्यधिरणं मत्सेनामनुगामिन: ।। ५७ [57]

अर्थ – क्षार गावाचे, राजापूर गावाचे, साटोली गावचे, जेतापुरीचे, प्रभावलीचे बांधव हे युद्धाच्या आधीच कठोर भासतात. केळघर, मुरे, जावळी येथील प्रभावशाली सैनिक, केळशी आणि मलकापूरचे सैनिक, वाडीचे आणि गोकर्णाचे असे सर्वजण दक्ष राहून माझ्या सैन्याचा पाठपुरावा करीत युद्धात रक्षण करतात.

सुवर्णदुर्गप्रान्तस्थै: संवृता: सज्जसैनिका: । मद्भृत्यतामनुगता: कर्णाटसुभटा अपि ।।



५८ [58] अलङ्करिष्णुभिर्भूयो वीरैर्जिष्णुपराक्रमै: । महाराष्ट्रै: सहाभान्ति भृत्या: शालवनीयका: ।। ५९ [59] कल्याणप्रान्तसञ्जाता भीवण्डीजनुष: परे । श्येनग्रामभवा: केचित्तथा खानवलीयका: ।। ६० [60] नानादेशसमावासा: प्रवीरा वीरमण्डले । सुबेदारा नायकाश्च जुम्लेकारा: सहस्रश: ।। ६१ [61] हवालदारा: प्रख्यातास्तथा सर्णोबता अपि । (ए)काकिन: परे केऽपि केऽपि बन्धुसुहृद्वृता: ।। ६२ [62] डिचोलीकडवाडस्था: शिवेश्वरनिवासिन: । आङ्कोलेकरनामानस्तथा बाधेकरा अपि ।। ६३ [63] कुलशीलावृता: सर्वे शक्रवत्पृथुविक्रमा: । मदीयपत्तिसेनाया जनयन्ति मुखश्रियम् ।। ६४ [64]

अर्थ – सुवर्णदुर्ग भागातील निवडक असे तयार सैनिक माझे अनुयायीत्व स्वीकारलेले (करवीरांबरोबरचे) कर्नाटकातील सैनिक माझ्या सैन्याच्या अग्रभागी भयानक ध्वनी करणारे, आपल्या लोकांनी घेरलेले रक्षण करीत असलेले दिसतात. नाना नाटके करण्यात निपुण असलेले, पुण्यवंत असे कर्नाटकातील वीर माझ्या सैन्याच्या अंतर्भागात पुरेसे आहेत. विजयी पराक्रम करणाऱ्या, पुन्हा पुन्हा शोभणाऱ्या (लक्षात राहणाऱ्या), महाराष्ट्रीयांच्यासह शालवनातील सेवक, कल्याण आणि भिवंडीत जन्मलेले, तसेच श्येनगावचे, खानवलीचे आणि इतर देशाचे रहिवासी असून शूरांमधे श्रेष्ठ, वीर, सुभेदार, नायक, जुमलेदार, हवालदार, सरनौबत, एकएकटे किंवा भाऊ, मित्र, नातलग यांच्यासह डिचोलीकर, वाडीचे शिवेश्वर येथील आंकोलेकर, बांदेकर हे सर्व कुलशीलवान असून, इंद्राप्रमाणे पराक्रमी असे माझ्या पायदळाच्या अग्रभागी शोभा आणीत आहेत.

पण्डाताण्डवनिष्णाता गीष्पते: समताङ्गता: । रचयन्ति श्रियं काञ्चित्सभासु मम पण्डिता: ।। ६५ अथर्वण इवाथर्वरहस्यपरिशालिन: । ललन्ति ब्राह्मणा ब्रह्मविद: सर्वत्र कर्मसु ।। ६६ चतुर्वेदविद: केचित्त्रिवेदीपारगामिन: । द्विवेदाध्ययिन: केचिदेकवेदरता: परे ।। ६७ श्रोत्रिया: स्नातका मौनव्रतिनो जापका अपि । तापसा जटिला: केचिद्वल्कलाजिनवासस: ।। ६८ [68]

अर्थ – बुद्धीचे तांडव करण्यात निष्णात, बृहस्पतीच्या बरोबरीला पोहोचलेले असे पंडित माझ्या दरबारास आगळीच शोभा आणतात. अथर्वणाप्रमाणे अथर्व वेदाचे रहस्य परिशीलन करणारे ब्रह्मवेत्ते सर्वच कर्मामधे विलसत असतात. काही चारही वेद जाणणारे, काही तीनचा पार गाठलेले, काही दोन वेदांचे अध्ययन करणारे, काही एका वेदाच्या अभ्यासात गुंतलेले, श्रोत्रिय स्नातक, मौनव्रती, जप करणारे, जटा वाढवून तप करणारे, वल्कले धारण करणारे

यायजूका योगविदो दीक्षिता अग्निहोत्रिण: । अयाचितव्रता ब्रह्मचारिणश्चोर्ध्वरेतस: ।।६९ अधोमुखा ऊर्ध्वमुखा जीर्णपर्णाशनास्तथा । शीर्णपर्णकृताहारा उञ्छवृत्तिरता: परे ।।६८ पञ्चाग्निसाधना वायुभक्षका धूमभक्षका: । तोयाहारा: फलाहारा: कन्दमूलाशना: पुन: ।। ६९ नानावेषधरा: केचिज्जटिला मुण्डिनोऽपि च । त्रिदण्डिन: केऽपि लसत्त्रिजटा द्विजटा अपि ।। ७० [70] उलूखलमुखा: केचिद्गोमुखा गोमयाशना: । गोमूत्रप्राशना: केचिच्छाकाहाराश्च केचन ।। ७१ [71] रामानुजा वैष्णवाश्च तप्तमुद्राङ्किता अपि । शुद्धमुद्राङ्कितै: सौरै: शाक्तैर्गाणेशकै: सह ।। ७२ शैवै: कैश्चिद्ब्रह्मविद्भिर्मान्त्रिकैस्तान्त्रिकैर्वृता: । मुनयो यतय: केचित्प्रसन्नमतय: सदा ।। ७३ सिद्धा: सिद्धिसमृद्धार्थां गणकैरनुलक्षित: । चिन्तयन्ति ममाभीष्टं निरुपद्रवसंश्रया: ।। ७४ [74] केऽपि कार्मणवेत्तार: परकृत्यानिवारका: । आभिचारान् परकृतान् वारयन्ति मम प्रिया: ।। ७५ [75] पुराणा ब्राह्मणा: केऽपि पुराणार्थप्रकाशका: । पौराण्य: प्रथिता गाथा: कथयन्त: सभास्थिता: ।। ७६ [76] अलङ्कारविद: केऽपि धिषणापतिधीभरा: । आतोषयन्ति

**वाग्जालैर्मामकं मानसं मुहुः ।। ७७ [77] तर्कशास्त्रैकपठनात्कर्कशास्तार्किका जनाः । रञ्जयन्ति महोद्ग्राहैः समाजे मानसं मम ।। ७८ [78] पूर्वोत्तरां च मीमांसां पठित्वा केऽपि धीवराः । समर्थयन्ति सार्थेन स्वार्थान् स्वार्थपरायणाः ।। ७९**

**अर्थ** – यज्ञ करणारे, योगाचे जाणकार, अग्निहोत्री, दीक्षित, अयाचित व्रत घेतलेले, ऊर्ध्वरेते, ब्रह्मचारी, अधोमुख-ऊर्ध्वमुख आणि पिकलेली पाने खाऊन तपश्चर्या करणारे, वाळलेली पाने खाऊन राहिलेले, धान्याचे कण वेचून जगणारे, पंचाग्नी साधना करणारे, वायुभक्षक, धूमभक्षक, पाणी पिऊन राहणारे, फलाहारी, कंदमुळावर राहणारे, नाना वेश धारण करणारे, जटा वाढविणारे, मुंडन केलेले, त्रिदंडी संन्यास घेतलेले, त्रिजटी आणि द्विजटी म्हणून मिरवणारे, तोंडाचा उखळासारखा उपयोग करणारे, गोमुखी, गोमयावर जगणारे, गोमूत्र पिऊन राहणारे, शाकाहारावर राहणारे, (कृश असून सूर्याची प्रभा असलेले, मंत्र-तंत्राचे रहस्य जाणणारे, तांत्रिक-मांत्रिक, षड्दर्शनांचे रहस्य जाणणारे, प्रवचनकार, ज्योतिषी, ग्रहगणिती), रामानुजी, वैष्णव, तप्तमुद्राधारी, शुद्ध मुद्राधारी, सूर्योपासक, शाक्त, गाणपत्य, शैव (तांत्रिक-मांत्रिक), मुनी, यती, नित्य प्रसन्न असलेले, सिद्ध, सिद्धीच्या जोरावर समृद्ध झालेले, ज्योतिषाने दाखविलेले असे सर्व उपद्रव न करता माझा आश्रय घेतलेले, माझे अभीष्टचिंतन करीत आहेत. काही जादू वगैरे तंत्र जाणणारे, शत्रूची 'कृत्या' निवारण करणारे, मला प्रिय असलेले, माझ्यावर शत्रूने केलेले अभिचार दूर करीत आहेत. काही पौराणिक ब्राह्मण पुराणातील आशय सांगणारे, पुराणातील प्रसिद्ध गाथा सभेत सांगतात. काही प्रबुद्ध, साहित्यशास्त्राचे जाणकार आपल्या वाग्जालानी नेहमी माझ्या मनाला संतोष देतात. फक्त तर्कशास्त्र पढल्यामुळे प्रखर बुद्धिवादी सभेत मोठाले वाद करून माझे मनोरंजन करतात. काही पंडित श्रेष्ठ पूर्व आणि उत्तर मीमांसा अभ्यासून, स्वार्थी असल्यामुळे मार्मिक शब्दांनी आपल्या स्वार्थाचे समर्थन करतात.

**महाभाष्यप्रवक्तारश्छेत्तारः संशयस्य च । प्रदर्शयन्ति धात्वर्थान्नानारूपान्समाग्रतः ।।८० महाकाव्यकलालापललिताः कलिताऽखिलाः । आभूषयन्ति परममास्थानीस्थानमास्थिताः ।। ८१ [81] चतुर्दशसु विद्यासु शिक्षिता दीक्षिता अपि । विवदन्ति मिथो वादैः स्वमतस्थापनस्थिराः ।। ८२ [82] चतुःषष्ठिकलातत्त्वपारगाः कुलभूषणाः । विशेषयन्ति मद्रङ्गे परस्परजिगीषवः ।। ८३[83] नासत्याविव सर्वासु चिकित्सासु विचक्षणाः । आवहन्ति श्रियं काश्चिन्मामका रोगहारिणः ।।८४ व्यायामशिक्षकाः केचित्सम्भ्रमैः सम्भृताः सदा । कलां काश्चिद्रङ्गमध्ये दीपयन्ति ममाग्रतः ।। ८५ गान्धर्वविद्यासारस्य वेत्तारो दर्शका अपि । गायन्ति गायना गाथाः सुस्वरा वैणिकैः सह ।। ८६ मार्दङ्गिकाः पाणिवादा लयाकल्पनपण्डिताः । भाण्डैः सह महारङ्गे रञ्जयन्ति मनो मम ।। ८७ वाद्य(नाट्य)ज्ञानाभिज्ञतमाः सदाऽहम्मतिवर्जिताः । नटन्ति विनटन्त्युच्चैर्नटा केचन तोरणे ।। ८८ [88] आभङ्गुरावलग्नश्रीभराः स्तनभरैरलम् । नृत्यन्ति वारललनाः सकलाः सकलोज्वलाः ।। ८९ [89] विचित्रचित्ररचनाचतुराश्चटुलोक्तयः । चित्रकाराश्चित्रयन्ति सचित्रा मद्गृहान्तरम् ।। ९० कारवः कारुशास्त्रार्थवेत्तारश्चारुकुण्डलाः । सुरेन्द्रभवनाकारान् रचयन्ति मम ग्र(गृ)हान् ।। ९१ परीक्षकाः परीक्षाभिर्बह्वीभी रत्नसञ्चयान् । परीक्षन्ति स्फुरल्लक्षा दक्षिणाश्चारुलक्षणाः ।। ९२ [92] क्रयविक्रयमत्युच्चैः सततं सत्यवादिनः । वणिग्जनाः प्रकुर्वन्ति मत्पुरे गतभीतयः ।। ९३**

**अर्थ** – महाभाष्याचे प्रवक्ते आणि संशयाचे निरसन करणारे, माझ्या समोर धातूंचे अनेक



अर्थ उलगडून दाखवितात. महाकाव्यांच्या कलेविषयी भाषणाने मृदू झालेले, सर्वकाही आकलन केलेले, माझ्या दरबारातील मानाच्या स्थानी बसलेले, आपले स्थान चांगले भूषवीत आहेत. चौदा विद्यांचे शिक्षण घेतलेले आणि दीक्षितदेखील स्वमतांवर खंबीर राहून आपसात वाद रंगवितात. चौसष्ट कलातत्त्वात पारंगत झालेले कुलभूषण, परस्परांना जिंकण्याच्या इच्छेने (माझ्या) मनोरंगभूमीवर विशेष स्थान निर्माण करतात. अश्विनीकुमाराप्रमाणे सर्वविध चिकित्सेत विचक्षण झालेले माझे रोग दूर करून माझी थोडीशी संपत्तीही नेतात. काही व्यायाम शिक्षक गडबडीत असताना माझ्यासमोर आखाड्यात आपली कला उजळवून दाखवतात. गांधर्वविद्येचे रहस्य जाणणारे आणि प्रकट करणारे आपली गायने वीणासाथीबरोबर गातात. मृदंग वाजविणारे, टाळ्यांनी साथ देणारे, लयाची उत्तम जाण असणारे, वाद्यांसह रंगभूमीवर माझे मनोरंजन करतात. नाट्याचे उत्तम ज्ञान मिळविलेले, केव्हाही अहंकार नसलेले असे नट राजद्वारावर आपल्या उच्च अभिनयाचे दर्शन घडवितात. किंचित वक्र आणि जड झालेल्या स्तनभारयुक्त अशा सौंदर्याच्या जोरावर उज्ज्वल कलावान अशा सर्व वारांगना नर्तन करतात. मधुरभाषी, चित्रविचित्र रचना करण्यात चतुर असलेले चित्रकार माझ्या सदनात चित्रे काढून आश्चर्यचकित करतात. वास्तुशास्त्रज्ञ, अभियंते, उत्तम वास्तुआलेख तयार करून माझ्यासाठी इंद्राच्या भवनाप्रमाणे बांधकाम करून देतात. रत्नपारखी अनेकविध रत्नसंचयाची परीक्षा करून, उत्तम लक्षणे असलेले, सहजपणे लक्ष रत्ने दक्षिणा घेतात. सत्यवादी असे व्यापारी माझ्या नगरात निर्भय होऊन नेहमी वरच्या दर्जाची खरेदी-विक्री करीत असतात.

**कुरङ्गवाहनोदग्रवेगाः केऽपि तुरङ्गमाः । हेषन्ति नृत्यन्त इव चत्वरे यामिकैः सह ।। ९४ गलन्मदाः सदोदग्रवेगाः केऽपि मतङ्गजाः । गर्जन्ति घनगम्भीरमजिरेऽरातिदारुणाः ।। ९५**

**अर्थ** – काही घोडे हरिणांच्या वाहनाप्रमाणे तीव्र गतिवान असल्यामुळे चौकीदारांबरोबर चव्हाट्यावर नाचत खिंकाळतात. काही हत्ती मद गळत असल्याने तीव्र वेगाने अंगणात घनगंभीर गर्जना करीत शत्रूंना धडकी भरवितात.

**रथिभिः संयुताः केचिदङ्गणेऽमी महारथाः । विभान्ति भानुप्रतिमास्तेजोभिर्मत्प्रियङ्कराः ।। ९६ मया दत्तानि देवेन्द्राः पितृभिः सहिताश्चिरम् । हव्यकव्यानि गृह्णन्ति वितन्वन्ति मम प्रियम् ।। ९७ [97] इत्थमापूरितो गौर्या शङ्करेण मनोरथः । तथापि जागर्ति मयि चिन्तानन्ता बतागता ।। ९८ [98] कथं सुतो मम भवेत्प्राज्यसाम्राज्यकारणम् । सुधीवराः सभास्ताराः प्रविचार्यार्यसम्मताः ।। ९९ [99] कानुष्ठानस्य रचना पुरश्चर्याऽथ का पुनः । प्रकर्तव्या मया ब्रूत सप्रधानाः समन्त्रिणः ।। १०० [100] इत्थं शम्भुनृपः प्रगल्भविभवः शक्रश्रियं भर्त्सयन् शम्भ्वाराधन-साधनोऽपि तुलजासर्वस्वभूतः पुनः । पुत्रेहां मनसा वहन्निजसभा-स्तारान्निगद्योच्चकैस्तूष्णीमास सतृष्ण एव निभृतं देव्याः समाराधने ।। १०१ [101]**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे परमानन्दात्मजदेवदत्तोद्भवप्रकाशितायां शुभलक्षणलक्षितायां शिवपुराणान्तर्गतायामनेकाध्यायसाधितायां वैयासिक्यामंशावतरणे राजाधिराज-शम्भुराजोक्तिर्नाम अध्यायः ।**

**अर्थ** – सारथ्यासह महारथीही माझ्या अंगणात सूर्याप्रमाणे आपल्या तेजाने तळपतात. पितरांसह देवेंद्रही मी दिलेली हव्यकव्ये घेतात व माझे प्रिय करतात. अशा रीतीने गौरीशंकर माझे मनोरथ पुरवीत आहेत. तथापि एक चिंता सतत जागृत आहे. माझा मुलगा मोठे साम्राज्य कसे मिळवील? बुद्धिमान व शिष्टसंमत, अशा दरबारातील प्रधान आणि मंत्री यांनी विचार करून कोणते अनुष्ठान व

पुरश्चरण करावे ते सांगावे. याप्रमाणे इंद्राचे वैभव तुच्छ लेखणाऱ्या, प्रगल्भ वैभव असलेल्या शंभूराजाने शिवोपासनेची साधना करीत असूनही आपणास पुत्र व्हावा ही इच्छा आपल्या दरबारातील पंडितांना स्पष्टपणे सांगून तुळजाभवानीच्या भक्तीची इच्छा करीत मौन धारण केले.

अनुपुराण सूर्यवंश परमानंदाचा पुत्र देवदत्ताचा मुलगा गोविंद याने प्रकाशित केलेला शुभलक्षणकारक शिवपुराणातील अनेक अध्याय संहितेतील वैयासिक अंशावतरण राजाधिराज शम्भुराजोक्ति नावाचा अध्याय.

## कालीदेवीचे वर्णन व स्तुती - अध्याय २

**कवीन्द्र उवाच । इत्थं निगद्य धरणीपाले शिवसुते तदा । तूष्णीम्भूते सभास्तारा: परस्परमुखेक्षणा: ।। १ छन्दोगामात्यसहिता: सोपाध्याया: सयोगिन: । शिवयोगिनमत्यर्थं पुरस्कृत्य तपोनिधिम् ।। २ अब्रुवन्वचनैश्चारुचमत्कृतिविधायकै: । एकचित्ताग्रतां गत्वा श्रृणुत द्विजसत्तमा: ।। ३** [3]

**अर्थ** – कवीन्द्र म्हणतात, ''याप्रमाणे शिवपुत्राने सांगितल्यावर मूकपणे दरबारातील लोक एकमेकांच्या तोंडाकडे पाहू लागले. छंदोगामात्यासह योगी आणि उपाध्याय तपोनिधी शिवयोग्यांना विशेषरीत्या पुढे करून सुंदर चमत्कृतीपूर्ण आणि विधायक अशा शब्दात सांगू लागले. हे श्रेष्ठ ब्राह्मणहो, एकाग्र चित्ताने ऐका.''

**मन्त्रिण ऊचु: । भो राजन्यकुलोत्तंस चिन्तां मा कुरु सर्वथा । आपूरितार्थनिचयां योगनिद्रां हरे: पराम् ।। ४** [4] **परावरैकसिद्धीनां दात्रीं पात्रीं सुखस्य च । दमिताशेषदैत्येन्द्रमण्डलां मङ्गलालयाम् ।। ५ तडित्कोटिप्रतीकाशतेजोभरविराजिताम् । पञ्चाशद्वर्णनिलयां सुरूपां मदमन्थराम् ।। ६** [6] **मदघूर्णितरक्ताक्षीं योगियोगैकगोचराम् । चराचरस्य निर्माणकारिणीं शङ्करप्रियाम् ।। ७ शक्तीनामपि सर्वासामाद्यां वन्द्यां विशेषत: । वेद्यां समस्ततन्त्रौघैर्मन्त्र-सङ्घप्रवर्तिनीम् ।।८ भवत्कुलैकवरदां दरदां दनुसन्ततौ । दयान्वितां सदोद्दाम-पाखण्डदमनोद्धुराम् ।। ९** [9] **मुक्तामणिप्रघटितमायूरोद्भासिनासिकाम् । ताटङ्कयुग-लीभूतभानुराकेशभासुराम् ।। १०** [10] **अनेककोटिब्रह्माण्डजननीं भञ्जिनीमपि ।। ११** R. cm. 11. **अशेषदोषदलिनीं दीनवृन्दाभिनन्दिनीम्। महाकालस्य रमणीं जननीं भगिनीमपि ।। १२** [12]

**अर्थ** – मंत्री म्हणाले, हे क्षत्रिय कुलभूषणा, मुळीच चिंता करू नकोस. सर्व अभीष्ट पूर्ण करणारी हरीची योगनिद्रा अशा सर्वार्थसाधक सज्जनांची कामधेनूच अशा देवीची आराधना कर. मंगलमय अशा तिने सर्व दैत्य राजांच्या मंडलाचे दमन केले आहे. कोट्यवधी विद्युतप्रकाशाच्या तेजाने ती विराजत आहे. अत्यंत सुंदर मदमन्थर पन्नास वर्णांची आभा तिच्या ठिकाणी आहे. मदाने फिरणारे लालबुंद डोळे असलेली ती योग्यांना योगसाधनेमुळेच दर्शन देते. ती शंकराला प्रिय असून चराचर विश्वाची निर्माती आहे. सर्वप्रथम वंदनीय, सर्व तंत्रांनी ज्ञात होणारी, अनेक मंत्र प्रवर्तित करणारी, दानवांना भय उत्पन्न करणारी, तुमच्या कुलाची वरदायिनी, सदय, नेहमी उद्दाम अशा पाखंडी वृत्तीवर तुटून पडणारी, आपल्या नथीतील मोती आणि मणी यामुळे मयूराप्रमाणे शोभणारी आहे. आपल्या बाहुभूषणरूपी सूर्य-चंद्रामुळे तेजस्वी दिसत आहे. ती अनंतकोटी ब्रह्मांडे निर्माण करते व त्यांचा भंगही करते. सर्व दोष दूर करणारी, सर्व दीनांना आनंद देणारी ती महाकालाची रमणी, जननी आणि भगिनीही आहे.

**करद्वयाङ्गुलिनखा जाग्रदग्राग्र्यलीलया । दशमूर्ती: कीर्तिपूर्ती: प्रकुर्वन्ती मुरद्विष: ।।१३**



**जितनिद्रस्य भद्रस्य रुद्रस्य गततन्द्रिण: । कल्पयन्ती कटाक्षस्य लीलयैकादशाकृती ।। १४ तुषारहेमाद्रिकुचां स्फुरदम्बरचोलिकाम् । वसूनष्टमरुद्युक्तान्शक्राद्यान्सुरनायकान् । जनयन्तीं मुनिमनुयुगानि किल लीलया ।। १५ अत्युदश्चच्चारुलीलाधृतलीलावतीतनुम् । जनयन्तीं कोमलभुजां श्यामवस्त्रविलासिनीम् ।। १६** [16] **जितहंसगतिं शश्वत्क्वणत्कनककङ्कणाम् । दाडिमीबीजसदृशन्तपङ्क्तिद्वयोज्वलाम् ।। १७ गूढगुल्फां कूर्मपृष्ठजयिष्णुप्रपदान्विताम् । पादाङ्गुलिनखज्योतिपरिनिर्जितकौमुदीम् ।। १८** [18] **अङ्गुल्यग्राताम्रमानकच्छपीनादसुन्दराम् । भारत्याश्चारुतालादिगीताकर्णननिश्चलाम् ।। १९** [19] **आलोललोचनां लोलां लीलालालित-भूसुराम् । अचिन्त्यां सत्यनिलयां महितां सहितां श्रिया ।। २०** [20]

**अर्थ** – एकापेक्षा एक श्रेष्ठ लीलांनी विष्णूचे दहा अवतार निर्माण करून ती कीर्तीने विश्व भरून टाकते. निद्रा जिंकलेल्या, जागृत अशा सौम्य रुद्राच्या अकरा मूर्ती कटाक्षांच्या लीलामात्रे निर्माण करते. हिमालय हेच जिचे स्तन, चमकणारे आकाश हीच जिची चोळी, अष्टवसू, मरुदगण आणि देवांचे नायक इंद्रादी तसेच सात मन्मंतरे सहजपणे ती निर्माण करते. सुंदर विलासांनी, अत्युच्चपदी जाणारे, लीलावतीचे रूप धारण करणारी, श्यामल वर्णाची, कोमल बाहू असलेली, निळ्या वस्त्रांनी शोभायमान झालेली, हंसगतीलाही जिंकलेली, सतत किणकिणणारी सुवर्ण कंकणे घालणारी, डाळिंबाच्या दाण्याप्रमाणे उज्वल दंतपक्ती असलेली, पायाचा घोटा आवृत असलेली, कासवाच्या पाठीवर आपली जयिष्णू पायाची बोटे ठेवलेली, पायाच्या नखांच्या किरणांनी चंद्रिकेला (चांदण्या रात्रीला) पराजित करणारी, अंगठ्याच्या टोकाप्रमाणे किंचित तांबूस वर्णाच्या बासरीच्या नादाने सुंदर भासणारी, सरस्वतीच्या मनोहर तालादीसहित गीत ऐकण्यात तल्लीन झालेली, किंचित चंचल नेत्रांची, विलासशील, सहजपणे भूसुरांचे लाड करणारी, अचिंत्य परंतु सत्य धरून राहणारी, वैभवाने युक्त व श्रेष्ठ असलेली,

**सदाशिवमहाप्रेतहृत्सरोजोपरि स्थिताम् । महाघोरविरावाभि: शिवाभि: परिवारिताम् ।। २१** [21] **नरास्थिमालाकलितां नरमुण्डविभूषणाम् । कृतकाञ्चीं शावकरैर्भूतै: प्रेतै: प्रवेष्टिताम् ।। २२ शाकिनीडाकिनीरुद्रवेतालबललालिताम् । मुक्तकेशीं मुक्तवस्त्रां विमुक्तमणिकञ्चुकीम् ।।२३ करिशुण्डासमाकारचारूरुयुगभासुराम् । सुरासुर-वधूवृन्दसेविताङ्घ्रिसरोरुहाम्।।२४ दक्षयज्ञप्रमथिनीं समस्तपुरुषार्थदाम्। पूर्णचन्दिर-सङ्काशवदनां मदनाकुलाम् ।।२५** [25] **सुस्निग्धात्यर्थकुटिलचारुभ्रमरकावलिम् । आदीर्घवेणिकां ज्ञानदीपिकां रत्नमुद्रिकाम् ।। २६** [26]

**अर्थ** – सदाशिवाच्या हृदकमळावर बसलेली, अत्यंत भयानक आवाजाच्या कोल्ह्यांनी वेढलेली, माणसांच्या हाडांची माळ घातलेली, कवट्यांचे अलंकार ल्यालेली, कंबरपट्टा घातलेली, प्रेतांच्या भोवती वावरणाऱ्या भूत-प्रेतांनी आत प्रवेश केला आहे अशी, शाकिनी-डाकिनी, रुद्रवेताळ यांच्या बळावर हालचाल करणारी, केस मोकळे सोडलेली, विसकळीत वस्त्रांची, मणिखचित कंचुकी अस्ताव्यस्त झालेली, हत्तीच्या सोंडेप्रमाणे आकार असलेल्या सुंदर मांड्यांनी विलसणारी, सुरासुरांच्या स्त्रियांकडून पदकमलांची सेवा करून घेणारी, दक्षाचा यज्ञ उधळणारी, सर्व पुरुषार्थ देणारी, पूर्ण चंद्राप्रमाणे मुखशोभा असलेली, मदन विकारांनी व्याकूळ झालेली, सुस्निग्ध आणि अत्यंत वक्राकार अशा सुंदर भुंग्यांची भोवताली रांग असलेली, किंचित लांब वेणी असलेली, ज्ञानाची दीपिका, रत्नांची अंगठी घालणारी.

रत्नग्रैवेयकां रत्नकाञ्चीं रत्नललामिकाम् । सरत्नवलयां रत्नकेयूरपरिराजिताम् ।। २७ [27] चतुर्भुजां त्रिनयनां खड्गमुण्डप्रमोदिनीम् । वराभयं सन्दधतीं कालिकां कविचन्द्रिकाम् ।। २८ [28] समाराधय सर्वार्थसाधिनीं साधुनन्दिनीम् । एनाङ्गतैनाः पश्चात्त्वं स्वाभिलाषमवाप्स्यसि ।। २९ [29]

अर्थ – रत्नांची माळ गळ्यात घालणारी, रत्नांचा कंबरपट्टा घातलेली, रत्नांची आभूषणे असलेली, रत्नांचे वलय वापरणारी, रत्नांच्या बाहुभूषणांनी शोभणारी, चतुर्भुज, त्रिनयन, तलवार आणि कवट्यांनी आनंद मानणारी, वर आणि अभय देणारी, कवींची चंद्रिका अशा त्या कालीची आराधना कर. अशा सर्वार्थसाधक, सज्जनांची कामधेनूच, अशा देवीची निष्पाप मनाने आराधना कर म्हणजे तुझे इच्छित तुला मिळेल.

इत्युक्तः शम्भुराजेन्द्रो योगिना शिवयोगिना । केशवेन गणेशेन मन्त्रिभिश्चानुमोदितः ।। ३० [30] सोपाध्यायैर्द्विजश्रेष्ठैः सिद्धैरन्यैर्मुहुर्मुहुः । सम्वर्धितोऽलं वाग्जालैर्भाविभव्यसमन्वितैः ।। ३१ [31] शिवराजात्मजः शम्भू राजराजसमः श्रिया । आनन्दसिम्धुलहरीनिमग्नः समजायत ।। ३२ ततोऽस्तुवीत्स्वमनसा कालीं स्वीयामुपासनाम् । आसन्नोदर्कसम्पर्कः प्रसन्नवदनो नृपः।। ३३ [33]

अर्थ – योगाभ्यासी शिवयोग्यानी याप्रमाणे शंभूराजांना सल्ला दिला व केशव, गणेश आणि मंत्री यांनी त्यास अनुमोदन दिले. उपाध्याय, द्विजश्रेष्ठ आणि अन्य सिद्धपुरुष यांनी पुनःपुन्हा भविष्यकाळातील गोष्टींच्या आश्वासनांनी त्याला हुरूप आणला. वैभवाने राजराजेश्वर असा विलसणारा शिवपुत्र शंभूराजा आनंदसागराच्या लाटांत निमग्न झाला. त्यानंतर भविष्यातील वैभव जवळ येऊन ठेपले आहे असे वाटून प्रसन्न वदनाने राजाने आपली उपास्यदेवता काली हिची मनोभावे आळवणी केली.

मनीषिण ऊचुः । कवीन्द्र काली या प्रोक्ता सर्वशक्त्युत्तमोत्तमा । तस्याः स्वरूपं किं ब्रह्मन्किं वीर्यं को मनुः स्मृतः ।। ३४ [34] का पूजा किंविधं यन्त्रं कः कालः सिद्धिसाधने । यद्यस्ति करुणा चित्ते कथयाशु समासतः ।। ३५ [35] तथैव सिद्धिं सर्वत्र परमां शिवयोगिनः । स्थानजन्मभवां काञ्चिद्वद त्वं ललिताक्षरैः ।। ३६ [36]

अर्थ – पंडित म्हणाले, हे कवीन्द्रा, ही जी सर्व शक्तिशाली, सर्वोत्तम म्हणून जी कालीदेवी वर्णिली, तिचे रूप कसे आहे? तिचा पराक्रम कसा आहे? ती कोणत्या मनूतील आहे? तिची पूजा कशी करायची? तिच्या पूजेचे यंत्र कशा प्रकारचे आहे? सिद्धीसाठी उपासना करण्यास किती काळ लागतो? आपल्या मनात करुणा असल्यास तुम्ही आम्हाला हे थोडक्यात सांगा. शिवयोग्यांची परमसिद्धी सगळीकडे प्रसिद्ध आहे. तसेच तिच्या उत्पत्तीचे स्थानही आम्हाला आपल्या लालित्यपूर्ण भाषेत सांगावे.

गणेशभट्टः को नाम कोऽभूत्केशवभट्टकः । एतेषां प्रकृतिं मञ्जु प्रधानां वक्तुमर्हसि ।। ३७ [37] अगण्यपुण्यचरितश्रवणे बत कौतुकम् । नरीनर्ति वरीवर्ति स्पृहा भो कविनायक ।। ३८ [38] इति पृष्टः कविश्रेष्ठः सम्भ्रमेण मनीषिभिः । रहस्यमखिलं हर्षाज्जगाद वदतां वरः ।। ३९

अर्थ – हे गणेशभट्ट आणि केशवभट्ट कोण? त्यांची स्वभाव वैशिष्ट्ये आपण वर्णन करावी. अगणित पुण्य असलेल्या या चरिताच्या श्रवणासंबंधी आम्हाला खूप कुतूहल आहे. हे कविनायका! आमचे कुतूहल पुनःपुन्हा उसळून येत आहे. पंडितांनी गोंधळून जाऊन कविश्रेष्ठाला विनंती करताच



त्या उत्कृष्ट वक्त्याने आनंदाने सर्व रहस्य प्रकटविले.

कवीन्द्र उवाच । मनीषिणः सावधानाः श्रृणुध्वं चरितं महत् । पुण्यं पवित्रं परमं काल्याः श्रोत्रसुखावहम् ।। ४० आसीत्पुरा धरा सर्वा सलिलेन परिप्लुता । योगनिद्रामयो विष्णुर्योगनिद्रामदीधरत् ।। ४१ वटस्य पत्रस्य पुटे शयाने पुरुषोत्तमे । तदा तत्कर्णमलजौ प्रभूतबलदर्पितो ।। ४२ मधुकैटभनामानौ दानवौ साधुगर्हितौ । दैवेनाविष्टहृदयौ कालयन्त्रनियन्त्रितौ ।। ४३ आस्फाटयेन्तौ स्वभुजौ तृणीकृत्य जगत्त्रयीम् । महामदभरोदग्रौ द्रोहोद्रेकसमेधितौ ।। ४४ [44] अकस्मादिव संवृद्धौ कालानलसमद्युती । प्रतीतौ विश्वविजये परस्परहितैषिणौ ।। ४५ एकांशाविव सर्वस्वभूतौ दनुजसन्ततेः । उन्मत्तौ क्रोधरक्ताक्षौ विष्णुनाभिकृतालयौ ।। ४६ [46] महाकापट्यभरितौ चरितौ बलिनां वरौ । धातारमत्तुमालोलौ विरेजाते मनस्विनौ ।। ४७ [47] ततो विधाता तौ वीक्ष्य भयाकुलितमानसः । निद्रामुद्राङ्गतो विष्णुः किं कार्यमिति चिन्तयन् ।। ४८ [48] क्षणं तूष्णीं समास्थाय प्रविचार्य स्वके हृदि । अत्यर्थमस्तुव–त्स्तोत्रैर्योगनिद्रामनुत्तमाम् ।। ४९

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, ''विद्वज्जनहो, हे मोठे पुण्यपावन कालीचे चरित्र ऐकण्यास सुखकारक आहे. ते आपण सावधानपूर्वक ऐका. पूर्वी सर्व पृथ्वी पाण्याने भरून गेली. विष्णू आपल्या योगनिद्रेत मग्न होते. पुरुषोत्तम विष्णू वडाच्या एका पानाच्या दुमडीवर झोपले असताना त्यांच्या कानाच्या मळापासून मधू आणि कैटभ या नावाचे दोन दानव उत्पन्न झाले. ते पुष्कळशा बलामुळे उन्मत्त झाले व साधूंनी त्यांची निर्भर्त्सना केली. कालचक्राच्या प्रभावाने दैव त्यांच्या हृदयात प्रविष्ट झाले व आपले बाहू थोपटून तीनही जगांना जुमानीनासे झाले. गर्वातिशयाने क्रूर होऊन आणि विरोध होताच घमेंडीने पेटून उठले. आकस्मिकपणे कालाग्नीप्रमाणे तेज असलेले ते आणखी वाढून एकमेकांचे हितचिंतक असलेले विश्व जिंकणे शक्य आहे असे त्यांना वाटू लागले. दनूच्या संततीला एकच अंश असलेले ते आपले सर्वस्व मानू लागले. विष्णूच्या नाभीचा आश्रय केलेले, उन्मत्त, क्रोधाने डोळे लालबुंद झालेले, अत्यंत कपटीपणा अंगात मुरलेले, महाश्रेष्ठ पराक्रम असलेले आणि मनस्वी असे ते दोघे ब्रह्मदेवाचा ग्रास करण्यास टपले. ब्रह्मदेव त्यांना पाहून मनात भयभीत झाला व विष्णूतर योगनिद्रेत आहेत, आता काय करावे? अशा विचाराने क्षणभर मौन धारण करून, मनात खोल चिंतन करून त्या श्रेष्ठ योगनिद्रेची स्तोत्रे गाऊ लागले.

विधातोवाच । पुष्टिस्त्वमेव कृतिनां हृदयेषु तुष्टिः सृष्टिर्विसृष्टिरसि कापि विकृष्टिरेव । धृष्टिः सुवृष्टिरतिवृष्टिरवृष्टिरेका मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५० [50] मायाभरैर्विरहि–तोऽप्यतिनिर्गुणोऽयम् क्षिप्तो गुणोग्रगहने गिरिजाधिनाथः । वेदा इमे तव नुतं चरितं रटन्ति मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५१ त्रैलोक्यमेतदखिलं रचितं त्वयैव ग्रस्तं युगान्तसमये किल लीलयोच्चैः । कल्याणदा त्वमसि भक्तजनस्य भूयो मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५२ दानं त्वमेव सुकृतं परमं त्वमेव रूपं त्वमेव किल वर्णमयी त्वमेव । सिद्धिस्त्वमेव नियतिश्च महासमृद्धिर्मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५३ [53] योगस्त्वमेव बत योगिजनैकवेद्यो रङ्गोऽसि रङ्गकमलोज्ज्वलरङ्गभूमिः । लीला कला नवरसा धिषणा रतिस्त्वं मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५४ [54]

अर्थ – ब्रह्मदेव म्हणतात, ''कोणत्याही कृत्याची पुष्टी आणि त्यायोगे हृदयात होणारा संतोष तूच आहेस. सृष्टी, प्रलय आणि विकृष्टिदेखील तूच आहेस. धारिष्ट्य, सुवृष्टी, अतिवृष्टी, अवृष्टी

सर्व तूच आहेस. माते, प्रसन्न हो आणि माझे अनाथाचे परिपालन कर. मायेच्या प्रभावाने रहित असा गिरिजानाथ, गुणांच्या दाट रानात असता तरी तो अतिनिर्गुणच आहे. तुझे स्तुत्य पराक्रम वेद घोकत आहेत. माते, प्रसन्न हो आणि या अनाथाचे प्रतिपालन कर. हे सर्व त्रैलोक्य तूच निर्माण केले आहेस, प्रलयकाळी ते तुझ्या श्रेष्ठ लीलांनी ग्रस्त झाले होते. भक्तजनांचे पुनःपुन्हा तू कल्याण करतेस. माते, या अनाथाचे तू प्रतिपालन कर. सर्व दाने आणि श्रेष्ठ-पुण्य तसेच रूपही सर्ववर्णमय अशी तूच आहेस. सर्व सिद्धी, नियती आणि महासमृद्धी तूच आहेस. हे माते, या अनाथाचे परिपालन कर. फक्त योगीजनांनाच ज्ञात असलेला योग तूच आहेस. रक्तकमलाप्रमाणे भासमान अशी रंगभूमी तूच आहेस. सर्व लीला, सर्व कला, नवरस, बुद्धी आणि प्रेम तूच आहेस. हे माते, तूच माझे परिपालन कर.

**त्वां ब्रह्मदेवविदुषोऽनुगृणन्ति वेदैर्विद्यां प्रगल्भधिषणाः प्रपठन्ति भूयः । अर्थं वदन्ति कवयो विदितार्थजाता मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५५ [55] मन्वन्तरं त्वमसि ये मनवस्त्वमेव भानुः शशी पवनभूमिनभोजलानि । वैश्वानरोऽसि परमो यजमान एको मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५६ [56] काव्यं त्वमेव कविताऽसि कवीश्वराणां निर्दूषणा गुणवती रसपूरिता च । धीरस्य धैर्यमथ वीरजनस्य वीर्यं मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५७ [57] कालस्त्वमेव कलितार्धकला त्वमेव बाला त्वमेव ललिता त्रिपुरा त्वमेव । सारः सरः सरसिजं च रसोरुचिस्त्वं मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५८ [58] शम्भोस्त्वमेव परमार्धशरीरमूर्तिः पूर्तिः समस्तजनतापरिचिन्तितस्य । उन्मत्तदैत्यदमनोदितकीर्तिलक्ष्मीर्मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ५९ [59]**

**अर्थ**-ब्रह्मदेव (अथर्ववेद) जाणणारे वेदरूपाने तुझेच गुणगान करतात. प्रौढ बुद्धीचे पंडित तुझीच विद्या अभ्यासतात. सर्व अर्थांचे ज्ञाते असे कवी त्याचाच अर्थ सांगतात. सर्व मन्वंतरे आणि मनु, सूर्य, चंद्र, वायु, भूमी, आकाश, अग्नी, पाणी हे सर्व तूच असून यजमानही तूच आहेस. काव्य आणि कवीश्वरांची दोषरहित, गुणसंपन्न, रसपरिपूर्ण कविता तूच आहेस. धैर्यवानांचे धैर्य आणि वीरांचा पराक्रम तूच आहेस. काल तूच आहेस, त्या कालाचे पळ तूच आहेस, बाला आणि ललिता (रूपातील) त्रिपुरा तूच आहेत. वस्तुतत्त्व, पाणी व त्यासह कमळ, यातील रस आणि रुची तूच आहेस. शंकराचे अर्धनारी रूप तूच आहेस. सर्व जनांच्या इच्छांची पूर्ती तूच आहेस. उन्मत्त दैत्यांचे दमन केल्याने उत्पन्न झालेली कीर्तिरूप लक्ष्मी तूच आहेस. माते! प्रसन्न हो, आणि या अनाथाचे प्रतिपालन कर.

**कान्तिस्त्वमेव किल कान्तिसमूहभाजां दैवं त्वमेव बत दैवसमेधितानाम् । राज्यं त्वमेव परितप्ततपोव्रतानां मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६० [60] ख्यातिस्त्वमेव परमासि सुलक्षणानां विद्यावतां नयवतां विनयोज्ज्वलानाम् । हासस्त्वमेव कलिताद्भुतविस्मयानां मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६१**

**अर्थ** – कांतिमान लोकांतील कांती तूच आहेस. दैवाने संपन्न असलेल्यांचे दैवही तूच आहेस. तपाचरणाचे व्रत केलेल्यांचे राज्यही तूच आहेस. सुलक्षणी, विद्यावान, न्यायी आणि विनयाने उजळून दिसणारे यांना मिळणारी श्रेष्ठ प्रसिद्धी तूच आहेस. अद्‌भुत, विस्मयकारक घटनातील हास्यही तूच आहेस. हे माते, तू या अनाथाचे प्रतिपालन कर.

**नाट्यं त्वमेव नटनं नटनायकानां लास्यं त्वमेव सुभगं गणिकाजनानाम् । लज्जाऽसि**



**काऽपि सकला कुलकामिनीनां मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६२ [62] विश्वेश्वरी त्वमसि विश्वविनोदशीला दुःशीलदारणकरी शरणागतानाम् । नारायणी त्वमथ पालनचारुलीला मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६३ [63] माया त्वमेव भुवनत्रयमोहिनी त्वं विश्वावसानसमये भुवनानि भूयः । स्वीयोदरे वहसि बालमुकुन्दमूर्तिर्मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६४ [64]**

**अर्थ** – नटांच्या अभिनयातील नाट्य तूच आहेस. गणिकांनी केलेले सुभग असे लास्य-नृत्य तूच आहेस. कुलस्त्रियांतील लज्जा तूच आहेस. विश्वाला रमविण्याचा स्वभाव असलेली विश्वेश्वरी तूच आहेस. शरण आलेल्यांची दुर्दशा तूच नाहीशी करतेस. सहजसुंदर अशी पालनकर्ती नारायणी तूच आहेस. त्रिभुवनाला मोह पाडणारी माया तूच आहेस. विश्वाच्या प्रलयाच्या वेळी असलेली भुवने-त्रिभुवने तूच आहेस. बालमुकुंदाची मूर्ती आपल्या उदरात तूच वाहतेस.

**वृत्तिर्निवृत्तिभरिताथ जनप्रवृत्तिः क्षान्तिः क्षतिश्च परिसन्नतिरुन्नतिश्च । प्रीतिर्दितिश्च सुमतिः कुमतिस्त्वमेका मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६५ [65] स्फीतिः स्थितिश्च विनतिर्लघुता च भीतिः स्फूर्तिश्च कापि विकृतिः प्रकृतिश्च काचित् । कृत्यं कृतिश्च निकृतिः परमाकृतिस्त्वं मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६६ यज्ञास्त्वमेव सकला यजनं त्वमेव दीक्षावतां रुचिचमत्कृतिदाऽथ दीक्षा । शिक्षावतामपि सतां प्रमिता तितिक्षा मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६७ [67]**

**अर्थ** – निवृत्तीने परिपूर्ण अशी वृत्ती, जनप्रवृत्ती, क्षमाबुद्धी, नुकसान, अतिनम्रता आणि उन्नती, प्रीती, दिती, सुमती आणि कुमतीही तूच आहेस. वृद्धी, स्थिती, विनय, लघुता, भीती, स्फूर्ती, विकृती, प्रकृती, कृत्य, कार्य, निकृती, अपमान हे सर्व तूच आहेस. सर्व यज्ञ, यजनविधी, दीक्षितांच्या रुचीला आनंद देणारी दीक्षा, सज्जनांच्या, सुशिक्षितांच्या मध्ये असलेली मोठ्या प्रमाणावरील तितिक्षा तूच आहेस. हे माते, या अनाथाचे तू प्रतिपालन कर.

**रक्षा भयाकुलितमानसमानवानां भिक्षा च भिक्षुकजनस्य नरस्य माया । सिद्धिः समृद्धिसहिता गृहिणां गृहस्था मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६८ [68] अस्त्रं तवैव बत रूपममोघवीर्यं शस्त्रं च शास्त्रमपि नाटकभाणजातम् । सङ्गीतगीतमपि वाद्यमथासि नादो मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ६९**

**अर्थ** – भयाकुल मानवांचे रक्षण, भिक्षुकांची भिक्षा, मनुष्यातील माया, सिद्धी, समृद्धी, गृहस्थांचे गार्हस्थ, गोपालन तूच आहेस. तुझे रूप हे एक बलशाली, अमोघ अस्त्र आहे आणि नाटक (=भाणादीतील नाट्यशास्त्र), संगीत आणि त्यातील गीत, वाद्य, नाद सर्व तूच आहेस.

**निद्रामयी त्वमसि मुद्रितलोकदृष्टिः स्वप्नः प्रशस्तिभरिता प्रथितस्त्वमेव । बोधः प्रबोधसमयेऽप्यथ का तुरीया मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ७० देव्या त्वया प्रविततानि विभान्त्यमूनि भव्योन्नतानि भुवनानि विजृम्भितानी । सर्वस्य सर्वमसि वर्धितशर्वगर्वे मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ७१ कारुण्यकन्दलितकान्तिभरं कटाक्षं ये तावकीनमनवे समुपालभन्त । ते दुस्तराण्यनुतरन्ति भरन्ति भाग्यैरम्ब प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ७२ लिप्सावतीप्रिततर्ति परिपूरयन्ती जागर्षि विश्ववलये वलितालिवीताः । एकापि शङ्करवधूरवधूत-पापा मातः प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ७३ प्रौढाः प्रगल्भधिषणा अपि ये सुधीरास्त्वामीरयन्ति परमामृतहेतुभूताम् । भूयो भजन्ति न भजन्ति जनुर्जनन्यां मातः**

**प्रसीद परिपालय मामनाथम् ।। ७४**

**अर्थ** – लोकदृष्टी झाकून टाकणारी निद्रा, स्तुतिपूर्ण (?) मोठी स्वप्ने, प्रबोधनकाळातील बोध आणि तुरीय अवस्था तूच आहेस. ही भव्य, उच्च आणि विस्तारलेली भुवने, हे देवी, तूच निर्माण केलेली असल्यामुळे शोभा देत आहेत. शंकराचा गर्व (थोरवी) तूच वाढविलेला आहेस. सर्वांनाच तू सर्वभूत आहेस. कारुण्याने उदयाला आलेल्या कमनीयतेने भरलेला तुझा कटाक्ष, हे अनघे, ज्यांना लाभतो, ते दुस्तर संकटे तरून जातात आणि भाग्याने भरून जातात. लोभी अशा सर्वांच्या इच्छा पूर्ण करणारी विश्वाच्या फेऱ्यात जागृत आहेस. शंकराची एकुलती एक आणि भुंग्यांनी गुंगविणारी पत्नी तू आहेस. तू पापांचे निर्धूलन केले आहेस. प्रगल्भ बुद्धी असलेले प्रौढ, धैर्यवंत 'परम अमृताचे सर्वस्व' असे तुझे वर्णन करतात आणि पुन:पुन्हा तुझ्या भक्तीला लागतात. स्वत:च्या आईलादेखील ते इतके भजत नाहीत. म्हणून हे माते, प्रसन्न हो आणि या अनाथाचे प्रतिपालन कर.

**इत्थं स्तुता भगवता विधिना विधानैर्नानाविधै: सरभसं नमिता च भूय: । सम्प्रार्थिता भगवती वरदा तदानीं विष्णुं मुमोच सहसा करुणार्द्रमूर्ति: ।। ७५ [75] मुक्तस्तया निभृततामसरूपयो–च्चैर्विष्णु: प्रसन्ननयनो दनुजालिजिष्णु: । बाह्वायुधेन युयुधे किल पश्चदिव्यसाहस्रवर्षक–ममोघपरक्रमोऽपि ।। ७६ [76]**

**अर्थ** – याप्रमाणे भगवान ब्रह्मदेवाने अनेक प्रकारांनी भगवतीची स्तुती केली आणि पुन:पुन्हा अतिशय त्वरेने प्रणाम केला. त्यावेळी प्रार्थना केल्यानंतर कृपाळू होऊन ती वर देण्यास प्रवृत्त झाली व विष्णूला सोडले. गुप्तपणे तामस रूप घेतलेल्या देवीकडून त्वरित मुक्त झाल्यावर अनेक दानवांना जिंकण्याची इच्छा असल्यामुळे विष्णूचे डोळे प्रसन्नतेने भरले आणि अमोघ पराक्रमी असूनही त्याला पाच दिव्य वर्षसहस्र इतका काळ आपल्या बाहूंच्या जोरावर लढवावा लागला.

**तौ मायया बत तमोगुणया विमुग्धौ दृप्तौ तदोचतुरिदं वचनं विचित्रम् । तुष्टा वयं मुररिपो वरमावृणीष्व युद्धस्य(द्धेन)तेऽप्यन(ल)मनेन विकल्पितेन ।। ७७ [77] वाक्यं समाकर्ण्य वरेण्यनाम्ना प्रयाचितौ मृत्युपथाय दुष्टौ । अथोचतुस्तौ जलहीनभूमावावां जहि त्वं मधुकैटभारे ।। ७८ [78] अङ्के तत: श्रीरमणो गृहीत्वा तौ दानवौ स्वीयसुदर्शनेन । जहार तेषां हृदयस्थजीवं शिवं पदं प्रापयिषु: प्रकामम् ।। ७९ [79] श्रीविष्णो: प्रभविष्णुतामथ समावीक्ष्योच्चकैर्भूजलं तेजोवायुयुतं नभश्च सुषमां दध्रेऽधिकां कामपि । चक्रुस्तोत्रशतै:स्तुतिं विधिमुखा: काल्या: प्रकामक्षणा: बध्वा हस्तसरोरुहाणि विनयान्नानाप्रणामानपि ।। ८० [80] विरचितशुभकीर्ति: काऽपि मूर्ति: शिवाया नलिनसदनचित्ताकाङ्क्षितं पूरयित्वा । तदनु झटिति लीलान्तर्हिताभूत्प्रभूतप्रथिततम–गुणश्री: श्रीजनित्री त्रिलोक्या: ।। ८१**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशेनिवासकरपरमानन्दात्मजदेवदत्तोद्भवगोविन्दकवीन्द्रप्रकाशितायां शिवपुराणा–न्तर्गतायामनेकाध्यायसाधितायामंशावतरणे कालीप्रभावनिरूपणमध्याय: ।।२।।**

**अर्थ** – तमोगुणाने माया उत्पन्न होऊन त्याने त्या दोघांना गप्प करून टाकले. दोघेही मदमस्त होऊन विचित्र बोलू लागले. ''हे मुरराक्षसाला मारणाऱ्या कृष्णा! आम्ही संतुष्ट झालो आहोत. वराची निवड कर. आता या युद्धाला पर्याय नाही.'' वरेण्य म्हणजे अत्यंत अभिलक्षणीय नावाच्या (ब्रह्मदेवाने) हे वाक्य ऐकून त्या दोघांना मृत्युपंथाकडे नेण्याची विनंती केली. तेव्हा ते दोघे म्हणाले,



''हे मधू आणि कैटभ, दैत्यांचे शासक असलेल्या कृष्णा! ज्या ठिकाणी पाणी नाही अशा भूमीवर आम्हाला मारावे.'' तेव्हा त्या लक्ष्मीपति विष्णूने त्या दोघा दानवांना मांडीवर घेऊन आपल्या सुदर्शनचक्राने त्यांच्या हृदयातला जीव, त्यांना कल्याणपदाला नेण्याची आत्यंतिक इच्छा असल्यामुळे, काढून घेतला. भगवान विष्णूंचा असा प्रभाव पाहिल्यावर पंचमहाभुतांमधे विलक्षण अशी शोभा दिसू लागली आणि ब्रह्मदेवाला पुढे करून अत्यंत आनंदित होऊन त्यांनी कालीदेवीला अनेक स्तोत्रांनी आळविले. आपले करकमल जोडून विनम्रपणे अनेकवेळा नमस्कारही केले. ती पार्वतीची मूर्ती पुण्यकारक अशी कीर्ती मिळवून कमलनिवासी ब्रह्मदेवाच्या मनातील इच्छा पूर्ण करून लगेच प्रथिततमगुण असलेली ती त्रैलोक्याची जननी लीलामात्रे करून अंतर्धान पावली.

अनुपुराण सूर्यवंश परमानंद नेवासकरांचा पुत्र देवदत्त व त्याच्यापासून जन्माला आलेला गोविंद कवींद्र प्रकाशित शिवपुराणांतर्गत अनेक अध्यायांच्या संहितेतील कालिप्रभाव निरूपण ।।अध्याय।।२।।

**बीजमंत्र** - अध्याय ३

**कवीन्द्र उवाच । अथोऽभिधास्ये परमं मन्त्रं तत्र प्रगोपितम् । वराङ्गमिव सर्वेषां गोप्यं प्रविदुषामपि ।। १ [1] स्वयं कृतमिवाकर्म जननीजारगर्भवत् । कन्यासम्भोगवत्पुम्भिर्भगिन्या: परिभोगवत् ।। २ अभक्ष्यभक्षणमिव मित्रद्रव्यापहारवत् । गोप्य: सर्वप्रयत्नेन पण्डितेन मया यथा ।। ३ नाशिष्याय कदा ब्रूयान्न शठाय कदाचन । न दाम्भिकायाकृतिने न च नष्टोद्धताय च ।। ४ यदि ब्रूयात्प्रमादेन देवताशापमाप्नुयात् । तस्मै कुप्यन्ति योगिन्य: सोऽनर्थ: सुमहान्स्मृत: ।। ५**

**अर्थ** – कवीन्द्र म्हणाले, ''आता मी एक अत्यंत गोपनीय असा श्रेष्ठ मंत्र सांगतो. हा मंत्र शिष्य नसलेल्याला आणि लबाडाला मुळीच सांगू नये. दांभिक, आळशी व नतद्रष्ट अशा माणसाला सांगू नये. चुकून सांगितला गेला तर देवतांचा शाप मिळेल. त्यामुळे योगिनी रागावतात. तो फार मोठा अनर्थ आहे.''

(श्लोक क्रमांक २ व ३चा अर्थ गाळला आहे. कारण त्यातील दुष्कर्मांचे वर्णन घृणास्पद वाटते.)

**पद्मभूर्वन्हिमारूढो मालिनीकलितान्तर: । द्विजराजकृतोत्तंसो बीजमेतत्त्रिवारत: ।। ६ [6] ये पठन्ति कविश्रेष्ठास्ते ज्येष्ठा: कविमण्डले । सिद्धिं पारमिकां यान्ति दक्षिणाया: प्रभावत: ।। ६ हरं सरक्षणं चन्द्रभूषितं द्वि: प्रयोजयेत् । जपकाले सधिषणधिषणां परिमर्दयेत् ।। ७ [7] शूली त्रिवेदी ललितो लक्ष्मीराकेशरञ्जित: । यो द्वि: स्मरति शत्रून्स क्षिपत्यतिपराक्रम: ।। ८ [8]**

**अर्थ** – ''ब्रह्मदेव अग्नीवर आरूढ होऊन गळ्यामधे माळ घालून हंसासारख्या थाटात बीजमंत्राचे त्रिवार पठण करतो (?)'' जे कविश्रेष्ठ (याप्रमाणे) पठण करतील ते कविमंडलामधे ज्येष्ठ ठरतील आणि मिळालेल्या दक्षिणेमुळे परमसिद्धी मिळवतील. चंद्राने भूषित झालेल्या संरक्षक अशा हरीचा जपाच्या वेळी दोन वेळा प्रयोग करावा आणि बुद्धिवानाच्या बुद्धीचा चुराडा करावा. तीन वेदांचा (ज्ञाता) शूल धारण करणारा सुंदर, (हर) लक्ष्मी आणि चंद्र यांनी रंजित झालेल्या (हरीचे) जो दोनदा स्मरण करतो, विशेष पराक्रम करून शत्रूला फेकून देतो.

**प्रतिबीजाधिकफलो ब्रह्मविष्णुशिवात्मक: । अनन्तपुण्यनिलयो योगिनामपि**

**दुर्लभः।।११[11] कलातीतं वरं वस्तु वर्णव्यक्तिमुपागतम् । द्वाविंशत्यक्षरो मन्त्रः सर्वेप्सितसमृद्धिदः ।। १२[12]**

**अर्थ** – प्रत्येक बीजमंत्राबरोबर अधिकाधिक फळ मिळवून ब्रह्मा–विष्णू–महेश असा (जप करणारा) अनंत पुण्याचा धनी होतो असा (जापक) योग्यातही दुर्मीळ आहे. हा बावीस अक्षरी मंत्र मनासारखी समृद्धी देणारा असून कलातीत अशी श्रेष्ठ वस्तू दृश्यरूपाला आणतो.

**यस्यानुष्ठानमात्रेण शक्रः सुरपदं गतः । कुबेरो धननाथत्वं वह्निस्तेजस्वितामपि ।। १३ [13]आस्ते यमो नियमकृत् त्रिलोक्यालोकलोकितः । निर्ऋतिर्नैर्ऋतिप्राज्यसाम्राज्यपदवीमगात् ।। १४ [14] वारुणीकृतसंवासो वरुणस्तोयनाथताम् । ईशानोऽभूदथेशान्यां तुषाराद्रिसुतापतिः । प्रभञ्जनः प्रबलतां भेजेऽखिलविभञ्जने ।। १५ [15] स्वपक्षबलसन्दृप्तो गरुडः पक्षिनाथताम् ।। १६ पालनं कुरुते विष्णुः प्रभविष्णुः पदे पदे । रोचिष्णुतां दिनमणिः प्रपेदे गगनेऽधिकाम् ।। १७ [17] वाचस्पतित्वमुदभूद्धिषणस्य विशेषतः । सुधामधुरिमोद्गारानदधच्छीतदीधितिः ।। १८ रम्भा दम्भानप्सरसामहरद्रूपसम्पदा । गन्धर्वाणामधिपतिर्विश्वावसुरथाभवत् ।। १९ शेषो विशेषप्रथिमा धराभारं बभार ह । अपारविघ्नसंहारधुरीणोऽभूद्गणाधिपः ।। २० [20]**

**अर्थ** – या मंत्राच्या अनुष्ठानाने इंद्राला देवपद मिळाले, कुबेर धनस्वामी झाला, अग्नीला तेजस्वीता प्राप्त झाली, यम हा सर्वांचे नियमन करणारा बनला. त्याच्यावर त्रैलोक्यातील सर्व प्रकाश पडला. निर्ऋतीला आपल्या दिशेचे मोठे साम्राज्य मिळाले, पश्चिम दिशेला असलेला वरुण हा जलाचा अधिपती झाला. हिमालय कन्येचा पती ईशान आपल्या दिशेला (मुख्य) झाला, वायू सर्वकाही मोडून–तोडून टाकण्याइतका प्रबळ झाला, आपल्या पंखाच्या बळावर विलक्षण अभिमान असलेला गरुड पक्ष्यांचा राजा म्हणवू लागला. विष्णू सतत प्रभावीपणे त्या मंत्राचे पालन करतो. सूर्य आकाशात अधिक तेजस्वी असतो. बुद्धीच्या जोरावर ब्रह्मदेव वाचस्पती झाला. चंद्राने अमृताची गोडी आपल्या किरणांत आणली, रंभेने आपल्या रूपसंपदेमुळे अप्सरांचे गर्वहरण केले. विश्वावसू हा गंधर्वाचा राजा झाला. शेषाने अधिक मोठेपणा मिळवून पृथ्वीचा भार स्वतःवर घेतला. गणपती अतिशय मोठ्या विघ्नांचा संहार करण्यात अग्रगण्य झाला.

**देवेन्द्रसेनापतितां स्थिरां भेजे षडाननः । त्रिलोकीमकरोद्वेधा ब्रह्माण्डान्यपि कानिचित् ।। २१ [21] रत्नाकरत्वमुदधिरवृणोद्रत्नसञ्चयैः । अमन्दगन्धकुसुमो मन्दारो नन्दनेऽवसत् ।। २२ [22]हरणं हरिणा नीता रुक्मिणीप्राणवल्लभा । प्रेष्ठा ज्येष्ठा गुणश्रेष्ठा बभूव रमणीगणे ।। २३ महाविक्रमसम्पूर्णो भार्गवः क्षात्रमण्डलम् । आचकर्त शरैरुग्रैरेकविंशतिसङ्ख्यया ।। २४ [24]शुक्रः प्रेङ्खत्क्रमं काव्यमकरोद्भव्यदायकम् । ततो वव्रे कवीन्द्रत्वं सुरासुरसभान्तरे ।। २५ [25]अचिन्त्यरूपचरितौ नासत्यौ सत्यसंश्रयौ । समीयतुः समगुणौ भिषग्वरवरेशताम् ।।२६**

**अर्थ** – षडानन हा देवेन्द्राचा कायमचा सेनापती झाला. त्रैलोक्यात ब्रह्मदेवाने विविध ब्रह्मांडे निर्माण केली. रत्नांचा साठा करून समुद्र रत्नाकर झाला. विशिष्ट प्रकारच्या सुगंधी फुलांमुळे मंदारवृक्ष नंदनवनवासी झाला, आपली प्राणवल्लभा रुक्मिणी हरीने हरण केली आणि स्त्रीसमूहात तिने ज्येष्ठत्व आणि गुणश्रेष्ठत्व प्राप्त करून ती हरीला परमप्रिय झाली. भार्गव परशुरामाने सर्व क्षात्रमंडळ एकवीस वेळा अतिशय तीक्ष्ण बाणांनी कापून काढले. शुक्राने भव्यताव्यंजक असे काव्य मंदक्रमाने तयार करून त्यावर देव–दानवांच्या सभांतून कविश्रेष्ठपद मिळविले. रूप आणि कर्म अचिंत्य असलेले सत्याश्रयी अश्विनीकुमार समगुण असल्याने उत्तम वैद्यांमधे श्रेष्ठता पावले.



**प्रेष्ठव्रतो वशिष्ठोऽसौ विश्वामित्रपराक्रमम् । जग्रासाव्यग्रहृदयो हर्षयन्शिष्यमण्डलम् ।। २७ [27] ब्रह्मर्षित्वं प्रकर्षेण ब्रह्मर्षिषु समावृणोत् । विश्वामित्रः पवित्रातिचरित्रः साधुसम्मतः ।।२८ गन्धर्वयक्षप्रवरकिन्नरैरभिशोभितः । अवाप पर्वतेन्द्रत्वं तुषाराद्रिः स्फुरद्धिमः ।। २९ [29] मेरुः सुवर्णप्राकारपरिखाशतभासुरः । समस्तदेववनितास्थानश्रियमसेवत ।। ३० [30]**

**अर्थ** – व्रताचरण अत्यंत प्रिय असलेल्या, एकाग्र चित्त झालेल्या, वसिष्ठांनी विश्वामित्राचा पराक्रमही कमी ठरवून आपल्या शिष्यगणांना आनंदित केले. विश्वामित्रही (त्याच मंत्राच्या जोरावर) पवित्र आणि अतिपराक्रमी होऊन सज्जनांच्या अनुमतीने ब्रह्मर्षींमधे श्रेष्ठ झाला. बर्फधारक हिमालय, गंधर्व–यक्ष–किन्नरांनी शोभून सर्व पर्वतांत श्रेष्ठ ठरला. सुवर्णाचा प्राकार शतावधी परिखा यांनी तेजस्वी झालेल्या मेरू पर्वताला सर्व देव आणि अप्सरा यांच्या निवासस्थानाची शोभा प्राप्त झाली.

**मार्कण्डेयो महायोगी योगयोगाङ्गगोचरः । दीर्घायुरप्रतिहतबलवीर्याण्युपाव्रजत् ।। ३१ [31] सुरर्षयो नारदाद्याः पुलस्त्याद्या महर्षयः । ब्रह्मर्षयः कश्यपाद्याः सम्प्रापुः स्वमनोरथान् ।। ३२ कामो निकामं कुसुमशरौघैर्धनुषा सह । अजयज्जगतीं जैतृज्योतिरुद्दीपयन्निव ।। ३३ [33] शीकराणुरिव प्रोक्तं मनोर्माहात्म्यमुत्तमम् । यस्य स्मरणमात्रेण सिद्धिभाग्जायते नरः ।। ३४ [34]**

**अर्थ** – महायोगी मार्कण्डेय योगाच्या सर्व अंगांनी संपन्न होऊन दीर्घायू बनला व त्याचे सामर्थ्य आणि वीर्य अप्रतिहत झाले, नारद वगैरे देवर्षी, पुलस्त्यप्रभृती महर्षी, कश्यपादी ब्रह्मर्षी यांना आपल्या मनोकामना पूर्ण करता आल्या. कामदेवाने धनुष्य आणि फुलांचे बाण अशा दुर्बल साधनांनी जग पूर्णतः जिंकून जणूकाही जेत्यांच्या पराक्रमाची ज्योतीच उजळली. या मंत्राचे माहात्म्य पाण्याच्या छोट्या थेंबाप्रमाणे उत्तम श्रेणीचे आहे. त्याच्या केवळ स्मरणाने सिद्धी प्राप्त होते.

**अथो यन्त्रं केरलानां वच्म्यहं साम्प्रदायिकम् । यस्मिन्प्रपूजिता देवी साधकाय प्रसीदति ।। ३५ [35] शाक्तं गन्धाष्टकं गृह्य विशोध्य रहसि स्थितः । कौशेयके विरचयेन्नवीने लोचनप्रियम् ।। ३६ रम्यं षट्कोणमालिख्य त्रिकोणत्रितयं ततः । वसुपत्रं धरागेहं त्रिरेखाङ्कितमुत्तमम् ।। ३७[37] चतुर्द्वारविशोभाढ्यमृजुरेखासमुज्ज्वलम् । अतिमात्रशुभावासमन्त्रमर्चयितुर्भवेत् ।। ३८**

**अर्थ** – आता केरळ लोकांच्या संप्रदायात असलेले यंत्र मी वर्णन करून सांगतो. यावर देवीची पूजा केली असता साधकाला ती प्रसन्न होते. एकांत स्थानी बसून शाक्तांना प्रिय असलेले अष्टगंध घेऊन व ते शुद्ध करून नवीन कोऱ्या वस्त्रावर नयनमनोहर असे यंत्र काढावे. सुंदर षटकोन काढून नंतर तीन त्रिकोण बनवून तीन रेघांनी अंकित असलेले वसुपत्र धारागृह काढावे व त्याला चार द्वारांनी शोभा आणावी, सरळ रेघांनी ते उठावदार दिसावे, पूजा करणाऱ्याने अत्यंत कल्याणकारक असलेला मंत्र काढावा.

**आदौ पुष्पाञ्जलिं दत्वा देव्यै पुष्पसमाकुलम् । साधकः पीठशक्तीनामथार्चनमुपाचरेत् ।। ३९ [39] सजयां विजयां पश्चादजितामपराजिताम् । नित्यां विलासिनीं दोग्ध्रीमघोरामथ मङ्गलाम् ।। ४० पीठशक्तय एताः स्युरथावरणदेवताः । समासेन प्रवक्ष्यामि देवतां तुल्यरूपिणीम् ।। ४१ [41] महाकालरतोत्साहां महाप्रेतशिवोपरि । शिवाभिर्घोररावाभिः समन्ताद्दिक्षुवेष्टिताम् ।। ४२ [42] घोराट्टहासां मदिरापानव्याघूर्णलोचनाम् । स्मरन्पुष्पाञ्जलिं कुर्वन्नङ्गानि प्रवजेत्ततः ।। ४३ [43] पूर्वो दिशं समारभ्य षडस्त्रयन्त्रमध्यगे । कालीं कपालिनीं कुल्लां कुरुकुल्लां विरोधिनीम् ।। ४४ [44] विप्रचित्तामथ नवकोणेऽन्या नवरूपिणीः । उग्रामुग्रप्रभां दीप्तां नीलां पश्चाद्घनामपि । बलाकिकामथो मात्रां मुद्रां मित्रामपि क्रमात् ।। ४५ [45]**

**सरोरुहाष्टपत्रेषु ललितेषु यथाक्रमम् । ब्राह्मीं नारायणीं माहेश्वरीं चामुण्डिकामपि ।। ४६** [46]
**कौमारीपूर्विकां पश्चादर्चयेदपराजिताम् । वाराहीं नारसिंहीश्च वसुसङ्ख्या वसुप्रदाः ।। ४७** [47]

अर्थ – प्रथम ओंजळीने देवीला फुले वाहून साधकाने पीठशक्तीचे अर्चन करावे. जया व विजया यांसह, नंतर अजिता आणि पराजिता, नित्या, विलासिनी, दोग्ध्री, अघोरा आणि मंगला या पीठशक्ती आवरणदेवता आहेत. यांना तुल्यरूप अशा देवतेचे मी संक्षेपाने वर्णन करतो, ‘‘महाकालाला आनंद देण्याचा उत्साह असलेली, महाप्रेत शिवावर बसलेली, शुभ आणि अतिघोर आवाजांनी, सभोवती वेष्टिलेली, मोठा अट्टहास करणारी, मदिरापानाने डोळे फिरत असलेली, अशा या देवीचे स्मरण करून व पुष्पांजली वाहून नंतर (पूजेच्या) इतर भागांकडे वळावे. पूर्व दिशेला सुरुवात करून षडस्त्र यंत्राच्या मध्यभागी काली, कपालिनी, कुल्ला, कुरुकुल्ला, विरोधिनी, एकाग्रचित्त, नऊ कोणात नऊ रूपे घेतलेली, तेजस्वी प्रभा असलेली, उग्रा, दीप्ता, नीला, पश्चाद्धना, बलाकिंका, मात्रा, मुद्रा आणि मित्रा, कमळाच्या आठ सुंदर पाकळ्यांवर क्रमाने ब्राह्मी, नारायणी, माहेश्वरी, चामुंडी, कौमारी, अपराजिता, वाराही, नारसिंही अशा आठ लक्ष्मींचे वैभव देणाऱ्या,

**अथो भूपुरेरखासु शोभनीषु समन्ततः । भैरवीश्च महाभैरवीमथो सिंहभैरवीम् ।। ४८** [48]
**धूम्रभैरविकां भीमभैरवीमुन्मनादिकाम् । वशीकरणपूर्वां च मोहनाद्यामतःपरम् ।। ४९** [49]
**दिगधीशान्हेतियुतानर्चयेत्साधकोत्तमः । एवमाराधिता काली सिद्धा भवति मन्त्रिणः ।। ५०**
**कृत्वा पुरा पुरश्चर्यामाचार्येणानुमोदितः । प्रयोगान्तन्त्रमार्गोक्तान्कल्पयेत्कल्पितार्थदान् ।।५१**
**अत्युत्तमः साधकानां साधुसाधितसाधनः । आत्मनोऽन्यस्य सर्वार्थजातमातनुतेऽचिरात् ।।५२**

अर्थ – तसेच भोवताली सुंदर भूपुरदर्शक रेखांमधे भैरवी, महाभैरवी आणि सिंहभैरवी, धूम्रभैरवी, भीमभैरवी, उन्मनाभैरवी वगैरेंच्या वशीकरणापूर्वी मोहना वगैरेंचे त्यानंतर दिक्पालांचे, त्यांच्या शस्त्रांसह खऱ्या साधकाने पूजा करावी. अशाप्रकारे कालीची आराधना केली असता मंत्र्यांना ती पावते. अगोदर आचार्यांची अनुज्ञा घेऊन पुरश्चरण केल्यावर संकल्पित गोष्टी देणारे तंत्रमार्गाचे प्रयोग करावे. साधकातील अत्युत्तम साधक चांगल्या प्रकारे साधना करून आपली साधने सिद्ध करतो व लवकरच स्वतःचे व सर्वांचे इच्छित साधतो.

**निन्दां प्रहासं कौटिल्यं द्वेषं रोषं जुगुप्सनम् । रहस्यभेदनं मानहानिं ताडनतर्जने ।। ५३**
**दुरुदन्तं दुरालापं दुरेहां दुर्निरीक्षणम् । दुःस्थितिं दुर्नयं दुःखाऽऽरोपणं मर्मघाटणम् ।। ५४**
**आक्षेपमुग्रवचनमनास्तिक्यमनादरम् । यदीच्छेत्सिद्धिमतुलां स्त्रीभ्य एतद्विवर्जयेत् ।। ५५**
**एवमाचारवान्मन्त्री पुरश्चरणसिद्धये । प्रकुर्वीत धृतोत्साहो होमब्राह्मणभोजने ।। ५६**
**शिवाबलिमुखान्सर्वान्बलीन्सम्यक्समर्पयेत् । पूजान्ते साधकोत्तंसो भुनक्ति विपुलं यशः ।।५७**
**आदीप्य दीपान्परितो घृततैलसमन्वितान् । कुङ्कुमागरुकस्तूरीचन्दनैरर्चयेच्छिवाम् ।। ५८**
**सहस्रनामपाठादि कुर्यात्स्वगुरुशिक्षया । सुवासिन्यः कुमार्यश्च बटुकं गणनायकम् ।। ५९**
**सिद्ध्यै यतमनोवृत्तिर्भावभक्तिसमन्वितः । समर्चयेत्सममतिरेतान्सिद्धिप्रदायकान् ।। ६०**

अर्थ – अतुलनीय सिद्धी मिळविण्याची इच्छा असेल, तर निंदा (मोठ्याने हसणे), कुटिलपणा, द्वेष, क्रोध, तुच्छताबुद्धी, रहस्यभेद, मानहानी, मारहाण, भीती दाखविणे, खोट्या वार्ता पसरविणे, दुष्टपणाचे भाषण, दुर्वासना, वाईट दृष्टी, वाईटाचा विचार, चुकीची नीती, दुःख लादणे, मर्मावर बोट ठेवणे, आरोप करणे, कठोर बोलणे, नास्तिक्य, अनादर या गोष्टी स्त्रियांच्या बाबतीत टाळाव्यात. याप्रमाणे आचारशुद्धी करून मंत्रसाधकाने होम–ब्राह्मणभोजन याबाबतीत उत्साहाने पुरश्चरणाच्या



सिद्धतेला आरंभ करावा. पार्वतीला द्यावयाचा (कोल्हा वगैरे) बळी आणि इतर बळी योग्यप्रकारेच अर्पण करावेत. पूजेच्या शेवटी साधकश्रेष्ठाला विपुल यश लाभते. तूप आणि तेल घालून सभोवती दिवे पाजळून कुंकू–अगरू–कस्तुरी–चंदन यानी पार्वतीची पूजा करावी. आपल्या गुरूने सांगितलेले सहस्रनाम पठण वगैरे करावे आणि सुवासिनी, कुमारी, बटू आणि गणनायक या सिद्धिदात्यांची समबुद्धीने मनोवृत्तींचा संयम करून भक्तिभावाने ‘सिद्धी द्यावी’ अशी (प्रार्थनापूर्वक) पूजा करावी.

**रात्रेरर्धमिते सदैव समये ध्यानप्रसक्तो नरो यो मन्त्रं परमं पठेच्छठजनालापं हठाद्वर्जयन् । भूशय्यासनसंस्थितो ललनया नानाविलासैर्ललन् काल्याः सः(स) कलयत्यतीवशुभ–दान्प्रौढान्कटाक्षक्रमान् ।। ६१ ध्यायेद्वामोर्ध्वहस्ते परिकलितमसिं मुण्डमेकं ततोऽधो हस्ते भीतिं वरञ्च प्रबलभयहरं दक्षिणाभ्यां वहन्तीम् । मध्याह्नादित्यकोटिप्रतिभटविलसद्दीधितिं कालकामां कालीं भालार्धचन्द्रां सुललितवसनां दिव्यभूषावृताङ्गीम् ।। ६२ इत्थं ध्यायन्नुदग्रां विगलितकबरीं कालिकां कालकामां कालातीतां कलाङ्कां नवकमलमुखी कृष्णवेषां सुभूषाम् । कृत्वा कान्तां निजाङ्के जपति मनुवरं सर्वसिद्धीश्वराणामीशत्वं याति तत्वं कलयति सततं सत्यवान्सत्यसङ्घः ।। ६३ होमद्रव्यैरपारैः परमरसपरो वह्निमध्येऽतिवेलं मन्त्रं जल्पन्पवित्रं गतविषयरतिर्यो जुहोति प्रकामम् । नानाभाषाविशेषाननुगमति कविर्भव्यकाव्येऽनुरूपान् निःशेषं दोषजातं परिहरति रतिं याति काश्चिद्रमायाः ।। ६४ निद्रां कामपि तन्द्रिकामपहरन्मुद्रां दधानोऽधिकं प्रेम्णा सान्द्रकृपामृतार्द्रहृदयामासंस्मरेत्कालिकाम् । भक्त्या पूरितमानसः सरभसं त्यक्तालसो लालसः पूजायां स कविः प्रगल्भकवितासाम्राज्यमामृच्छति ।। ६५ इत्थं कालीमहत्त्वं कथितमिह मया तत्त्वभूतं मुनीनां योगीन्द्राणां यतीनामहिकुलजनुषां भूसुराणां सुराणाम् । अग्रे वक्ष्यामि किञ्चित्कलिकलुषहरं योगिनः श्रीशिवस्य प्रौढं पुण्यंचरित्रं रुचिरुचिरमथो भो द्विजेन्द्राः श्रृणुध्वम् ।। ६६**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे अध्यायस्तृतीयः समाप्तः ।।**

अर्थ – अर्धी रात्र झाल्यावर ध्यानमग्न होऊन, कडकपणे लबाड लोकांचे बोलणे कानावर येऊ न देता जो साधक मंत्र जपेल, भूमीवरच शय्यासन घालून बसून स्त्रियांबरोबर अनेक विलास करील, त्याला कालीदेवीचे अत्यंत शुभसूचक आणि प्रौढ कटाक्ष मिळतील. डाव्या हातात खड्ग घेऊन त्याखाली एक मुंड, खालच्या हातात अभय आणि वरमुद्रा, उजव्या दोन हातात प्रबल भयहरण अशा माध्यान्हीच्या सूर्याप्रमाणे किरणांचा विलास असलेली कालकामा, कपाळावर अर्धचंद्र खुलून दिसणारी वस्त्रे धारण केलेली, चमकदार अशा दागिन्यांनी मढलेल्या कालीचे ध्यान करावे. अशाप्रकारे तेजस्वी, वेणी मोकळी सुटलेली, कालकामा, कालातीत, षोडश कलांची, नवकमलाप्रमाणे सुंदर मुख असलेली, काळे वस्त्र परिधान केलेली, उत्तम भूषणे असलेली, अशी कामिनी आपल्या मांडीवर घेऊन जो हा श्रेष्ठ मंत्र जपतो, तो सत्यवान आणि सत्यप्रतिज्ञ सर्व सिद्धींचा स्वामी होऊन तत्त्वांचे आकलन करतो. अपार होमद्रव्यांनी अत्यंत आनंदाने खूप वेळ अग्नीवर हा पवित्र मंत्र कामेच्छारहित होऊन जपतो व मनसोक्त हवन करतो. तो नाना भाषांचा ज्ञाता होतो, अनुरूप भव्य काव्ये करणारा कवी होतो. सर्व दोषांचा परिहार करून स्त्रीचे प्रेम मिळवितो. निद्रा आणि तंद्री टाळून मुद्रेवर अधिक भर देऊन व प्रेमाने सांद्रकृपामृताने दयार्द्र झालेल्या कालीचे स्मरण करावे. भक्तिभावाने आळस झटकून स्वेच्छेने असा कवी पूजेमधे प्रगल्भ कवितेचा सम्राट होतो. मुनींना, योग्यांना, यतींना, सूर्यकुलात जन्मलेल्यांना, ब्राह्मणांना आणि देवांना असे हे कालीचे

सिद्धांतरूप माहात्म्य मी सांगितले. यापुढे मी कलियुगातील दोष किंचितमात्र घालविणारे असे शिवयोग्याचे प्रौढ, पुण्यप्रद, सर्वप्रकारच्या रुचीला भावणारे असे चरित्र सांगतो, ते हे ब्राह्मणश्रेष्ठहो, आपण ऐकावे.

अनुपुराण सूर्यवंश अध्याय तिसरा समाप्त.

## शिवयोग्याचे माहात्म्य व दीक्षा -

### अध्याय ४

**कवीन्द्र उवाच । इत्थं मया कालिकायाः कथितं मन्त्रतन्त्रयोः । महत्त्वमथ वक्ष्यामि परमं शिवयोगिनः ।। १ [1] उत्तरस्यां पुण्यतमा राढा नाम महापुरी । गगनप्रान्तसंलग्न-प्राकाराट्टालिकावृता ।। २ [2] हंसकारण्डवाकीर्णैश्चक्रवाकोपशोभितैः । वापीकूपतटाकाद्यैः पूरिता देवपूर्यथा ।। ३ [3] इतस्ततो गृहारामैः सरामाभिः समावृता । उद्यानशतसम्बाधा स्फुरत्प्रस्रवणोन्नता ।। ४ स्वर्णमुक्तामणिमयसोपानश्रेणिशोभितैः । गतप्रत्यागतैः पूर्णरिक्त-कुम्भैर्वधूगणैः ।। ५ लोलद्द्विरेफकलितफुल्लपङ्कजशोभितैः । क्रीडद्वधूतोय-कणपृक्तवायुस्फुरत्तटैः ।। ६ सुधासवर्णाप्रतिमपुष्करप्रतिमानितैः । तीर्थैरनेकैर्निचिता पापभञ्जनकारिभिः ।। ७ गतदंशा गतक्रोधा गतद्रोहा गतस्पृहा । कुलस्त्रीभिः परिवृता कुलदीपविलासिनी ।। ८ [8] सुमनामल्लिका-जातिजपाचम्पकपाटलैः । करवीराशोक-कुन्दकर्णिकारैः सबन्धुकैः ।। ९ पुन्नागकेतकीझिण्टी-बकुलैर्भूमिचम्पकैः । सेवन्तिकार्कस्थलजसरोजैः कन्दुकैरपि ।। १० [10] कुरण्टकैः कुरबकैः कदम्बैर्देवदारुभिः । कन्दैर्मूलैः फलैः पुष्पैः पल्लवैरङ्कुरैश्चिता ।। ११ [11] आम्रैराम्रातकैर्निम्बैर्नि-चुलैर्वञ्जुलैः पुनः । मन्दारैः पारिजातैश्च वटाश्वत्थार्जुनैरपि । कर्णिकारैः सकरकैर्मधूकैः सीधुपीलुकैः ।। १२ [12] बिल्वैर्भल्लातकैः सीताफलै रामफलैरथ । अनानसैश्च रम्भाभिः क्रमुकैर्नारिकेरकैः ।। १४ [13]**

अर्थ – कवीन्द्र म्हणाले, "याप्रमाणे मी मंत्रशास्त्र आणि तंत्रशास्त्र यातील कालीदेवीचे माहात्म्य सांगितले. आता शिवयोग्याचे माहात्म्य वर्णन करून सांगतो. उत्तरेला एक राधा नावाची (राढा) एक अत्यंत पवित्र महानगरी आहे. ती आकाशाला भिडणाऱ्या प्राकारांनी, प्रासादांनी युक्त आहे. स्वर्गनगरीप्रमाणे ती लहानमोठ्या विहिरी आणि तळी यांनी परिपूर्ण असून त्यांना हंस, कारंडव, चक्रवाक यांमुळे शोभा आली आहे. इकडेतिकडे घराला लागून असलेल्या बागा आणि त्यात स्त्रिया होत्या. शेकडो उद्यानांनी गर्दी केली होती. उसळून येणाऱ्या ओढ्यांनी ती नगरी प्रसिद्ध झाली होती. सोने, मोती आणि रत्ने यांनी युक्त अशा पायऱ्यांनी तिला शोभा आली होती. त्याबरोबर येणाऱ्या-जाणाऱ्या, भरलेल्या आणि मोकळ्या घागरी घेऊन जाणाऱ्या (स्त्रिया), इकडेतिकडे फिरणारे भुंगे आणि फुललेली कमळे होती. तटावर खेळणाऱ्या स्त्रिया होत्या व त्यांनी उडविलेले पाण्याचे तुषार वाऱ्याबरोबर मिसळून जात होते. वर्ण आणि रूप यांमुळे अमृताबरोबर स्पर्धा करणारी आणि पुष्कराच्या तोडीची पापनाशक अशा अनेक तीर्थांनी भरलेली ती नगरी होती. दंशरहित, क्रोधरहित, द्रोहरहित त्या नगरीने इच्छा अपेक्षांना मागे टाकले होते. कुलस्त्रियांनी वेढलेली अशी ही नगरी कुलदीपांनी विलसित होती. त्यात मल्लिका, जाई, जास्वंद, चाफा, गुलाब, करवीर, अशोक, कुन्द, कण्हेर, बंधूक, पूंनाग, केवडा, झिण्टी, बकुल, भूमीचंपक, शेवंती, रुई, ज़मिनीवरील कमळे, कंदुक, कोरांटी, कुरबक, कदंब, देवदार, कंदमुळे, फळे, फुले, पाने, कळ्या यांनी ती नगरी खचाखच भरली होती. आंबे, काजू, निंब, निचुल, कळक, मंदार, पारिजातक, वड, पिंपळ, अर्जुन, कण्हेर, डाळिंब, मधूक, बकुळ, पीलू, बेल, बिब्बा, सीताफळ, रामफळ, अननस, केळ, सुपारी, नारळ

**खर्जूरैश्चन्दनै रक्तचन्दनैः कृष्णचन्दनैः । सुगन्धापूर्णदिक्प्रान्तप्रौढकेसरभूभरैः ।। १५ पलाशैर्नव्यलतिकाकलितैर्ललितैर्दृढैः । ग्राहीभिरवकेशीभिर्विविधैश्च शिरीषकैः ।। १६ [16] अलङ्कृता मतिमतां मताभिमतदायिनी । वर्वर्ति त्रिपथातीरे मन्दमारुतवीजिते ।। १७**

अर्थ – खजूर, चंदन, रक्तचंदन, कृष्णचंदन, मोठे केसर हे सगळीकडे जमिनीवर पसरल्यामुळे सुगंधाने भरून गेलेले (वातावरण), तसेच पळस, लहान वेलींनी वेढलेली सुंदर आणि कडक अशी कवठे, फुलझाडे, तसेच विविध शिरीष पुष्पांची झाडे यांनी ती नगरी आलंकृत झालेली होती. बुद्धिमंतांची नानाविध मते तेथे व्यक्त होतात. गंगेच्या तीरावर मंद वारा वहात होता. अशा या गंगेच्या तीरावर असलेली ती नगरी प्रसिद्ध होती.

**तस्यां महासिद्धिधरः सर्वसिद्धजनप्रियः । पठन्वेदान्वावदूकः सर्वशास्त्रार्थपारगः ।। १८ [18] अथर्वणरहस्यज्ञः प्रज्ञावान्प्राज्ञसम्मतः । जनयन्दोषदमनं जनानां स्वीयदर्शनैः ।। १९ [19] ब्रह्मश्रियावृतो दान्तः शान्तः क्षान्तः शुचिस्मितः । ऊर्ध्वरेता ब्रह्मचर्यचर्यानानार्यपूजितः ।। २० [20] धृतव्रतिव्रतस्तीव्रसाधितानन्तसाधनः । आर्याभक्तो व्यक्तमतिर्मन्त्रयन्त्रप्रवर्तकः ।। २१ [21] महासत्त्वोऽतिगम्भीरस्तत्त्ववित्तत्त्वदर्शकः । दूष्यतिष्यः स्फारशिष्यो निर्दूष्यो दोषवर्जितः ।। २२ अध्यात्मवक्ता सद्भक्तस्त्यक्तसङ्गोऽपि भक्तदः । अष्टांगयोगकुशलो कृती सुकृतिमानितः ।। २३ [23] निर्वाणपदवीकाङ्क्षाकाङ्क्को ब्रह्मलक्षकः । चतुःषष्टिकलावेत्ता ज्ञानविज्ञानपारगः ।। २४ [24] पद्मासनस्थितो दक्षः श्वेतयज्ञोपवीतकः । श्वेतोत्तरीयकः श्वेतसुमप्रीतः सिताम्बरः ।। २५ [25] श्वेतानुलेपलिप्ताङ्गः श्वेतासनसमास्थितः । शिवयोः सामरस्यानि चित्ते समनुभावयन् ।। २६ [26] अक्षोभ्यैः स्वकृपापाङ्गैरुद्धरन्देशिकव्रजान् । अनुग्रहाय जगतां विग्रही बत शङ्करः ।। २७ [27]**

अर्थ – त्या नगरीत महासिद्धी प्राप्त केलेला, सर्व सिद्धांना प्रिय असलेला वेद पढलेला उत्तम वक्ता, सर्व शास्त्र पारंगत, अथर्ववेदाचे रहस्य जाणणारा, प्रबुद्ध आणि बुद्धिमानांनी मान्य केलेला, स्वतःच्या दर्शनाने लोकांचे दोष घालविणारा, ब्रह्मश्रीयुक्त, दांत-शांत-क्षांत, शुचिस्मित, ऊर्ध्वरेता, ब्रह्मचर्यव्रती, अनेक आर्यांनी स्तुती केलेला, अनेक व्रते घेतलेला, तीव्र साधनांनी अनंताची उपासना केलेला, आर्याभक्त, स्पष्ट विचारांचा, मंत्र आणि यंत्राचा प्रचारक, धैर्यवान, गांभीर्यपूर्ण, तत्त्वज्ञ आणि तत्त्वांचा दर्शक, कलियुगाला दूषणीय मानणारा, पुष्कळ शिष्य असलेला, दोषरहित, अध्यात्म सांगणारा, उत्तम भक्त, संगत्यागी असूनही भक्तस्वरूप, अष्टांग योगात प्रवीण, कर्तबगार, पुण्यकृत्याने मान्य झालेला, निर्वाणाची पदवी प्राप्त करण्याची इच्छा बाळगणारा, ब्रह्माला ध्येय केलेला, चौसष्ट कला जाणणारा, ज्ञानविज्ञानात पारंगत, पद्मासन घातलेला, दक्ष, पांढरेशुभ्र जानवे घातलेला, पांढरेशुभ्र उपरणे पांघरलेला, पांढऱ्या फुलांवर प्रसन्न असलेला, पांढरी वस्त्रे नेसलेला, पांढरे अनुलेपन लावलेला, पांढऱ्या आसनावर बसलेला, मनात शिव-पार्वतीचे सामरस्य आळविणारा, स्थिर अशा आपल्या कृपाकटाक्षांनी शिष्यांचा उद्धार करणारा, जगावर अनुग्रह करण्यासाठी जणू शंकरच असा

**अभ्रान्तो भ्रान्तिसंहर्ता (विश्ववि?) भ्रमणक्रमः । दक्षिणामूर्तिरूपेण भ्रमन्सम्भ्रमसम्भृतः ।। २८ [28] जगत्यां सत्यसुलभः सुभगः सत्यसंश्रयः । सत्यव्रतः सत्यतपाः सत्यवाक्यविशारदः ।। २९ [29] अनन्तकुलधर्माणां मर्मज्ञश्चारुकर्मकृत् । जटिलः शङ्कर इव समदृष्टिर्मुकुन्दवत्**

।।३० वशिष्ठवच्छिष्टतमो विशिष्टचरितेष्टभूः । भ्रष्टदुर्जनसंल्लापविवर्जनपरो यमी ।। ३१ निरञ्जनो निरालम्भो निरालम्बो निराकुलः । अलक्ष्यचरितावासः सत्पक्षो भव्यलक्षणः ।। ३२ [32] अक्षोभ्यहृदयो मायाविमुक्तो विगतालसः । अतिथिव्रातनिष्णातपरिचर्यापरायणः ।। ३३ [33] लभ्यालभ्यमनोवृत्तिर्योगमुद्राविमुद्रितः । खेचर्यादिमहामुद्राविवञ्चनसमुद्धुरः ।। ३४ हरन्सुदूरे विषयान्विश्वामित्र इवापरः । मित्रामित्रौ(त्रे) समौ(मे) पश्यन्यशस्यः सिद्धिसम्पदा ।। ३५ [35] प्रातः प्रशस्यप्रथितनामा कामप्रपूरकः । साधकानां समुदिताह्लादः सादविनाशनः ।। ३६ साहसाङ्को जपतपोनुष्ठानैर्नैष्ट्यपूर्वकैः । अत्रेर्विचित्रं चरितमाचरन् प्रहसन्निव ।। ३७ [37] असाध्वसो महाध्वान्तविध्वंसनकृतश्रमः । आश्रमी श्रमजिद्धीमान् श्रेयस्कामैः समाश्रितः ।। ३८ [38] पिशङ्गहेमाभलसज्जटाजूटो दृढाशयः । मितवक्ता मिताहारो मितमार्गो मितोद्यमः ।। ३९ [39] मितेक्षणो मितरतिर्मिततृण् मिततोषभृत् । मिताकल्पचमत्कारी मितविस्मयहर्षुलः ।। ४० [40]

**अर्थ** – भ्रमरहित, भ्रांतीचा नाश करणारा, विश्वात भ्रमण करणारा, दक्षिणामूर्तिरूपाने संभ्रम निर्माण करीत फिरणारा, जगतसत्य सुलभ असलेला, भाग्यवान, सत्याचा आश्रय केलेला, सत्याचे व्रत घेतलेला, सत्यरूपी तपश्चर्या करणारा, सत्य बोलण्यात कुशल, अनेक कुलधर्मांचे मर्म जाणणारा, सुंदर कर्म करणारा, शंकराप्रमाणे जटाधारी, मुकुंदाप्रमाणे समदृष्टी, वसिष्ठाप्रमाणे शिष्टजनात अग्रगण्य, विशेष पराक्रम करण्याची इच्छा बाळगणारा, भ्रष्ट अशा दुर्जनांशी बोलणे टाळणारा, संयमी, निष्कलंक, अहिंसक, आश्रयहीन, ज्याचे शांत निवासस्थान कोणालाही माहीत नसलेला, सत्याचा पक्ष घेतलेला, उत्तम लक्षणांनी युक्त, हृदयात क्षोभ न होणारा, मायेतून मुक्त झालेला, आळस सोडून दिलेला, अनेक अतिथींची कुशल परिचर्या करण्यात प्रवीण, लभ्य आणि अलभ्य याबाबतीत समान मनोवृत्ती असलेला, योगमुद्रांनी विकसित झालेला, खेचरादी महारुद्रांच्या फसविण्यातून मुक्त असलेला, विषयांना दूर घालविलेला, जणू दुसरा विश्वामित्रच, शत्रुमित्रांना समदृष्टीने पाहणारा, सिद्धिरूपी संपत्ती मिळविण्यात यशस्वी ठरलेला, प्रातःकाळी ज्याचे प्रशंसनीय आणि विख्यात नाव घ्यावे असा इच्छा पूर्ण करणारा, साधकांना आल्हाद देणारा, खिन्नता घालविणारा, जप-तप-अनुष्ठाने निष्ठापूर्वक करून साहसी झालेला, हसतच अत्रीचे आश्चर्यकारक कृत्य करून दाखविणारा, निर्भय, घोर, अज्ञानरूपी अंधकार नष्ट करण्याचे श्रम केलेला, आश्रमधर्म पाळणारा, श्रम जिंकलेला, कल्याणेच्छूंनी आश्रय घेतलेला, पिंगट सोनेरी जटांनी विलसणारा, दृढमती, मितवक्ता, मिताहारी, मितमार्गी, मितोद्योगी, मितदृष्टी, मितप्रेमी, परिमित तृष्णा असलेला, परिमित संतोषी, मित आभूषणांनी आनंद देणारा, आश्चर्यभावना आणि हर्ष मित असलेला

स्वभ्रूभङ्गाक्षेपलीलापरिप्लुष्टाहितावलिः । अहन्तारहितोत्साही बालोन्मत्तपिशाचवत् ।। ४१ [41] वैराग्यपरिपूर्णोऽपि महासौभाग्यदायकः । दुर्भाग्यदमनोपायो गङ्गाम्भ इव भासुरः ।। ४२ [42] कृतार्थः सिद्धिकामानां प्रकामनियमोज्ज्वलः । परापरेक्षणपरः परब्रह्मस्वरूपवित् ।। ४३ [43] कश्चित्सिद्धः समृद्धश्रीः सर्वेषां श्रुतिमागतः । आसीदासीमधरणीवलये मुक्तिवल्लभः ।। ४४ [44]

**अर्थ** – केवळ आपल्या भ्रूभंगाने, लीलेने अहितांचा नाश करणारा, अहंतारहित पण उत्साही, बाल-वेडा-पिशाच यांच्याप्रमाणे वैराग्यपूर्ण असूनही महासौभाग्यदायक, दुर्भाग्याचे दमन करण्याचा उपाय सांगणारा, गंगाजलाप्रमाणे प्रकाशमान, सिद्धिकामांनी कृतार्थ झालेला, आत्यंतिक नियमांनी



उजळलेला, परापराकडे नजर असलेला, परब्रह्माचे स्वरूप जाणणारा, असा एक सिद्ध, तेजस्वी, समृद्धश्री, मोक्षप्रेमी, राज्याच्या सीमेवर सर्वांना माहीत होता.

शिवयोगी नाम कश्चिद्ब्राह्मणः कोङ्कणोद्भवः । करहाटस्फुटमतिर्मेघगम्भीरनिस्वनः ।। ४५ [45] निशम्य तस्य सिद्धस्य चरितं परमाद्भुतम् । हित्वा कोङ्कणकं देशं तं देशं समुपाययौ ।। ४६ [46] तत्र गत्वाऽथ तं दृष्ट्वा स्पृष्ट्वा पादसरोरुहे । बद्धाञ्जलिपुटोऽतिष्ठत्स्थाणुलीलामपाहरन् ।। ४७ [47] सिद्धेन सोऽथ सम्पृष्टो नामग्रहणपूर्वकम् । ग्रामगोत्रे महोदग्रे श्रावयामास सम्भ्रमात् ।। ४८ शिवयोगी श्रावयित्वा कुलशीलादिकं स्वकम् । गुरुत्वेनाश्रुतं सिद्धं वरयामास सुव्रतः ।। ४९ [49] अन्तेवासिनमायान्तमन्ते वस्तुं सुलक्षणम् । समग्रहीत्समु(दमुं) तत्रान्तेवासाय विचक्षणः ।। ५० [50]

**अर्थ** – शिवयोगी नावाचा हा ब्राह्मण कोकणात जन्मलेला होता. कऱ्हाटकामध्ये त्याचे विचार प्रसिद्ध होते. आवाज घनगंभीर होता. त्या सिद्धपुरुषाचे अतिशय आश्चर्यकारक चरित्र कानावर आल्यावर (शंभूराजे) कोकण प्रांत सोडून त्या ठिकाणी आले. तेथे जाऊन, त्यांची भेट घेऊन त्यांच्या चरणकमलांना स्पर्श करून, हात जोडून, शंकराची लीला हरण करीत उभे राहिले. सिद्धाने विचारल्यावर नामग्रहणपूर्वक आपले उच्च गाव व गोत्र गडबडीने सांगितले. शिवयोग्यांनीही स्वतःचे कुलशीलादिक ऐकवून त्या व्रतधारकाने गुरू म्हणून प्रसिद्धी नसतानाही सिद्ध शिष्य म्हणून निवड केली. शिष्याच्या नात्याने आलेल्या त्या सुलक्षणी शंभूराजांना आपल्याजवळ राहण्यास स्वीकारिले.

ततोऽनुकूलनक्षत्रे कस्मिंश्चिदपि वासरे । उक्ते मासि तिथौ स्वर्तौ प्रवृत्ते चोत्तरायणे ।। ५१ [51] संवत्सरं कृतां सेवां योगिनो वीक्ष्य कामपि । दीक्षामदान्मदहरीं योगीन्द्रहृदयङ्गमाम् ।। ५२ [52]

**अर्थ** – नंतर एका अनुकूल नक्षत्र असलेल्या दिवशी सांगितलेल्या महिन्यातील तिथीवर उत्तरायण सुरू झाल्यावर एक वर्षपर्यंत योग्याची विशेष सेवा पाहून योगीश्रेष्ठांच्या हृदयाला आनंद देणारी, गर्वहरण करणारी दीक्षा दिली.

मनीषिण ऊचुः । देवदत्तात्मज महाकविनायक नायक । दीक्षाविधानं प्रब्रूहि सिद्धेनाऽऽकल्पितं यथा ।। ५३ भवत्प्रोक्तकथालापपीयूषपरिपूरिताः । न तृप्यामश्चिरतरं पायं पायं सुधामिव ।। ५४ नवोदिते कुमुदिनीनाथे प्रेम यथा यथा । तथा तथा भवत्काव्यश्रवणे बत कौतुकम् ।। ५५

**अर्थ** – "हे देवदत्तात्मजा, (गोविंदा) महाकवीश्रेष्ठा, त्या सिद्धाने सुचविलेल्या दीक्षाविधानाचे वर्णन करा. आपण सांगितलेल्या कथारूपी अमृताने भरून जाऊन जणू खरेच अमृत पीत असल्याप्रमाणे इतका वेळ झाला तरी आमची तृप्ती होत नाही. कुमुदिनीनाथ चंद्र उगवत असताना त्याविषयी जसे कुतूहल वाढते, त्याप्रमाणे आपल्या काव्याच्या श्रवणात आमची उत्कंठाही वाढत आहे."

कवीन्द्र उवाच । शृण्वन्तु सुधियः सर्वे दीक्षाया विधिमुत्तमम् । अलौकिकं लौकिकं च रेणुकायाः प्रसादतः ।। ५६ आवीक्ष्य हस्तामलवत्सकलं बुद्धिलीलया । कथयिष्ये न सन्देहः परमामृतदीपकम् ।। ५७ भूमेः परिग्रहं पूर्वमाकल्प्याशोध्य सादरम् । कृत्वाङ्कुरार्पणमथो वास्तुपूजां यथाविधि ।। ५८ [58] हुत्वाग्नौ ब्राह्मणान्नत्वा स्तुत्वा स्वाभिष्टदेवताम् । ध्यात्वा स्मृत्वा स्वपितरावाचार्यकुलकामिनीः ।।५९ नन्दिनीप्रमुखागावः(गाश्च) कुलाद्रीनुरगानपि

**। निधीन्ससागरान्कल्पवृक्षान्नदनदीः पुनः ।। ६० [60] अभिवाद्य गणेशानं बटुकं योगिनीगणम् । नरेन्द्रान्पुण्यचरितानाकीर्त्य सुरनायकान् ।। ६१ [61] अथ सिद्धैर्महासिद्धैरनेकैः परिवारितः । पुण्याहं वाचयित्वाऽशु वाद्यघोषपुरस्सरम् ।। ६२ [62] कौशेयेन नवीनेन बन्धयित्वा विलोचने । रहस्यानीय तं शिष्यं योगिनं शिवयोगिनम् ।। ६४ [64] अध्वषट्कमथाशोध्य सिद्धः शास्त्रोक्तमार्गतः । दिव्यलक्षणसंयुक्तं दीक्षाषट्कमकल्पयत् ।। ६५ [65]**

**अर्थ** – आपण सर्व विद्वान रेणुकेच्या प्रसादाने लौकिक व अलौकिक असा हा उत्तम दीक्षाविधी ऐका. हातावरील आवळ्याप्रमाणे तो परमामृतावर प्रकाश टाकणारा (विधी) प्रत्यक्ष दिसत असल्याप्रमाणे मी सुबुद्धीने वर्णन करतो, यात शंका बाळगू नका. भूमीचा अगोदर स्वीकार निश्चित करून व ती शुद्ध करून त्या ठिकाणी दूर्वांकुर ठेवून यथाविधी वास्तुपूजा करावी व ब्राह्मणांना वंदन करून आपले माता, पिता, आचार्य, कुलस्त्रिया, नंदिनी वगैरे. गाई, कुलपर्वत, नागदेवता, कुबेराचे निधी, समुद्र, कल्पवृक्ष, नद्या, यांचे ध्यान व स्मरण करून, गणेशाला अभिवादन करावे, बटू, योगिनी, पुण्यचरित राजे, सूरश्रेष्ठ यांचा उच्चार करून अनेक सिद्ध व महासिद्ध यांच्या परिवारात वाद्यघोषासह पुण्याहवाचन करून लगेच नवीन रेशमी वस्त्रांनी डोळे बांधून, शिष्याला जवळ एकांतात बोलावून शिवयोग्याना सहा मार्ग शुद्ध करण्यास सांगून त्या सिद्धाने, शास्त्रोक्त मार्गाने, दिव्य लक्षणाने युक्त अशा सहा दीक्षा दिल्या.

**तीव्रवेधमयीं दीक्षां सप्तमीमाचरत्ततः । यथा शिष्यस्य सर्वत्र दिव्यभावः प्रजायते ।। ६६ [66] अथो चक्रचतुर्द्वार्षु चतुर्दिक्ष्वन्तरे पुनः । बिन्दौ दलेषु वलयेषूक्तेषु समनुक्रमात् ।। ६७ नानौषधिक्काथमिश्रजलपूर्णान्मनोरमान् । संस्थितान्कलशान्गृह्य पूर्वपूर्वक्रमादरात् ।। ६८ अस्नापयन्मन्त्रपूतैस्तोयैस्तीर्थालिजृम्भितैः । पूर्वाम्नायभवान्मन्त्रान्पवित्रान्मन्त्रगोपितान् ।। ६९ [69] योगिने कथयामास कर्णे सार्थरहस्यकान् । स सिद्धः सर्वसिद्धानां प्रथमो गोरखो यथा ।। ७० [70] आहृत्य दक्षिणान्कुम्भान्दक्षिणाम्नायजान्मनून् । स्नपयन्कथयामास दत्तात्रेय इव ज्वलन् ।। ७१ [71] पश्चिमाम्नायसम्भूतान्मन्त्रान्कांश्चित्प्रकाशयन् । अभिषिञ्चन् पाश्चिमकैः कलशैः शिष्यवल्लभम् ।। ७२ [72] तत्त्वं सत्त्वपरः सत्त्वमाराधय शुचिस्मित । इत्थमाज्ञापयामास सिद्धो रैवतको यथा ।। ७३ [73] तथौत्तरान्घटान्गृह्योत्तराम्नायविचक्षणः । अवीवदत्कर्णमूले शिष्यस्य वडवालवत् ।। ७४ बिन्द्वन्तरालगैःकैश्चित्पीयूषौषधिपूरितैः । कलशैः स्नपयामास कथयामास सुव्रतः ।। ७५ अत्यूर्ध्वगतिदं कश्चिदूर्ध्वाम्नायं महाफलम् । प्रथितः सर्वसिद्धेषु सिद्धो नागार्जुनो यथा ।। ७६ बिन्दुमध्यगतं कुम्भं नवरत्नविराजितम् ।। ७७ नवपल्लवसङ्कीर्णं नवौषधिरसावृतम् । नानामञ्जरि–काकीर्णं नवपुष्पसमाकुलम् ।। ७८**

**अर्थ** – तीव्र वेध करणारी सातवी दीक्षा त्यानंतर दिली की, ज्यामुळे शिष्यामधे सर्वत्र दिव्य भाव जागृत होतो. नंतर चक्राच्या चारही दारात, चारही दिशांच्या मध्यात, बिंदूच्या क्रमाक्रमाने नाना औषधी काढे आणि पाणी यांनी भरलेले असे सुंदर कलश ठेवून, पूर्वेकडील क्रमाने ते घेऊन त्या मंत्राने पवित्र केलेल्या पाण्याने व तीर्थजलाने स्नान घातले. पूर्वाम्नाय यातील पवित्र व गुप्त मंत्रांनी योग्याच्या कानात मंत्राचा अर्थ व रहस्य सांगितले. पहिल्या गोरक्षनाथाप्रमाणे तो सर्व सिद्ध पुरुषांत श्रेष्ठ होता. त्याने दक्षिणेकडचे, उजवीकडचे कुंभ घेऊन दक्षिणाम्नायातील मंत्र दत्तात्रयाप्रमाणे प्रकाशत स्नान घालत असता सांगितले. पश्चिमाम्नायातील काही मंत्रांचे उच्चारण करून पश्चिमेकडच्या कलशाने प्रिय शिष्याला अभिषेक करीत, सत्त्वगुणप्रधान आणि शुचिस्मित अशा



त्याने 'तत्त्व आणि सत्त्व यांची आराधना कर' अशी रेवतकसिद्धाप्रमाणे आज्ञा केली. नंतर उत्तरेकडचे घट घेऊन उत्तराम्नायातील मंत्रांनी शिष्याच्या कानात वडवानलाप्रमाणे सांगितले. त्या व्रतधारकाने बिंदूच्या मध्यभागी असलेल्या काही अमृतासारख्या औषधींनी भरलेल्या कलशांनी त्याला स्नान घातले व वर उंच गती देणारे एक ऊर्ध्वाम्नायातील महाफल त्याला सर्व सिद्धांतील प्रख्यात अशा नागार्जुनाप्रमाणे सांगितले. बिंदूमध्यावर ठेवलेल्या कुंभात नवरत्ने, नव पल्लव, नवऔषधी रस, ताजी फुले असून त्यावर नाना मंजिरी

**कुङ्कुमागरुकस्तूरीमृगनाभिसमर्चितम् । धूपितं विविधैर्गन्धै रक्तचन्दनचर्चितम् ।। ७९ अष्टगन्धमयैर्गन्धैर्लेपितं परिलोलितम् । पिष्टातैश्चारुसीमन्तचूर्णैराचीर्णमन्तरा ।। ८० एलालवङ्गकर्पूरपूगकङ्कोलसङ्कुलम् । ताम्बूलीदलखर्जूरीनारिकेरफलावृतम् । रक्तकौशेयवसनं रक्तमालाविभूषितम् ।। ८१**

**अर्थ** – कुंकुम, अगरू, कस्तुरी हेही वाहिलेले होते. रक्तचंदनाचा लेप दिला होता व विविध सुवासिक द्रव्यांचा धूपही केला होता. अष्टगंधाच्या लेपाने ते आकर्षक झाले होते. मधून मधून हळद आणि सुंदर सीमंतचूर्ण पसरले होते. वेलदोडे, लवंग, कापूर, सुपारी, कंकोळ, विड्याची पाने, खजूर आणि नारळ ठेवले होते. लाल रेशमी वस्त्र आणि लाल फुलांच्या माळा यांनी त्याला शोभा आली होती.

**स्वहस्ते कलशं गृह्य (धृत्वा) प्रशस्ते सिद्धनायकः । कृपाकटाक्षभरितो ललितो गुणसम्पदा ।। ८२ नेति नेतीति नेतीति यत्परं श्रुतयो जगुः । अनुत्तरं तमाम्नायमभिषेकं प्रकल्पयन् ।। ८३ [83] व्यादिदेश प्रसन्नात्मा कर्णमूले सुशोभने । शिष्यस्य गिरिजानाथो हयग्रीवस्य यादृशम् ।। ८४ [84] पूर्णदीक्षां विधायेत्थमागमोक्तेन वर्त्मना । साम्प्रदायं स्वकं प्रोच्य दृष्टिबन्धं विसृज्य च ।। ८५ निजक्रमागतं कश्चिद्गुरुक्रममथादिशत् । येन शिष्यस्य परमा सिद्धिर्भवति नान्यथा ।। ८६ आद्यं तद्दिननाथार्णं गृहीत्वातिमनोरमम् । चकार निजशिष्यस्य नाम सम्भ्रमपूर्वकम् ।। ८७ [87] तेन दीक्षाप्रभावेण स शिवो ब्राह्मणाग्रणीः । योगीति ख्यातिमगमत्सिद्धिपारमुपागतः ।। ८८ शिवयोगी ततस्तंत्र बहुकालं गुरोर्गृहे । वसन्नाल्हादयामास संसेवन्विविधक्रमैः ।। ८९ [89] आराधयन्महोदारसेवाभिर्गुरुमञ्जसा । शिवयोगी मुनिश्रेष्ठः सिद्धिं कामप्युपालभत् ।। ९० [90] प्रसन्नचेताः सततं जपन्ध्यायन्स्तुवन्नमन् । सिद्धस्य चरितं चित्रं शिवयोगी पपाठ सः ।। ९१ [91] इत्थं भक्तिभरं पश्यन्स सिद्धः शिवयोगिनः । आज्ञापयामास चिरं ब्रह्मचर्यव्रतश्चर ।। ९२ [92]**

**अर्थ** – मुख्य सिद्ध आपल्या प्रशस्त हातात कलश घेऊन कृपाकटाक्षाने भारून टाकीत, गुणसंपदेने शोभणारा, नेती, नेती, नेती असे ज्याला उद्देशून वेद म्हणाले, त्या सर्व श्रेष्ठ आम्नायावर अभिषेक करीत, प्रसन्न मनाने शंकराने हयग्रीवाला सांगितले त्याप्रमाणे शिष्याच्या सुंदर कर्णमुलात उपदेश केला. असा दीक्षाविधी पूर्ण करून आगमोक्त मार्गाने स्वतःच्या संप्रदायाचा उच्चार करून व डोळ्यांवरील पट्टी काढून आपल्याला माहीत असलेल्या गुरुक्रमाची माहिती दिली. त्याशिवाय शिष्याला परमसिद्धी मिळत नाही. प्रथम त्या दिवसाच्या स्वामीचे सुंदर अक्षर उच्चारून आपल्या शिष्याचे नावही संभ्रमपूर्वक घेतले. त्या दीक्षेच्या प्रभावाने तो ब्राह्मणश्रेष्ठ शिवयोगी म्हणून प्रसिद्ध झाला व सिद्धीच्या पार गेला. त्यानंतर शिवयोगी गुरूच्या गृही बराच काळ राहून विविधप्रकारे गुरूची सेवा करीत त्याला प्रसन्न करीत होता. अत्यंत मोकळेपणाने, सरळभावाने, गुरूची सेवा

करीत राहून मुनीश्रेष्ठ शिवयोग्याने उत्तम सिद्धी प्राप्त केली. प्रसन्न मनाने सतत जप-ध्यान-स्तुती, नमन करीत शिवयोग्याने त्या सिद्धाचे आश्चर्यकारक असे चरित्र वाचले. अशा रीतीने शिवयोग्याचा भक्तीचा आवेश पाहून त्या सिद्धाने कायम ब्रह्मचर्य व्रताचे पालन कर असा आदेश दिला.

पाणिग्रहं क्वचिदपि मा कुरुष्व व्रतेच्छया । शिष्यत्वेन नराधीशं योगिन्मा वृणु सर्वथा ।। ९३ योगी स सिद्धस्य वचो निशम्य प्रणम्य पादौ परिलभ्य भव्यम् । सङ्कल्पवाक्यं सकलं करिष्ये ययावथो याम्यदिशं व्रतार्थी ।। ९४ 94 विद्योतद्ब्रह्मवर्चाः परिचरिततपा भावयन्मन्त्रजातं पश्यन्क्षेत्राणि नानारसभरभरितः पर्यटन्तीर्थपङ्क्तीः । प्रेम्णा शृङ्गारपुर्यां व्यचरदथमठीं कोङ्कणक्रूरदेशे वस्तुं योगी प्रसिद्धस्तदनु नुतगुणं सन्निवासश्चकार ।। ९५ 95

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरपरमानन्दात्मजदेवदत्तोद्भवगोविन्द-कवीन्द्रप्रकाशिताया-मनेकाध्यायसाधितायां शुभलक्षणलक्षितायां शिवपुराणान्त-र्गतायामंशावतरणे अध्यायः ।।४।।

अर्थ - व्रताच्या इच्छेचा भाग म्हणून कधीही लग्न करू नकोस, हे योग्या, कोणत्याही राजाला शिष्य म्हणून कधीही निवडू नकोस. त्या सिद्धाचे बोलणे ऐकून योग्याने त्याला पदस्पर्शपूर्वक वंदन केले. त्याचा भव्य आदेश स्वीकारून सर्व संकल्पाच्या प्रतिज्ञेप्रमाणे वागेन असे म्हणून तो व्रतार्थी (शिवयोगी) दक्षिण दिशेकडे गेला. त्याचे ब्रह्म वर्च तळपणारे होते. तपश्चर्या करीत तो मंत्राचे चिंतन करीत होता. पर्यटन करीत असता तो आनंदाने कोकणातील शृंगारपुरातील एका मठात वस्तीसाठी आला. एक प्रसिद्ध योगी त्याला योग्य अशा गुणांनी लौकिक प्राप्त झाला व तो तेथे राहिला.

अनुपुराण सूर्यवंश परमानंद नेवासकरांच्या देवदत्त या पुत्राचा पुत्र गोविंद कवींद्राने प्रकाशित केलेल्या अनेक अध्यायांच्या संहितेतील शुभलक्षणकारक शिवपुराणातील अंशावतरण हा अध्याय.

## शिवयोग्याची तपश्चर्या - अध्याय ५

कवीन्द्र उवाच । शिवयोगी ततस्तत्र शृङ्गारनगरे वरे । प्रज्वलन् प्रौढतपसा समिद्धाग्निरिव श्रिया ।। १ जपन् मन्त्रं पठन्स्तोत्रं पितृन्देवान्प्रतर्पयन् । अतिथीन् भोजयन् काले प्रपूज्य च यथाविधि ।। २ प्रणमन् ब्राह्मणान् काले प्रार्थयन् पूजयन्नपि । अन्यानपि तथा कांश्चिद्व्रजन्नाश्रमिणश्चिरम् ।। ३ समाचचार परमं व्रतं किञ्चिन्महाव्रतः । प्रपूरयन् स्वमहसा तत्रत्यगिरिगह्वरम् ।। ४ शीतकाले शीतसहो भीष्मे ग्रीष्मे बहिस्तपन् । वर्षासु जलशायीवालक्षि लोकैर्धृतक्षणैः ।। ५ खेचरीं मुद्रिकां बध्द्वा साधयन्योगमुत्कटम् । सिंहान् व्याघ्रान् वराहांश्च लालयन् गतमत्सरान् ।। ६ दंशर्क्षवृकजम्बूककपिपन्नगपक्षिणः । रक्षन् स्वलक्षैरक्षोभ्यैरक्षीणो-ज्वललक्षणैः ।। ७ चान्द्रायणं हविष्यान्नमेकान्नं नक्तभोजनम् । एकाशनं जीर्णपर्णचर्वणं वायुभोजनम् ।। ८ कन्दमूलाशनमपि फलपुष्पाशनं पुनः । इक्षून्द्राक्षागुडं रम्भाफलान्यश्नन् तिलानपि ।। ९ सक्तुपिष्टं मुद्गपिष्टं पृथुकांश्च कुलित्थकान् । पद्माक्षपिष्टं लाजांश्च वंशपिष्टं मनोहरम् ।। १० आम्रजम्बीरनारिङ्गखर्जूरफलपूरकान् । अक्रोडमधुबीजानि शाकाः काश्चन भासुराः ।। ११ जम्बूबदरिकापेरूसीतारामफलादिकम् । समानीय मुदा स्वल्पं जग्ध्वा जग्ध्वा निरन्तरम् ।। १२ यापयामास कालं स शिवयोगी महामतिः । ध्यायन्नमन्हरिहरौ लोके स्त्रीपुंस्वरूपिणौ ।। १३ इत्थं तपस्यतस्तस्य योगिनः शिवयोगिनः । सुखोदर्कः समधिकं कालो बहुतिथिर्ययौ ।। १४



अर्थ - कवीन्द्र म्हणाले, शिवयोगी त्या उत्तम शृंगारपुरात आपल्या घोर तपश्चर्येच्या समृद्धीने तप्त अशा अग्नीप्रमाणे तेजःपुंज स्वरूपात मंत्र-जप, स्तोत्रपठण, देव व पितरांना तर्पण, अतिथिभोजन, ब्राह्मण वंदन, प्रार्थनादी यथाविधी यथाकाल करीत दुसऱ्याही काही आश्रमस्थ लोकांची पुष्कळ काळ सेवा करीत. त्या महाव्रती पुरुषाने असे कोणते मोठे व्रत आचरिले? आपल्या तेजाने तेथील डोंगरी प्रदेश भरून टाकला. थंडीच्या दिवसांत थंडी सहन करीत, भयानक ग्रीष्म ऋतूत उघड्यावर तप करीत, वर्षाकाळी पाण्यात पडून असलेला असा तो लोकांना दिसे. खेचरी मुद्रा साधून तीव्र योग आचरीत सिंह, वाघ, रानडुक्कर यांच्यातील मत्सर काढून टाकून त्यांचे लाड करी. मधमाश्या, अस्वल; लांडगे, कोल्हे, माकडे, साप आणि पक्षी यांचे त्यालाच फक्त माहीत असलेल्या अक्षोभ्य, तीव्र आणि प्रकट लक्षणांनी रक्षण करी. चांद्रायण, हविष्यान्न, एकान्न, नक्त, एकाशन, जीर्णपर्णभक्षण, वायुभक्षण, कंदमूलभक्षण, फलपुष्पाशन या व्रतांखेरीज तो फक्त ऊस, द्राक्षे, गूळ, केळी, तीळ खाऊन तसेच सातूचे पीठ, मुगाचे पीठ, पोहे, कुळीथ, कमळांच्या बियांचे पीठ, लाह्या, सुंदर बाबूंचे पीठ, आंबे, ईडलिंबू, नारिंगे, खजूर, आक्रोड, भाज्या, जांभळे, बोरे, पेरू, सीताफळ, रामफळ अशी फळे आणून ती सतत थोडी थोडी खाऊन शिवयोगी काळ घालवीत असे. स्त्री-पुरुष रूपात शिव-विष्णू आहेत असे समजून तो त्यांना नमस्कार करी. याप्रमाणे तपश्चर्या करीत असता त्या योगी शिवयोग्याचा बराच काळ सुखात गेला.

## शिवयोगी व शंभूराजे -

श्रीशृङ्गारपुरावासं शिवयोगिनमादरैः । निशम्य पूजयामास भोजनाच्छादनादिभिः ।।१५ शिवराजसुतः शम्भुर्ववन्देऽथ पुनः पुनः । अकरोद्वचनं तस्य यशस्यं निबिडाक्षरम् ।। १६ अयाचकं स्वाश्रमस्थमसेवकमनाश्रयम् । निशम्योद्वीक्ष्य भूपालोत्तंसः कारुण्यशेवधिः ।।१७ अन्नमाभूषणं वस्त्रं बहुमानपुरस्सरम् । देवतार्चनसामग्री समग्रामग्रसम्भवाम् ।। १८ अदान्मान्यो गुरुरयं धन्यः शमदमादिभिः । अत्यर्थमवदत्सार्थं समर्थानाप्तसेवकान् ।। १९ गुरुणा प्रतिपिद्धोऽपि योगी राजप्रतिग्रहात् । आदिमायाविमुग्धात्मा सर्वां जग्राह सादरम् ।। २० किं ज्ञानिना प्रविदुषा योगिना मुनिनाऽपि च । किं तापसेन यतिना प्रकृतिः सर्वकारणम् ।। २१ प्रकृत्याचरितं कर्म नरश्चरति दुश्चरम् । विधिनाऽपि विधिज्ञेन दैवं किं परिहण्यते ।। २२

अर्थ - शृंगारपुरात राहणाऱ्या शिवयोग्यांचा उपदेश अतीव आदराने ऐकून शिवपुत्र शंभूने त्यांचा भोजन, आच्छादनासहित परम आदराने सत्कार करून त्यांना पुनःपुन्हा वंदन केले. त्यांचा यश देणारा गूढ उपदेशही स्वीकारला. याचना न करणाऱ्या आपल्या आश्रमात राहिलेल्या, कोणीही सेवक नसलेल्या व निराश्रय असलेल्या त्या योग्याकडे पाहून व त्यांचा उपदेश ऐकून राजश्रेष्ठ, कारुण्यसागर शंभूने भोजन, अलंकार, वस्त्रे देऊन सर्व देवतार्चन सामग्रीप्रमाणे दुर्मीळ अशी सर्व सामग्री दिली आणि हे आमचे मान्यवर गुरू साधनसंपत्तीने धन्य आहेत असे आपल्या कर्तबगार आप्तांना आणि सेवकांना गांभीर्याने पुनःपुन्हा सांगितले. गुरूंनी शिवयोग्याला राजाचा शिष्य होण्यास प्रतिबंध केला असताही त्याने आदिमायेच्या मोहाने वश होऊन त्या सर्व सामग्रीचा सादर स्वीकार केला. ज्ञान मिळाले, विद्वत्ता प्राप्त झाली, योग साध्य झाला, मुनी झाला, तपश्चर्या करणारा यती झाला तरी त्याचा काय उपयोग? शेवटी स्वभावच सर्व परिस्थितीला कारणीभूत असतो. प्रकृतीने घडविलेले कर्म अत्यंत कठीण असले, तरी मनुष्य ते करतोच. ब्रह्मदेव जरी सर्व (कर्म) विधी जाणणारा असला, तरी दैवाचा पाडाव होतो का?

## शिवयोग्याचे चमत्कार -

**अथो दुष्टाः परिभ्रष्टाः षड्दर्शनमहोदधेः । क्रूरा मर्कटवल्लोला विलोलाः साधुखण्डने ।। २३ आगमोक्तौ स्थाणुसमाः पन्नगा इव दुःसहाः । सूचीव सुमुखाकाराः प्रविशन्तोऽन्तरं क्षणात् ।। २४ देवर्षयः कन्हाटाश्च कुलवन्तः कुलोद्भवाः । दाभ्याः सारस्वताश्चित्तपावनाः केचन द्विजाः ।। २५ असहन्तः परोत्कर्षं स्पर्धन्तो योगिना सह । निन्दामुच्चावचां चक्रुर्वाममार्गप्रवर्तनात् ।। २६ राजप्रतिग्रहपरं वाममार्गविनोदिनम् । समीक्ष्य योगिनं सर्वे खलाः कोङ्कणका (ऽ) हसन् ।। २७ हसत्सु कोङ्कणस्थेषु विप्रेषु क्रूरकर्मसु । अधिकं मानयामास योगिनं शम्भुभूपतिः ।। २८**

अर्थ – दुष्टजन षड्दर्शनांच्या सागरातून पूर्णपणे बाजूला पडलेले, क्रूर, माकडाप्रमाणे साधूच्या खंडनात चंचलपणाने भरकटत गेलेले, आगमाच्या (उपदेशविषयक) खांबाप्रमाणे निश्चल झालेले, सापाप्रमाणे दुःसह तरी सुईप्रमाणे क्षणात आपल्या मनात शिरून (मनाचा ताबा घेणारे) देवर्षी (देवरुखे), किरवंत या कुळातील तसेच कन्हाडे, काही सारस्वत आणि चित्तपावन इ. ब्राह्मण दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळे योग्याशी स्पर्धा करीत, वाममार्गाकडे नेण्यामुळे थोडीफार निंदा करू लागले. एक योगी राज्याचा शिष्य म्हणून स्वीकार करतो आणि त्याला वाममार्गाकडे वळवितो, हे पाहून कोकणातील सर्व खलपुरुष हसू लागले. कोकणातील हे क्रूरकर्मे ब्राह्मण हसत असताना शंभूराजे मात्र शिवयोग्यांना अधिकच मानू लागले.

**गुणिनं परिगृह्णन्ति गुणज्ञानेन केचन । एको जानाति माहात्म्यं निधेर्यक्षाधिनायकः ।।२९ योगी स शम्भुराजाय भावि भव्यमभाषत । यद्यत्तत्तत्समभवत्तुलजायाः प्रभावतः ।।३० निष्ठा विशिष्टा भूपस्य तस्मिन्योगिनि सर्वदा । समजायत वर्धिष्णुर्गुणमण्डलमण्डिता ।। ३१ सर्वे जनाः कोङ्कणका योगिनं भूपमानितम् । वीक्ष्यारटन्गुरुरयं श्रीशम्भोर्बत दाम्भिकः ।। ३२ एतस्मिन्नन्तरे केचिन्नानाव्रात्यकुलोद्भवाः । संन्यासिनः समाधूतकल्मषा दशनामिनः ।। ३३ भारतीका अरण्याश्च सागरा आश्रमा वनाः । गिरिणः पुरिणस्तीर्थाः पर्वता इन्द्रनामकाः ।।३४ सरस्वतीकाः सन्तोषा महानिर्वाणवल्लभाः । तीर्थयात्राव्रतपराः पर्यटन्तो धरातलम् ।। ३५ केचिद्दिगम्बराः केचिज्जटिलाश्चीरवाससः । मुण्डिनः केऽपि नखरनखा वक्रनखा अपि ।।३५ ऊर्ध्वं बाहुयुगं केचिदेकबाहुमथाऽपरे । समुद्वहन्तो निबिडभस्मचर्चितविग्रहाः ।। ३६ आदीर्घकन्धराः केचित्तृणवत्तनवः परे । द्योतद्धमनयः केचित्सितश्मश्रुसमुज्वलाः ।। ३७ तरुणा बालकाः केचिद्वृद्धाः कम्पितमस्तकाः । सदोदतिष्ठकाः केचिदधोर्ध्ववदनाः परे ।।३८ पुष्टा महिषवत्केचिद्भिक्षाभक्षणविभ्रमैः । महोक्षवदिवाक्षोभ्यां कुर्वन्तः केऽपि गर्जनाम् ।। ३९ आरक्तलोचनप्रान्ताः कुठारादिमहायुधाः । समाजग्मुर्विलासेन श्रीशृङ्गारपुरं प्रति ।।४०**

अर्थ – गुण लक्षात घेऊन गुणी माणसाचा स्वीकार फारच थोडे लोक करतात. कुबेरच फक्त खजिन्याचे महत्त्व जाणतो. योग्याने शंभूराजाला भविष्यातील भव्य गोष्टी सांगितल्या. जे जे काही झाले ते ते तुळजाभवानीच्या प्रभावानेच झाले. त्या योग्याविषयी विशेष प्रकारची निष्ठा राजांच्या मनात विशेष गुणांनी शोभून देणारी अशी वाढू लागली. कोकणातील सर्व लोक राजांनी मान दिलेल्या योग्याकडे पाहून शंभूराजाचा हा गुरू दांभिक दिसतो असे म्हणू लागले. त्याचवेळी काही विविध व्रात्य कुळातील संन्यासी, पाप नष्ट केलेले दशनामी, भारती (संज्ञक) अरण्यप्रिय, सागरप्रिय, वनप्रिय, पर्वतवासी, नगरवासी, तीर्थवासी, नगेंद्रवासी, सारस्वत, संतुष्ट असलेले, महानिर्वाणप्रिय



तीर्थयात्रा करीत व्रतनिष्ठेने पृथ्वीवर फिरत होते. दिगंबर, जटाधारी, फाटके कपडे घालणारे, मुंडन केलेले, तीक्ष्ण नखे असलेले, वाकडी नखे असलेले, हात वर केलेले, एकच हात असलेले, अंगाला भस्माचे दाट पट्टे ओढलेले, खूप लांब खांदे असलेले, गवताप्रमाणे बारीक शरीर असलेले, धमन्या प्रकाशित असलेले, पांढऱ्या श्मश्रूने शोभणारे, तरुण, बालक, वृद्ध, मान हालत असलेले, सतत पाण्यात राहणारे, खाली-वर तोंड करीत राहणारे, रेड्याप्रमाणे पुष्ट, भिक्षा खात असताना तोंड विचित्र करून मोठ्या बैलाप्रमाणे न आवरणारी, प्रचंड गर्जना करणारे, डोळ्यांच्या कडा लाल असलेले, कुऱ्हाडीसारखी मोठी शस्त्रे घेतलेले (असे विविध गोसावी) शृंगारपूरला मोठ्या थाटाने जमा झाले.

**असहन्तोऽथ योगीन्द्रं कोङ्कणस्थाः सुदुर्जनाः । मिथ्यालपन्गुरुरिति श्रीशम्भोर्दशनामिषु ।।४१ कोङ्कणस्थवचः श्रुत्वा मत्तास्ते दशनामिनः । भङ्क्तुं मठीं तस्य केचिदुदतिष्ठन्कलेर्बलात् ।।४१ तत्र गत्वाऽथ तं वीक्ष्य तापसं शिवयोगिनम् । जगदम्बाप्रभावेण मोहमेव समाव्रजन् ।।४२ केचित्प्रचलचित्ताशाः पुरो भूय समावदन् । भोजनोपथिकं किञ्चिद्देहि नो चेद्विनश्यसि ।।४३**

अर्थ – कोकणातील सज्जन आणि दुर्जन दोघांनाही योगींद्र असह्य झाला होता. ते दशनामी साधूंना म्हणाले, "शंभूराजांचा गुरू खोटा आहे." कोकणस्थांचे ते बोलणे ऐकून उन्मत्त दशनामी कालीच्या प्रभावाने त्या योग्याची मठी तोडून टाकण्यास तयार झाले. तेथे गेल्यावर मात्र त्या तापसी शिवयोग्याला पाहिल्यावर जगदंबेच्या प्रभावाने ते मोहवश झाले. काहीजण मन अतिशय चंचल असल्याने पुढे येऊन म्हणाले, "आम्हाला भोजनासाठी काहीतरी दे, नाहीतर तुझा नाश होईल."

**इतीरयन्तो वचनं कुड्यमेडूकमण्डितम् । व्रात्या बभञ्जुस्ते मठ्या जपोत्के शिवयोगिनि ।।४४ दन्तान्कटकटायन्तः साटोपं मदगर्विताः । उत्तोल्य परशून्केचित्प्रहर्तुमुपचक्रमुः ।।४५ अमुं समस्तं वृतान्तं नाश्रृणोत्रैक्षदच्युतः । ध्यानस्तिमितनेत्रः सन्सस्मार त्रिपुराम्बिकाम् ।।४५ व्रात्यहस्तगतं वीक्ष्य गुरुं शिष्यस्त्वरान्वितः । कश्चिद्विमोचयन्मन्त्रविद्यां स्वामिन्द्रजालिकीम् ।। ४६ सिद्धवद्दर्शयामास शृणुत द्विजनायकाः । करेण यष्टिकां गृह्य वञ्जुलस्य मनोरमाम् ।। ४७ विलोमं भ्रामयामास दर्शयन्निजलाघवम् । वञ्जुलभ्रमणात्सर्वे तिर्यग्वलितबाहवः ।। ४८ स्थाणुबद्धा इव भुंवै(जै)र्गुणैः परमदारुणाः । प्रति प्रतीकमगमत्स्तम्भस्तेषां सुदुस्तरः ।। ४९ तत उच्चक्रुशुः सर्वे दीनास्या दीनभाषिणः । मुधापराद्धमस्माभिर्योगिनो मन्द्रबुद्धिभिः ।। ५० अथ मध्याह्नसमये जाते लीनविहङ्गमे । कोटरेषु विशालेषु वृक्षाणां परमादरात् ।। ५१ महिषा(षे)षु वराहेषु ख...षु(खड्गेषु)च गजेषु च । चमरीषु नदीतीरे विचरत्सु सुशीतले ।।५३ देवतार्चनसक्तेषु सर्वेषु गृहकारिषु । सरीसृपेषु द्युमणिकरतप्तेषु केवलम् ।। ५५**

अर्थ – असे म्हणत व भिंतीशी वेड्यासारखे चाळे करीत असताना मठीत तो शिवयोगी जप करण्यात मग्न होता. त्या खोडसाळ लोकांनी मोडतोड सुरू केली. दात कडकड वाजवीत, मदाने उन्मत्त झालेले ते प्रयत्नपूर्वक कुऱ्हाडी उचलून मारण्यास प्रवृत्त झाले. हा सर्व वृत्तांत विष्णूला ऐकू आला नाही आणि दिसलाही नाही. ध्यानामधे आश्चर्यचकित नेत्रांनी तो त्रिपुराम्बिकेचे स्मरण करीत होता. खोडसाळ लोकांच्या हातात गुरू सापडलेला आहे पाहून एका शिष्याने ताबडतोब स्वतःची इंद्रजालिक मंत्रविद्या सोडली व सिद्ध असल्यासारखे दाखविले. ब्राह्मणहो, ऐका. बांबूची एक सुंदर छडी हातात घेऊन आपले कौशल्य दाखवीत उलट बाजूने त्याने ती गरगर फिरवली.

बांबूच्या छडीच्या भ्रमणात सर्वजण हात आडवे वळवून अत्यंत गंभीर अवस्थेत बाहू स्थिर होऊन बद्ध झाले. अत्यंत दुस्तर असा खांब प्रतीकरूप झाला. तेव्हा सर्वजण दीन चेहऱ्याने व दीन वाणीने आम्ही उगीचच अज्ञानाने योग्याचा अपराध केला असे मोठमोठ्याने म्हणू लागले. नंतर दुपार झाल्यावर पक्षी वृक्षांच्या विशाल ढोल्यांत अतिशय शांतपणाने गडप झाले. रेडे, डुक्कर, गेंडा, हत्ती, हरिण असे प्राणी थंडगार अशा नदीतीरावर विहार करू लागले. गृहस्थजन देवपूजेमधे मग्न झाले. सरपटणारे प्राणी सूर्याच्या किरणांनी निव्वळ भाजून जाऊ लागले.

**विसृज्य ध्यानमखिलं शिवयोगी महामतिः । अपश्यदतिहर्षेण समस्तानाततायिनः ।।५६ ध्यानं विमुच्यापचितिं समाप्य जपपूर्वकीम् । प्रफुल्लनयनो योगी स्वमठीं समलोकत ।। ५७ ततस्ते वीक्षितास्तेन योगिना दशनामिनः । आबद्धबाहुयुगलाः पश्चात्तिर्यगधोर्ध्वतः ।। ५८ स्वशिष्यमब्रवीद्योगी कस्येदं मन्त्रलाघवम् । व्रात्यसन्यासिनः केन निबद्धा भुजमण्डले ।।५९ एतेषामपराधः को भुजदण्डनिबन्धनम् । लब्धं कथं कथयतात्युच्चैर्व्रात्ययतीश्वरैः ।। ६०**

**अर्थ** – अशा वेळी महामती शिवयोग्याने ध्यान विसर्जन करून हर्षाने त्या आततायी लोकांना जपापूर्वीचे प्रायश्चित्त समाप्त करून व ध्यान सोडून प्रफुल्ल नयनांनी योग्याने मठीकडे दृष्टिक्षेप केला. योग्याचे दशनामींकडे लक्ष जाताच ते आपापले दोन्ही बाहू बद्ध झालेले लवकरच आडवे-खाली-वर (हालवू लागले.) योग्याने आपल्या शिष्याला विचारले, 'हे मंत्रकौशल्य कुणाचे आहे? या खोडसाळ संन्याशाचे हात कुणी बांधले? यांचा अपराध काय? या खोडसाळ यतीवरांचे हात कसे बांधले गेले?'

**छात्रमध्याच्छात्रवेत्ता कश्चित्प्रथमकल्पिकः । निवेदयामास धियं व्रात्यानां दुष्टचेतसाम् ।। ६१ निशम्य सकलं तेषां व्रात्यानां दुष्टचेष्टितम् । प्रत्यक्षकरुणामूर्तिः कृपां कामप्यथातनोत् ।। ६२ विमोचयेमानधुना स्वकर्मफलभोगिनः । अवोचदित्थं शिष्याय विनीतायामितात्मने ।। ६३ शिष्यस्ततः शक्रजालमखिलं परिनिर्मितम् । चकर्त वाञ्जुलीं यष्टिं भ्रामयन्ननुलोमतः ।। ६३ बाहुबन्धनतो मुक्ता व्रात्या गर्ववियोगिनः । वितेनुः प्रणतिं भूयः शिवयोगिपदाम्बुजे ।। ६४ शिवयोगी ततः सोऽथ करुणाकृष्टमानसः । लेपायाम (उपायनं) मनोहारि प्रददौ प्रणयावृतः ।। ६५ यथातथमथो जग्मुर्विस्रब्धा दशनामिनः । अखर्वगर्वगलिता दलिता इव तेजसा ।। ६६ उन्मुक्तबाहुबन्धेषु गतेषु दशनामिषु । पप्रथेऽस्य प्रभा भूयस्तरां श्रीशिवयोगिनः ।। ६७ ततो जनाः कोङ्कणका भीता योगीन्द्रतेजसा । चमत्कारं समीक्ष्यामुं स्तुतिमेवावलम्बिरे ।। ६८**

**अर्थ** – त्या छात्रांच्या मधील पहिला योग्य व सर्व छात्रांना जाणणाऱ्या शिष्याने, त्या दुष्ट व्रात्यांचे विचार सांगितले. त्या व्रात्यांचे सर्व दुष्ट कृत्य ऐकून त्या साक्षात करुणामूर्ती (योग्याने) त्यांच्यावर आश्चर्यकारकपणे (कामपि) कृपा केली. 'आता या आपल्या कर्माचे फळ भोगणाऱ्यांना सोडा.' असे त्याने मोठ्या मनाच्या विनीत शिष्याला सांगितले. तेव्हा शिष्याने बांबूची छडी सुलट बाजूने फिरवून निर्मिलेले सर्व इंद्रजाल दूर केले. बाहुबंधनातून सुटल्यावर गर्वहरण झालेल्या त्या व्रात्यांनी शिवयोग्यांच्या चरणकमलांवर पुन्हा वंदन केले. शिवयोग्याने करुणेने आकृष्ट झाल्याने प्रेमाने सुंदर भेटही दिली. तेव्हा ते दशनामी घोड्यावर स्वार होऊन आपापल्या ठिकाणाकडे गेले. त्यांचा सर्व गर्व गळाला होता आणि तेजही खंडित झाले होते. बाहुबंधनातून मुक्त झालेले ते दशनामी गेल्यानंतर शिवयोग्याचा प्रभाव खूपच (भूयस्तरां) वाढला. त्यानंतर कोकणचे लोकही



योग्याच्या तेजाने भिऊन गेले व त्यांना तो प्रसंग एक चमत्कारच वाटला. ते त्याची स्तुती करू लागले.''

**सर्वे सुमनसोऽभूवन्तत्रस्था ये द्विजर्षभाः । वामाचारपरस्यापि स्तुतिमेवोपचक्रिरे ।। ६९ विधिर्यदा भव्यदायी वरीवर्ति पुरःसरः । तदा भवति सर्वत्र विपरीते विपर्ययः ।। ७० ये येऽप्यधर्पयन्पूर्वं महोत्कर्षा नरर्षभाः । मेनिरे तेऽस्य वाक्यानि किङ्करा इव सर्वतः ।। ७१ अमुं समस्तं वृत्तान्तं चारोक्तं शम्भुभूपतिः । असेवत समाकर्ण्य विशेषच्छिवयोगिनम् ।। ७२ अयं गुरुर्गुरुतरः सामाजिकवरैर्नरैः । लक्षितव्योऽनुमन्तव्यो विनेतव्यः क्षणं क्षणम् ।। ७३ इति सर्वान्समादिश्य शम्भुराजः शिवात्मजः । ालोकितुमिवातीव मठीं तस्य समाययौ ।। ७४ प्रविदितपरमार्थः सार्थवान्भूमिनाथः प्रथिततरजयश्रीर्योगिनः पादपद्मम् । सविनयमथ नत्वा प्रार्थयामास भूयो भव मम बहुमान्यस्त्वं सदस्यः सभायाम् ।। ७५**

**अर्थ** – तेथील सर्व ब्राह्मण सरळ मनाने वामाचरनिष्ठांचीही स्तुती करू लागले. ब्रह्मदेव जेव्हा भव्य असे काहीतरी देऊन पुढे येत राहतो, तेव्हा सर्व विपरीते उलटून जातात. पूर्वी जे जे उच्चतम पुरुष धाक निर्माण करीत होते, ते शिवयोग्याचे बोलणे अगतिक होऊनच जणू मानू लागले. हा सर्व वृत्तांत हेरांच्या तोंडातून (चारोक्तं) शंभूराजांनी ऐकल्यावर त्यांनी शिवयोग्याची विशेष सेवा आरंभिली. 'हे गुरू सर्व गुरूंत श्रेष्ठ असून सामाजिक पुढाऱ्यांनी सतत त्याच्याकडे लक्ष द्यावे, त्यांचे ऐकावे व शिस्त बाणवावी.' असे सर्वांना सांगून शिवपुत्र शंभूराजे त्यांची भेट घेण्यासाठी मठीकडे आले. सर्व सत्य समजल्यावर राजे धन्य होऊन आपली जयश्री वाढली म्हणून योग्याच्या पदकमलांवर विनयाने वंदन करून पुन्हा प्रार्थना करीत म्हणाले, 'माझ्या सभेतील आपण बहुमान्य सदस्य व्हावे.'

**ओमित्युक्तिमुपावदत्समभवद्योगी सदस्योत्तमो भूपस्याग्रहतो विवाहमकरोद्धित्वा स्वकीयं व्रतम् । क्षोणीन्द्रोऽपि तमन्वहं परिभजन्तस्योक्तिभिर्निर्भरं कार्याकार्यविचारणां चिरतरश्चक्रे प्रगल्भोत्सवः ।। ७६ कथितमिह मयाधिकं पवित्रं चरितमिदं शिवयोगिनो विचित्रम् । श्रुणुत बुधवरा गणेशभट्टस्थितिमतुलाममलां मनुष्यलोके ।। ७७**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरपरमानन्दात्मजदेवदत्तसुतगोविन्दकवीन्द्र-प्रकाशितायां शुभलक्षणलक्षितायां शिवपुराणान्तर्गतायां संहितायामनेकाध्यायसाधितायामंशावतरणेऽध्यायः ।।५।।**

**अर्थ** – होकार देऊन योगी उत्तम सदस्य झाले व राजाच्या आग्रहावरून आपले व्रत टाकून त्यांनी विवाह केला. स्वामीनेही त्यांच्या बोलण्यावर विश्वासून प्रतिदिन सेवा करीत मोठ्या आनंदाने बराच काळ सल्लाही घेतला. शिवयोग्याचे हे पवित्र व आश्चर्यकारक चरित्र मी विस्ताराने सांगितले. नंतर पृथ्वीवर अतुल आणि निर्मळ अशी गणेशभट्टाची स्थिती कशी झाली हे बुधवरांनो, ऐका.

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदाचा मुलगा देवदत्त व त्याचा मुलगा गोविंद कवींद्र प्रकाशित शुभलक्षणलक्षित शिवपुराणातील संहितेतील अनेक अध्यायांतील अंशावतरण अध्याय ५.

## गणेशभट्ट जांभेकर आणि मंत्रविद्या - अध्याय ६

**कवीन्द्र उवाच । समस्तगुणसम्पन्नः सर्वशास्त्रार्थपारगः । वेदवेदान्तनिष्णातः सदाचारप्रवर्तकः ।। १ जम्बूग्रामे महानासीदनन्तो नाम कश्चन । ब्राह्मणो ब्रह्मनिपुणो शान्तिक्षान्तिसमन्वितः ।। २ पूजयन् शङ्करं नित्यं सर्वलोकैकशङ्करम् । प्रसन्नहृदयोऽतीव साधुसज्जनसम्मतः ।। ३ तस्य पुत्रः समभवद्गणेशो नाम विश्रुतः । व्याख्याता धर्मशास्त्रस्य**

विजेता परवादिनाम् ।। ४ सहिष्णुः परवाक्यानां भ्राजिष्णुर्जनसंसदि । अनेकसाहित्य-कलाकलितो ललितोऽधिकम् ।। ५ अथो गणेशभट्टः स ब्रह्मचर्यव्रतं चरन् । अभ्यस्तुं सकलां विद्यां पुरीं वाराणसीं ययौ ।। ६ जाम्भेकरोपनामा स प्रथितः पृथिवीतले । दृष्ट्वा वाराणसीं रम्यां गङ्गातीरमुपागमत् ।। ७ एतस्मिन्समये कश्चित्सुमतिर्यतिनायकः । ददर्श मार्गे तं नाम नूतनं ब्रह्मचारिणम् ।। ८ प्रथमाश्रमिणं वीक्ष्य यतिः परमधार्मिकः । अपृच्छत्कोऽसि कुत्रत्यः किमागमनकारणम् ।। ९ इति पृष्टो बटुस्तेन यतिना ललिताक्षरम् । कथयामास परमं वृत्तजातमशेषतः ।। १० जाम्भेकरोपनाम्नोऽहमनन्तस्यादिमः सुतः । दैवज्ञवृत्त्या स्वां वृत्तिमाचरामि समन्ततः ।। ११

अर्थ – कवींद्र म्हणाले, सर्व गुणांनी युक्त, सर्व शास्त्रांत पारंगत, वेदवेदांतात निष्णात, सदाचार घालून देणारा असा एक अनंत नावाचा थोर ब्राह्मण जंबूग्रामात (जांभ) राहात होता. तो ब्रह्मनिपुण, शांत आणि क्षमाशील होता. कल्याणकारी अशा शंकराची तो नित्य पूजा करी. अत्यंत प्रसन्न मनाचा आणि साधुसज्जनांना मान्य असा त्याचा गणेश नावाचा पुत्र प्रसिद्धी पावला. तो धर्मशास्त्राचा प्रवक्ता, इतर वादी लोकांना हरविणारा, परमतसहिष्णू, सभांतून तेजस्वी दिसणारा, साहित्य-कलांचा ज्ञाता, अधिक मनोहर असा होता. गणेशभट्ट ब्रह्मचर्य व्रत धारण करीत असता सर्व विद्यांचा अभ्यास करण्यासाठी वाराणसी नगरीला गेला. सर्व जगात जांभेकर आडनावाचा हा प्रसिद्ध पंडित वाराणसी नगरी पाहून गंगातीरावर आला. त्याच सुमारास कोणी एक सुमती नावाच्या परमधार्मिक यतिश्रेष्ठाच्या दृष्टीस पडून त्या नवख्या ब्रह्मचाऱ्याला वाटेतच 'कोठून आलास?', 'येण्याचे कारण काय?' असे विचारले. त्या यतीने सुंदर शब्दांनी विचारल्यावर बटूने (स्वतःचे) उत्तम कुलवृत्त सर्वत्र सांगितले, ''मी जांभेकर आडनावाचा व अनंताचा थोरला मुलगा आहे. इकडेतिकडे फिरून ज्योतिष वृत्तीवर निर्वाह करतो.

इदानीमभियातोऽस्मि मन्त्रशास्त्रमशेषतः । पठितुं पाठितुं लोकानन्तेवासित्वमागतान् ।। १२ संहारमुपसंहारं मन्त्राणां परमाद्भुतम् । ज्ञातुकामः कर्तुकामस्तर्तुकामो भवार्णवम् ।। १३ समागतोऽस्मि भद्रं ते यतिराज महामते । अत्रातिमात्रं कञ्चित्त्वमुपायं परिदर्शय ।। १४

अर्थ – यावेळी मी पूर्ण मंत्रशास्त्राचा अभ्यास करण्यासाठी आणि शिष्य म्हणून आलेल्यांना शिकविण्यासाठी आलो आहे. मंत्रांचा अत्यंत आश्चर्यकारक संहार आणि उपसंहार कसा असतो हे जाणण्याची व कार्य करण्याची इच्छा आहे. भवसागर तरून जाण्याच्या इच्छेने मी इथे आलो आहे. हे यतिराज, महामते! आपले कल्याण इच्छितो. याबाबतीत काही उपाय आपण विस्तृतपणे दाखवून द्यावा.''

इत्थं निशम्य वचनं स यतिस्तं दयान्वितः । निजगाद बटोः सर्वं कथयाम्यहमादरात् ।।१५ इत्थमाकर्ण्य तद्वाक्यं स बटुस्त्वरयान्वितः । शिष्यवत्तं महाप्रेम्णा ववन्दे पादपङ्कजे ।।१६ अहं शिष्योऽस्मि दासोऽस्मि भक्तोऽस्मि तव सुव्रत । इत्यालपद्यतिश्रेष्ठं वरिष्ठगुणमण्डितम् ।। १७ शिष्यत्वेन बटूत्तंसं वरयित्वा यतिस्तदा । स्वमठीं प्रापयामास दिव्यभावविनोदिनीम् ।। १८ अकुण्ठोत्कण्ठया वीतः स बटुस्तदनन्तरम् । मठीमटन्मठपतेः कार्यजातममन्यत ।।१९ अनवद्यां बटुर्विद्यामविद्याङ्कुरभञ्जिनीम् । समभ्यसस्त-मुदितख्यातिः कतिपयैर्दिनैः ।। २०

अर्थ – त्याचे हे बोलणे ऐकून तो यती करुणेने म्हणाला, ''हे बटो, मी तुला सर्वकाही प्रेमाने



सांगतो!'' हे वाक्य ऐकताच त्या बटूने त्वरेने शिष्य असल्याप्रमाणे मोठ्या आनंदाने त्यांचे पदकमलापाशी नमस्कार केला. ''मी तुमचा शिष्य आहे. हे सुव्रता! मी तुमचा दास आहे, भक्त आहे.'' असे त्या थोर गुण असलेल्या यतिश्रेष्ठाला म्हटले. त्यावेळी त्या उत्तम बटूला शिष्योत्तम म्हणून स्वीकारून दिव्य भाव जागृत करणाऱ्या आपल्या मठीत नेले. अतूट अशा उत्कंठेने त्या बटूने नंतर मठीत राहून मठपतीची सर्व कामे स्वीकारली. काही दिवसांतच त्या बटूने अविद्येचा समूळ नाश करणारी श्रेष्ठ विद्या अभ्यासून आपली ख्याती वाढविली.

अभ्यस्तेषु समस्तेषु सार्थेषु मनुषूच्चकैः । मुदमाप बटौ तस्मिन्स भिक्षुः प्रविचक्षणः ।।२१ सरहस्यां समभ्यस्य बटुर्विद्यां यतीश्वरात् । समर्प्य दक्षिणां काञ्चिद्देशकालानुरूपिणीम् ।। २२ संसेव्य विविधोपायैर्गतापायैर्निरन्तरम् । स्वदेशदर्शनाकाङ्क्षी जग्राहाज्ञां हताग्रहः ।।२३ अदादाज्ञामथ गुरुराशीर्भिरभिनन्द्य तम् । विविधाभिरनेकाभिर्ललिताभिर्निरन्तरम् ।। २४ गृहीत्वाज्ञां मठपतेर्हित्वा वाराणसीं पुरीम् । स्वं देशमगमद्वेगान्मनोमारुतरंहसा ।। २५ गणेशनामा स बटुर्यदा कोङ्कणमागतः । तदा स्फीतिः समभवत्प्रशस्या तस्य भूतले ।। २६ अशृण्वन्सकला लोका विद्यासामर्थ्यमञ्जसा । ततोऽभवद्गणेशस्य सततं मानदायकाः ।।२७

अर्थ – सर्व मंत्रविद्या सार्थ आणि चांगल्या गुणांनी अभ्यासल्यावर तो हुशार भिक्षू त्या बटूवर प्रसन्न झाला. यतिश्वराकडून रहस्यासहित सर्व विद्या अभ्यासून व देशकालानुरूप दक्षिणा देऊन निर्दोष अशा विविध मार्गांनी सेवा करून स्वदेशाचे दर्शन घेण्याच्या इच्छेने आग्रह सोडून यतीची आज्ञा घेतली. गुरूनेही आशीर्वादाने त्याचे अभिनंदन करून अनुमती दिली. विविध अशा अनेक सुंदर (आशीर्वादांसह) लगेच मठपतीची आज्ञा घेऊन व वाराणसी नगरी सोडून तो त्वरेने मनोवेगाने व वायुवेगाने स्वदेशाला आला. गणेश नावाचा तो बटू कोकणात आला तेव्हा त्याची सर्वत्र प्रशंसा पसरली. लवकरच त्याचे विद्यासामर्थ्य सर्व लोकांच्या कानावर गेले व ते गणेशाला मान देऊ लागले.

आदौ गन्धाक्षतपाद्यासनाद्यानुपचारकान् । ददौ समाजेषु जनो गणेशाय द्विजातिनाम् ।। २८ इत्थं प्रसिद्धिः सर्वत्र गणेशस्य यदाऽभवत् । शम्भुराजस्तमाकर्ण्य सदस्यत्वेऽनुमन्यत ।। २९ क्षितिपतिकुलचूडारत्नभूतः प्रभूतद्विजवरकुलदाता शासिता दुर्जनानाम् । शिवनरपतिसूनुः सभ्यतां प्रापयित्वा बुधगणवररत्नं तं गणेशं ननन्द ।। ३०

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरपरमानन्दात्मजदेवदत्तोद्भवप्रकाशितायां शिवपुराणा-न्तर्गतायामनेकाध्यायसाधितायां संहितायामंशावतरणेऽध्यायः ।।६।।

अर्थ – प्रथम गंधाक्षता, पाद्य, आसन इत्यादी उपचारांसह ब्राह्मणसमाजात त्याला सन्मान प्राप्त झाला. याप्रमाणे त्याची सर्वत्र प्रसिद्धी झाल्यावर ती शंभूराजांच्या कानावर आली आणि त्यांनीही त्यास जवळ केले. राजकुलातील चूडारत्न असलेल्या, अनेक ब्राह्मणश्रेष्ठांच्या कुलांना दान देणाऱ्या, दुर्जनांचा शास्ता असलेल्या, शिवराजपुत्राने सर्व पंडितांतील श्रेष्ठ असलेल्या गणेशाला दरबारात प्रवेश देऊन खूश केले.

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदाचा मुलगा देवदत्त व त्याचा मुलगा गोविंद कवींद्र प्रकाशित शुभलक्षणलक्षित शिवपुराणातील संहितेतील अनेक अध्यायांतील अंशावतरण अध्याय ६.

## केशवपंडित – अध्याय ७

कवीन्द्र उवाच । श्रीशृङ्गारपुरे कश्चिश्चन्द्रवंशसमुद्भवः । अभूत्प्रभूतमहिमा राजाराम-

कुलाधिपः ।। १ सूर्यराज इति ख्यातः स्वबाहुबलदर्पितः । सहायास्तस्य चाभवन् शिरस्काः क्षत्रियर्षभाः ।। २ तेषामुपाध्यायवरः केशवो द्विजनायकः । उपाध्यायाभिधां बिभ्रन् देशे कोङ्कणके चिरम् ।। ३ समस्तकार्यजातानि वशिष्ठ इव साधयन् । मध्येसभं गीष्पतिवद्विहरन्साधुभाषितैः ।। ४ आबभासेतरां विप्रवृन्देषु गुणसम्पदा । हर्षादुपनिषद्देवीमधिकण्ठं प्रकल्पयन् ।। ५ श्रीमान्पण्डितराजो यः शिवराजप्रियङ्करः । रघुनाथ इति ख्यातो विद्यासागरपारगः ।। ६ अशृणोद्विप्रमुख्येभ्यः सर्वलक्षणलक्षितम् । तं सर्वगुणसम्पन्नं केशवं ब्राह्मणर्षभम् ।। ७ ततः कतिपयाहोभिः सूर्यराजसमन्विताः । शिरस्काः शिवराजेन स्वायत्ताः सेवकीकृताः ।। ८ रघुनाथस्ततो वेगात्केशवं विप्रपुङ्गवम् । गताश्रयं गतस्थानं गतगेहं गतश्रियम् ।। ९ गलिताचार्यकं भ्रष्टविभ्रमं जातसाध्वसम् । स्वहस्तकत्वे प्रणयात्स्थापयामास सादरम् ।। १०

अर्थ – कवीन्द्र म्हणाले, शृंगारपुरामधे चांद्रवंशात उत्पन्न झालेला व मोठा प्रभावी असा राजाराम सूर्यराव (सुर्वे) हा प्रसिद्ध होता. त्याला आपल्या बाहुबलाची फार घमेंड होती. त्याचे साहाय्यक शिर्के हे सुद्धा क्षत्रियश्रेष्ठ होते. त्यांचा उपाध्याय ब्राह्मणश्रेष्ठ केशव 'उपाध्ये' हे आडनाव धारण करणारा कोकणात आणि देशात बराच काळ राहून वसिष्ठाप्रमाणे त्यांची कामे करीत असे. सभेमधे चांगल्या भाषणांनी ब्रह्मदेवाप्रमाणे (लीलया) विहार करून ब्राह्मण समुदायातही आपल्या गुणांच्या जोरावर छाप पाडीत असे. आनंदाने उपनिषदे व त्यांचे रहस्य त्याला कंठस्थ होते. पंडितराज रघुनाथ हा विख्यात विद्यासागर पार केलेला व शिवाजीराजांना प्रिय असलेला असा पंडित होता. ब्राह्मणप्रमुखाकडून सर्व लक्षणांनी युक्त व सर्वगुणसंपन्न अशा ब्राह्मणश्रेष्ठ केशवाचे नाव त्याच्या कानावर आले. काही दिवसांनी सुर्व्यांच्या बरोबर शिर्के यांना शिवाजीराजांनी आपल्याकडे घेऊन त्यांना आपल्या सेवकवर्गात स्थान दिले. तेव्हा ब्राह्मणश्रेष्ठ केशवाचे आश्रयस्थान, घर आणि वैभव गेले, म्हणून रघुनाथाने त्वरेने त्याचे गेलेले उपाध्येपण, त्याची भ्रांत व भयभीत स्थिती जाणून त्याला आदराने व प्रेमाने आश्रय दिला.

पण्डितानां गुणध्वंसाद्विप्राणां मानखण्डनात् । उपमर्दात्कवीन्द्राणां गणकानां प्रहासतः ।। ११ रघुनाथः क्षयाविष्टो विशिष्टोऽपि धरातले । प्रययावतिवेगेन दिदृक्षुरमरावतीम् ।। १२ तथैव शिवराजोऽपि सर्वलोकशिवङ्करः । असर्पदतिवेगेन द्रष्टुं कैलासनायकम् ।। १३ अथो साम्राज्यपदवीं परकुञ्जरगृञ्जनः । शिवराजात्मजो भेजे शम्भुराजो गुणोज्वलः ।। १४ ततः केशवभट्टेन लब्धा पण्डितराजता । पूर्वोपाध्यायपदवी त्यक्ता जीर्णवधूरिव ।। १५ त्यक्तामर्षो धृतोत्कर्षः प्रहर्षपरिभूषितः । केशवः प्रीणयामास विप्रान् शम्भुसभागतान् ।। १६ केषाञ्चिदग्रहाराणि दापयामास लाघवात् । वर्षाशनानि केषाञ्चित्कारयामास सुव्रतः ।। १७ महाषोडशदानानि व्रतानि विविधानि च । प्रदर्शयामास मुदा शम्भुभूपाय धीमते ।। १८ अधर्मखण्डनं धर्मस्थापनं नियतव्रतः । केशवो रचयामास हस्तेन नृपतेर्मुहुः ।। १९ नीतिशास्त्राण्यशेषाणि दर्शयित्वा नरेश्वरे । नीतीः संस्थापयामास शाश्वतीर्धरणीतले ।। २० यद्यत्समभवत्सर्वं दुःसाध्यमधिभूतलम् । साधयामास तत्सर्वं मन्त्रैर्वेदसमुद्भवैः ।। २१ प्रसन्नवदनोऽधिकं ललितलक्षणो दक्षिणःप्रवृद्धधिषणो महान्विदितसर्वतत्वव्रजः । अभूत्प्रियसखो गुणैः शिवनृपात्मजस्योच्चकैर्विचित्रचरितावलिं विरचयन्सदा केशवः ।। २२ यत्काल्याः शिवयोगिनो यदतुलं श्रीमद्गणेशस्य यद् यच्छ्रीकेशवशर्मणस्त्रिभुवने



माहात्म्यमन्यादृशम् । तत्सर्वं कथितं मया नृपतिना पुत्रेहया साधितं यद्यत्कर्म तदेव भो बुधवरा! वक्षाम्यथो सम्भ्रमैः ।। २३

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरपरमानन्दात्मजदेवदत्तोद्भवप्रकाशितायामध्यायशत-साधितायां शिवपुराणान्तर्गतायां संहितायां केशवभट्टमाहात्म्यनिरूपणं नाम अध्यायः ।।७।।

अर्थ – पंडितांच्या गुणांचा नाश होत आहे, ब्राह्मणांची मानखंडना होत आहे, कवींद्रांचा अपमान होत आहे, ज्योतिषी थट्टा करीत आहेत, अशा स्थितीत रघुनाथ पंडिताने जगात विशेष स्थान मिळविलेला असूनही त्याला क्षय होऊन लवकरच तो स्वर्गात गेला. शिवाजीराजेही सर्व लोकांचे कल्याण करणारे असे कैलासनायकाच्या दर्शनास गेले. नंतर शत्रूच्या हत्तीला आव्हान करणारे शिवपुत्र संभाजीराजे सम्राट झाले. केशवभट्टाला पंडितराजाचे स्थान मिळाले. म्हाताऱ्या बायकोप्रमाणे त्याने पूर्वीचे उपाध्येपण टाकून दिले, राग टाकून दिला, उत्कर्ष झाल्यामुळे मोठा हर्ष होऊन केशवपंडित शंभूराजांच्या दरबारातील ब्राह्मणांना खूश करू लागला. त्याने कोणाला सुनिश्चयाने अग्रहार देवविले, कोणाला सहजपणे वर्षासने करविली, मोठाली षोडशदाने देवविली. बुद्धिमान शंभूराजांना आनंदाने विविध व्रते स्पष्ट करून सांगितली. अधर्माचे खंडन आणि धर्माची स्थापना अशा नियत व्रतपूर्वक राजांच्या करवी केशवाने घडविली. राजाला सर्व नीतिशास्त्रे विशद करून या पृथ्वीतलावर शाश्वत नीतीची स्थापना केली. भूतलावर जे जे काही दुःसाध्य होते, ते सर्व वेदमंत्रांनी त्याने साध्य केले. त्या प्रगल्भ बुद्धीच्या सर्व थोर तत्त्वांच्या जाणकार केशवाने चातुर्याने, प्रसन्नमुखाने आणि सुंदर पद्धतीने आपल्या गुणांच्या जोरावर शंभूराजांशी गाढ मैत्री संपादन केली व आश्चर्यकारक कार्ये करीत राहिला. कालीभक्त शिवयोग्याचे, गणेशभट्टाचे आणि केशवशर्म्यांचे जे अतुलनीय आणि जगात विलक्षण माहात्म्य आहे, ते सर्व राजांनी पुत्रेच्छेने विचारल्यावरून मी सांगितले. ते सर्व कर्म मी आता ब्राह्मणश्रेष्ठहो! संभ्रमाने सांगतो.'

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदाचा मुलगा देवदत्त व त्याचा मुलगा गोविंद कवींद्र प्रकाशित शुभलक्षणलक्षित शिवपुराणातील संहितेतील अनेक अध्यायांतील अंशावतरण अध्याय ७.

तळटीपा :–

R = Rajopadhye Records. Contain the following variants :- a, b, c, d denote the four lines of the verse.

अध्याय १

Verse [2] cd. R. सभामगाद्विनोदेन कस्मिंश्चिदपि वासरे ।

[4] a. R. ततो रहः समावीक्ष्य - R. cm. 4c-5d.

[6] d. R. सिद्धान्योगीश्वरानपि ।

[7] ab. R. सामाजिकान्मन्त्रिवरान्प्रधानान्प्रधनप्रथान् ।

[10] After 10 ab. R. ins.
सहजाः कृत्रिमाश्चैव स्वसहायैः समावृताः ।

[11] b. R. बर्बरा अपि (for काबलैः सह).

[12] R. cm. 12c. - 13 b.

[15] R. cm. 15 ab.

[16] d. R. दापयन्ति करान्मुहुः ।

[17] R. cm. 17-22.
R. cm. 33 cd.
[25] d. R. निवसन्ति ममाङ्कने ।
[26] d. R. शरणार्थिनः (for गलितोदद्यमाः) ।
[27] cd. R. मत्प्रतापाग्निसन्तप्ता निद्रां नोपलभन्त्युत ।
[28] b. R. वरा नृपकदम्बके ।
[29] c. R. -संस्थाना (for - सञ्चारा) ।
[30] ab. R. बिदनूराश्रयसञ्जातप्रतापाग्निमहोज्वलाः ।
[32] a. R. अतिदुर्गमदुर्गस्थाः - After 32. R. ins.:
फरासिनः समाक्रान्ता विक्रान्ताः सङ्गरे दलम् ।
मामकैः सकलैः शूरैः साग(रा)न्तरचारिभिः ॥
त्रिनेजाश्चिरात्राय वित्रासितपरा अपि ।
आहोपुरुषिकां काश्चिन्न वहन्ति ममाग्रतः ॥
दुनोलाः कलिताः शेषपाखण्डाः खण्डमुत्कटम् ।
आददन्ति विनोदेन जल्पन्तो मामका इति ॥
ढोग्भाकाः प्रणयप्रह्व बह्वलापविवर्जिताः ।
मद्भक्तिमनुगच्छन्ति प्रयच्छन्ति धनं बहु ॥
[33] After 33 ab. R. ins.:
कटकं मामकं वीक्ष्यारटन्त्यानन्दसम्भृताः ।
कड्दीना दीनवदनाः सदने मद्भयं सदा ॥
विशेषयन्ति विरताः सिन्धुमार्गादनेकधा ।
[35] cd. R. मदग्रेसरतां प्राप्य धावन्ति विनटन्ति च ॥
[36] After 36. R. ins.:
पौडखोरैकनिलयाः सलया मद्धिते सदा ।
मद्दत्तं धनमासाद्य प्राणानुज्झन्ति सङ्गरे ॥
[37] R. cm. 37-44.
[45] R. reads: मूठेखोरगृहाः केऽपि भटाः प्रोत्कटमानिनः ।
आशंसयन्ति मद्धस्ताद्धनं विजयमेव च ॥
[46] ab. R. मूलसीकस्थिताः प्रोद्यद्याननामसमर्धिताः ।
d. R. रमन्ति स्त्रीकदंबके,- After 46. R. ins.:
केचिद् गुञ्जणसंवासाः सुभटा रणकर्कशाः ।
मद्वासतां गताः सन्तः प्रकुर्वन्ति यशो भुवि ॥
तथा हरणमध्यस्थाः परेषां हरणोद्यताः ।
मदाशाकिङ्कराः सर्वे निवसन्ति सुखं गृहे ॥
तथा हीरडसस्थाना मदाश्रयमुपागताः ।
भूदुर्गाण्यनुरक्षन्ति लक्षयन्ति हितं मम ॥
पाटण्खोरकृतावासाः प्रवासैककृतक्षणाः ।
मदाश्रयं संश्रयन्तो भजन्ति शिवमुत्कटम् ॥



भूयः परलखोरस्थाः प्रेष्यतां मम सङ्गताः ।
जैत्रयात्राः प्रकुर्वन्ति प्रोल्लसन्ति सभास्वलम् ॥
तथा तारलखोरस्थाः शूराः केचन सम्मताः ।
मत्पत्तिसेनां पतितां भान्ति प्राप्य क्षितौ किल ॥
मेढेखोराश्रयाः प्रायः प्रकर्तुं प्रसभोद्यताः ।
मत्पत्तिसैन्यपार्श्वस्थाः प्रस्थाने प्रभवन्त्युत ॥
[47] b. R. खरांशुरिव रश्मिभिः ।
[48] R. cm. 48.
[49] b. R. तथा हेटकुडालकाः- After 49 R. ins.:
शृङ्खलाकरसंयुक्ताश्चान्देरीग्रामवासिनः ।
मत्पत्तिसेनावामाङ्गमङ्गीकुर्वन्ति सङ्गरे ॥
अन्ये वारुणखोरस्था रोहिडेखोरजैः सह ।
[50] d. R. तथा सौन्दलजा अपि।
[52] b. R. सावर्डेकरजा दृढं After 52 ab. R. ins.:
प्रपालयन्ति दक्षाङ्गं सेनाया मम सर्वदा।
चिपोलणभवाः केचिद्दाभोलीप्रभवास्तथा ॥
[53] After 53. R. ins.:
सालसीपत्तनगृहाः केचिद्वेलेकराः सदा।
पुत्रपौत्रैः परियुताः शूराग्रपदवीङ्गता।।
अवन्ति मम सेनाया दक्षवामकरावपि।
[54] d. R. राजपत्तनिकाः परे ।
[55] cd. R. प्रभावलीयाः प्रोद्दामसङ्ग्रामकृतविस्मयाः ।
After 55 R. ins.:
गर्जन्तो दक्षिणे पार्श्वे पत्तीनां प्रभवन्त्यरम् ।
[56] b. R. जयवल्लीसमुद्भवाः मल्कापुरालयाः शूराः ।
वाडीगोकर्णभूभवाः - After 56 R. ins.:
हरिचेरीपरिस्पन्दाः कशेलीकाश्च केचन ।
[57] R. cm. 57.
[58] b. R. करवीरभवैः सह - After 58 R. ins.:
मूर्धानं मम सेनाया नदन्तो भैरवान् रवान् ।
आलक्षयन्ति रक्षन्तः स्वजनैरभिसंवृताः ।
नानानाटकनिर्माणनिपुणाः पुण्यकारिणः ।
उदरे मम सेनायाः कर्णाटा निवसन्त्यलम् ॥
[59] ab. R. अलङ्करिष्णवोत्यर्थ वीरान् जिष्णुपराक्रमाः ।
cd. R. महाराष्ट्रोद्भवा वीराः सेनामध्ये लसन्त्यमी ।
After 59
रत्नालङ्कृतकोटीरकुण्डलोज्वलनिग्रहाः ।
सेनावामाङ्कमाप्राप्य तिष्ठन्ति बत सिन्धुजाः ॥

कुलबाचलदेशस्था अचला युद्धकर्मणि ।
अश्रान्तं मम सेनाया दक्षाङ्के विभ्रमन्त्यरम् ॥
महाकापट्यभरिताः कानडीयप्रथां गताः ।
वामकूर्परतां यान्ति मत्सैन्यस्य रणोत्सवाः ॥
आरलग्रामनिलयास्तारलैकसमाश्रयाः ।
सोलाङ्कुरीयाः साङ्गूलभवाः शालवनीयकाः ॥

[60] d. R. राशिवडेकरमिश्रिताः –After 60 R. ins.:
वामकुर्परतामस्मत्सेनायाः कल्पयन्त्युत ।
प्रेङ्खत्कटकिनः केचित्काटकाः षण्मुखोद्यमाः ।
वामकुक्षिं दक्षकुक्षिं पालयन्ति बलस्य मे ॥
प्रबलाः प्रथिताः खानवलीग्रामसमुद्भवाः ।
मत्सैन्यमध्यस्थेनाभिद्योतयन्ति दिशो दश ॥
मदीयसेनानेत्रश्रीभरं बिभ्रति सर्वदा ।
नानाभूदुर्गरचितसंश्रयाः क्रूरमानसाः ॥
मदीयसैन्यकर्णाभां दीपयन्ति मदोन्नताः ।

[61] R. cm. 61 ab.

[62] After 62 R. ins.:
अटन्ति मम सैन्येऽस्मिन्नानादेशसमुद्भवाः ।

[63] After 63 R. ins.:
स्वस्वविक्रमसन्दीप्ताः शक्रवत्प्रथिताः परम् ।
मत्सेना प्रपदस्थाना द्योतन्ति निजतेजसा ॥
वर्णदूतसमालेखप्रगल्भाधिषगोद्यमाः ।
लेखकाः सन्ति मे भूयश्चित्रगुप्तोत्तमोत्तमाः ॥

[64] R. cm. 64.

[68] R. cm. 68 cd.

[70] R. cm. 70 cd.

[71] After 71 R. ins.:
कृशा अपि दिनेशाभप्रभाभरविलासिनः ।
मत्कल्याणपराः सर्वे तिष्ठन्ति मम सद्मनि ॥
मन्त्रयन्त्ररहस्यज्ञास्तान्त्रिका मानि का अपि ।
समुदायैः समुदयं मत्सभासु गम (द) न्त्यमी ।
षड्दर्शनरहस्यज्ञाः प्रशस्ताः सङ्कथास्वपि ॥
आवेदयन्ति सततं मत्कल्याणपरं विधिम् ।
गणि(ण)का गुणिनः केचिद् गणितग्रहमण्डलाः ।
वल्गन्ति दैवं बहुशः सभासु मम सुव्रताः ॥

R. cm. 71-73 d

[74] R. cm. 74 ab.

[75] After 75, R. read 84-89.



[76] d. R. कथयन्ति ममाग्रतः ।

[77] b. R. धिषणापतिबुद्धयः ।

[78] b. R. कर्कशत्वमुपागताः– d. R. समाजं मम तार्किकाः ।

[81] ab. R. नानाकाव्यकलालापकोविदाः कविनायकाः ।

[81] cd. R. आभूषयन्ति परमं समाजं मामकं सदा ।

[82] R. transfer 82-83 d. R. स्वमतस्थापनोद्धुराः ।

[83] R. cm. 83 cd.

[83] After 83 ab. R. ins.:
क्रीडन्ति चत्वरे सर्वे दर्शयन्तः क्रमात्कलाः ।

[88] a. R. नानावाद्यकलाभिज्ञाः ।

[89] d. R. सततं मम चत्वरे ।

[92] ab. R. परीक्षयन्ति सततं कोशागारे मदीयके ।

[97] a. R. देवा अपि मया दत्तम् ।

[98] R. reads for 98
इत्थं मनोरथोऽस्माकं शङ्करेण प्रपूरितः ।
तथाप्येका कापि चिन्ता मयि जागर्ति साम्प्रतम् ॥

[99] cd. R. सर्वे ब्रूत सभास्ताराः प्रविचार्य स्वके हृदि ।

[100] cd. R. कार्या मया वा वदत प्रधानमन्त्रिभिः सह ।

[101] cd. R. पुत्रेहां मनसा वहन् ।
cd. R. देव्याः समाराधने ।

**अध्याय २**

[3] d. R. तच्छृण्वन्तु मनीषिणः ।

[4] c. R. आराधयस्व तां कालीम् ।

[6] b. R. तेजोभरतरङ्गिणीम् ।
-c. R. सद्रूपां (निलयां)

[9] b. R. दनुजेष्पलं (ष्वलं) (लां?) (सन्ततौ) R. cm. 9 cd.

[10] R. transp. 10 ab and 10 cd. After 10 R. ins.:
कुचकुम्भसमाकारतुहिनस्वर्णपर्वताम् ।

R. cm. 11.

[12] b. R. सदयां भक्तमण्डले ।

[12] d. R. जजनीमपि सर्वदा । R transp. 12 cd and 13 ab.

[13] R. cm. 13 c. -16 b.

[16] d. R. श्यामलास्त्रविलासिनीम् ।

[18] b. R. प्रपदद्वयां

[19] R. cm. 19 ab. c. R. कच्छपीध्वनिगम्भीर -R. cm. 20 ab.

[20] c. R. भारत्याः (for अचिन्त्यां)

[21] b. R. हृतपद्मपरिसंस्थिताम् । R. cm. 21 c -23 d.

[25] b. R. त्रिलोकीजननीं पराम् ।
[26] a. R. सुस्निग्धाकुटिलात्यर्थं ।
-cd. R. मादीर्घवेणिकोद्भासिनानाभूषणभूषिताम् ।
[27] b. R. रत्नैकमुद्रिकां (ललन्तिकेति वा) After 27 R. cm. 28 ab.
[28] cd. R. लाक्षारागाधिकद्योतच्चरणां कविचश्चिकाम् ।
[29] R. cm. 29 ab. cd. R. एनामाराध्य राजेन्द्र स्वाभिलाषं प्रपूरय ।
[30] cd. R. सकेशवेन सगणेशेन मन्त्रिवरैः सह ।
[31] b. R. सिद्धैः कैश्चिन्मुहुर्मुहुः । R. cm. 31 c-32 b.
[33] for 33 R. reads:
अस्तुवीन्मनसा देवीं स्वोपासनपदं गताम् ।
शिवराजात्मजः शम्भू राजराजसमः श्रिया ॥
[34] d. R. किं तेजस्तद्वदस्व नः । -After 34 R. ins.:
किं वीर्यं किं तपो ध्यानं को मन्त्रः को जपः परः ।
[35] b. R. को जपः परः (सिद्धिसाधने) -R. cm. 35 cd.
[36] d. R. कथयस्व समासतः ।
[37] b. R. कोभूत्केशवभट्टकः ।
[38] R. cm. 38.
[44] d. R. समर्धितौ (for समेधितौ)
[46] b. R. दनुकुलेष्वलं (for * जसन्ततेः)
[46] d. R. कृतालयं (for लयौ) 47 R. Transp. 47 ab and 47 cd.
[47] b. R. प्रबलौ (for चरितौ) -cd. R. धातारमत्तुमुद्युक्तौ स्ववीर्यभरशालिनौ ।
[48] After 48 ab R. ins.:
अस्तुवन्मनसा तत्र योगनिद्रामनुत्तमाम् ।
[50] R. reads for 50.
पुष्टिस्त्वमेव भुवनाकलनं त्वमेव । सृष्टिस्त्वमेव हृदये मुनिपुङ्गवानाम् ।
तुष्टिस्त्वमेव सकलार्तिहरा त्वमेव । मातः प्रसीद ।
After 50 R. ins.:
शम्भुस्त्वया विनिहितो गुणगह्वरेऽस्मिन् । R. cm. 51 b.
[52] b. R. ग्रस्तं युगान्तसमयेषु विनिर्मितश्च ।
[53] a. R. यज्ञस (for दानं) R. cm. 53 bc. R. सिद्धिस्त्वमेव हृदये बत तापसानाम् ।
[54] R. cm. 54 bcd.
[55] ab. R. त्वां ब्रह्मवेदान्तविदः पठन्ति। विद्यां वदन्ति मुनयः परमार्थदात्रीम्। c. R.
सुजना (for मुनयो) R. ध्याता (for जाता)
[56] bc. R. भानुः शशी वायुधराजलानि ।
त्वां व्योम वह्निरिति केऽपि भणन्ति धीराः ।
[57] c. R. धैर्यं त्वमेव समरे विजयस्त्वमेव ।
[58] c. R. वीर्यं च किञ्चिदसि वीरजनस्य युद्धे । R. Transp. 58 and 59.
[59] c. R. उन्मत्तदानवविनाशमयी त्वमेव ।



After 59 R. ins.:
त्रैलोक्यपावनकरी त्रियुगी त्वमेव ।
सत्यं त्वमेव सकलाकलनं त्वमेव ॥
भूपा त्वमेव मणयो निधयस्त्वमेव ।
मातः..... ।
[60] b. R. द्रव्यं (for दैवं) C. R. बहुतप्त (for परितप्त)
[62] b. R. निभृतं (for सुभगं) -c. R. लज्जा त्वमेव सततं कुलसुन्दरीणाम्।
After 62 R. ins.:-
लक्ष्मीस्त्वमेवासि सुलक्षणानां । विद्यावतां ज्ञानवतां सताश्च ।
उल्लास एवाद्भुतविस्मयस्त्वं । मातः..... ।
[63] c. R. त्वमसि (for थ)
[64] After 64 R ins.:
देव्या त्वया ततमिदं प्रतिभाति सर्वम् ।
शर्वप्रिये नृत्यसि रौद्ररूपा ।
एकाकिनी कल्पसमाप्तिकाले ।
मातः प्रसीद..... ।
[65] R. cm. 65-66.
[67] b. R. सौदामिनी वज्रधरी त्वमेव ।
c. कान्तस्त्वमेव सुमुखो रमणी त्वमेव ।
After 67 R. ins.:
अस्त्राणि शस्त्राणि च ते स्वरूपम् ।
शास्त्राणि नानार्थमतोन्नतानि ॥
कीर्तिस्त्वमेव सुमतिः कुमतिस्त्वमेव ।
मात प्रसीद.... ।
[68] R. cm. 68-74.
[75] d. R. प्रादुर्बभूव पुरतः करुणार्द्रचित्ता ।
[76] a. R. परमतामस (for निभृत*)
[77] d. R. युद्धेन तेप्यलमनेन विकल्पितेन ।
[78] R. आकर्ण्य वाक्यमिदमाशु जनार्दनेन संयाचितौ मृत्युपथाय भूयः ।
तावूचतुस्तोयविहीनभूमावावां जहि त्वं मधुकैटभारे ॥
[79] a. R. स्वके (for ततः)
[80] a. R. प्रभविष्णुतां हृदि (for *विष्णुतामथ)
c. R. प्रकामोत्सवाः (for *मक्षणाः)d. R. बध्वा हस्तसरोरुहावलिमथो नानाप्रणामानपि।

अध्याय ३
[1] b. R. मन्त्रं सर्वोत्तमोत्तमम् । -After R. ins.:
यं जप्त्वा साधकश्रेष्ठो व्रजेत्सिद्धिमनुत्तमाम् ।
-R. omits 1c-5d.

[6] For 6 R. subst.:

ब्रह्मवह्निसमारूढ: कलायुक्चन्द्रशेखर: ।
बीजमेतन्मनोहारि पठेदादौ त्रिवारत: ।।

[7] a. R. व्योमरक्षणयुक् (for हरं सरक्षणं)

cd. R. बीजयुग्मभिदं प्रोक्तं भुक्तिमुक्तिफलप्रदम् ।

[8] a. R. शूलीत्रिवेदीमारूढो ।

cd. R. यो द्विर्जपति सिद्धानां पारग: सुभगो भवेत् ।

[11] R. cm. 11 ab.

[12] R. cm. 12 ab and reads 12 cd after 10.

[13] c. R. धनदामापद (for नाथत्वं)

[14] b: R. लोकवन्दित: (for लोकित:)

[15] cd. R. ईशान्यत्बमथेशान्यामन्वभूद्गिरिजापति: ।

R. cm. 15 c-16 b.

[17] d. R. अगमद् (for प्रपेदे)

[20] c. R. अनन्तविघ्न (for अपार*)

[21] cd. R. वेधास्त्रिलोकी निर्माणं चक्रे समुदितोद्यम: ।

-After 21 R. ins.:

प्रभञ्जन: प्रबलतां भेजेऽखिलविभञ्जने ।

[22] R. cm. 22 c-23 d.

[24] a. R. –संयुक्तो (for सम्पूर्णो) -c. R. आजघान (for आचकर्त)

[25] a. R. महाक्रमं (for प्रेङ्ख*) -cd. R. वव्रे कवीन्द्रपदवीं सुरासुरकदम्बके ।

[27] a. R. प्रेष्ठोक्रतो (for प्रेष्ठक्रतु) र्वशिष्ठोऽपि -cd. R. बभञ्ज जनयन्हर्ष प्रकर्षं शिष्यमण्डले।

[29] d. R. समुज्ज्वल: (for स्फुरद्भिम:)

[30] cd. R. समस्तदेवजनतास्थानतां समनुग्रहीत् ।

[31] d. R. चावृणोत् (for उपाव्रजत्)

[3] d. R. तेजो (for जैतृ). d. R. वहन् किमपि सर्वदा ।

-After 33 R. ins.:

इत्थं समस्तं माहात्म्यं मैन्त्रस्य परिदर्शितम् ।

[34] R. cm. 34.

[35] b. R. वच्मि चारु समासत: । -R. cm. 35 c-36 d.

[37] d. R. पूजायन्त्रं समीरितम् । -R. cm. 38.

[39] for 39 R. subst.:

पीठपूजां विधायादौ तत आवरणार्चनम् ।
प्रकुर्यात्साधक: श्रेष्ठ: सम्पदामालयो भवेत् ।।

[41] For 41 R. subst.:

पीठशक्तीरिमा: ख्याता महावरणदेवता: ।
समासेन प्रवक्ष्यामि साङ्गावरणपूर्विकाम् ।।



-After 41 R. ins.:

महाप्रेतं शिवं ध्यात्वा हृदये तस्य सुस्थिरा ।

[42] ab. R. महाकालरतां वेशवशां युक्तां शिवागणै: ।

-R. cm. 42 c-43 b.

[43] cd. R. स्मृत्वा पुष्पाञ्जलिं दत्वा मूलमन्त्रेण साधक: ।

[44] ab. R. आरभ्य पूर्वमङ्गानि षडस्त्रे परिपूजयेत् ।

-d. R. विरोचिनीं (for * धिनीम्)

[45] b. R. शक्तिर्न वाचयेत् । -d. R. नीलां पश्याप्रनामपि ।

-b. R. प्रपूजयेत् (for अपि क्रमात्) ।

[46] b. R. ब्राह्मीं नारायणीमथ । -cd. माहेश्वरीं च चामुण्डां कौमारीमपराजिताम् ।

[47] R. cm. 47 ab. -d. R. भूपुरेऽथार्चयेत्सुधी: ।

[48] R. cm. 48 ab.

[49] R. cm. 49-66.

अध्याय ४

[1] ab. R. इत्थं मया कालिकाया: कथितं मन्त्रतन्त्रयो: ।

[2] after 2 ab. R. ins.:

नाना तपोवनाकीर्णा नानामुनिसमाकुला ।
अनेकतीर्थैर्निचिता महापुण्यफलप्रदै: । -R. cm. 2 cd.

[3] a. R. हंसकारोद्यानकीर्णै: =-After 3 ab R. ins.:

हंसै: परमहंसैश्च वालखिल्यै: समावृता ।
गतद्वेषैरभिवृता सिंहव्याघ्रमृगादिभि: ।।
-R. cm. 3 c-7 d.

[8] b. R. जनमण्डलभासुरा । -d. R. नानापुष्पलताकुला ।

[10] After 10 R. reads 12.

[11] R. cm. 11.

[12] c. R. कदम्ब: (म्बै:)कर्णिकारैश्च । -After 12 R. ins.:

करकैर्बदरीवृन्दै: करीरैश्चारुपीलुकै: ।
वधुलैश्चन्दनै रक्तचन्दनै: कृष्ट(ष्ण)चन्दनै: ।
वानस्पत्यैरनेकैश्च वनस्पतिगणैरपि ।।

[13] R. cm. 13-15.

[16] R. cm. 16 c-17 b.

[18] After 18 ab R. inserts:

तेजसा भानुसदृशश्चतुर्मुख इवापर: ।

c. R. वेदान्वदन् (for पठन्वेदान्)

[19] c. R. दोषमरणं (for * दमनं)

[20] b. R. धृतव्रत: (for शुचिस्मित:) -d. R. वानार्यसम्मत: (for * पूजित:)

[21] R. cm. 21 ab.

[22] R. cm. 22 cd.
[23] a. R. साधूनां (for सद्भक्तस्) -b. R. सम्मतः सुजनप्रियः ।
d. R. निःसङ्गो निर्ममः कृती ।
[24] ab. R. निर्वाणपदवीमिच्छन्बद्धपद्मासनः सुधीः ।
[25] R. cm. 25 ab. For 25 cd. R. ins.:
शुक्लाम्बरधरः शुक्लचन्दनेनानुलेपितः ।
[26] R. cm. 26 ab. -d. R. समनुचिन्तयन् (for * भावयन्)
-After 26, R. ins.:
कृपाकटाक्षविभवैरुद्धरन् शिष्यमण्डलम् ।
[27] R. cm. 27 ab.
[28] ab. R. भ्रमन्गुरुस्वरूपेण जगत्यां सत्यसंश्रयः ।
R. cm. 28 c-29 b.
[29] d. R. सत्यवाक्यपरायणः ।
[32] b. R. सत्पक्षोभव्यलक्षणः । -R. cm. 32 cd.
[33] R. cm. 33 c-34 d.
[35] d. R. सिद्धिसम्मतः (for * सम्पदा) -After 35 R. ins.:
अनन्तपुण्यफलदचरितव्रतमण्डलः ।
[37] R. cm. 37 ab. -d. R. वहन्विगतसाध्वसः)
[38] R. cm. 38.
[39] a. R. पिशङ्गचारुविलसज् । -d. R. मितहासो (for * मार्गो)
[40] ab. R. मितश्रमि(मी)र्मिताकाङ्क्षी मिततृट्(ण्) मिततोषभृत् ।
[41] a. R. किञ्चिद् भ्रूभङ्गविक्षेप [29] -d. R. बाललीलां समावहत् ।
[42] d. R. दृङ्मार्गाद्वनितां हरन् ।
[43] R. cm. 43 cd.
[44] After 44 ab R. ins.:
महानिर्वाणपदवीं भृगयन्निजलीलया ।
-d. R. लयपण्डितः (for मुक्तिवल्लभः)
[45] b. R. चित्तपावनः (for कोङ्कणोद्भवः) R. cm. 45 cd.
[46] d. R. समुपस्थितः (for * पाययौ)
[47] R. cm. 47 a-49 b.
[49] c. R. गुरुत्वेनाशु तं (for * नाश्रुतं)
[50] ab. R. शिष्यत्वेनाथ सोप्येनमग्रहीद्रम्यविग्रहे । -R. cm. 50 cd.
[51] a. R. शुभग्रहैः परिवृते
[52] R. cm. 52 a-58 b.
[58] cd. R. वास्तुपूजनं च (for अथो वास्तुपूजां)
[60] b. R. कुलाद्रोन्तुरगाधिपान् । -c. R. विधीन् (for निधीन्)
[61] a. R. अभिवन्द्य (for * वाद्य) -b. R. वन्दुकं (for बटुकं) -c. R. नरेशान् (for नरेन्द्रान्)



[62] ab. R. अध्वषट्कं विशोध्याशु स सिद्धः सिद्धसम्मतः ।
[64] cd. R. शिवस्य स्वीयशिष्यत्वदीक्षाषट्कं विधाय च ।
[65] R. cm. 65.
[66] b. R. सत्तमां पर्यकल्पयत् । -R. cm. 66 c-69 b.
[69] cd. R. पूर्वाम्नायमथोच्चार्य पूर्वकुम्भैः सुशोभनैः ।
[70] R. cm. 70 ab.
[71] b. R. दक्षिणाम्नायमुत्तमम् । -d. R. इवापरः (for इव ज्वलन्)
[72] For 72 R. subst.:
पाश्चिमान्कलशान्गृह्य पश्चिमाम्नायजान्मनून् ।
अभिषिञ्चन्नकथयत्तथा रैवतको यथा ॥
[73] R. cm. 73-82
[83] 1 b. R. वदन (for जगुः) -d. R. शिववन्निजगाद सः ।
[84] R. cm. 84.
अतः सुतार्थं राजेन्द्र चिन्तां मा कुरु कर्हिचित्
[87] a. R. आद्यन्तद्रा(द्वा)रनाथार्ण(र्णं)-cd. R. शिष्यस्य कल्पयामास स सिद्धो नाम सम्प्रमात्।
[89] cd. R. तोषयामास विधिवत्तस्य प्रियतमान्परान् ।
[90] For 90 R. subst.:
प्रगल्भोदारसेवाभिराराध्यगुरुमादरात् ।
अलभच्छिवयोगी स सिद्धिं कामपि सुव्रतः ॥
[91] c. R. किञ्चिज् (for चित्रं)
[92] a. R. ज्ञात्वा (for पश्यन्)
[94] R. cm. 94 bcd.
[95] a. R. विद्योतद्ब्रह्मिवर्चाः (for * ब्रह्मवर्चाः)
After 95 R. inserts:
मदाज्ञया त्रिपुरजित् तव पुत्रो भविष्यति ।
भूभारस्यापि संहारं करिष्यति न संशयः ॥ ७५
तारयिष्यति भूदेवान् दुःखपङ्कादतन्द्रितः ।
मर्दयिष्यति दुष्टौघान् निर्जरान्स्थापयिष्यति ॥ ७६
रक्षयिष्यति धेनूनां गणान् यवनहस्ततः ।
श्रीकृष्ण इव तेजस्वी वधूरानन्दयिष्यति ॥ ७७
संस्थापयिष्यति मुदा धर्मं शर्मसमन्वितः ।
आह्लादयिष्यति धनैः कुरकोङ्कणजान्नरान् ॥ ७८
धुरन्धरान्राजकृत्ये नवीनान्कल्पयिष्यति ।
स्वपूजायां बताभक्तिं धरिष्यति न संशयः ॥ ७९
सौरान् शाक्तान् गाणपत्यान् शैवानावर्जयिष्यति ।
अर्चनं बालकृष्णस्य प्रेम्णा परिकरिष्यति ॥ ८०

ताम्रैः साम महामायो बहुकालं चरिष्यति ।
आचरिष्यति सौम्यः सन्नेकच्छत्राधिपत्यताम् ॥ ८१
निरन्तरं वनेऽतीव पापर्घ्यर्थमटिष्यति ।
स्वमतेनैव सर्वाणि कार्याण्याकल्पयिष्यति ॥ ८२
महानन्दभराविष्टः सदैव विहरिष्यति ।
वारयिष्यत्यरिष्टानि दूरादेव गतस्पृहः ॥ ८३

***



# प्रकरण ८

## पुत्रकामेष्टी -

मूळ संहितेतील विभाग ५ – अध्याय १ व २ – पुत्रकामेष्टीची तयारी आणि पूर्तता – श्लोक १–७७ आणि १–८७, अध्याय ३ – विष्णुस्तुती – श्लोक १–६०, अध्याय ४ – कालीचे स्वप्नात दर्शन – श्लोक १–८, यज्ञविधी – श्लोक ९–४३, संभाजीराजांचे रूपवर्णन, शौर्यवर्णन – श्लोक ४४–५३, अध्याय ५ – येसूबाई (राजसबाई) चे डोहाळे – श्लोक १–५७, सूतिकागृह व्यवस्था – श्लोक ५८–६४, शाहूजन्म – श्लोक ६५–६८, बालकाचे वर्णन – श्लोक ६९–७५, आनंदोत्सव – श्लोक ७६–८४.

## पुत्रकामेष्टीची तयारी आणि पूर्तता - अध्याय १

कवीन्द्र उवाच । समाकर्ण्य नृपश्रेष्ठः शिवयोगिप्रभाषितम् । ऋत्विग्वरैर्मन्त्रिमुख्यैः प्रधानैरनुमोदितः ॥ १ कर्तुं पुत्रेष्टिमुद्युक्तस्त्वरावान्शम्भुभूपतिः । आज्ञापयामास तदा सेवकानाशुकारिणः ॥ २ आचार्यः सम्भृताश्चर्यवाक्प्रपञ्चो विचक्षणैः । प्रष्टव्यो यज्ञसामग्री केन का क्रियतामिति ॥ ३ कथयिष्यति शास्त्रोक्तरीत्या यान् स पुरोहितः । सम्भारान् यज्ञियांस्तांस्तानानयध्वमितस्ततः ॥ ४ वापीकूपतटाकाब्धिनदीनदजलान्यलम् । आहर्तव्यानि चतुरैर्मनोमारुतरंहसा ॥ ५ इत्यादिश्य तथैवान्यान् सेवकान् व्यादिशन्नृपः । आहूयतां द्विजश्रेष्ठा बंहिष्ठगुणमण्डिताः ॥ ७ शिल्पविद्यासु निष्णातान् शिल्पिनोऽनल्पलाघवान् । आनयध्वं समाहूय परीक्ष्य मतिविभ्रमैः ॥ ८ इत्थं नरेन्द्रसन्दिष्टास्त्वरया वाक्यकारिणः । कर्तुं कार्याण्यशेषाणि जग्मुर्हर्षपरिप्लुताः ॥ ९ देशान् ग्रामान् पत्तनानि नगराण्याश्रमानपि । गत्वा समाह्वयामासुर्विप्रेन्द्रान् शम्भुसेवकाः ॥ १० प्रथां स्वलीलाविभवैर्हरत्नो विश्वकर्मणः । आकारिताः शिल्पिमुख्याः प्रगल्भैः शम्भुसेवकैः ॥ ११ निशम्य कारणं सर्वे विप्राः सिद्धाश्च शिल्पिनः । पुत्रैः पौत्रैः परिवृताः शिष्यैश्च विधृतक्षणैः ॥ १२ श्वेतोष्णीषा लसच्छ्वेतकञ्चुकाः श्वेतवाससः । द्योतद्गन्धाक्षता भाले समागच्छन्मुदान्विताः ॥ १३ अथो दिगन्तादायाता ब्राह्मणाः शास्त्रपारगाः । दत्वा फलं राजहस्ते निगद्य बहु भावुकम् ॥ १४ आदिष्टेषु नरेन्द्रेण पीठेषु विविशुस्ततः । सम्पृष्टाः कुशलप्रश्नैः पाद्याद्यैरुपचारकैः ॥ १५ प्रपूजिताः सप्रणयं साष्टाङ्गमभिवन्दिताः । सर्वे सुमनसोऽभूवन् द्विजेन्द्राः शास्त्रपारगाः ॥ १६ ज्ञात्वा तुष्टान् द्विजज्येष्ठान्निष्ठावान् शम्भुभूपतिः । नत्वा निवेदयाञ्चक्रे स्वकं कार्यमशेषतः ॥ १७

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, शिवयोग्याने सांगितलेले ऐकल्यावर नृपश्रेष्ठ शंभूराजांना ऋत्विग्वर, मुख्यमंत्री, प्रधान यांनी अनुमोदन दिले. शंभूराजे पुत्रेष्टि करण्यास तयार होऊन त्यांनी लगेच आपल्या हुशार सेवकांना सूचना दिल्या. आचार्यांना या भाषणाचे आश्चर्य वाटेल; परंतु विचक्षणाने त्यांना यज्ञसामग्री कोणती आणि कोणी तयार करायची हे विचारावे. शास्त्रात सांगितल्याप्रमाणे यज्ञासाठी जे जे लागेल ती सर्व सामग्री पुरोहित सांगतील, ती इकडून तिकडून आणावी. विहीर, कूप, सरोवर, सागर, नदी, नद यातून भरपूर प्रमाणात चतुराईने व वायुवेगाने आणावे. याप्रमाणे आदेश देऊन अन्य

सेवकांनाही सूचना दिल्या. अतिशय गुणी अशा श्रेष्ठ ब्राह्मणांना बोलवा. शिल्पविद्येत निष्णात असलेल्या अत्यंत कुशल अशा कारागिरांना परीक्षा घेऊन बोलवा. याप्रमाणे राजाने संदेश दिल्यावर सेवक अतिशय आनंदाने सर्व कामे करण्यासाठी गेले. शंभूराजांचे सेवक वेगवेगळ्या देशांत, गावांत, पत्तनांत, नगरांत, आश्रमांत जाऊन त्यांनी उत्तम ब्राह्मणांना निमंत्रण दिले. आपल्या पराक्रमाने आणि वैभवाने विश्वकर्म्याच्या कसबाला मागे सारणाऱ्या मुख्य मुख्य कलावंतांना शंभूराजांच्या ज्येष्ठ सेवकांनी बोलाविले. त्याचे कारण ऐकल्यावर सर्व ब्राह्मण, सिद्ध, शिल्पी, पुत्रपौत्र, शिष्यांसह निमंत्रण स्वीकारून पांढऱ्या पगड्या घालून, पांढरे अंगरखे व इतर पांढरी वस्त्रे घालून दर्शनीय असे होऊन कपाळ गंधाक्षतांनी आकर्षक करून आनंदाने आले. सर्व दिशांनी शास्त्र पारंगत ब्राह्मण येऊन राजाच्या हातावर फळ ठेवून भावनावशतेने बरेच बोलून राजाने दाखविलेल्या आसनावर बसले. कुशल प्रश्न विचारून पाद्यादी उपचारांनी सत्कार करून त्यांना प्रेमाने साष्टांग नमस्कार केला. ते सर्व शास्त्रपारंगत ब्राह्मण प्रसन्न झाले. द्विजश्रेष्ठ संतुष्ट झालेले जाणून श्रद्धावान शंभूराजांनी आपले कार्य सविस्तर हात जोडून निवेदन केले.

शम्भुराज उवाच । पठितानि च शास्त्राणि श्रुतानि च पुनः पुनः । पुराणानि प्रदत्तानि दानानि विविधानि च ।। १८ विजिताः शत्रवः सर्वे बान्धवाः परिलालिताः । संवर्धितानि मित्राणि सुहृदः परिपालिताः ।। १९ कवीन्द्राणां महाकाव्यालापानमृतहारिणः । आकर्ण्य लक्षशः स्वर्णभारा दत्ता गजा हयाः ।। २० यज्ञाः कृता बहुविधा दक्षिणाभिरलङ्कृताः । आराधिता दत्तवरा कालीकालाङ्कसंस्थिता ।। २१ आसेविताश्च गुरवः पितरावपि पूजितौ । इदानीं कर्तुमुद्युक्तः पुत्रेष्टिं स्वेष्टदायिनीम् ।। २२ नानादेशपरिप्राप्ता ब्राह्मणाश्चरितव्रताः । कुरुध्वमुरुसाहाय्यं वचसा मनसाऽधुना ।। २३ एकाग्रमनसो भूत्वा परीक्षत धरातलम् । शिल्पिमुख्यान् पुरस्कृत्य मापयध्वं प्रमाणतः ।। २४ इत्थं द्विजनुषः सर्वे व्यादिष्टाः शिवसूनुना । पपरीक्षुर्ममापुश्च (परीक्ष्य मापयामासुः) शास्त्रतो यज्ञभूमिकाम् ।। २५ अनन्तायां मापितायां दिष्टे दिष्टज्ञसूचिते । नवाः कल्पचमत्काराः शिल्पिनो मृष्टकुण्डलाः ।। २६ वहन्तः क्षितिपस्याज्ञां शिरसा नवमाल्यवत् । प्रसन्नमनसः सर्वे पारितोषिकतर्षुलाः ।। २७ चतुर्द्वारविशोभाढ्यं चारुस्तम्भविराजितम् । देवदारुमयैर्दारुचयैरुपरिसाधितम् ।। २८ नीलैर्हरिन्मणिदलैराच्छादितमनेकधा । अतिशीतलया शश्वच्छायया परिलक्षितम् ।। २९ समानचत्वरप्रान्तोच्छलत्पानीययन्त्रकम् । इतस्ततो विरचितजलकुण्डकदम्बकम् ।। ३० पुरतः परमोदारसभया परिमण्डितम् । समभूमिभिराक्रान्तं प्रशस्तगुणगह्वरम् ।। ३१ बहिः प्रखेलत्पानीयप्रणालीभिर्मनोहरम् । मण्डपं-रचयामासुर्लोकलोचनतस्करम् ।। ३२ घटिते मण्डपे विप्राः सम्भ्रमाच्छम्भुभूमिपम् । गत्वा पठित्वा कल्याणं श्लक्ष्णं वचनमब्रुवन् ।। ३३ शिवात्मज महाराज शम्भो शम्भुकृपाङ्कुर । एकचित्ताग्रतां गत्वाऽस्मदीयं वचनं शृणु ।। ३४

अर्थ – शंभूराजे म्हणाले, ''शास्त्रे वाचली, पुराणे पुनःपुन्हा ऐकली, विविध दाने दिली, सर्व शत्रूंना जिंकले, नातलगांचे कौतुक केले, मित्रांची भरभराट केली, सुहृदांचे रक्षण केले. कवीन्द्रांची अमृताला मागे टाकणारी महाकाव्याची भाषणे ऐकून लक्षांनी सुवर्णभार (भाराभर सोने) आणि हत्ती-घोडे दिले. दक्षिणांनी शोभणारे अनेकविध यज्ञ केले. काळाच्या मांडीवर बसलेल्या कालीची आराधना केल्यावर तिने वरही दिले. गुरूंची सेवा केली, आई-वडिलांचा सत्कार केला. आता अभीष्ट देणारी पुत्रेष्टी करण्याचा बेत आहे. नाना देशांतून आपण आला आहात. मनाने आणि



वाणीने आपण मोठे साहाय्य करावे, एकाग्र चित्ताने भूमीची परीक्षा करावी. मुख्य मुख्य शिल्पकारांना पुढे आणून भूमीचे मापन करावे.'' याप्रमाणे शिवपुत्राने त्या सर्व ब्राह्मणांना सूचना दिल्या व भूमीची परीक्षा करून यज्ञभूमीचे शास्त्राप्रमाणे मापन केले. भूमीचे मापन झाल्यावर शास्त्रोक्त वेळेवर राजाची आज्ञा शिरसावंद्य मानून शिल्पकारांनी अनेक नवीन कल्पनांचे चमत्कार करून कुंडले स्वच्छ केली आणि प्रसन्न मनाने सर्व पारितोषिकांची ते इच्छा करू लागले. चारही द्वारे विशेष सुशोभित केली. सुंदर खांब त्यावर लावले. देवदाराच्या लाकडांनी वरची बाजू सुशोभित केली. निळ्या आणि हिरव्या रंगाच्या मण्यांनी विशेष प्रकारे आच्छादन टाकले. अतिशय शीतल आणि भरपूर प्रकाश आणला. चौकाच्या चारही बाजूंना कारंजी उडू लागली. सर्व बाजूंना जलकुंडे तयार झाली. समोर बऱ्याच दालनांनी मंडित झालेले समभूमीवर प्रशस्त, डोळे दीपवणारे मंडप तयार करून ते बाहेरून येणाऱ्या खळाळणाऱ्या पाण्याच्या पन्हाळीने मनोहर बनविले. मंडप तयार झाल्यावर ब्राह्मण गडबडीने शंभूराजांकडे जाऊन कल्याणकारी आशीर्वाद देऊन म्हणाले, हे शिवपुत्रा, शंभूकृपांकुरा, शंभूमहाराज ! मन एकाग्र करून आमचे बोलणे ऐकावे.

ब्राह्मणा ऊचुः । परीक्षिता महोपायैर्गतापायैर्वसुन्धरा । पुत्रेष्टिः फलदा यस्यां भूयात्प्रभ्रष्टसंशया ।। ३५ सिद्धिप्रदानि चिह्नानि वीक्षितान्यथ कानिचित् । गावः सवत्साः पुरतो बालानां शुभभाषितम् ।। ३६ सुवासिन्यः कुमार्यश्च ब्राह्मणाः पुष्पहस्तकाः । भारद्वाजादिकाः पुण्याः पक्षिणश्च समीक्षिताः ।। ३७ विश्वस्ता स्वैरिणी काचिल्लक्षिता भव्यशंसिनी । आयान्ती रूपलहरी दृष्टा वारविलासिनी ।। ३८ विरुतानि मनोज्ञानि श्रुतानि शुभपक्षिणाम् । अस्थिखर्परपाषाणरहिता मिलिता धरा ।। ३९ शोधने मुनिभिर्यादृक्पुराणैः परिवर्णिता । यथा पङ्क्तिरथंस्यासीद्यज्ञे प्राज्ञजनप्रिया ।। ४० सिद्धिः सिद्धिः सिद्धिरिति देवदूतेन भाषिता । श्रुतान्तरिक्षादस्माभिः साक्षादिव सरस्वती ।। ४१ देवदुन्दुभिनिर्घोषो विश्रुतो गगनान्तरे । निरीक्षिता पुष्पवृष्टिः पतन्ती व्योममण्डपात् ।। आकर्णितं कम्रागं गीतं गन्धर्वकल्पितम् । इत्यादिभिर्भव्यचिह्नैः सिद्धिर्हस्ततलागता ।। ४२ गिरिजायाः प्रसादेन ब्राह्मणानां विशेषतः । अवेहि शम्भुराजेन्द्र त्वमस्मान्सत्यवादिनः ।। ४३

अर्थ – ब्राह्मण म्हणाले, ''सुरक्षित अशा अनेक उपायांनी वसुंधरेची परीक्षा झाली आहे. निःसंशय तिच्या ठिकाणी पुत्रेष्टी फलदायी होईल. काही सिद्धिसूचक चिन्हे आमच्या पाहण्यात आली. समोर सवत्स गाय दिसली. लहान बाळाचे शुभ भाषण ऐकले. सुवासिनी-कुमारी-ब्राह्मण हातात फुले असलेले दिसले, भारद्वाजासारखे शुभपक्षी पाहण्यात आले. विश्वासयोग्य अशी स्वैरिणीदेखील चांगले भाकीत सूचित करणारी असल्याचे लक्षात आले. रूपाचे तरंगच अशी वारविलासिनी येताना दिसली, शुभपक्ष्यांचे मनाला रिझवणारे कूजन ऐकले. पृथ्वीवर कोणतीही हाडे, खापरे, पाषाण अशा वस्तू नव्हत्या. मुनींनी केलेल्या पुराणातील संशोधनाप्रमाणे यज्ञ हा विद्वानांना प्रिय असलेला जणू रथ होता. देवदूताने उच्चारलेली जणू साक्षात सरस्वतीच अशा वाणीतून सिद्धी-सिद्धी-सिद्धी असे शब्द अंतरिक्षातून त्रिवार ऐकू आले. देवांच्या नगाऱ्याचा घोष आकाशातून ऐकू आला आणि आकाशरूपी मंडपातून पुष्पवृष्टी होत असलेली आम्ही पाहिली. गंधर्वांनी म्हटलेले मधुर रागातील गीतही ऐकले. अशाप्रकारच्या शुभ चिन्हांनी सिद्धी तळहातावर आलेली आहे. गिरिजेच्या प्रसादाने आणि विशेषतः ब्राह्मणांच्या आशीर्वादाने हे सर्वकाही झाले. हे शंभूराजा, आम्ही सत्यवादी आहोत असे जाण.''

कवीन्द्र उवाच । निशम्य वचनं तेषां विप्राणां नृपनायकः । सत्पुत्रसम्भवाकाङ्क्षी हर्षोत्कर्षमुपागमत् ।। ४४ निजगाद वचः किञ्चिद्भूरिभावार्थसम्भृतम् । वशिष्ठादीन् मुनिवरानजो रघुसुतो यथा ।। ४५

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, राजाने ब्राह्मणाचे ते भाषण ऐकून त्याला सत्पुत्राच्या जन्माच्या अपेक्षेने परम हर्ष झाला. रघूचा मुलगा अज वसिष्ठादी मुनिवरांना ज्याप्रकारे बोलला, तसेच अत्यंत सार्थ असे भाषण तो करू लागला.

शम्भुराज उवाच । यद्भवद्भिर्निगदितं तत्तथैव भविष्यति । इत्थं सम्भाष्य सोत्कर्षं राजा विश्वम्भरामरान् ।। ४६ पूजयामास विधिवद्दानमानासनादिभिः । आभूषणैः स्वर्णमणि-घटितैरम्बरैरपि ।। ४७ एतस्मिन्नन्तरे सर्वे शिल्पिनोनल्पबुद्धयः । महाध्वजं महोच्छ्रायं परितो बद्धतोरणम् ।। ४८ कुण्डैर्यथोक्तैरावीतं स्थण्डिलैर्विततैरपि । वेदिकाभिः परिवृतं तुङ्गोटजविराजितम् ।। ४९ अत्यर्थं शोधितानन्तं दशकिष्कु प्रमाणतः । रञ्जितं रङ्गवल्लीभिः शोभनीभिरितस्ततः ।। ५० आबद्धकाण्डपटकं चारुचन्द्रकमण्डितम् । रक्तकम्बलसम्वीत-स्तम्भमण्डलभासुरम् ।। ५१ मुक्तामणिमयैर्गुच्छैराचितान्तरमन्तरा । अन्तर्धानपटैर्बद्धै रुचिरैः समलङ्कृतम् ।। ५२ हीरमुक्ताकल्पिताभिर्जालिकाभिः समावृतम् । द्योतत्फलभराक्रान्त-कदलीस्तम्भसम्भृतम् ।।५३ इक्षुभिर्बहुभिर्बद्धैर्वहन्तं श्रियमुन्नताम् । फलैर्ललद्भिरुपरि विभान्तं रुचिपूरितैः ।।५४ सौवर्णैरथ दौर्वर्णैस्ताम्रपित्तलनिर्मितैः । द्वारोपान्तेषु विन्यस्तैः पूर्णकुम्भैः परिप्लुतम् ।। ५५ पुन्नागमल्लिकाजातीपुष्पमालाविभूषितम् । निबद्धाभिर्मञ्जरीभिर्जन-मानसरञ्जकम् ।। ५६ प्रवालकान्तिरिपुभिः कोमलैर्नवपल्लवैः । विद्योतमानमाबद्धैस्त्रि-जगन्मोहनक्षमम् ।। ५७ कृतं निवेदयामासुर्मण्डपं विनयान्विताः । नत्वा पादाब्जयुगले भूपायामिततेजसे ।। ५८

अर्थ – शंभूराजे म्हणाले, 'आपण सांगितलेत तसेच होणार आहे' असे म्हणून राजाने आपल्या वैभवाला साजेशी विश्वंभरादिक ब्राह्मणांची दान-मान-आसन देऊन पूजा केली. सोने-रत्ने-वस्त्रे इत्यादीसह आभूषणे दिली. तेवढ्यात बुद्धिमान शिल्पकारांनी ध्वज उंच उभारला आणि त्याला बाजूने तोरणे बांधली. योग्य प्रकारे कुंडे विस्तृत अशी स्थंडिले आणि वेदिका, तसेच सभोवती उंच असे आश्रम तयार झाले. त्यामुळे एक शोभा निर्माण झाली. दहा किष्कू याप्रमाणात सुंदर रांगोळ्या काढल्या, पडदे लावले. सुंदर चंद्राकृतींनी शोभा वाढविली. लाल कांबळ्यांनी झाकून खांब दर्शनीय केले. मोत्यांच्या गुच्छांनी मधूनच ते भरले. झाकायची सुंदर वस्त्रे गुंडाळून ते आलंकृत केले. हिरे-मोत्यांच्या जाळ्यांनी ते जोडले, मनोवेधक फळांनी लगडलेल्या केळीच्या खांबांनी पूर्णता आणली. पुष्कळशा उसाच्या कांडांनी मोठे वैभव सूचित केले, वर लगडलेली आवडीची फळे टाकून बहार आणली. सुवर्णाच्या, तांब्याच्या आणि पितळ्याच्या दाराजवळ ठेवलेल्या पूर्ण कुंभांनी जागा भरून गेली. पुन्नाग, मल्लिका, जाती यांच्या फुलांच्या माळांनी सुशोभित केले. त्यात गुंफलेल्या मंजिऱ्यांनी लोकांची मने आकर्षून घेतली. तसेच प्रवाळाच्या रंगाने, कोवळ्या नवपल्लवांनी तिन्ही जगांना मोहित करण्यासारखी त्यास चकाकी आणली. (इतके झाल्यावर) विनयाने आपल्या तेजस्वी राजाच्या चरणकमलाला वंदन करून मंडपाची तयारी पूर्ण झाल्याचे सांगितले.

शिल्पिप्रजल्पितेऽनल्पचमत्कृतिविकल्पके । इत्थं श्रुते नरेन्द्रेण प्रदत्ता धनराशयः ।।५९ पारितोषिकमालभ्य ननामुः (नेमुस्ते) शम्भुभूमिपम् । शिल्पिनः स्वकरौ बध्वा वारंवारं



मुदान्विताः ।। ६० याज्ञियानथ सम्भारान्समस्तानाशुकारिणः । परिगृह्य समाजग्मुः सर्वौषधिविमिश्रितान् ।। ६१

अर्थ – कारागिरांनी सांगितलेल्या बऱ्याच कृती अशाप्रकारे ऐकल्यावर राजाने बरेच धन दिले. पारितोषिक मिळताच शंभूराजांना ते शिल्पकार आनंदाने वारंवार हात जोडून प्रणाम करू लागले. सर्व यज्ञोपयोगी औषधीमिश्रित सामग्री ते घेऊन आले.

आनयित्वा (आनाय्य च) समस्तेभ्यस्तीर्थेभ्यः पावनं वनम् । ववन्दुर्भूपचरणावथो केचन सेवकाः ।। ६२ पुत्रजीवेन्धनव्रातं पुत्रोत्पत्तिफलप्रदम् । विचेत्यान्ये महाप्रेष्या आययुः कार्यसाधकाः ।। ६३ यद्यत्समभवत्सर्वं याज्ञियं वस्तु भूतले । स्वीयैरनुचरैस्तत्तदानीतं वीक्ष्य भूपतिः ।। ६४ मिलितान् ब्राह्मणोत्तंसान् मण्डपञ्च प्रकल्पितम् । विशिष्टदिष्टं दैवज्ञदिष्टं दिष्टमुपस्थितम् ।। ६५ आहूय चारान् चतुराननचातुर्यहारिणः । निमन्त्रणाय भूपानां प्रेषयामास सत्वरः ।। ६६ आहूताः शम्भुराजेन राजानः पृथुविक्रमाः । दिदृक्षमाणाः पुत्रेष्टिं समाजग्मुः स्वदेशतः ।। ६७

अर्थ – काही सेवक सर्व तीर्थांचे पवित्र पाणी आणून राजाचे चरण वंदू लागले. पुत्रोत्पत्तीफल प्राप्तीसाठी सर्व प्रकारची तयारी करणारे असे मोठे दूत आले. जी जी वस्तू या भूतलावर यज्ञाला लागणारी आहे, ती ती सर्व आपल्या अनुचरांकरवी आणलेली पाहून जमलेले सर्व श्रेष्ठ ब्राह्मण, तयार झालेला मंडप, ज्योतिषाने सांगितलेल्या विशिष्ट मुहूर्ताची वेळ झाल्याचे पाहून राजाने ब्रह्मदेवाचे चातुर्य हरण करण्याऱ्या हेरांना बोलावून त्वरेने राजांच्या निमंत्रणासाठी रवाना केले. शंभूराजांनी बोलाविलेले मोठे पराक्रमी राजे आपापल्या देशांतून पुत्रेष्टी पाहण्यासाठी एकत्र आले.

वणिग्जना बहुविधा विविधान्वस्तुसञ्चयान् । विक्रयार्थमुपाजग्मुर्महानन्द-भरालसाः ।।६९ प्रशस्यलास्यलीलाभिर्भर्त्सयन्त्यः सुराङ्गनाः । पिककण्ठ्यः कम्बुकण्ठ्यो वारमुख्याः समाययुः ।। ७० हसन्तस्तुम्बरोर्गानं तथा विश्वावसोरपि । महोत्सवाय महते गायकाः शीघ्रमाययुः ।। ७१ विनोदका नटा मल्ला विटा भाण्डाः सुदूरतः । पुत्रेष्टिं परमोत्साहैरायाताः परिवीक्षितुम् ।। ७२ षड्ग्वन्धबधिरास्तत्र दीनाऽनाथगणाः परे । पाशैराशामयैर्बद्धा इवागत्य चकाशिरे ।। ७३ आयातेषु समस्तेषु विप्रभूमीश्वरादिषु । यथायोग्यान्निवासाय निलयानददन्नृपः ।। ७४ दत्वा निवासं सर्वेषां कृत्वार्चनमनन्तरम् । आह्लादयामास मुहुर्भोजनाच्छादनादिभिः ।। ७५ तत उदितरुचिर्नरेन्द्रचन्द्रो बुधवरविप्रपुरोहितानुवीतः । व्यरचयदतुलां व्रताधिवासं निजकुलमन्त्रिणि भारमांशु दत्वा ।। ७६ वादित्राणां निनादो गगनगिरिगुहाः पूरयन् दुन्दुभीनां घोषो भव्योक्तिशब्दः समधिकमभितः संस्थितानां प्रजानाम् । आलापो गायकानां ध्वनिरपि गणिकागीतजः प्रादुरासीत् क्षोणीन्द्रेणा-धिवासे सुतजननकरे कल्पितेऽनल्पभावैः ।। ७७

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरपरमानन्दात्मजदेवदत्तोद्भवगोविन्दकवीन्द्रप्रकाशितायां -शुभलक्षणलक्षितायां शिवपुराणान्तर्गतायां संहितायां यज्ञसामग्रीसमुपलब्ध्यधिवासो नाम अध्यायः ।

अर्थ – नानाप्रकारचे व्यापारी, विविध वस्तू मोठ्या आनंदाने विक्रीसाठी घेऊन आले. प्रशंसनीय नृत्यविलासाने अप्सरांना दूषण देत कोकिलकंठी, कंबुकंठी मुख्य वारांगना आल्या. तुंबरूच्या आणि विश्वावसूच्या गायनावरही वरताण करणारी गायकमंडळी मोठ्या महोत्सवासाठी

आनंदाने तातडीने आली. विनोदी नट, मल्ल, विट, वादक अत्यंत उत्साहाने दूरवरून पुत्रेष्टी पाहण्यासाठी आले. पंगू, आंधळे, बहिरे, दीन, अनाथ असे बरेच लोक आशेने आलेले दिसले. सर्व ब्राह्मण आणि राजे आल्यावर राजाने त्यांना यथायोग्य निवासस्थाने दिली. त्यानंतर त्यांचा सत्कार करून मेजवानी व वस्त्रे देऊन त्यांना समाधानी केले. नंतर तेजःपुंज झालेल्या या नरेशचंद्राने अत्यंत हुशार ब्राह्मण आणि पुरोहित यांच्या साहाय्याने आपल्या कुळाच्या मंत्र्यावर या व्रताच्या अनुषंगाने तुळा करण्याची जबाबदारी टाकून ती पूर्ण केली. वाद्यांचा घोष, नगाऱ्यांचा आकाश आणि गुहा भरून टाकणारा प्रचंड आवाज, बाजूला बसलेल्या लोकांचा आणखीनच गलका, गवयांचे आलाप, गणिकांच्या गीतांचे आवाज इत्यादींचा मोठ्या भक्तीने पुत्रेष्टीसाठी राजाच्या निवासस्थानी घोष होऊ लागला.

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदांचा मुलगा देवदत्त व त्याचा मुलगा गोविंद कवींद्र प्रकाशित शुभलक्षणयुक्त शिवपुराणातील संहितेतील 'यज्ञसामग्री उपलब्धी' नावाचा अध्याय.

अध्याय २

कवीन्द्र उवाच । कृत्वाधिवासं पुत्रेष्ट्याः सम्भ्रमेण सयीसुतः । द्वितीयदिवसे प्रातर्मङ्गलस्नानभासुरः ।। १ शुक्लवस्त्रावृतो विप्रपरीतः साधुमानितः । पुण्याहं वाचयित्वाशु गीतवादित्रनिस्वनैः ।। २ नान्दीमुखान् समाराध्य देवान् पितृगणानपि । आचार्यान् विनयान्नत्वा ध्यात्वा स्वाभीष्टदेवताम् ।। ३ योगिनीमण्डलं स्तुत्वा स्मृत्वा श्रीगुरुपादुकाम् । नित्यदानविधिं कृत्वा गृहीत्वा शिष्टसम्मतम् ।। ४ प्रार्थयित्वा सिद्धगणं मानयित्वा कुलाङ्गनाः । भावयित्वा कार्यसिद्धिं वर्जयित्वाऽहितं वचः ।। ५ उग्रत्वमखिलं हित्वा धुरं दत्वा स्वमन्त्रिणि । ऋत्विजां वरणं चक्रे राजा पङ्क्तिरथो यथा ।। ६ सदस्याश्चानुमन्तारो होतारः परिवीक्षकाः । उद्गातारश्च साक्षर्या वृतास्तेन चकाशिरे ।। ७ उत्तमेषूत्तमा मध्या मध्यमेषु निवेशिताः । नीचा नीचेषु कृत्येषु सत्कृत्य शिवसूनुना ।। ८ अधिकारो नरेन्द्रेण यस्य योऽभूत्समर्पितः । स तमेवाकरोत्तत्र गततन्द्रो गतालसः ।। ९ बालवृद्धातुरान्धानामनाथानां परिग्रहः । कारितोऽधिकृतानुक्त्वा सयीपुत्रेण धीमता ।। १० तुहिनाद्रिसमाकारा लघुशाल्यन्नराशयः । आसन् प्रकल्पितास्तत्र पुत्रेष्टिपरमोत्सवे ।। ११ एकवर्णगवां दुग्धैर्मुग्धैः समनुसाधितैः । पायसैः परिपूर्णानि भाण्डानि प्रचकाशिरे ।। १२ पोलिकानामपूपानां वटकानां महीधराः । शष्कुलीनां पूरिकाणां लड्डुकानां विरेजिरे ।। १३ नानापक्वान्नजातीनां भक्ष्याणां व्यञ्जनैः सह । पुञ्जाः पूतैर्नैस्तत्र पूगशः परिकल्पिताः ।। १४ गुडौदनानि चित्राणि कृशरान्नानि कानिचित् । समण्डाः फेणिकास्तत्र विबभुः पर्वतोपमाः ।। १५ घृतपक्वैस्तैलपक्वैर्मन्दाग्निपरिपाचितैः । पिष्टकैरभिसम्भूतास्तत्र भूरि शिलोच्चयाः ।। १६ कचोरिकाश्चारुतरा वटिकश्चाणकोद्भवाः । कन्दमूलाङ्कुरफलाः पुष्पपल्लवकोरकैः ।। १७

अर्थ – कवीन्द्र म्हणतात, काहीशा संभ्रमातच पुत्रेष्टीला आरंभ झाला. सईचा पुत्र दुसऱ्या दिवशी सकाळी मंगलस्नान करून उजळला. श्वेतवस्त्रे परिधान करून ब्राह्मणांमध्ये साधुसज्जनांची संमती घेऊन गीतवाद्यांच्या स्वरात लवकरच पुण्याहवाचन, नांदीमुख समाराधन त्याने केले. देव, पितर, आचार्य यांना विनम्रपणे वंदन करून व अभीष्ट देवतेचे ध्यान करून योगिनी मंडळाची स्तुती करून, गुरुपादुकांचे स्मरण करून, नित्य दानविधी करून, शिष्टसंमती घेऊन, सिद्ध गणांची प्रार्थना केली. कुलस्त्रियांना वंदन करून कार्यसिद्धी मनात आणून, अहितकारक भाषण टाळून, उग्रवृत्ती



पूर्णपणे सोडून देऊन व आपल्या मंत्र्यांवर (जबाबदारीची) धुरा सोपवून राजा दशरथाप्रमाणे त्याने ऋत्विग्वरण केले. सदस्य, अनुमोदक, होते, परिवीक्षक, उद्गाते त्याने निवडले. उत्तमांना उत्तमामध्ये, मध्यमांना मध्यमामध्ये ठेवून, क्षुद्रांना क्षुद्र कृत्यातून सत्कृत्य करावयास लावले. शिवपुत्र शंभूराजांनी ज्याला जो अधिकार दिला, तो त्याने आळस झटकून पार पाडला. या सईपुत्राने बाल, वृद्ध, रोगी, आंधळे, अनाथ यांना जवळ करण्यास अधिकाऱ्यांना सांगितले. उत्तम तांदळाच्या व अन्नाच्या राशी हिमालयाच्या आकाराच्या असल्यासारख्या त्या परमोत्सवात वाटल्या. एकाच रंगाच्या गायींच्या दुधापासून हुशार अशा सेवकांनी केलेल्या पायसांनी भांडी भरून गेली. पोळ्या, घारगे, वडे, करंज्या, पुऱ्या, लाडू यांचे पर्वत उभे राहिले. नानाविध पक्वान्नांनी खाद्यपदार्थ आणि मसाले (चटण्या, कोशिंबिरीसह) स्वच्छ माणसांनी या पदार्थांचे ढिगारे रचले. मनोहर गुडदाणी, खिचडी, तुपाच्या तवंगासह फेण्या डोंगराएवढ्या झाल्या. तुपात, तेलात, मंदाग्नीवर तळलेले पदार्थ, रोट यांचेही ढीग तयार झाले. सुंदर कचोऱ्या, चण्याच्या वड्या, कंदमुळ अंकुर, फळे, फुले, पाने, कळ्यांसह

स्फुरद्रुचिभराः शाका लेह्यचोष्यसमन्विताः । जितखेदैस्तत्र सूदैः कृत्वा संस्थापिता बभुः ।। १८ सिताघृतामृतदधिमधूनामतुला ह्रदाः । बभासुरिन्द्रस्य गृहे सुधाकुण्डचया यथा ।। १९ इत्थमन्नानि सिद्धानि कृत्वा कृत्वा प्रतिक्षणम् । आयातेभ्यो याचकेभ्यो ददुरन्नाधिकारिणः ।। २० दीयतां दीयतां भूयो भुज्यतां भुज्यतामिति । स्फारः शब्दः प्रादुरभूत्सत्रे सर्वगुणोत्रते ।। २१ गृह्णीध्वमन्नं खाद्यश्च त्यजध्वमवशिष्टकम् । सूपाधिकारिणः सर्वेऽब्रुवन् लेपार्थिनो द्विजान् ।। २२ पेयं खाद्यं बहुविधं पीयतां खाद्यतामिति । दीयतां स्थीयतां तत्र शब्दो व्योम समास्पृशत् ।। २३ दिवसे दिवसे तत्र ववृधे स महोत्सवः । यस्मिन्ननाथा दीनाश्च तुतुषुर्भोजनादिभिः ।। २४

अर्थ – रसरशीत, चवदार भाज्या, लेह्य व चोष्य पदार्थ आचाऱ्यांनी आळस न करता तयार करून ठेवले. खडीसाखर, तूप, लोणी, दही, मध यांचे मोठाले हौद इंद्राच्या घरच्या अमृताच्या कुंडाप्रमाणे वाटले. याप्रमाणे अन्न सारखे तयार करून वेळोवेळी येणाऱ्या याचकांना अन्नाधिकाऱ्यांनी दिले. 'वाढा-वाढा', 'आणखी खा' असा मोठा आग्रहाचा शब्द त्या परिपूर्ण (सर्वगुणश्रेष्ठ) अशा अन्नसत्रात होऊ लागला. 'जेवा, खा, राहिलेले टाकून द्या' असे आचाऱ्यावर नेमलेले अधिकारी अन्नावर ताव मारणाऱ्या ब्राह्मणांना सांगत होते. 'पेय आणि खाद्य भरपूर आहे', 'प्या आणि खा', 'वाढा, इथे थांबा' असे आवाज आकाशाला भिडले. दिवसामागून दिवस, महोत्सव वाढू लागला, व त्यात अनाथ आणि गरीब भोजनाने तृप्त झाले.

इत्थं कुर्वन्शम्भुभूपो विप्राणां परिभोजनम् । आचार्यसम्मतो विप्राननुष्ठातुं समादिशत् ।। २५ येन विघ्नस्य संहारः सद्यो भवति सर्वथा । कथयामास तं विप्रानादौ गणपतेर्जपम् ।।२६ दुर्गाणि यस्यास्तरति नामोच्चारेण मानवः । दुर्गाया ब्राह्मणा मन्त्रं जजपुर्भूपतोदिताः ।। २७ नमस्कारान्भास्करस्य कर्तुमारोग्यसिद्धये । ब्राह्मणान् ब्रह्मनिपुणान् राजेन्द्रो वरणीमदात् ।। २८ अभिषेकं हरस्यापि चक्रुर्भूपाज्ञया द्विजाः । येन सर्वेष्टसंसिद्धिर्भविष्यति न संशयः ।।२९ उपोषणानि श्रीविष्णोः सतृष्णाः शम्भुसिद्धये । आतन्वंस्तत्वनिष्णाताः सत्ववन्तो द्विजातयः ।। ३० नवग्रहाणां परमान्मन्त्रान्मान्त्रिकसत्तमाः । भूपप्रदिष्टाः प्राजपन् पुत्रेष्टिफलदायकान् ।। ३१ अमङ्गलस्य विलयो मङ्गलस्य महोदयः । येन तं मङ्गलं पुत्रहेतोर्विप्राः प्र(अ)पूजयन् ।। ३२ ये ये देवाः समभवन् वरदाः शीघ्रसिद्धिदाः । तांस्तानारा–

धयामासुर्द्विजेन्द्राः सर्वसिद्धये ।। ३३ अश्वत्थसेवनं केचिद्गवामासेवनं तथा । अकुर्वन् भूपसिध्यर्थं तुलसीपूजनादिकम् ।। ३४ सहस्रनामस्तोत्राणि कवचान्यपि सिद्धये । अपठन् ब्राह्मणोत्तंसा हंसा इव सुनिर्मलाः ।। ३५

अर्थ – अशा रीतीने शंभूराजांनी ब्राह्मणभोजन झाल्यावर आचार्यांच्या संमतीने विप्रांना अनुष्ठानास प्रारंभ करण्यास सुचविले. ज्यामुळे विघ्नांचा सर्वथा झटकन नाश होतो, त्या गणेशाचा जप करण्यास त्यांना सांगितले. जिच्या नामोच्चरणाने मानव संकटे तरून जातो, तो दुर्गादेवीचा मंत्रही राजाच्या सूचनेने ब्राह्मण जपू लागले. आरोग्यसिद्धीसाठी ब्राह्मणाला ब्रह्मनिपुण सूर्यनमस्कार घालण्यासाठी त्या राजेंद्राने सांगितले. राजाच्या आदेशावरून द्विजानी शंकरालाही अभिषेक केला. त्यामुळे सर्व इष्ट गोष्टी निश्चित साध्य होतील. तत्त्वनिष्ठ व सात्त्विक ब्राह्मणांनी शंभूराजांच्या यशाच्या उद्देशाने, विष्णूसाठी उपवास केले. ज्येष्ठ मांत्रिकांनी नवग्रहांचे श्रेष्ठ मंत्र पुत्रेष्टी सिद्धीसाठी राजाने आग्रह केल्यावरून जपले. अमंगलाचा लय होऊन मंगलाचा उदय होण्यासाठी विप्रांनी (त्याच्या) पुत्रासाठी मंगलपूजा केल्या. जे जे देव वर देणारे आणि शीघ्र सिद्धी देणारे आहेत, त्यांची त्यांची द्विजांनी सर्वसिद्धीसाठी आराधना केली. राजाला यश मिळावे म्हणून काहींनी घोड्याची सेवा, तर काहींनी गायींची सेवा, तुलसीपूजन, सहस्रनामस्तोत्र आणि कवच यांचे पठण निर्मल हंसाप्रमाणे ब्राह्मणश्रेष्ठांनी सुरू केले.

अधः स्वमस्तकं केचिदूर्ध्वं पादसरोरुहे । कृत्वाऽतपन् भूपसिद्धिकामुकाः कामुका इव ।। ३६ एकाशनं केचिदपि परे नक्तं प्रभोजनम् । धारणं पारणमपि केचित्तोयप्रभक्षणम् ।।३७ फलादनं केचिदपि केचित्पल्लवचर्वणम् । आहारमेके वातस्य भूपकार्यार्थमाचरन् ।।३८ परिवार्य करौ पृष्ठे व्युत्क्रमात्पदयोर्दृढम् । धृत्वाङ्गुष्ठौ बद्धपद्मासनाः सिद्धाश्च केचन ।। ३९ पादौ व्युत्क्रमतः केचित्स्कन्धमारोप्य सुव्रताः । अतपन् राजार्यार्थं सिद्धाः स्वार्थे यथा पुरा ।। ४० दक्षाङ्गुष्ठे केचिदपि वामाङ्गुष्ठेऽथ केचन । अतिष्ठन् भानुवदनास्तपन्तः शम्भुसिद्धये ।।४१ वामस्कन्धे वामपादं विधाय विधिवेदिनः । आकुर्वन् परमं केचिद्व्रतं श्रीशम्भुहेतवे ।। ४२ दक्षपादं वाममूर्ध्नि दक्षमूर्ध्नि परं पदम् । वहन्तः केऽपि नियमं भूपार्थमथ तेनिरे ।।४३ एके दक्षं परे वामं बाहुयुग्ममथापरे । ऊर्ध्वं दधन्तः श्रीशम्भुकार्यार्थं व्रतमाचरन् ।। ४४ निम्बूरसं शर्कराश्च सायं सायं समागृणन् (समागिरन्) । इच्छन्तो भूपसंसिद्धिं तापसाः केचनोत्तमाः ।। ४५ गुडोदकं केचिदपि द्राक्षाफलरसं परे । अन्ये दूर्वारसमपि निम्बपत्ररसान् परे ।। ४६ गोमूत्रं गोमयं दुग्धं दधि तक्रश्च केचन । पञ्चगव्यं माक्षिकश्च काञ्चिकं घृतशर्कराम् ।। ४७ खर्जूरं कण्टकिफलं पोलिका आम्रपोलिकाः। अक्रोडान्नारिकेरानि रम्याश्चारोलिका अपि ।। ४८ वदराण्यैक्षवरसं भल्लातफलबीजकम् । रम्भाफलं जाम्बवानि नारिङ्गान्यपि दाडिमम् ।। ४९ शाकं कन्दं केचिदपि समश्नन्तो दिने दिने । तपासि बहुधा चक्रुः श्रीशम्भोर्बत सिद्धये ।। ५० सर्वे नवीनवसना नवासनसमास्थिताः । नवीनविलसत्पात्रा उपपात्रविलासिनः ।।५१ रत्नाङ्गुलीयका समाः स्फुरन्मकरकुण्डलाः । सरत्नवलया रत्नकेयूरावलिराजिताः ।। ५२

अर्थ – आपले मस्तक खाली व पाय वर करून राजाच्या सिद्धीसाठी कामुकाप्रमाणे तपश्चर्या आरंभिली. एकभूक्त, नक्त, प्रभोजन, धारण, पारण, जलपान, फलाशन, पर्णाशन, वाताशन असेही राजकार्यासाठी केले. काही सिद्ध हात पाठीमागे आवळून पाय उलट्या बाजूने घट्ट धरून अंगठे धरून पद्मासन घालून बसले. काहीतर पाय उलट्या बाजूने खांद्यावर नेऊन व्रतधारणपूर्वक, पूर्वी



स्वार्थाकरिता करीत त्याप्रमाणे राजकार्यासाठी तप करू लागले. काहीजण उजव्या तर काही डाव्या अंगठ्यावर उभे राहून शंभूराजाला यश मिळावे म्हणून सूर्याकडे तोंड करून तपश्चर्या करू लागले. डाव्या खांद्यावर डावा पाय ठेवून योगविधी जाणणारे शंभूराजांसाठी श्रेष्ठ व्रत करू लागले. उजव्या पायावर डोक्याचा डावा भाग व दुसरा पाय डोक्याच्या उजव्या बाजूवर ठेवून नियमन करू लागले. काहीजण उजवा, काही डावा, तर काही दोन्ही बाहू वर करून व्रत करू लागले. काही तापस राजयश चिंतित रोज सायंकाळी लिंबूसाखरेवर राहू लागले. काही गूळ, पाणी, द्राक्षांचा रस, दूर्वांचा रस, कडुनिंबाचा रस, गोमूत्र, शेण, गायीचे दूध, दही, ताक, पंचगव्य, मध, कांजी, तूप-साखर, खजूर, वांगी, पोळी, आंब्याची पोळी, अक्रोड, नारळ, चारोळ्या, बोरे, उसाचा रस, बिब्बा, केळी, जांभूळ, नारिंगे, डाळिंबे, पालेभाज्या, कंद असे दररोज खाऊन शंभूच्या व्रताला यश मिळावे म्हणून ते तप करू लागले. नवीन वस्त्रे घालून, नव्या आसनावर बसून, नवीन लहानमोठी भांडी घेऊन, रत्नांच्या अंगठ्या, मकरकुंडले, रत्नजडित बांगड्या, रत्नजडित बाहुभूषणे घालून त्रिया

गन्धाक्षताभिर्विलसल्ललाटाः शुद्धवृत्तयः । पुष्पमालालसत्कण्ठा ग्रैवेयकसमुज्ज्वलाः ।। ५३ प्रत्यहं मङ्गलस्नाताश्चूर्णैरामलकोद्भवैः । महानन्दभरावेशभरिताः सिद्धिवाञ्छकाः ।।५४ वृता ये शम्भुराजेन कर्तुं जपमतन्द्रितम् । विबभुर्मण्डपे तत्र सूर्यप्रतिमवर्चसः ।। ५५ अपरे भूसुरोत्तंसा मुनिवन्नियतव्रताः । रक्ताम्बरधराः सर्वे रक्तगन्धानुलेपनाः ।। ५६ रक्तोत्तंसा रक्तपुष्पमालाव–लिविराजिताः । रक्तासनस्थिता रक्ताक्षता रक्तपरिच्छदाः ।। ५७ ताम्बूलापूरितमुखाः कस्तूरीकेसराप्लुताः । लसत्सुगन्धतैलोघाञ्चितदीर्घशिरोरुहाः ।। ५८ प्रसन्नमनसो द्योतन्मणिभूषणभूषिताः । शुचिस्मिताः शौचपराः पुरश्चर्याकृतश्रमाः ।। ५९ क्षुत्तृट्च्छ्रमसहाः प्रेङ्खत्तेजःपुञ्जमनोहराः । वीक्षितानन्तफलदानुष्ठाना किल शुक्रवत् ।। ६० कालिकाया मन्त्रजपमाचरंश्चिरसौख्यदम् । येन सर्वेष्टसंसिद्धिः प्रभूयान्नात्र संशयः ।। ६१

अर्थ – भालप्रदेशावरील गंधाक्षतांनी अधिक शोभत, शुद्ध वृत्ती धारण करून, गळ्यात फुलांच्या माळा घालून, (सोन्याच्या) माळांनी तेजस्वी बनत, रोज आवळ्याच्या चूर्णाने मंगलस्नान करून आनंदाने राजाला सिद्धी मिळावी अशी इच्छा करीत होत्या. शंभूराजाने ज्याना सतत जप करण्यास नेमले होते, ते त्या मंडपात सूर्याप्रमाणे तेजाने तळपत होते. दुसरे ब्राह्मण मुनीप्रमाणे नियम व व्रत पाळून, लाल वस्त्रे नेसून, रक्तचंदनाचे गंध लावून, लाल आभरणे घालून, लाल फुलांच्या माळांनी विराजत, लाल रंगाच्या आसनावर बसून, लाल अक्षता लावून, कस्तुरीकेशराने भरून, लाल वातावरणात राहून, लाल विडा मुखात धरून, आपल्या लांब केसांना सुगंधी तेलाने माखून प्रसन्न मनाने, रत्नाभरणांनी लखलखत, शुचिस्मित करीत, पवित्र राहून, पुरश्चर्या करण्यासाठी श्रम घेऊन, भूक, तहान, कष्ट सहन करीत, मनोहरपणे डुलत, तेजःपुंज शुक्राचार्याप्रमाणे अनंत फल देणाऱ्या अनुष्ठानावर देखरेख करीत, कालीदेवीच्या चिरसौख्यकारक अशा मंत्राचा जप करीत राहिले. त्यामुळे सर्वांना इष्टसिद्धी प्राप्त होईल यात शंका नाही.

इत्थं व्रतानि कुर्वत्सु विप्रोत्तंसेषु सर्वदा । चतुर्मण्डलसङ्ख्याकः कालः परमको ययौ ।। ६२ अथैकस्मिन्दिने काली निशीथे परिपूजिता । मद्यैर्मांसैः पायसाद्यैरन्नैः सपिशितैरपि ।। ६३ विविधैरुपहारैश्च फलैरुपवनोद्भवैः । आराधिता नयवता शम्भुराजेन धीमता ।। ६४ महते वरदानाय पुरस्तात्समुपस्थिता । दर्शयामास भूपाय स्वप्ने स्वां मूर्तिमञ्जसा ।। ६५ चतुर्भुजां खड्गमुण्डवरा–भयविजृम्भिताम् । कालपन्नगसङ्काशवेणिकां चन्द्रभूषणाम् ।। ६६

लसत्सीमन्ततिलकां स्फुरत्कुङ्कुममण्डलाम् । मुक्तारत्नमणिव्रातैः कृतग्रैवेयकावलिम् ।।६७
मुक्ताफलप्रविलसन्ना-सादण्डसमुज्वलाम् । अनर्घ्यरत्नताटङ्कमणिकञ्चुकदीपिताम् ।। ६८

अर्थ – अशाप्रकारे ते ब्राह्मणश्रेष्ठ सतत व्रते करीत असता बरीच म्हणजे चार वर्षे झाली. तेव्हा एके दिवशी रात्री कालीची पूजा मद्य-मांस-पायसांनी चालू असता विविध उपहारांनी आणि बागेतील फळांनी नीतिमान व हुशार अशा शंभूराजांनी तिची आराधना केली. तेव्हा मोठा वर देण्यासाठी तिने राजाला स्वप्नात आपले रूप स्पष्टपणे पुढे उभे राहून दाखविले. तिला चार हात होते ते तलवार, मुंडमाळा, वर आणि अभय मुद्रा यासह पसरले होते. तिची वेणी कालरूपी नागासारखी होती, चंद्राचा अलंकार होता. सीमंतावर तिलक उठून दिसत होता. कपाळावर कुंकवाचा टिळा शोभत होता. मोती, रत्न आणि मणी यांची गळ्यात माळ होती. नाकातील मोत्याच्या अलंकाराने तेजस्वी नाक उज्ज्वल दिसत होते. मूल्यवान रत्नांनी कानातील डूल आणि मणिखचित कंचुक तळपत होते.

स्वर्णतन्तुसमाकीर्णपट्टकूलविलासिनीम् । ऊर्णोज्वलपरीधानां सुस्मेरवदनाम्बुजाम् ।।६९ कालीं समीक्ष्य क्षोणीन्द्रः प्रणनाम पदाम्बुजे । मनोरथं सिद्धमिति स्वकं मेने दृढाशयः ।। ७० अतिष्ठदग्रजः स्वप्ने बध्वा स्वीयं करद्वयम् । अप्रार्थयन्महोपायैरपायदलिनीं शिवाम् ।। ७१ ततः सः कालिका देवी वरदानसमुद्यता । जगाद शम्भुराजेन्द्रमुचितं रुचिरं वचः ।।७२

अर्थ – सोन्याच्या जरीने विणलेल्या साडीचा विलास होता. (पांढऱ्या) लोकरीचे वस्त्र परिधान केले होते. मुखकमल सुस्मितयुक्त होते. अशा कालीचे दर्शन होताच राजाने तिच्या चरणकमलावर प्रणाम केला आणि आपला मनोरथ सिद्ध झाला, अशी त्याला खात्री वाटली. स्वप्नातच पुढे होऊन आपले दोन्ही हात जोडून तो उभा राहिला, शिवेची प्रार्थना केली. तेव्हा ती कालीदेवी वर देण्यास उत्सुक होऊन ती शंभूराजांना उचित आणि प्रिय अशा भाषेत म्हणाली,

काल्युवाच । अलं जपैश्च विविधैर्व्रतैराचरितैरपि । तपोभिर्विप्रचितैर्नियमैरपरैरपि ।।७३ दानधर्मदयाभिश्च प्रारब्धैर्विप्रभोजनैः । प्रसन्नाऽस्मि महाराज समापय महाव्रतम् ।। ७४ पुंरूपं प्रतिपद्याहं भविष्यामि सुतस्तव । भूभारं संहरिष्यामि पालयिष्यामि भूसुरान् ।। ७५ रक्षयिष्यामि धेनूनां गणान् यवनहस्ततः । अनाथांस्तारयिष्यामि दुःखपङ्काद्दिवानिशम् ।। ७६ दुष्टान् संमर्दयिष्यामि स्थापयिष्यामि देवताः । धर्मं संवर्धयिष्यामि हर्षयिष्यामि सुन्दरीः ।। ७८ नूतनान् कल्पयिष्यामि कार्यभारधुरन्धरान् । आह्लादयिष्यामि धनैर्ग्राम्यान् कोङ्कणजान्नरान् ।। ७९ महाराष्ट्रोद्भवान् मध्यरीत्या विष्णामि भूतले । आनन्दयिष्यामि वधूवृन्दं गोपपतिर्यथा ।। ८० स्वमतेनाचरिष्यामि राजधर्माननेकशः । स्वैरिणीनां जनपदे प्रदास्यामि महाभयम् ।।८१ अपराधं जनकृतं क्षमिष्यामि गतस्मया । बहुकालं धरिष्यामि साम ताम्रदलाधिपैः ।।८२ एकच्छत्रं करिष्यामि साम्राज्यं जगतीतले । पापर्द्धिं सञ्चरिष्यामि सर्वकाले विशेषतः ।। ८३ अतः सुतार्थं राजेन्द्र चिन्तां मा कुरु कर्हिचित् । स्वल्पैरहोभिस्तनयवदनं द्रक्ष्यसि ध्रुवम् ।। ८४ ततः कतिपयाहोभिर्महाकालो मम प्रियः । आकारयिष्यति मुदां त्वां स्वकीयं स्थलं प्रति ।। ८५

अर्थ – आता जप आणि विविध व्रते पुरे झाली. ब्राह्मणांच्या तपांनी आणि इतर नियमांनी, दानधर्माने, दयेने, सुरू असलेल्या ब्राह्मणभोजनाने मी प्रसन्न झाले आहे. महाराज, आता हे महाव्रत



थांबवा. पुरुषाचे रूप घेऊन मी तुझा पुत्र होईन, भूभार हरण करीन, ब्राह्मणांचे पालन करीन, यवनांच्या हातातून गायींचे रक्षण करीन, दुःखाच्या चिखलातून सतत अनाथांना वर काढीन, दुष्टांचे मर्दन करीन, देवतांची स्थापना करीन, धर्माचे संवर्धन करीन, स्त्रियांना आनंद देईन, कार्यभाराची धुरा वाहणारे असे नवे लोक तयार करीन, धान्याने कोकणवासीय खेडुतांना आनंदी बनवीन, महाराष्ट्रीयांना मध्यमार्ग सुखाचा करीन, गोपपती कृष्णाप्रमाणे वधूंना आनंद देईन, राजधर्माची अंमलबजावणी माझ्या मताप्रमाणे अनेकप्रकारे मी करीन, देशात स्वैरिणींना महाभय उत्पन्न करीन, मान विसरून लोकांचे अपराध माफ करीन, मोगल राजांबरोबर पुष्कळ काळ शांतता टिकवीन. जगात एकच्छत्री साम्राज्य निर्माण करीन, विशेषत्वे करून नेहमी पापांची वाढ थांबवीन. म्हणून राजेंद्रा, पुत्राची चिंता मुळीच करू नकोस. थोड्याच दिवसांत तू निश्चितपणे पुत्रमुख पाहशील. नंतर काही दिवसांनी मला प्रिय असा महाकाल आनंदाने तुझ्या जागी स्थिर होईल.

इत्थं महावरं दत्वा वराय शिवसूनवे । अन्तर्हिता समभवन्महाकाली तदा क्षणात् ।।८६ शिवनरपतिसूनुः सूर्यतुल्यप्रतापो वरमभिमतमुच्चैःश्यामया सम्प्रदत्तम् । अमृतमिव हृदब्जे श्लाघयित्वा तदानीं समधिकमुदमापज्जागृतिं सन्दधानः ।। ८७

इत्यनुपुराणेसूर्यवंशेनिवासकरपरमानन्दात्मजदेवदत्तोद्भवगोविन्दकवीन्द्रप्रकाशितायामनेकाध्यायसाधितायां शुभलक्षणलक्षितायां शिवपुराणान्तर्गतायां संहितायां कालीवरप्रदानं नाम अध्यायः ।

अर्थ – त्या श्रेष्ठ शिवपुत्राला अशा रीतीने महान वर देऊन क्षणात महाकाली अंतर्धान पावली. कालीने दिलेल्या श्रेष्ठ व इष्ट वराने शिवाजीचा सूर्यतुल्य, प्रतापी पुत्र शंभूराजाला आपल्या हृदयकमलात अमृतच आले असे वाटले व अतिशय आनंदी अवस्थेत तो जागा झाला.

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदपुत्र देवदत्तपुत्र गोविंद कवींद्र प्रकाशित अनेक अध्यायांच्या साधिकेतील शुभलक्षणकारक शिवपुराण संहितेतील 'कालीवरप्रदान' नावाचा अध्याय.

## विष्णुस्तुती - अध्याय ३

कवीन्द्र उवाच । एतस्मिन्समये देवाः पुरस्कृत्य चतुर्मुखम् । वैकुण्ठवासिनं देवं वीक्षितुं समुपाव्रजन् ।।१ क्षीराम्भोनिधिमध्यस्थे कल्पद्रुममहावने । रत्नपल्यङ्कवच्छेषपृष्ठे स्वापपरायणम् ।।२ निबद्धहस्तपद्मेन गरुडेनानुसेवितम् । विष्वक्सेनेन परितः कृतवृन्तानिलं मुहुः ।।३ सम्मर्दयन्त्या पादाब्जं सप्रेमकलिताङ्घ्रिकम् । अङ्के स्वके कमलया लसन्तं वनमालया ।।४ शङ्खं चक्रं गदां पद्मं चतुर्भिः करपङ्कजैः । वहन्तं कौस्तुभोद्भासि वक्षस्तटमकल्मषम् ।।५ वैयजन्तीं नाम मालां दधतं कण्ठदेशतः । अतसीकुसुमश्यामं पीताम्बरयुगावृतम् ।। ६ कस्तूरीतिलकभ्राज-ल्ललाटञ्चारुलोचनम् । नवरत्नसमा-वीतमध्यसूत्रस्फुरत्त्विषम् ।। ७ केयूरराजितभुजं वैष्णवैरभिशोभितम् । तुलसी-दलमालाभिरभिमालिनमुन्नतम् ।। ८ श्रीवत्साङ्कं श्रुतिललन्मकराकृतिकुण्डलम् । वज्राङ्कुशध्वजसरोरुहचिह्नितपत्तलम् ।। ९ चारुकण्ठं चारुनसं द्योतद्रण्डमनोहरम् । स्मेरहास्यस्फुरद्दल्लमनर्घ्यगुणमन्दिरम् ।। १०

अर्थ – कवीन्द्र म्हणाले, याच वेळी ब्रह्मदेवाला पुढे करून देव वैकुंठात राहणाऱ्या देवाला भेटण्यास गेले. क्षीरसागराच्या मध्यभागी, कल्पवृक्षांच्या महावनात, रत्नजडित पलंग असलेल्या शेषाच्या पाठीवर देव झोपेच्या अधीन झाले होते. हातात कमळ घेतलेला गरुड सेवा करीत होता.

विष्णूच्या बाजूला हळूहळू पंख्याचा वारा येत होता. मांडीवर असलेली लक्ष्मीप्रेमाने पदकमल चुरीत होती. वनमालेमुळे विष्णू शोभायमान होते. स्वच्छ असे वक्ष कौस्तुभ मण्यांनी चकाकत होते. चार हातात शंख-चक्र-गदा-पद्म धारण केलेली होती. गळ्यात वैजयंती माळा घातलेली होती. अळशीच्या फुलाप्रमाणे श्याम वर्ण होता. दोन पितांबरांनी अंग झाकलेले होते. भालप्रदेशावर कस्तुरीचा तिलक उठून दिसत होता. नेत्र सुंदर होते. मध्यसूत्रात नवरत्ने ओवली होती. त्यामुळे कांती विशेष प्रफुल्लित वाटत होती. केयूरांनी बाहू भूषित झाले होते. तसेच ते विभूतीनेही उठावदार दिसत होते. तुळशीच्या माळांनी तर सर्वांवर ताण केली होती. श्रीवत्स चिन्हाने तो आणखी रुबाबदार दिसत होता. माशाच्या आकाराची कुंडले कानांवर डुलत होती. पायांच्या तळव्यावर वज्र, अंकुश, ध्वज आणि कमळ अशी चिन्हे होती. कंठ आणि नाक सुंदर होते. गाल चमकदार आणि मनोहर होते व त्यातून स्मितहास्य फुलत होते. जणूकाही ते गुणमंदिरच असावे.

**दीर्घस्कन्धं दीर्घबाहुं दीर्घवक्षस्तटावृतम् । नन्दकं शार्ङ्गं सशरं समीक्षन्तं प्रतिक्षणम् ।।११ पूर्णचन्द्रसमाभासवदनं सदनं श्रियः । मादिनीं रूपसम्पत्तिं दधानमभिमानिनम् ।। १२ नाभिपङ्कजसञ्जातविधिं रम्योदरं वरम् । श्लिष्टजङ्घं सुन्दरोरुं मणिभासुरगुल्फकम् ।। १३ नखज्योत्स्नाभिरधिकं हसन्तं रजनीपतिम् । प्रगल्भपरमोदारलक्षणं परमोज्ज्वलम् ।। १४**

अर्थ – त्याचे खांदे आणि बाहू दीर्घ होते. त्याची छाती भरदार असल्याने प्रतिक्षणी तो बाण आणि धनुष्यच पाहात होता. त्याचे मुख पूर्ण चंद्राप्रमाणे भासत असून ते जणू वैभवाचे मंदिरच होते. आपणास मादक रूपसंपत्ती असल्याचा त्याला अभिमान होता. त्याच्या नाभिकमलातून ब्रह्मदेवाची उत्पत्ती झाली होती. उदर, जंघा आणि मांड्या सुंदर होत्या. पायाचे घोटे मण्यांच्या आभूषणाने चकाकत होते, तसेच कोवळ्या चांदण्याने जणू रजनीपती चंद्र अत्यानंदित झाला आहे असे वाटत होते. तो अतिशय उजळ आणि प्रगल्भ व अतिशय उदार होता.

**स्तुतं फणीन्द्रराजेन स्वकीयैः सकलैर्मुखैः । चतुर्वेदस्तोत्ररतैर्मुनिभिः परिवारितम् ।।१५ सिद्धैर्विद्याधरैः सर्वैः सततं समुपासितम् । देवर्षिभिर्नारदाद्यैराराधितमहर्निशम् ।। १६ तुम्बरुप्रमुखैः सर्वैर्गन्धर्वैर्गर्वकुञ्जरैः । रम्भाद्याभिः समस्ताभिरप्सरोभिरनारतम् ।। १७ किन्नरीभिर्नागवधूगणैर्यक्षवधूगणैः । गीतं सङ्गीतभङ्गीभिस्त्रिकालं परमादरात् ।। १८ बालार्ककोटिसुषमातस्करं कमलापतिम् । ददृशुः सकला देवा विधातृप्रमुखास्तदा ।। १९ दृष्ट्वा मुकुन्दं प्रणतिमकुर्वन् सुरनायकाः । स्वखेदभारमखिलं कथयामासुरञ्जसा ।। २०**

अर्थ – शेषराज आपल्या सर्व मुखांनी त्याची स्तुती करीत होता. चारही वेदातील स्तोत्रे म्हणणारे मुनी सभोवती होते. सिद्ध आणि विद्याधर त्याची सतत उपासना करीत होते. नारदादी देवर्षी रात्रंदिवस त्याची भक्ती करीत होते. तुंबरूप्रमुख सर्व गंधर्व, रंभाप्रमुख सर्व अप्सरा, किन्नरी, नागवधू आणि यक्षवधू अत्यंत आदराने सतत संगीतातील अनेक प्रकार योजून त्याचे गुणगान करीत होते. कोट्यवधी तेजस्विता असलेल्या कमलापती विष्णूस ब्रह्मदेवादी सर्व देव पाहात होते. देवश्रेष्ठांनी मुकुंदाला प्रणाम करून आपल्या सर्व कष्टभाराची कथा सरळपणे (त्याला) सांगितली.

**देवा ऊचुः । धरायामतिसम्बद्धाः खलास्ताम्रा महाबलाः । गते स्वर्गं यदुपतौ समस्तभयभञ्जने ।। २१ बौद्धावतारे परमं ध्यानासक्ते निरन्तरम् । शिवराजे महाराजे गते रजतपर्वतम् ।। २२ कुर्वन्ति पापसंवृद्धिं प्रशस्तमददर्पिताः । गावः क्षीणा द्विजा दीना व्रतिनो भग्नमानसः ।। २३ यतयो व्रतविभ्रष्टा आश्रमस्था गताश्रमाः । भङ्गः समस्तमूर्तीनां यज्ञादीनां**



**परिक्षयः ।। २४ धर्मस्य विलयोऽतीव दानानामपि खण्डनम् । पुराणानां कथालापवार्तायाः परिभञ्जनम् ।। २५**

अर्थ – देव म्हणाले, पृथ्वीवर अतिशय बलिष्ट असे दुष्ट यवन एकत्र आले आहेत- समस्त भय घालविणारा यदुपती स्वर्गाला गेला. बौद्धावतारात शिवाजीराजे रायगडावर जाऊन निरंतर ध्यानासक्त झाले. (आणि इकडे) घमेंडीने उन्मत्त झालेले लोक पापाची वृद्धी करीत आहेत. गायी कृश झाल्या, ब्राह्मण गरीब झाले, व्रतधारकांच्या मनाला धक्का बसला. यती व्रतापासून चळले. गृहस्थाश्रमी लोकांचे आश्रमधर्म बुडाले. सर्व मूर्ती फोडल्या गेल्या. यज्ञादींचा ऱ्हास झाला. धर्माचा पुरता विलयच झाला. दानधर्मही खंडित झाला. पुराणातील कथांची परंपरा तुटली.

**खपुष्पवत्कर्मरतिर्नतिः सन्नतिकन्नतिः । सिद्धानां सिद्धिरतिः क्षपिता बत पापिभिः ।।२६ उग्रावतारः श्रीशम्भुः सदा यज्ञपरायणः । जपानुष्ठाननिरतः समुपेक्षां तनोत्यलम् ।।२७ दैत्यारे पुण्डरीकाक्ष गोविन्द गरुडध्वज । यथा धर्मस्य संस्था स्यात्त्वमुपायं विचिन्तय ।। २८ त्वया मत्स्यावतारेण हत्वा शङ्खं महासुरम् । चत्वारः प्रथिता वेदा आनीता मधुमर्दन ।। २९ धृत्वा कूर्मतनुं पृष्ठे मन्दरो विनिवेशितः । विश्वम्भरापि विधृता कयाचिन्निजलीलया ।। ३० उत्तोल्य धरणीं दन्ते त्वमेकः परमोज्वलः । बिभर्षि सौकरीं मूर्तिं नारायण नरोत्तम ।। ३१ हिरण्यकशि-पोर्वक्षस्तटीतटविपाटनम् । नृसिंहरूपमास्थाय मुकुन्द प्रतिपादितम् ।। ३२ वामनीं मूर्तिमासाद्य त्रिभिर्विक्रमणैः क्रमात् । त्रिलोकी सहसाऽऽक्रान्ता जनार्दन जगत्पते ।।३३**

अर्थ – कर्मावरील श्रद्धा आकाशपुष्पाप्रमाणे खोटी ठरली. नमस्कार केल्यावर तो खरा का खोटा हे कळेनासे झाले. सिद्धांना आपल्या सिद्धीबद्दल प्रेम होते, तेही पाप्यांनी नाहीसे केले. उग्रावतार श्रीशंभू सतत यज्ञपरायण, जपानुष्ठानात राहून थोडीशी उपेक्षा वाढवीतच आहेत. हे दैत्यरिपो, पुंडरिकाक्षा, गोविंदा, गरुडध्वजा, धर्माची स्थापना पुन्हा होईल असा उपाय सुचवा. हे मधुसूदना! आपण मत्स्यावतार घेऊन महाअसुर शंखाला मारून प्रसिद्ध असे चारही वेद आणलेत. कासवाचे रूप घेऊन मंदार पर्वत पाठीवर ठेवला. आपल्या अगाध सामर्थ्याने पृथ्वीलाही आधार दिला. पृथ्वीला दातांवर तोलून धरून आपणच काय ते परमोज्वल राहून वराहाचे रूप धारण केले. हे नरश्रेष्ठा, नारायणा! नरसिंहाचे रूप घेऊन, हे मुकुंदा, हिरण्यकश्यपूची छाती फोडली. वामनरूपाने, हे जनार्दना, जगत्पते! क्रमाक्रमाने तीन पावलांनी आकस्मिकपणे त्रैलोक्य व्यापले.

**त्रिः सप्तकृत्वा जगतीपतयो विरथीकृताः । कुठारधारयातीव त्वया भार्गवमूर्तिना ।।३४ त्वया दाशरथीभूय प्रख्यातगुणसम्पदा । शरैरुग्रैर्विनिहतो रावणो लोकरावणः ।। ३५ हलेन सहसाकृष्य कालिन्दी परिभेदिता । त्वया त्रैलोक्यसारेण बलरामतनूभृता ।। ३६ औपहास्यं त्वया नीताः श्रुतयो बौद्धरूपिणा । वर्द्धिताः परमा बौद्धा द्विषन्तो ब्राह्मणर्षभान् ।। ३७ तुरङ्गमं समारुह्य विगृह्य यवनैः सह । भवान् कल्किस्वरूपेण कीर्तिं काश्चित् करिष्यसि ।।३८ ऊर्जस्वीनि स्वरूपाणि बिभर्षि कमलापते । बहूनि यैः समस्तानामानन्दः परिवर्धते ।। ३९ त्वमित्थं दुरितश्रेणीं मधुमर्दन सर्वदा । त्रयाणामपि लोकानां हरस्यतिकृपान्वितः ।। ४० हृषीकेशाऽधुना तस्मात्त्वमेवास्मान् प्रपालय । लुप्तयज्ञक्रियारम्भात्परिदीनमनोरथान् ।। ४१**

अर्थ – परशुरामाच्या अवतारात आपण एकवीस वेळा राजांना कुऱ्हाडीच्या धारेने विस्थापित केले. दाशरथी राम होऊन आपल्या विख्यात गुणसंपदेच्या जोरावर तीक्ष्ण बाणांनी लोकांना भयप्रद

झालेला रावण मारला. बलरामाचे शरीर धारण करून त्रैलोक्यात बलशाली होऊन नांगराच्या बळाचा वापर करून यमुनेचे गर्वहरण केले. बुद्धाचे रूप घेऊन वेदांना उपहासास्पद बनविले आणि ब्राह्मणद्वेष्ट्या बौद्धांना वाढविले. अश्वारूढ होऊन यवनांशी लढून आता आपण कल्कीच्या रूपाने आणखी कीर्ती मिळवाल. आपण अनेक ऊर्जस्वल रूपे धारण करता आणि पुष्कळ रूपांत आपण सगळ्यांच्या आनंदात भर घालता. हे मधुसूदना! आपण याप्रमाणे नेहमीच अतिकृपाळू होऊन त्रैलोक्यातील पापांची मालिका दूर करीत असता, हृषीकेशा, आता तुम्हीच लुप्त होत असलेल्या यज्ञक्रिया पुन्हा सुरू करून दीनमनोरथ झालेल्या आमचे परिपालन करावे.

त्राणं त्वत्तो विना विष्णो कोऽन्यो नः प्रकरिष्यति । अतस्त्वामेव सम्प्राप्ताः शरणङ्करुणानिधे ।। ४२ व्याप्तश्चराचरमिदं मायया भवदीयया । त्रैलोक्यं विविधान् भावान् बिभर्ति हृदयङ्गमान् ।। ४३ अच्युतानन्त लक्ष्मीश प्रसादसुमुखो भव । मग्नान् कलौ जलनिधाविव शीघ्रं समुद्धर ।। ४४ इति सम्प्रार्थितो देवैर्माधवो वरदोऽभवत् । अनुकम्पासमावीतो गीर्वाणावलिनायकः ।। ४५ अवोचद्वचनं किञ्चिद्देवान् वरसमुत्सुकान् । निरूपयिष्यामि बुधाः सुधेव सकलप्रियम् ।। ४६

अर्थ – हे विष्णो! आमचे रक्षण दुसरा कोण करू शकणार आहे? म्हणूनच, हे करुणानिधे, आम्ही आपल्यालाच शरण आलो आहोत. आपल्या मायेने हे सर्व चराचर व्याप्त झाले आहे. हृदयंगम अशा वेगवेगळ्या भावनांना आणि त्रैलोक्याला आपण धारण करता. हे अच्युता, अनंता, लक्ष्मीपते! प्रसन्नमुखाने सागरात बुडाल्याप्रमाणे या कलियुगात खोल जाणाऱ्यांना तारून त्यांचा उद्धार करावा.'' याप्रमाणे देवांनी प्रार्थना केल्यावर माधव वर देऊ लागला. सर्व देवांचा तो नायक दयाळू होऊन वरासाठी आतुर असलेल्या देवांना म्हणाला, ''सगळ्या शहाण्यांना अमृताप्रमाणे प्रिय वाटेल असे मी सांगतो.''

विष्णुरुवाच । तिष्यात्समुत्पन्नमिदं भयं त्यजत निर्जराः । अगण्यपुण्यचरितख्याते भृशबलान्वये ।। ४७ शिरस्ककुलकन्याया राजसाया मनोरमे । जठरे मामकी माया पुरूपेण भविष्यति ।। ४८ कार्यं त्रिलोक्याः परमप्रीत्या परिकरिष्यति । कृत्वा विचित्रं चरितं लोकानाह्लादयिष्यति ।। ४९ दामोदरो वाक्यमित्थमुक्त्वा त्रिदिववासिनः । विरराम महायोगी विसृज्य प्रणयान्वितः ।। ५० उपेन्द्रेण मुदा देवा विसृष्टाः कार्यमुन्नतम् । प्रतिज्ञाय प्रणम्याथ ययुर्बत यथातथम् ।। ५१ गतेषु देवेषु निजस्थानानि मधुसूदनः । कमलासेवितपदः सुष्वापोरगनायके ।। ५२

अर्थ – विष्णू म्हणतात, ''हे देवहो! कलीपासून निर्माण झालेले हे भय टाकून द्या. अगणित पुण्यकृत्ये केलेल्या विख्यात व प्रबळ अशा शिर्के कुलातील मनोरम कन्या राजसा हिच्या उदरात माझी माया पुत्ररूपाने प्रकट होईल आणि त्रैलोक्याचे हे कार्य अत्यंत आवडीने पार पाडील. आश्चर्यकारक पराक्रम करून लोकांना आनंद देईल!'' असे म्हणून महायोगी दामोदराने देवांना प्रेमाने निरोप देऊन थांबला. त्या इंद्रसख्याने आनंदाने उत्तम कार्याची प्रतिज्ञा करून प्रणामपूर्वक निरोप दिला व देव आले तसे निघून गेले. देव आपापल्या स्थानी गेल्यावर विष्णू–मधुसूदन शेषावर पहुडले व लक्ष्मी त्यांची चरणसेवा करू लागली.

मनीषिण ऊचुः । कवीन्द्र भवतो वाक्यं विश्रुतं परमाद्भुतम् । प्रतिज्ञातं कालिकया पुंरूपवरणं यथा ।।५३ आद्या शक्तिः कथमियं जाता पुरुषरूपिणी । कुत्राऽपि पौरुषप्राप्तिर्न



दृष्टा रमणीगणे ।। ५४ इत्थमाकर्ण्य वचनं कवीन्द्रो वाक्यकोविदः । सानन्दं कथयामास पण्डिताञ् श्रवणोन्मुखान् ।। ५५

अर्थ – पंडित म्हणतात, ''कवींद्र आपले आश्चर्यकारक भाषण ऐकले. कालीने पुरुषरूप घेण्याची प्रतिज्ञा केली. ती आदिशक्ती, पुरुषरूपिणी कशी झाली? स्त्रियांच्या ठिकाणी पौरुष प्राप्त झालेले पाहाण्यात नाही.'' असे भाषण ऐकून संभाषणपटू कवींद्र आनंदाने श्रवणोत्सुक पंडितांना सांगू लागला.

कवीन्द्र उवाच । एता युवतयः सद्यः पुरुषत्वं प्रपेदिरे । मार्कण्डेयेन मुनिना पुराणे परिवर्णितम् ।। ५६ नन्दगोपगृहे जाता यशोदागर्भसम्भवा । ततस्तौ नाशयिष्यामि विन्ध्याचलनिवासिनी ।। ५७ इत्थमुक्तं भगवता मृकण्डोः किल सूनुना । तस्मादियं महामाया पुरुषं प्रतिपत्स्यति ।। ५८ कथं पुरुषरूपत्वं यास्यतीतीति द्विजोत्तमाः । महामायात्र सन्देहं त्यजध्वमवलम्बितम् ।। ५९ समुदितनवहर्षा निर्जराणामधीशा मुररिपुमुखपद्मा–द्वाक्यमुच्चैर्निशम्य । स्वहितमतिविचित्रं भावयन्तः स्वचित्ते समधिकमुदंमा–पन्वर्जितानन्तशोकाः ।। ६०

इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरपरमानन्दात्मजगोविन्दकवीन्द्रप्रकाशिता–यामनेकाध्यायसाधितायां शिवपुराणान्तर्गतायामध्यायः ।

अर्थ – कवींद्र म्हणतात, ''मार्कण्डेय मुनींनी पुराणात वर्णिले आहे की, युवतींना तत्काळ पुरुषत्व प्राप्त झाले. नंद गवळ्याच्या घरी यशोदेच्या पोटी जन्मलेल्या त्या दोघींचा मी विंध्यांचलवासिनी नाश करीन, असे मृकण्डू मुनिपुत्र मार्कण्डेय भगवानांनी सांगितले आहे. तेव्हा महामाया पुरुषरूप घेईल. ब्राह्मणहो, ती महामाया पुरुषरूप कसे घेईल, याविषयीचा मनात रेंगाळणारा किंतु टाकून द्या. देवांचे राजे मुरारी यांचे हे वाक्य ऐकून पुन्हा आनंदित होऊन आणि दुःखाला सोडून देऊन आपले आता भले होणार आहे असे मनात घोळवीत अत्यंत आश्चर्यकारक अशाप्रकारे त्यांचा आनंद आणखी वाढला.

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदपुत्र गोविंद कवींद्र प्रकाशित अनेक अध्यायांच्या शिवपुराणातील साधिकेतील अध्याय.

## कालीचे स्वप्नात दर्शन - अध्याय ४

मनीषिण ऊचुः । काल्या प्रदर्शिते स्वप्ने राजा जागृतिमागतः । तदा यद्यत्कर्म चक्रे कवीन्द्र परिवर्णय ।। १

अर्थ – विद्वज्जन म्हणाले, ''कालीदेवीने स्वप्नात दर्शन दिल्यानंतर राजा जागा झाला. त्यानंतर त्याने जे जे केले, तेही, हे कवींद्रा, वर्णन करावे.''

कवीन्द्र उवाच । राजा जागरमासाद्य प्रातः प्राप्य सभान्तरम् । पुरोहितायाकथयत्स्वप्नं परमहेतुकम् ।। २ पुरोहितोऽपि तत्सर्वं निशम्य नृपभाषितम् । अवश्यं भावि सकलं भाति कालीवचो यतः ।। ३ जपयज्ञैस्तपोयज्ञैरलं निष्ठाप्रवर्तितैः । पूर्णाहुतिश्चर विभो महाराजकुमारक ।। ४ इत्युक्तः शम्भुभूपालो गौरवेण पुरोधसा । कर्तुं पूर्णाहुति–मथोदतिष्ठत्परमासनात् ।। ५ प्रवीक्ष्य होमभवनं वीक्ष्य वह्निं समेधितम् । ब्राह्मणान् होमसंसक्तानपि सञ्जातसम्भ्रमः ।। ६ मद्यैर्मांसैः सपिशितैः परमान्नविमिश्रितैः । एलालवङ्ग–कङ्कोलकर्पूरक्रमुकैरपि ।। ७ जातीफलैर्नारिकेरै रम्भाखर्जूरजैः फलैः । रसालैर्विविधैः

खाद्यैरपूपैर्वटकैः सह ।। ८

अर्थ – कवींद्र म्हणतात, ''राजा जागा झाल्यावर प्रातःकाळी दरबारात प्रवेश करून दुसऱ्या कक्षात जाऊन त्याने ते गूढ हेतू असलेले स्वप्न आपल्या पुरोहिताला सांगितले. पुरोहितानेही राजाचे सर्व भाषण ऐकून राजाला म्हटले, ज्या अर्थी कालीचे भाषण आवश्यक असा सगळा भविष्यकाळ दाखवीत आहे, त्या अर्थी हे विभो, युवराज, जपयज्ञ, तपोयज्ञ श्रद्धेने आपण केलेले आहेत. त्यांची पूर्णाहुती करावी. असे सांगितल्यावर उत्साहाने पुरोहिताकरवी पूर्णाहुती करण्यासाठी (निश्चय) करून आपल्या आसनावर बसले. होमहवन, त्यातील प्रदीप्त अग्नी आणि होमात गुंतलेले ब्राह्मण यांना पाहून ते गोंधळात पडले. मद्य, मांस, परमान्न, वेलदोडा, लवंग, कंकोळ, कापूर, सुपारी, जातीफळ, नारळ, केळी, खजूर, विविध जातींचे आंबे, घारगे, वडे इत्यादी खाद्ये

**यज्ञविधी -**

कुङ्कुमागरुकस्तुरीसिन्दूरपटवासकैः । स्फुरत्सुगन्धपटलैर्विविधैः कुसुमव्रजैः ।। ९ कौशेयैः सिचयैरूर्णावस्त्रैः सुन्दरकम्बलैः । अपरैर्मिलितैर्वस्तुसञ्चयैर्नरनायकः ।। १० घृतधाराभिरधिकं स्नपयन्वातसारथिम् । चकार परमोदारां पूर्णाहुतिमतन्द्रितः ।। ११

अर्थ – कुंकू, अगरू, कस्तुरी, शेंदूर, पटवासक इत्यादी सुगंधी पदार्थ, निरनिराळ्या प्रकारची फुले, रेशमी आणि लोकरीची वस्त्रे, सुंदर कांबळी इतरही जमविलेले पदार्थ यांनी तुपाच्या धारेसह अग्नीला अर्पण केली व अतिशय सावधपणे खूपच चांगली पूर्णाहुती केली.

पूर्णाहुतौ समाप्तायामाततान प्रभोजनम् । विप्राणां शम्भुराजेन्द्रः प्रार्थनापूर्वकं तदा ।।१२ केषाञ्चित् प्रददौ ग्रामान् दक्षिणायै विचक्षणः । तुरङ्गमान् गजेन्द्रांश्च रथान् रत्नानि कानिचित् ।। १३ अजाविकं बहुधनं शिबिकाः सुमनोहराः । सुखासनान्यश्वतरीरुष्ट्रान् गावस्समाहिषीः ।। १४ समीचीनानि वासांसि भूषणानि सहस्रशः । भाण्डानि बहुरूपाणि पात्राणि विविधानि च ।। १५ ग्रैवेयकानि वलयावलयो रत्नमुद्रिकाः । काञ्चीललामकप्राभ्रष्टकानि सदनान्यपि ।। १६ दासीर्दासान् धान्यराशीन् कृषिक्षेत्राणि कानिचित् । समाददे राजसिंहो याचमानाय सर्वतः ।। १७ तथैव दशदानानि प्रख्यातानि नरेश्वरः । प्रकल्पयामास मुदा स्वानुष्ठानप्रपूर्तये ।। १८ महाषोडशदानानि कानिचित्परमादरात् । रचयामास राजेन्द्रचन्द्रो यज्ञप्रपूर्तये ।। १९ इत्थं दानानि निभृतं प्रददन् शम्भुभूपतिः । कल्पद्रुम इवालोकि लोकैर्लोलैर्महोत्सवे ।। २०

अर्थ – पूर्णाहुती संपताच संभाजीराजे यांनी विप्रांना प्रार्थना करून भोजन दिले. काहींना गावे दिली. दक्षिणा म्हणून घोडे, हत्ती, रथ, रत्ने, शेळ्या-मेंढ्या, रोकड, मनोहर पालख्या, आरामशीर आसने, खेचरे, उंट, गायी, म्हशी, चांगली वस्त्रे, हजारो भांडी, विविध आकाराची अनेक पात्रे, गळ्यातील माळा, हातातील वळी, रत्नजडित अंगठ्या, कंबरपट्टे, माळा, घरे, दास-दासी, धान्याच्या राशी, शेतीसाठी जमीन अशी अनेक दाने त्या राजसिंहाने याचकांना दिली. तसेच प्रसिद्ध दशदानेही राजाने आपल्या अनुष्ठानाच्या पूर्ततेसाठी आनंदाने दिली. यज्ञाच्या पूर्ततेसाठी महाषोडश दानेही तयार ठेवली. अशा रीतीने गाजावाजा न करता दाने देणारा शंभूराजा त्या महोत्सवात लोकांना जणू कल्पवृक्षच वाटला.

इत्थं दानं समुद्वीक्ष्य तत उच्चुक्रुशुर्जनाः । न ययातेर्न मान्धातुर्न नृगस्य न वा निमेः ।।२१ न सृञ्जयस्य नैलस्य न दिलीपस्य नो शिबेः । हरिश्चन्द्रस्य नाजस्य न च रामस्य नो शिनेः



।।२२ उशीनरस्य राजर्षेर्गयस्य नहुषस्य च । न वीक्षितोऽस्माभिरहो विश्रुतः श्रवणेन वा ।।२३ यावन्तः पांसवो भूमेर्धारा मेघस्य यावतीः । आदाद्दानानि तावन्ति द्विजेभ्यो राजसत्तमः ।।२४ यावत्यः सिन्धुतीरेषु वालुकानां परम्पराः । यावन्तो धरणीमध्ये तृणानामपि सञ्चयाः ।। २५ यावत्यः स्वर्णशैलस्य शिलाः परमभासुराः । यावत्यो गगनप्रान्ते तारकाः परिसंस्थिताः ।।२६

अर्थ – हे सर्व दानकार्य पाहून लोक म्हणू लागले, ''ययाती, मान्धाता, वैवस्वतपुत्र-नृग, निमी, सृंजय, नल, दिलीप, शिबी, हरिश्चंद्र, अज, राम, शिनी, उशीनर, राजर्षिगय, नहुष (यांनी कोणीही असे दान केलेले) आम्ही पाहिलेले नाही व आमच्या ऐकण्यातही नाही. भूमीवर जितके धुळीचे कण असतील, ढगामधे जेवढ्या जलधारा असतील, सागरतीरावर जितकी वाळू असेल, पृथ्वीवर जेवढी गवताची पाने असतील, सुवर्णपर्वतांच्या जितक्या अतितेजस्वी शिळा असतील, आकाशात जेवढ्या तारका असतील, तेवढी दाने या श्रेष्ठ राजाने ब्राह्मणांना दिली.

भानोः करेषु यावन्तोऽणवः समुपबृंहिताः । यावत्यस्तरुजातीनां पल्लवावलयः स्मृताः ।। २७ यावन्तः सागरजले संस्थिता यादसां व्रजाः । तुषाराद्रेः समुदिता यावन्तो हिमजाः कणाः ।। २८ कणा धान्यस्य यावन्तो धरणीमधिजृम्भिताः । तावतीर्गाः सुवर्णानि याचमानाय सर्वतः ।। २९ प्रददन् शम्भुराजेन्द्रश्चिन्तामणिरिवापरः । महोत्सवे महोदारे प्रबभावधिकं श्रिया ।। ३० दत्वेत्थं दानमतुलं ततः श्रीशम्भुभूपतिः । स्नात्वावभृथमत्युच्चैः सुहृन्मित्रसमन्वितः ।। ३१ विसर्जयामास मुदा द्विजेन्द्रान् स्वाश्रमं प्रति । हर्षोत्कर्षसमावीतः स सद्यः समजायत ।। ३२ अथो विप्रेषु यातेषु पूर्णकामेषु दापनैः । महानन्दभराविष्टः शिवराजात्मसम्भवः ।। ३३ समाहूय नृपश्रेष्ठान् सभान्तरमलङ्कृतम् । आभूषयामास मृदुवासोभिर्मणिभूषणैः ।। ३४ अथ सर्वे नृपोत्तंसाः पूजिताः शिवसूनुना । आभूषिता बहुविधं यथातथमुपाययुः ।। ३५ यातेषु भूपमुख्येषु प्रजानामपि मण्डलम् । यथार्हं मानयामास श्रीमाञ् शम्भुनरेश्वरः ।। ३६ तथा मौलाः केचिदपि प्रधाना मन्त्रिनायकाः । मानिता विविधैर्मानैस्तदा भूपेन सादरम् ।। ३७ दीनान्धबधिराः केचिदुत्सवार्थं समागताः । तेऽपि सन्तोषितास्तेन क्षोणीन्द्रेण सुबुद्धिना ।। ३८ महोत्सवे येन येन यद्यत्समनुयाचितम् । दत्तमासीत्तस्य शम्भुभूमीन्द्रेण महाधनम् ।। ३९

अर्थ – सूर्यकिरणांमधे जितके अणू एकत्र झाले असतील, अनेक जातींच्या झाडांवर जितकी पाने असतील, समुद्राच्या पाण्यात जितके जलचर प्राणी असतील, हिमालयावर जितके बर्फाचे कण एकत्र झाले असतील, पृथ्वीवर जितके धान्याचे कण वाढले असतील, तितक्या गायी आणि सुवर्ण याचकांना भरभरून देणारा शंभूराजेंद्र म्हणजे दुसरा चिंतामणीच जणू या प्रचंड महोत्सवात वैभवाने अधिकच तळपत आहे. याप्रमाणे अतुलनीय दाने दिल्यावर शंभूराजाने आपल्या प्रिय मित्रांबरोबर अवभृथ स्नान करून आनंदाने ब्राह्मणांना घरी जाण्यास निरोप दिला. त्यावेळी त्यांना खूप आनंद झाला होता. ब्राह्मणदानाने आपल्या इच्छा पूर्ण झाल्यावर तो शिवपुत्र आनंदाने आलंकृत केलेल्या दुसऱ्या कक्षात गेला व राजांना बोलावून तलम कपडे व रत्नजडित आभरणे देऊन त्याने त्यांना विभूषित केले. त्या सर्व राजांचा त्यांची योग्यता लक्षात घेऊन सत्कार केल्यावर ते राजे परत गेले. मुख्य राजे निघून गेल्यावर शंभूराजाने प्रजेच्या शिष्टमंडळाचा (सरदार देशमुख-पाटील वगैरे यांचा) योग्यतेप्रमाणे सत्कार केला. तसेच जुन्या प्रधानमंत्रिश्रेष्ठांचाही विविध प्रकारे सन्मान केला.

दीन, आंधळे, बहिरे असेही जे उत्सवासाठी आले होते, त्यांनाही त्या सुबुद्ध राजाने संतुष्ट केले. महोत्सवात ज्याने ज्याने, जे जे मागितले, ते ते महाधन शंभूराजाने त्यांना त्यांना दिले.

इत्थं समाप्तिं सकलं यज्ञं नीत्वा नरेश्वरः । यथाक्रमं समानाय्यादराद्दृत्विग्वरोत्तमान् ।।४० यस्य यद्यत्समभवद्वस्तु मानसमन्वितम् । तस्य तत्तत्करगतश्चकार परया मुदा ।। ४१ गजान् तुरङ्गमानुष्ट्रान् रथानश्वतरीरपि । आवाह्य धनभारेणर्त्विजः स्वान् गृहान् ययुः ।। ४२ ऋत्विजेषु समस्तेषु स्वान् गृहान् प्रस्थितेष्वलम् । शम्भुराजो महाराजः शिवराजात्मजः कृती ।। ४३

अर्थ – अशा रीतीने सर्व यज्ञ समाप्त झाल्यावर मोठ्या आदराने ऋत्विकश्रेष्ठांना क्रमाने आणून ज्याला जी वस्तू द्यावयाची ठरली असेल, ती ती वस्तू त्याला सन्मानपूर्वक, मोठ्या आनंदाने त्याच्या त्याच्या हातात दिली. हत्ती, घोडे, उंट, रथ, खेचरेदेखील त्यात आणखी धनाची भर घालून ऋत्विजांना आवाहन करून दिल्यानंतर ते आपापल्या घरी गेले. सर्व ऋत्विज आपल्या घराकडे निघाल्यावर शिवराजांचे पुत्र शंभूराजे धन्य झाले.

### छ. संभाजीराजांचे रूपवर्णन व शौर्यवर्णन -

वहन् स्वमूर्ध्नि परमं श्वेतच्छत्रं शशिप्रभम् । चामराभ्यां वीज्यमानः सुरराज इवापरः ।।४४ मायूरव्यजनेनाऽपि सर्वतः परिवीजितः । अनेकसेवासुमुखैः सेवकैरभिसेवितः ।। ४५ प्रसन्नवदनाम्भोजो नवाकल्पविराजितः । मुक्ताजालैः कृतोत्तंसो मुक्ताकुण्डलमण्डितः ।।४६ एकावलिं रत्नहारं वहन् कण्ठे सुशोभने । हीरमाणिक्यघटितकेयूरद्युतिबृंहितः ।। ४७ वक्षःस्थलाभिविलसत्पदकः स्मरसुन्दरः । रत्नानुवीतवलयद्वयशोभिकराम्बुजः ।। ४८ अनेकरत्नकलितकटिसूत्रमनोहरः । दिव्याम्बरपरीधानः पुष्पमालासमुज्ज्वलः ।। ४९ केशरेणानुलिप्ताङ्गो गन्धाक्षतविराजितः । कस्तूरीतिलकभ्राजल्ललाटरुचिरञ्जितः ।। ५० परिपूर्णानन्दभरो वैतालिकपरिष्टुतः । यज्ञमण्डपकं हित्वा प्रविवेश स्वकं पुरम् । स्थित्वा रत्नासने रम्ये कार्यजातमसाधयत् ।। ५१ अगणितकृतकीर्तिः कामवत्कम्रमूर्तिः विरचितबहुपूर्तिर्याचकानां जनानाम् । मखवरमतिहर्षात्पूर्णतां प्रापयित्वा निजगृहमथ गत्वा शम्भुराजो ननन्द ।। ५२ नीलया निभृतलीलया वरं प्राप्य दत्तमथ शम्भुभूपतिः । आबभार सुषमां महत्तरां कालिकोक्तिमतिभावयन् हृदि ।। ५३

इत्यनुपुराणे सूर्यवंशे परमानन्दोद्भवदेवदत्तात्मजप्रकाशितायामध्यायशतसाधितायां- शिवपुराणान्तर्गतायामध्यायः ।

अर्थ – श्रेष्ठ असे चंद्राप्रमाणे शुभ्र छत्र त्यांच्या शिरावर होते. दुसरा इंद्रच अशा त्या राजावर चवऱ्या ढाळल्या जात होत्या. बाजूने मोरपिसांच्या पंख्यानेदेखील वारा घातला जात होता. अनेकप्रकारे सेवा करण्यासाठी प्रसन्न असलेले सेवक सेवा करीत होते. मुखकमल प्रसन्न होते. वेशभूषादी नवीन सरंजामाने शोभा आली होती. मोत्यांच्या कुंडलांना, मोत्यांच्या जाळ्यांनी सौंदर्य आणले होते. आपल्या सुंदर कंठात एकावली, रत्नहार होते. हिरे-माणके जडविलेल्या बाहुभूषणांनी तेज आणखीनच वाढले होते. रत्नमाणकांनी जडविलेले पदक वक्षस्थलावर विलसत होते. मदनाचे सौंदर्य होते. रत्नजडित अशा दोन वलयांनी हाताला शोभा आली होती. अनेक रत्ने असलेल्या कटिसूत्रामुळे (राजे) मनोहर दिसत होते. दिव्य वस्त्रे परिधान केली होती. फुलांच्या माळांनी विशेषच उजळपणा आला होता. अंगाला केशराचा अनुलेप होता. गंधाक्षतांनी (ते) विराजित झाले होते. भालप्रदेशाची शोभा कस्तुरीच्या टिळ्याने आकर्षक झाली होती. परिपूर्ण आनंदाचा विस्तार झाला



होता. वैतालिक स्तुती करीत होते. (राजाने) यज्ञमंडप सोडून आपल्या कक्षात प्रवेश केला होता. रम्य अशा सिंहासनावर बसून ते आपला कार्यभार साधत होते. त्यांनी अगणित कीर्ती मिळविली होती. मदनाप्रमाणे लोभस शरीर होते. याचकांना अनेक (दानांनी) संतुष्ट केले होते. अत्यंत आनंदाने मोठा यज्ञ पूर्णतेस नेला होता. शंभूराजे आपल्या घरी गेल्यावर आनंदित झाले होते. शंभूराजे कालीने (देवीने) अगम्य लीलेने दिलेला वर मिळाल्यावर मनात कालीचे शब्द पुनःपुन्हा घोळवीत वेगळीच श्रेष्ठ शोभा धारण करते झाले.

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदपुत्र देवदत्ताचा पुत्र गोविंद कवींद्र प्रकाशित शतसाधिकेतील शिवपुराणातील अध्याय.

### महाराणी येसूबाईंचे (राजसबाईंचे) डोहाळे - अध्याय ५

कवीन्द्र उवाच । अथो शिरस्ककुलजा राजसा शम्भुसुन्दरी । बभार गर्भं परमं सर्वलोकहितङ्करम् ।। १ लब्धे राजसया गर्भे पाण्डिमा मुखमाविशत् । उत्थाने निभृतालस्यं पादयोः समुपाययौ ।। २ तन्द्रा विलोचनप्रान्ते निद्रामुद्राऽपि काचन । अवर्धत विशेषेण सर्वव्यावृत्तिहारिणी ।। ३ सुषमा काचिदधिका राजसाया मुखाम्बुजे । जगाम वृद्धिं नृपतेर्मानसोल्लासदायिनीम् ।। ५ भूयः करिशिरःस्पर्धां जघनं गर्भसम्भवे । समाललम्बे सहसा राजसाया विशेषतः ।। ६ अवलम्बं विनोत्थातुं राजसायाः प्रतिक्षणम् । न शक्तिरासीजठरे गर्भभाराद्गुरावति ।। ७ त्रैलोक्यगुर्वी जठरे यस्या माया समाविशत् । समुद्वहेत्समधिकं गरिमाणं कथं न सा ।। ८ अखण्डधर्मसलिलबिन्दवो मुखमण्डले । मुहुर्ददृशिरे तत्र राजसायाः सखीगणैः ।। ९ अवलम्बं प्रेमभराद्दत्वा सख्यः सुविस्मिताः । असेवन्त महोत्साहै राजसां राजसुन्दरीम् ।। १० उदरे सत्वसंपन्नां नर्मदामिव शर्मदाम् । समीक्ष्य राजसां सख्यः सम्प्रापुः परमां मुदम् ।। ११ गर्भिणीं शम्भुभूपालो राजसां निजसुन्दरीम् । क्षणक्षणं प्रेमभरादलोकत दयान्वितः ।। १२ सर्वासु सा सपत्नीषु राजसा मानमानिता । राज्ञाधिकं सखिजनैर्गुर्विणीत्यधिकाऽभवत् ।। १३ यद्यदर्थयते साऽथ राजसा पृथुलेक्षणा । तत्तत्सम्पादितमभूच्छम्भुराजेन धीमता ।। १४ आभूषणानि सा भारं मेने शम्भुनृपप्रिया । अङ्गनामपि केषाञ्चिन्महागर्भभरालसा ।। १५ गर्भच्छाया काचिदपि ववृधे तां समाश्रिता । सखीजनस्य चेतांसि हरन्ती भूपतेरपि ।। १६ अथ तां मृगशावाक्षीं तृतीये मास्युपस्थिते । उदभूवन् सखिजनाह्लादका दोहदा मुहुः ।। १७

अर्थ – कवींद्र म्हणतात, नंतर शिर्के कुलात जन्मलेल्या शंभूच्या पत्नीने (म्हणजे) राजसबाईने लोकहितकर असा श्रेष्ठ गर्भ धारण केला. राजसबाईला गर्भवती झाल्यावर मुखावर पांढरट छटा आली. उठताना पायात बराच जडपणा आला. डोळ्यांच्या कडांवर झोपेची झाक दिसू लागली व ती सर्व (कार्यापासून) परावृत्त होण्याकडे वाढू लागली. शरीरावरील कृशपणा दुःसह होऊ लागला. उदरात असलेला गर्भ लक्षात येऊ लागला. राजसबाईच्या मुखकमलावरील शोभा राजाच्या मनाला आनंद देत वाढू लागली. गर्भाच्या भारामुळे तिला क्षणोक्षणी उठताना आधाराशिवाय शक्ती राहिली नाही. जिच्या उदरात त्रैलोक्यातील 'जड' अशी मायाच प्रविष्ट झाली, तिला अधिक जडपणा कसा येणार नाही? मुखमंडलावर तिच्या सख्यांना पुनःपुन्हा सतत निर्माण होणारे घामाचे बिंदू दिसू लागले. आश्चर्यचकित झालेल्या सख्या तिला प्रेमाने आधार देऊन मोठ्या उत्साहाने राजपत्नी राजसबाईची सेवा करू लागल्या. सख्यांना तिच्या उदरात सत्त्वसंपन्न झालेल्या राजसबाईकडे पाहून कल्याणप्रद अशा नर्मदेचेच जणू दर्शन झाल्याप्रमाणे अत्यंत आनंद झाला. शंभूराजे (तिची) दया येऊन आपल्या

गर्भिणी पत्नीकडे सतत प्रेमभराने पहात असत. सर्व पत्न्यांत राजाकडून मानाने आदर मिळालेली राजसबाई सख्यांकडूनही गर्भवती म्हणून अधिकच प्रभावशाली झाली. तिला जे जे हवे असे, ते ते बुद्धिमान शंभूराजा विशाल नयन असलेल्या राजसबाईसाठी संपादन करी. शंभूराजाची ती लाडकी, गर्भभाराने अंगावर जडपणा आलेली (राजसबाई) दागिनेदेखील भार मानू लागली. एक विलक्षण गर्भच्छाया तिच्या आश्रयाने वाढू लागली व राजाच्या आणि सख्यांच्या मनाला आकर्षक वाटू लागली. त्या हरिणाक्षीला तिसरा महिना लागल्यावर सख्यांना आवडणारे डोहाळे पुनःपुन्हा उद्‌भवू लागले.

प्रतिमाया देवतानां सदर्च्यारभ्मणे मतिः । समस्तविप्रवृन्दानां सम्भ्रमात्परिपालनम् ।। १८ मत्तव्याघ्रवराहाणां बन्धनं परिमर्दने । अभिलाषः समधिकं प्रादुरासीद्दिने दिने ।। १९ हरिणानामपि मुहुर्बन्धने हनने रतिः । वधे तित्तिरवृन्दानां रक्षणे च महोत्सवः ।। २० सारिकाशुकवृन्दानां धरणे परिपोषणे । प्रीतिः परमिका काचिद्दिवानिशमतन्द्रिता ।। २१ अनेकपक्षिव्रातानां हनने परिपीडने। अकुण्ठा परमोत्कण्ठा राजसाया हृदम्बुजे ।। २२ पवित्रमत्स्यजातीनां त्यक्त्वा गलमकुण्ठितम्। धर्तुं समीहा लीलाभी राजसां समुपस्थिता ।।२३ औदास्यं परमोदारं महाराष्ट्रेषु सर्वदा । कोङ्कणस्थेषु सर्वेषु महादरपरिक्रमः ।। २४ आरामारोपणोत्साहः समीहा वनवीक्षणे । सर्वत्र करुणा चित्ते जनानां परिपालने ।। २५ मौलानामाधिपत्येषु नवीनस्थापने रतिः । नमस्यायां मुररिपोरानन्देन समुद्यमः ।। २६ प्रीतिः समधिका काचिन्नटानामपि नर्तने । हर्षोत्कर्षो वारवधूलास्यलीलासमीक्षणे ।। २७ सुन्दरीभिः परिकृता अपराधाः समुन्नताः । स्पृहाभिमानेन मया गोपनीया नृपस्त्रिया ।। २८ विश्वासः सर्वकार्येषु सेवकेषु निरन्तरम् । क्रूरकोङ्कणभूतेषु कृषिकर्मोपजीविषु ।। २९ आशा वधूः स्वका दासीः करिष्यामि गतश्रमाः । आशामित्थं दधाराशु राजसा सत्त्वसम्भृता ।। ३० अट्टालिकाश्चन्द्रबिम्बचुम्बिन्यश्चारुचित्रिताः । कदा विरचयिष्यामि शम्भुभूमीन्द्रसुन्दरी ।।३१

अर्थ – देवतांच्या मूर्तींची पूजा करण्याकडे तिचा कल झाला व सर्व ब्राह्मणांनी तो गडबडीने/उत्साहाने अमलात आणला. दिवस जसजसे जाऊ लागले, तसतसे मत्त झालेले वाघ आणि वराह यांना पकडून छळण्याची इच्छा वाढू लागली. हरणेही पकडून मारण्याची आवड पुनःपुन्हा होऊ लागली. तित्तिर (पक्ष्यांना) मारण्यात व रक्षणही करण्यात मोठा आनंद वाटू लागला. सारिका आणि पोपट पकडावे व पाळावे अशी अनिवार इच्छा सतत वाढती राहू लागली. अनेक पक्ष्यांना मारण्याची किंवा छळण्याची अनावर व जोरदार उत्कंठा राजसबाईंच्या मनात उत्पन्न झाली. सतत गळ टाकून पवित्र मासे धरण्याची इच्छा; परंतु त्यासाठी धावपळीची भीतीही होती. महाराष्ट्रात सर्वत्र खूप मोठे औदासीन्य आहे. कोकणात मोठ्या उत्साहाने काम चालू असते. बागा लावाव्या, वने पाहावीत अशी इच्छा उत्पन्न झाली. लोकांचे रक्षण आणि पालन व्हावे अशी मनात करुणा उत्पन्न झाली. जुन्या मंत्र्यांच्या कामावर नवीनांची स्थापना व्हावी अशी आवड निर्माण झाली. मुरारी कृष्णाला वंदन करण्यात आनंदाने प्रयत्न होऊ लागला. नटांनी नर्तन करावे अशी अधिकच इच्छा निर्माण झाली. वर-वधूंच्या नृत्यलीला पाहाण्यात अपार आनंद होऊ लागला. स्त्रियांच्या भोवती चालू असलेले अपराध वाढू लागले आहेत, तेव्हा इच्छा व अभिमान धरून मला राजस्त्रियांचे रक्षण केले पाहिजे. सर्व कार्यांत सेवकांवर, कोकणातील क्रूर भुतांवर (?), शेतीवर जगणाऱ्या (शेतकऱ्यांवर) नेहमी विश्वास ठेवला पाहिजे. आशेला आणि स्त्रियांना माझ्या दासी बनवून मी



त्यांचे श्रम दूर करीन. राजसबाईने अशी सात्त्विक आशा लवकरच बाळगली. शंभूराजांच्या पत्नीला चंद्रबिंबाला स्पर्श करणाऱ्या, सुंदर चित्रांनी (मढलेल्या) मोठाल्या इमारती मी कधी बांधीन, असे वाटू लागले.

यवनेषु समस्तेषु सेना सम्प्रेषणस्पृहा । अभिलाषश्चिरतरं सामस्याऽपि(साम्नश्चापि) समुद्यतः ।। ३२ अत्युन्नतपुराणाश्च स्वायत्तीकरणे मतिः । जलस्थलारण्यशैलदुर्गाणां पालनोद्यमः ।। ३३ तस्कराणामप्यवधे रतिः काचन सर्वदा । प्रजानामपि सर्वासां वाक्यस्य सहनं मुहुः ।। ३४ अभिलाषः स्वसेनानां विजयप्रेषणे महान् । एकछत्राधिपत्यस्य वाञ्छा स्वच्छा हृदम्बुजे ।। ३५ क्रीडनं बालकगणैर्भ्रमणं विभ्रमन्मुहुः । गायकानां गायनस्य श्रवणे परमादरः ।। ३६ सदा विजयभेरीणां ध्वनेराकर्णने महः । अनेकवाद्यजातीनां ध्वानालोचनकौतुकम् ।। ३७ सर्ववस्तुषु वैराग्यं भूषणादिषु सर्वदा । महास्पृहा वितरणे विप्रमुख्येषु काचन ।। ३८ प्रीत्या परमया स्त्रीषु सर्वासु बत गौरवम् । अष्टादशपुराणानां मर्मज्ञाने महोत्सवः ।। ३९ अलौकिकं लौकिकञ्च ज्ञानाज्ञानविवेचनम् । अपास्त्वाजिशालानां रचने प्रीतिरुन्नता ।।४० गलन्मदानां बहुशो गजानां परिवीक्षणम् । अनेकरथशाला-नामाकल्पनचमत्कृतिः ।। ४१ अभिमानः सेवकानां स्वकीयानां निरन्तरम् । गौरीवल्लभपूजायामौदास्यं मनसि स्फुटम् ।। ४२ विज्ञप्तिपूरणं सद्यो दीनानाथा-(न्धाना)मनेकधा । प्रियोक्तिः सर्वलोकेषु क्षमा कापि च सम्भृता ।। ४३ आनन्दः सर्वदा चित्ते दशदिग्विजयक्षमः । दाम्भिकानामपाराणां दूरतः परिवर्जनम् ।। ४४ वैष्णवानामतितरां सन्मानपरिकल्पनम् । विद्यावतां ज्ञानवतामवने मध्यमा रतिः ।। ४५ विनोदकानामधिकं रुचिर्वित्तप्रदापने । भाण्डानां बहुरूपाणां वस्त्राद्यैः परिलालनम् ।। ४६

अर्थ – सर्व यवनांवर सेना पाठविण्याची इच्छा झाली; पण त्याचबरोबर तडजोड करण्याचीही इच्छा सतत वाढू लागली. मोठाली नगरे ताब्यात घ्यावीत असे वाटू लागले. जलाशय, स्थळे, अरण्ये, पर्वत आणि दुर्ग यांच्या रक्षणाचा उपाय व्हायला पाहिजे. चोरांनाही मारू नये अशी एक इच्छा सतत होऊ घातली. सर्व प्रजेची टीका सहन केली पाहिजे, आपले सैन्य विजय मिळविण्यासाठी पाठवावे अशी मोठी आकांक्षा उत्पन्न झाली. एकच्छत्री आधिपत्य असावे अशी स्पष्ट इच्छा मनात धरू लागली. लहान मुलांबरोबर खेळणे, इकडेतिकडे फिरणे आणि गायकांचे गाणे ऐकणे यात खूप रस निर्माण झाला. सतत विजयदुंदुभीचा आवाज कानावर पडणे, (आणि) अनेक प्रकारच्या वाद्यांचा ध्वनी ऐकणे, (आलोचन) यात कुतूहल वाढले. अलंकारादी सर्व वस्तूंबाबत वैराग्य (उत्पन्न होऊन) विप्रांना (दक्षिणा) देण्याविषयी तीव्र इच्छा झाली. अत्यंत आवडीने सर्व स्त्रियांत मोठेपणा (असावा), अठरा पुराणांचे मर्म समजावे यात आनंद वाढला. लौकिक आणि अलौकिक ज्ञानातील फरक लक्षात यावा, आणि मोठाल्या पागा असाव्यात अशी आवड वाढली. ज्यांच्या (गंडस्थळातून) मद गळत आहे, असे अनेक हत्ती पहावेत, अनेक रथशालांची रचना करावी यात आनंद निर्माण झाला. आपल्या सेवकांबद्दल सतत अभिमान (होताच). गौरीवल्लभाची पूजा करण्याविषयी मनात स्पष्ट औदासीन्य (आले). दीन, अनाथ, आंधळे यांच्या अनेकविध विनंत्या तत्काल पूर्ण कराव्यात, सर्व लोकांत मधुर भाषण (करावे), विलक्षण क्षमाबुद्धी उचंबळून आली. दाही दिशा जिंकण्याइतका आनंद नेहमी चित्तात दिसू लागला. आत्यंतिक दांभिक दूर (ठेवून) टाळावेत. वैष्णवांचा मोठा सन्मान करावा, विद्यावंत आणि ज्ञानवंत यांच्या रक्षणात मध्यम आवड, विनोद करणाऱ्यांना जास्तच

वित्त देण्यात रुची, बहुरूप्यांना आपल्या (नकलेच्या) कलेसाठी वस्त्रे वगैरे देऊन त्यांची काळजी घ्यावी.

**जलस्थलारण्यगिरिदुर्गेषु निजलीलया । उत्साहः स्थापने कश्चिदधिकृत्याधिकारिणाम् ।।४७ स्वबुद्धिलीलाविभवैरार्यकार्यप्रयोजनम् । दत्वा भयं दृढतरमापणानां प्रकल्पनम् ।।५० अन्योक्तिजल्पनं सर्वं कृत्वा निःस्पृहताधिकम् । कालातिक्रमणं भूयस्तरावेतनदापने ।। ५१ स्वकार्यसाधने साधुवचनं समयोचितम् । परोत्कर्षविमर्देषु प्रकर्षेण समुद्यमः ।। ५१ कार्योद्यते स्तुतिकथाहलनं कृतकर्मणि । दायादेषु कृपा काचिद्बहिः सज्जनसम्मता ।। ५२ वर्तनानां नवीनानां ग्रहणे प्रीतिरुन्नता । दापने चापि परमा निजप्रेष्येभ्य आदरात् ।। ५३ अभिलाषश्चिरतरं कुङ्कुमारुणवाससाम् । कस्तूरीतिलकस्यापि समीहा हृदयाम्बुजे ।। ५४ वधूटिकानामधिकं लोचनाभ्यां समीक्षणे । स्पृहेत्थं दोहदाः स्फारा बभुवुः शम्भुसुन्दरीम् ।। ५५ ये ये दोहदकाः केचित्समभूवन्दिने दिने । राजसायाः प्रपूर्णास्ते शम्भुराजकृपाभरैः ।। ५६ इत्थं ग्रहमिता मासा दिनानि कतिचित्पुनः । व्यतीयुर्दशमस्याऽपि राजसाया नृपस्त्रियः ।। ५७**

अर्थ – जलाशय, स्थल, अरण्ये, पर्वत, दुर्ग या ठिकाणी आपल्या नेहमीच्या रीतीने कोणाला तरी अधिकार देऊन अधिकारी नेमण्यात उत्साह होता. आपल्या बुद्धीच्या वैभवाने चांगले काम ठरवावे. खंबीरपणे अभय देऊन बाजाराची रचना करावी. इतर गोष्टी सांगून अधिक निःस्पृहता (आणावी). बरेच वेतन देववून कालक्रमणा करावी. आपले काम करून घेण्यासाठी समयोचित योग्य बोलावे. दुसऱ्यांचा (=शत्रूचा) उत्कर्ष हाणून पाडण्यासाठी मोठा खटाटोप करावा. कार्याला तयार झाल्यावर स्तुती करावी. काम झाल्यावर .... बाहेरून सज्जनांना मान्य होईल अशी वारसांवर दृष्टी असावी. नवीन (प्रकारच्या) वर्तनाच्या स्वीकाराविषयी मोठीच आवड असावी. तशीच मोठी आवड आपल्या सेवकांना आदरपूर्वक (काहीतरी) देवविण्यात असावी. कुंकवाचा लाल रंग असलेल्या वस्त्रांविषयी सतत इच्छा धरावी. मनामध्ये कस्तुरीचा टिळा (लावण्याचीही) इच्छा असावी. शंभूराजाच्या स्त्रीला डोहाळे वाढत राहिले. दिनानुदिन जे जे डोहाळे होत, ते राजसबाईच्या बाबतीत शंभूराजांच्या अतीव कृपेने पूर्ण झाले. अशाप्रकारे नऊ महिने आणि दहाव्याचेही काही दिवस निघून गेले.

### सूतिकागृहव्यवस्था -

**अथ सर्वोत्सवकरैः प्रगल्भमणिभित्तिके । विचित्रचित्ररुचिरचमत्कृतिविधायके ।।५८ गुडानिर्गुण्डिकाश्वेतसर्षपैर्निम्बपल्लवैः । अभितोऽभिवृते चारुवचाखण्डविराजिते ।।५८ परितो दृढसम्बद्धैः कृष्णतन्तुभिराचिते । कम्रैराम्रदलैर्द्योतद्द्वारोर्ध्वतनमण्डले ।। ५९ भिषग्वरैः सूतिकायाश्चिकित्सासुविचक्षणैः । बहिः समावृते दिष्टवेदिभिश्च समन्ततः ।। ६०**

अर्थ – भिंतींना मोठाले मणी सर्वांच्या आनंदासाठी लावले होते. नाना प्रकारांनी कुतूहल वाढविणारे सुंदर आणि आनंद देणारे असे ते (सूतिकागृह) होते. रुई, निर्गुंडी, पांढरी मोहरी, निंब यांच्या पल्लवांनी सर्व बाजूंनी ते (आकर्षक बनविले होते). सुंदर वेखंडाचे तुकडे त्यात पसरले होते. बाजूने काळे धागे पक्के बांधले होते. सुंदर आंब्याची पाने दरवाज्यांच्या वरच्या बाजूस (लावली होती.) प्रसूतिशास्त्रात निष्णात असलेले उत्तम वैद्य आणि भविष्यवेत्ते ज्योतिषी बाहेरच्या बाजूला गर्दी करून होते.

**अधिकं भौतिकैर्भूतबाधाहारिभिरावृते । दीपमालापरिवृते कुलस्त्रीभिरभिप्लुते ।। ६१**



**निबद्धकाण्डपटके चतुरैर्दृढपूरुषैः । एकविंशतिसङ्ख्याकमात्तैः प्राप्तमनोरथैः ।। ६२ धात्रीजनैरनुसृते सौविदल्लाभिरक्षिते । प्रसूतिकासूक्तजपपरैर्विप्रैरधिष्ठिते ।। ६३ चातुर्वर्ण्यभवैः कैश्चिद्वृद्धैः शुभविचिन्तकैः । बहिरावेष्टिते मन्त्रभग्नरक्षःकदम्बके ।। ६४**

अर्थ – भौतिक (बाधा) आणि भूतबाधा दूर करणारे मांत्रिकही होते. दिव्यांच्या मालिका सर्वत्र लावल्या होत्या. कुलस्त्रियांनी ते तुडुंब भरलेले होते. बलवान व चतुर सेवकांनी जाड पडदे बांधले होते. पूर्ण झालेले एकवीस मनोरथ दायांनी पार पाडले होते. अंतःपुरातील रक्षक (त्या सूतिकागृहाचे) रक्षण करीत होते. ब्राह्मण सुखप्रसूतीसाठी जप करीत होते. सर्व वर्णांचे काही वृद्ध शुभ चिंतीत बाहेर जमले होते. त्यातच मंत्रजपात विघ्न आणणारे काही राक्षसी प्रवृत्तीचेही होते.

### शाहूजन्म -

**अन्तःपुराभ्यन्तरस्थे ललिते सूतिकागृहे । शालिवाहनके शाके .... .... ।।६५ सौभाग्यसम्भृतातीव राजसा राजमानिता । शचीं जयन्तञ्च यथा प्रद्युम्नं रुक्मिणी यथा ।।६६ षडाननं शैलसुता यथा विष्णुं यथाऽदितिः । तथा बालार्कविलसदहर्दीधितिमुन्नतम् ।। ६७ साम्राज्यप्राज्यपदवीदायकैः पञ्चभिर्ग्रहैः । असूर्यगैरन्वितायां वेलायां सुषुवे सुतम् ।।६८**

अर्थ – अंतःपुरातील आतल्या बाजूस असलेल्या या सुंदर प्रसूतिगृहात राजसबाईने मुलाला जन्म दिला. शालिवाहन शके.... अतीव सौभाग्यसंपन्न आणि राजाच्या आदराला पात्र झालेल्या राजसबाईने, शचीने जयंताला, रुक्मिणीने प्रद्युम्नाला, पार्वतीने स्कंदाला, अदितीने विष्णूला, त्याप्रमाणे बालसूर्याप्रमाणे विलसणाऱ्या उन्नत सूर्यप्रकाशच जणू अशा बालकाला साम्राज्याचे मोठे स्थान देणाऱ्या पाच ग्रहांचा अस्त झाला नाही अशा वेळी जन्म दिला.

### बालकाचे वर्णन -

**सुश्लक्ष्णकुन्तलं चारुभालं कमललोचनम् । मुरारिमुरलीवेणुनासादण्डमनोहरम् ।। ६९ मनोज्ञश्रवणं राकानाथस्पर्द्धिमुखाम्बुजम् । पलाशकलिकाकारलसद्भ्रूयुगमण्डलम् ।। ७० समानगल्लमधिकं विलसद्गण्डयुग्मकम् । सुहनुं चारुचुबुकं मनोज्ञदशनच्छदम् ।। ७१ कम्बुग्रीवं वृषस्कन्धं दीर्घबाहुं विराजितम् । कपाटविलसद्वक्षस्तटं कम्रोदरश्रियम् ।। ७२ द्योतत्कोकनद्राकारकरं सुललिताङ्गुलिम् । मनोज्ञजङ्घायुगलं ललन्तं स्वीयतेजसा ।। ७३ कम्रोरुयुगुलप्रान्तं प्रस्फुरन्मणिबन्धकम् । ध्वजोर्ध्वरेखाकुलिशाङ्कुशभास्वत्पदाम्बुजम् ।।७४ शशरक्ततिरस्कारिनखकान्त्याभिमण्डितम् । षडुन्नतं षडात्यर्थनतं लक्षणलक्षितम् ।। ७५**

अर्थ – बालकाचे केस अतिशय तलम होते. कपाळ सुंदर होते. डोळे कमळाप्रमाणे सुंदर होते. नाक कृष्णाच्या मुरलीवेणूप्रमाणे मनोहर होते. कान सुंदर होते. मुखकमल पौर्णिमेच्या चंद्राशी स्पर्धा करीत होते. भुवया पळसाच्या कळीच्या आकाराप्रमाणे शोभिवंत होत्या. गळा मोठा आणि सारखा होता. दोन्ही गाल चमकदार होते. हनुवटी छान होती. दातांची शोभा मनोज्ञ होती. ज्या शंखावर तीन रेषा आहेत अशा शंखासारखी मान. (तीन रेषा शंखावर असणे हा शुभशकुन मानला जातो.), बैलासारखे (बळकट) खांदे, दीर्घ बाहू, रुंद छाती असून पोट (कंबर) सुंदर होते. हात रक्तकमलाप्रमाणे होते. बोटे अतिशय नाजूक होती. दोन्ही जंघा आकर्षक होत्या. स्वतःच्या तेजाने बालक स्वतःशीच खेळत होते. मांड्यांचा भाग कमनीय होता. मनगट स्फुरण पावत होते. पायाच्या तळव्यावर ध्वज, उभी रेख, वज्र, अंकुश अशी तेजस्वी चिन्हे होती. नखांची कांती सशाच्या रक्ताच्या वरचढ होती. सहा बाबतीत उन्नत आणि सहा बाबतीत खूप नत आणि (शुभ) लक्षणयुक्त

असे ते बालक होते.

**आनंदोत्सव –**

**धात्र्यः प्रभूताः प्रोद्भूतं सुतं वीक्ष्यातिविस्मिताः । ससम्भ्रमं विभ्रमेण प्रतीहारमुपाश्रिताः ।। ७६ नत्वाधिकं नरेन्द्राय शम्भवे शिवसूनवे । निवेदयामासुरुच्चैः सुतजन्म सुधोपमम् ।।७७ अथ महितजयश्रीः शम्भुनामा नरेन्द्रः समधिकगुणवृन्दैर्बन्दिभिः स्तूयमानः । समुदितनव-हर्षाद्धात्रिभिर्जल्पितं यत् सुतजननमुदग्रं तन्निशम्योदतिष्ठत् ।। ७८ उत्थायाऽथो विधायाभिष-वमतिरसाच्छम्भुराजः सचैलं दृष्ट्वा वक्त्रं सुतस्य प्रणयनवभराच्चिन्तयन्नादिमायाम् । विप्रेभ्यः सम्भृतेभ्यः कनकवितरणं कर्णवत्पूर्णहर्षोत्कर्षाच्चक्रे तदानीममरवरतरुर्वीक्षितो याचकौघैः ।। ७९ कारागारनियन्त्रणामधिगता ये पूर्वमत्युन्नतां दण्ड्याश्चण्डिमदण्डखण्डनिकरैर्ये दुर्जनाः केचन । ये द्वेष्या अपि पुत्रसम्भवमहोत्साहे प्रसन्नात्मना सर्वे ते शिवसूनुना नृपतिना श्रीशम्भुना मोचिताः ।। ८० वादित्राणां निनादैः सहरुचिरसितां मत्तकुम्भीन्द्रपृष्ठे ष्वारोप्य प्रौढहर्षात्सकलजनपदे पत्तने वापि भूयः । आबालं प्रीतियोगात्करसलिलरुहे दापयामासुरेके मौलेयाः प्रेष्यलोकाः क्षितितिलकसमा ज्ञापिना यातशोकाः ।। ८१ रूपाजीवा नवीना नलिनदलदृशो लास्यलीला–मतन्वत् नानागानानि चक्रुः परमरसभराद्गायनाश्चारुतानाः । नृत्यन्त्याराान्नटौघाः परमविटगणैः सम्भृताः केऽप्यकुर्वन् जाते श्रीशम्भुपुत्रे निभृतगुणगणश्रेणिमालापवित्रे ।। ८२ देवा हर्षमुपागमन्...भूतानि शुद्धान्यलं विप्रेन्द्रास्तुतुषुः प्रजाः परमिकामापू रतिं काञ्चन । दासीदास–गणाः प्रमोदभरिता भूपाः परे शत्रवश्चित्ते शम्भुनरेशसूनुजननं शल्यं दृढं मेनिरे ।। ८३**

अर्थ – त्या पुष्कळ दायांना अशा विलक्षण रूपात जन्मलेल्या बालकाकडे पाहून अतिशय आनंद झाला व आश्चर्य वाटले. त्या लगबगीने द्वाररक्षकाकडे गेल्या. शिवपुत्र शंभूराजाला लवून नमस्कार करून मुलाच्या जन्माचे अमृतोपम वृत्त मोठ्याने निवेदन केले. त्या श्रेष्ठ जयश्री मिळविलेल्या शंभूराजाची त्याच्याहीपेक्षा (द्वाररक्षकांपेक्षा) अधिक गुण असलेल्या कैद्यांनी स्तुती आरंभिली. अभिनव हर्षाने दायांनी सांगितलेले पुत्रजन्माचे मोठे वृत्त ऐकून राजे उभे राहिले. उठून शंभूराजे सचैल स्नान करण्याच्या इच्छेने मुलाचे तोंड पाहून प्रेमभराने आदिमायेचे चिंतन करू लागले. जमलेल्या ब्राह्मणांना, कान तृप्त करणाऱ्यांना अतीव आनंदाने सुवर्णदान दिले. त्यावेळी याचकांना कल्पतरूच दिसला. कारागृहात पूर्वी कडक शिक्षा झालेल्यांना, तीक्ष्ण दंड भोगणाऱ्यांना, दुर्जन आणि द्वेषी लोकांना त्या पुत्रजन्माच्या महोत्सवात प्रसन्न मनाने शिवसुत शंभूराजाने मुक्त केले. वाद्यांच्या कोलाहलासह मत्त हत्तीच्या पाठीवर चढून मोठ्या हर्षाने सर्व राज्यात व नगरात आनंदित झालेल्या सर्वांना हातावर तितकीच गोड साखर देवविली आणि जुन्या सेवकांना त्या राजेंद्राइतकेच आनंदित होऊन ते वृत्त कळविले. कमलनयना तरुण वेश्यांनी नृत्यकला सादर केली. गायकांनी सुंदर तानांसह अत्यंत आवडीने अनेक गीते गायली. प्रसिद्ध विटजनांसह काही नटही एकत्र जमून नृत्य करू लागले आणि शंभूपुत्राने आपल्या सुप्त गुणांनी पवित्र वातावरण निर्मिती केली. देवांना आनंद झाला. भूतेही बरीच सुधारली. ब्राह्मण संतुष्ट झाले. प्रजेला विलक्षण आनंद झाला. दास-दासी हर्षभरीत झाल्या. परंतु शत्रूराजांच्या मनात शंभूराजपुत्राच्या जन्माने शल्य दृढ केले.

**यः कर्णे शृणुयात्पठेद्रुचिभराद्यः पाठ्येच्छैक्षकान् श्रीशम्भोः सुतजन्म नर्मपरमोत्साहैः क्षितौ मानवः । सर्वं सो लभते मनोरथशतं प्रख्यातकीर्तिर्महापुत्रामात्यकलत्रबन्धुसुहृदां**



**मानैकमान्यो भवेत् ।। ८४**

**इत्यनुपुराणे सूर्यवंशे निवासकरपरमानन्दोद्भवगोविन्दकवीन्द्रप्रकाशितायामनेका-ध्यायसाधितायामंशावतरणे अध्यायः पुत्रजननं नाम ।**

अर्थ –जो मनुष्य श्रीशंभूच्या पुत्रजन्माचे हे वर्णन अत्यंत आवडीने ऐकेल व जो पृथ्वीवर विद्यार्थ्यांना आनंददायी अशा मोठ्या उत्साहाने सांगेल, त्याचे शंभर मनोरथ पूर्ण होऊन सर्वकाही प्राप्त होईल. त्याची कीर्ती सर्वत्र पसरून पुत्र, अमात्य, स्त्रिया, बांधव व मित्रही मोठे होतील आणि मान मिळून तो सर्वमान्य होईल.

अनुपुराण सूर्यवंश नेवासकर परमानंदपुत्र गोविंद कवींद्र प्रकाशित अनेक अध्यायसंहितेतील अंशावतरण 'पुत्रजनन' नावाचा अध्याय.

***

## परिशिष्ट १

# कवींद्र परमानंदा(?)चें परमानंदकाव्यम्

### परीक्षणात्मक लेख : श्री. य. ग. फफे

### (सह्याद्री मासिक, अंक ४, एप्रिल १९५३)

बडोदा ओरिएंटल सीरीजमधील १२०वा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्यास संपादकांनी 'कवीन्द्र परमानंदाचें परमानंदकाव्यम्'* असें नांव दिलें आहे. रियासतकार श्री. गो. स. सरदेसाई हे या ग्रंथाचे संपादक असून त्यांनी त्यास विस्तृत इंग्रजी प्रस्तावना जोडली आहे आणि सर यदुनाथ सरकार यांनी असाच विस्तृत इंग्रजी पुरस्कार लिहिला आहे. बडोदा येथील ग्रंथालयांत एक हस्तलिखित बाड होतें. त्यांत 'शाहूराजकीर्तिप्रभामंजरी' हें एक मराठी आणि इतर कांहीं संस्कृत ऐतिहासिक काव्य होतें. त्यांतील हें मराठी काव्य म. म. दत्तो वामन पोतदार गौरवग्रंथांत छापलें असल्यामुळे तें तेवढें वगळून बाकी या बाडांत जो संस्कृत भाग होता तो सर्व जशाचा तसा प्रस्तुत ग्रंथांत छापला आहे. संपादकांनी सुमारे साठ ठिकाणीं कांही शुद्धि सुचविली आहे; पण ती चौकटी कंसांत निराळी दाखविली आहे. हेतु असा की, ग्रंथ मूळ स्वरूपांत वाचकांच्या दृष्टीस पडावा. तथापि पदें तोडून लिहिणें व कांही अवग्रह देणें ही कार्ये संपादकांनी केलीं असावीं असें दिसतें.

संपादकांस मिळालेल्या हस्तलिखितावर पानांचे अंक नव्हते. यामुळे श्लोकांच्या व विषयाच्या अनुरोधाने तीं पानें क्रमवार जुळविणें त्यांस भाग पडलें. बहुतेक पानांची संगति लागली, त्यांचे त्यांनी विषयास अनुसरून पांच विभाग पाडले आणि ज्या पानांची संगति त्यांस लावतां आली नाही तीं सहा पानें 'असंगत' म्हणून त्यांनी निराळी छापलीं आहेत. यांतील ४ पानें पृष्ठ १०० ते १०२ वर एका स्वतंत्र अध्यायाच्या रूपाने छापलीं असून बाकीचीं २ पानें पृ. १५३ व १५४ यांवर छापलीं आहेत. माझ्या मतें या सहाहि पानांची संगति नीट लागते. तसेंच, संपादकांनी जो तिसरा विभाग केला आहे, त्यांत प्रारंभापासून चौथ्या अध्यायाच्या ३८व्या श्लोकापर्यंत (पृ. ४४) संभाजीच्या राज्यारोहणाचें वर्णन असून तें चालू असतांच ३९व्या श्लोकापासून अचानकपणें शिवाजीच्या चरित्रांतील वर्णन सुरू होतें व तेंच या विभागाच्या अंतापर्यंत चालतें. अशी विलक्षण विसंगति ह्या विभागांत झाली आहे. ही विसंगतिहि या 'असंगत' पानांचा क्रम नीट लावल्यावर दूर होते.

**असंगत पानांची व्यवस्था** – (१) पृष्ठ ७ वरील ४६व्या श्लोकापुढे ४७व्या श्लोकाचा "राजानो बहवो धृताः खलु" एवढा अर्धाच चरण आला आहे. त्या चरणाचा पुढील अर्धा भाग "सुरत्राणीयसैन्यास्तथा" हा व येथून पुढील काव्यभाग पृ. १५३/१५४ वर असंगत म्हणून पोथीचीं जीं दोन पानें छापलीं आहेत त्यांत प्रारंभापासून क्रमाने आलेला आहे. अर्थात् त्या दोन पानांचें स्थान पृष्ठ ७ वर 'राजानो बहवो धृताः खलु' हा जो अर्धा चरण आहे त्याच्यापुढे आहे हें उघड आहे. अशा प्रकारें या दोन पानांची संगति लागते.

(२) असंगत चार पानांचा जो अध्याय पृ. १०० ते १०२ वर छापला आहे, त्यांत १ ते ३८

* 'Paramananda Kavya of Kavindra Paramananda', edited by G. S Sardesai (Kamshet, Dist. Poona), 1952, Oriental Institute, Baroda - Pp. 31 + 183 + 3; Price Rs. 10.



श्लोक शिवाजीच्या वर्णनांतील आणि ३९ पासून पुढील अध्यायसमाप्तीपर्यंतचे श्लोक संभाजीच्या राज्यारोहण प्रकरणांतील आहेत. तिसऱ्या विभागांतील चौथ्या अध्यायांत याच्या बरोबर उलटा प्रकार झालेला आहे. त्यांत १ ते ३८ श्लोक संभाजीच्या राज्यारोहण प्रकरणांतील आहेत आणि ३९व्या श्लोकापासून पुढे अध्यायसमाप्तीपर्यंत शिवाजीच्या वर्णनांतील भाग आहे. म्हणजे ह्या दोन्ही अध्यायांत वडाची साल पिंपळाला आणि पिंपळाची साल वडाला असा प्रकार होऊन हे दोन्ही अध्याय गंगाजमनी झाले आहेत. या दोन अध्यायांच्या द्वितीय भागांची अदलाबदल केल्याने हे दोन्ही अध्याय सुसंगत होतात. अशा प्रकारें असंगत म्हणून बाजूस टाकलेल्या चार पानांची संगति नीट लागते आणि त्याबरोबरच हा असंगत म्हणून बाहेर टाकलेला अध्याय मुळांत चौथ्या अध्यायापुढे घेतां येऊन तेणेंकरून तिसऱ्या भागांतील विषयाची विसंगतिहि दूर होते.

**एकाचे दोन विभाग आणि दोहोंचा एक विभाग** – असंगत म्हणून बाजूस टाकलेलीं चार पानें वरील प्रकारें मुळांत समाविष्ट केल्यावर या संपादककृत तिसऱ्या विभागाचे दोन स्वतंत्र विभाग पडतात. त्यांत पहिल्या चार अध्यायांचा एक विभाग होतो, त्यास विषयास अनुसरून 'संभाजीचें राज्यारोहण' असें नांव देतां येईल. तसाच पुढील १० अध्यायांचा दुसरा विभाग पडतो त्यास 'शिवाजीचें राज्याभिषेकोत्तर चरित्र' असें नांव साजेल.

संपादकांनी केलेल्या चौथ्या व पांचव्या विभागांत मिळून (पृ. १०३ ते १८३) वस्तुतः बारा अध्यायांचें एक स्वतंत्र काव्य आहे. त्याचा कर्ता परमानंदाचा नातू गोविंद हा असून काव्याचा विषय 'शाहूचा जन्म' हा आहे. शाहू हा विष्णूच्या आदिमायेचा अंशावतार अशी कल्पना करून कवीने या काव्यास 'अंशावतरण' हें नांव दिलें आहे. हें नांव बारांपैकी पहिल्या अध्यायापासून सुरू होतें व बाराव्या अध्यायाच्या अंतींहि आढळतें. सर्व शत्रूंस जिंकून मोठें राज्य संपादिलें पण आपणास पुत्र नाही अशी चिंता पहिल्या अध्यायांत व्यक्त करून पुत्रप्राप्तीस्तव कोणतें अनुष्ठान करावें, असें संभाजी मंत्र्यांस विचारतो; ते शिवयोगी याचें मत घेण्यास सांगतात; शिवयोगी तंत्रोक्त पद्धतीने कालीचें आराधन करण्यास सांगतो; तसें केल्यावर काली प्रसन्न होते; आणि पुढे राजपत्नी शिर्के-कुलोत्पन्न राजसा (येसूबाई) हिच्या उदरीं शाहूचा जन्म होतो, असें या बारा अध्यायांतलें एकरूप कथासूत्र आहे. तसेंच प्रथमाध्यायाच्या प्रारंभीं नमन आणि बाराव्या अध्यायाच्या अंतीं फलश्रुति घालून कवीने आपल्या या काव्यास शिक्कामोर्तब केलें आहे. अशा ह्या एकरूप काव्याचे चौथा व पांचवा असे दोन विभाग न पाडतां बारा अध्यायांचा एकच विभाग केला पाहिजे हें उघड आहे.

वर दाखविल्याप्रमाणें संपादककृत तिसऱ्या एका विभागाऐवजी दोन विभाग आणि त्यांनी केलेल्या चौथ्या व पांचव्या विभागांचा मिळून एकच विभाग केल्यावर या ग्रंथाचे जे पांच विभाग होतील त्यांस क्रमाने पुढील नांवें देतां येतील:- १ भोसलकुलप्रशस्ति. २ शिवाजीचें राज्याभिषेकोत्तर चरित्र. ३ राजारामास गादीवर बसविण्याचा व्यूह. ४ संभाजीचें राज्यारोहण. आणि ५ अंशावतरण. आता या पांच विभागांतील विषयांचें स्वरूप थोडक्यांत पाहूं.

**१. भोसलकुलप्रशस्ति** – हें एक स्वतंत्र काव्य असून तें प्रायः शार्दूलविक्रीडित, स्त्रग्धरा अशा मोठ्या वृत्तांत रचलेलें आहे. याचे पहिले तीन श्लोक उपलब्ध नाहीत. त्यांत मालोजीचें वर्णन असणार हें संदर्भावरून दिसतें. ४ ते २० या श्लोकांत शहाजीचें वर्णन असून त्यापुढील तीस-बत्तीस श्लोक शिवाजीच्या वर्णनाचे आहेत आणि त्यापुढे उणेपुरे शंभर श्लोक संभाजीच्या वर्णनपर आहेत. संभाजीच्या आश्रयास आलेला औरंगजेबाचा पुत्र अकबर हा इराणास गेला येथवरचा म्हणजे

१६८७ पर्यंतचा वृत्तान्त यांत आला आहे. ही प्रशस्ति संभाजीच्या कोणा आश्रित कवीने त्याच्या कारकीर्दीत लिहिलेली दिसते. ही अपूर्ण असल्याने तींत कवीचा उल्लेख आलेला नाही. तथापि दीर्घ वृत्तें, 'मिलाप', 'लंच', 'सलाह' यांसारख्या परकीय शब्दांची योजना व भिन्न भाषासरणी यांवरून ही प्रशस्ति परमानंदकृत नव्हे हें निश्चित होय. पुरस्कारांत अशी कल्पना केली आहे की, अन्य कोणीं केलेलें हें काव्य ठाकठीक व शुद्ध करून देण्याचें परमानंदानें मान्य केलें असावें. पण अशा येन केन प्रकारेण या प्रशस्तीचा परमानंदाशी संबंध जोडण्याची कांही आवश्यकता दिसत नाही.

**२. शिवाजीचें राज्याभिषेकोत्तर चरित्र** – या भागांतील विषय पुढीलप्रमाणें वर्णिला आहे. शिवाजीस वैदिक पद्धतीने राज्याभिषेक होऊन तो धर्मानें राज्य करूं लागला तेव्हा कलीने शंकराकडे जाऊन गाऱ्हाणें केलें की, तुम्हीं मला हें युग दिलें असता भूलोकीं शिवाजी हा कृतयुग निर्माण करीत आहे हें काय? यावर शंकराने त्यास आश्वासन दिलें की, शिवाजी हा माझ्याच गणाचा अवतार आहे, त्यास मी लवकरच परत बोलावितों; मग तुझें राज्य अकुंठित होईल. नंतर कलीच्या प्रेरणेने मोहमत्सरादिकांनी शिवाजीच्या मंत्र्यांमध्ये प्रवेश केला. त्यांनी नाना प्रकारचे कर बसवून प्रजेस नागवलें. शिवाजीसहि मोठा द्रव्यलोभ सुटला. तो स्त्रीलंपट होऊन सोयराबाईच्या ओंजळीने पाणी पिऊं लागला. संभाजी हा सर्वगुणसंपन्न आदर्श राजपुत्र असतां व त्याच्या वर्तनांत दोषाचा लवलेश नसतां त्यास बाजूस सारून राजारामास महाराष्ट्राचें राज्य देण्याचें शिवाजीने योजिलें. संभाजीस श्रृंगारपूर येथे ठेवून शिवाजी कर्नाटकाच्या स्वारीस गेला. तिकडून तो परत आल्यावर मोरोपंतादिकांनी कागाळी केली की, संभाजी हा प्रजेशीं फार प्रेमाने वागतो; तीस धाकात ठेवीत नाही. व तो मोंगलांचें साह्य घेऊ इच्छितो. या कागाळीवरून शिवाजीने संभाजीस सज्जनगडावर नजरकैदेंत ठेवलें. तेथे देवीने स्वप्नांत येऊन त्यास दिलीरखानाकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणे जाऊन पुढे संभाजीने शिवाजीचा भूपाळगड मोठ्या पराक्रमाने हस्तगत केला. अशा प्रकारचें वर्णन या विभागांत केलेलें आहे. यांतील कांही अध्यायांच्या शेवटीं परमानंदकृतौ किंवा परमानंदप्रकाशितायां असा उल्लेख असून भाषासरणीहि कांही अंशी परमानंदाच्या पद्धतीची आहे. तसेंच यांत एका स्थळीं मनीषींच्या तोंडी 'परमानंदा', असें संबोधनहि योजिलेले आहे. यावरून संभाजी गादीवर आल्यानंतर त्याची मर्जी सुप्रसन्न करून घेण्यासाठी स्वत: परमानंदानेच हें काव्य रचलें आहे असें संपादक व पुरस्कारक मानतात. पण मला तें संभवनीय वाटत नाही. परमानंद आणि शिवाजी यांचे संबंध लक्षांत घेतां परमानंदाने असलें विकृत कल्पनांनी भरलेलें कवित्व केलें असणें मला शक्य दिसत नाही. शिवाय सन १६७३ पूर्वीच परमानंद विरक्त गोसावी होऊन पोलादपूर येथे मठांत राहिला होता. पन्हाळ्यास जातांना शिवाजीने पायउतारा होऊन त्याच्या दर्शनास जाऊन त्याचा आशीर्वाद घेतला, इत्यादि वर्णन जयरामाने केलें आहे. अशा अवस्थेस पोचल्यानंतर परमानंद गोसावी इतक्या खालच्या पायरीवर उतरेल हें सुतरां अशक्य होय. परमानंदाच्या मुलाने असो वा शिष्याने असो, त्याच्या भाषासरणीशीं परिचित अशा कोणा स्तुतिपाठकाने केलेलें हें कवित्व आहे व तें त्याने परमानंदाच्या नांवावर खपविण्याचा यत्न केला आहे, हें उघड आहे. असले प्रकार कित्येक आढळतात.

**३. राजारामास गादीवर बसविण्याचा व्यूह** – शिवाजीच्या मृत्यूनंतर रायगड येथे राजारामास गादीवर बसवावें असा बेत सोयराबाई आणि अण्णाजी दत्तो, मोरोपंत पिंगळे वगैरे मुत्सद्दी यांनी कसा केला याचें वर्णन या दीड अध्यायाच्या अपूर्ण विभागांत केलेलें आहे. हें वर्णन परमानंदकृत नव्हे असें संपादक व पुरस्कारक मानतात तें युक्तच आहे.



**४. संभाजीचें राज्यारोहण** – संभाजीने पन्हाळ्यावर शिवाजीचें उत्तरकार्य केलें. प्रल्हाद निराजी, सेनापति हंबीरराव मोहिते इत्यादिकांचें साह्य त्यास मिळालें आणि त्याने रायगड हस्तगत करून तेथे आपणांस राज्याभिषेक करून घेतला, हा वृत्तांत या विभागांत आला आहे. संपादक हा विभाग परमानंदकृत मानतात; पण दुसऱ्या विभागाप्रमाणेच हाहि विभाग संभाजीची अवास्तव अतिरिक्त स्तुति करणारा असून त्यांत संभाजीने सोयराबाईस फार आदराने वागविल्याचें वर्णिलें आहे. अण्णाजी दत्तो वगैरेंस शासन केल्याचा यांत उल्लेखहि नाही. यात राज्याभिषेक विधीचें जें वर्णन केलें आहे त्यावरून या विधीविषयी कवीचें पूर्ण अज्ञान व्यक्त होतें. पौरंदरशांति, विष्णुपूजन, सिंहासनारोहण वगैरे महत्त्वाचीं अंगेहि यांत उल्लेखिलेली नाहीत आणि अभिषेकाच्या वेळीं राजपत्नी सन्निध असावी लागते याचेंहि स्मरण कवीस झालेलें नाही. परमानंदासारख्या ज्ञात्या पंडिताने असलें वर्णन केलें असणें अशक्य होय.

**५. अंशावतरण** – या द्वादशाध्यायात्मक स्वतंत्र काव्यांत कोणता विषय आहे तें मागे संक्षेपत: सांगितलें आहेच. संभाजीचा अमात्य कवि कलश हा कालीचा भक्त होता; तो तांत्रिक पद्धतीने जारण-मारणादि प्रयोग करीत असे. संभाजीची त्याजवर भक्ति होती; शिवयोगी, गणेशभट्ट जांबेकर यांसारखे एकदोन महाराष्ट्रीय तंत्रविद्या शिकून आलेहि असतील; हें सर्व सत्य मानलें तरी गोविंद कवीने 'अंशावतरण' काव्यांत वर्णिल्याप्रमाणे संभाजी खरोखरच पुत्रप्राप्तीस्तव आतुर झाला होता व त्याने तांत्रिक विधीने पुत्रेष्टि केली हें ऐतिहासिक सत्य नव्हे.

**पुत्रेष्टि ही काल्पनिकच** – संपूर्ण 'अंशावतरण' काव्य निव्वळ काल्पनिक आहे. संभाजीने जिंकलेल्या शत्रूंचीं इंग्रज, डच, पंजाबी, चिनी, सिंहली इत्यादि वीस-पंचवीस नांवेंकवीने सांगितलीं आहेत. तसेंच अंकित केलेलीं मावळें व गांवें यांचीं शंभरांवर नांवें पहिल्या अध्यायांत गोवलेली आहेत. कवीने आपलें सारें भूगोलज्ञान येथे ओतलें आहे! हें वर्णन जसें काल्पनिक तशीच संभाजीची पुत्रप्राप्तीची चिंताहि काल्पनिकच आहे. कारण शाहूचा जन्म १८ मे १६८२ चा; तत्पूर्वी नऊ-दहा महिने पुत्रेष्टिची समाप्ति; ती इष्टि सत्राप्रमाणे बहुतकाल चाललेली होती. म्हणजे तिचा प्रारंभकाल निदान १६८१ चा एप्रिल-मे धरावा लागतो. संभाजीचा राज्याभिषेक १६८१ तच झाला. त्यानंतर त्याने सर्व शत्रूंस जिंकलें केव्हा? पुत्रप्राप्तीस्तव वैदिक पद्धतीचीं व्रतानुष्ठानें केलीं केव्हा? व त्यांनी फलप्राप्ति होणें नाही असें दिसल्यामुळे तांत्रिक पद्धतीकडे तो वळला केव्हा? हें काय सारें दोनतीन महिन्यांत घडलें? दशरथाप्रमाणे पुत्रेष्टि करावयास या वेळीं संभाजीचें वय तरी असें कितीसें झालें होतें? त्याचा जन्म १६५७ सनांतला; १६८१ त त्याचें वय २४ येतें; त्याच्या पत्नीची विशीहि उलटलेली नसेल! अर्थात् संभाजी पुत्रप्राप्तीविषयी चिंतातुर झाला होता इत्यादि सर्वच कविकल्पनाविलास आहे, इतिहास नाही. पृष्ठ १६१ वर सुरू झालेल्या अध्यायांत पुत्रेष्टिचें म्हणून जें वर्णन केलें आहे तेंहि मोठें विचित्र आहे. त्यांत गणपतीचा व दुर्गेचा जप, सूर्यनमस्कार, शंकरास अभिषेक, विष्णूचीं उपोषणें, नवग्रहमंत्रजप, अनेक देवतांचे आराधन, पिंपळास व तुळशीस प्रदक्षिणा, सहस्रनामें व कवचें यांचें पठन, खाली डोकें वर पाय करून उभें राहणें, एकाशन, नक्तभोजन, धारणें-पारणें, फलाहार, पर्णाशन, वातभक्षण, एक किंवा दोन्ही हात उंच करून उभें राहणें, डावा किंवा उजवा पाय डोक्यावर चढवून उभें राहणें असलेंच सर्व कांही आहे! सारांश, संभाजीने इंग्रज, डच, तुर्क यांस जिंकलें हें जसें काल्पनिक, तशीच त्याची तांत्रिक पद्धतीची पुत्रेष्टि देखील काल्पनिकच होय.

येथवर प्रतिपादिल्याप्रमाणे प्रस्तुत ग्रंथांतील काव्याशीं कवींद्र परमानंदाचा कांही संबंध नसला आणि यांतील काव्यें शिवभारताइतक्या उच्चतेची नसलीं तरी तीं समकालीन कवींचीं काव्यें आहेत या दृष्टीने त्यांचें महत्त्व आहेच. त्यांच्या योगाने कांही तत्कालीन ऐतिहासिक घटनांवर नवा प्रकाश पडतो आणि सामाजिक व वैचारिक माहितीहि बरीच कळते. दिग्दर्शनार्थ यांचीं कांही उदाहरणें आता पाहूं.

**संभाजीचा कलशाभिषेक** – शिवाजी कर्नाटकाच्या स्वारीहून परत येतांच संभाजीच्या वागणुकीसंबंधी कागाळी त्याच्या कानीं गेली असावी. संभाजीवर कांही राज्यकारभाराचा भाग सोपविल्यास त्यांत मन गुंतून तो ताळ्यावर येईल असें शिवाजीस वाटलें असावें व त्यासाठी त्याने यौवराज्याभिषेकासारखा 'कलशाभिषेक' या नांवाचा कांही समारंभ केला असावा, असें पहिल्या विभागांतील ६२व्या श्लोकावरून दिसतें. हा श्लोक पृ. ९ वर पुढीलप्रमाणे छापिलेला आहे :-

**युग्माम्बरा रक्षति वृत्तिचित्रे । चैत्रे सिते वत्सरकालयुक्ते ।।**
**काम्यातिथौ तत्कलशाभिषेकः । कामं चमत्कारततिं चकार ।।६२।।**

तत्कलशाभिषेक म्हणजे संभाजीचा कलशाभिषेक हें संदर्भावरून समजतें. हा कलशाभिषेक केव्हा झाला तें त्याच्या वरच सांगितलें आहे. काम्यातिथि म्हणजे चैत्र शु।। एकादशी. चैत्र शुद्ध एकादशीचे नांवच कामदा एकादशी असें आहे. छंदासाठी कवीने कामदा याऐवजी काम्या हा शब्द योजिला आहे हें उघड आहे. कालयुक्त संवत्सराचा शक १६०० हा येतो, तो या श्लोकांत सांगितला आहे की नाही? प्रथम चरणांतील 'युग्माम्बरा रक्षति' या शब्दांचा कांही सुसंगत अर्थ लागत नाही. यांतील रक्ष या अक्षरांचे ठायीं रिक्षि असा फरक धरून पाहा. मग युग्माम्बराररिक्षिति असें होतें. युग्माम्बर म्हणजे दोन शून्यें; अरि म्हणजे सहा आणि क्षिति म्हणजे एक म्हणून युग्माम्बराररिक्षिति = १६०० हा शक संवत्सराशीं बरोबर जमतो. म्हणून कवीने योजिलेलें मूळ रूप रिक्षिति हेंच होय. नक्कल करणारास रिक्षिति हें अशुद्ध वाटून त्यानें आपल्या समजुतीप्रमाणें रक्षति असे शुद्ध केलेलें उघड दिसतें; आणि प्रस्तुत बाड ही संपादक समजतात त्याप्रमाणे कवीच्या हातची मूळ प्रत नसून नक्कल आहे हेंहि या जावई शोधावरून सिद्ध होतें. पृष्ठ २१ वरील १४३ व १४४ हे संभाजीच्या वर्णनाचे श्लोक मागे शिवाजीच्या वर्णनांत ४३ व ४४ या क्रमांकांस अक्षरशः जसेच्या तसे अस्थानीं आलेले आढळतात. अशी चुकी नक्कल करितांनाच होणें शक्य आहे. प्रस्तुत बाड ही नक्कल असल्याचे असेच दुसरेहि अनेक पुरावे दाखवितां येतील. संभाजीचा कलशाभिषेक ही ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची गोष्ट प्रस्तुत काव्यानेच आपणांस प्रथम कळत आहे.

**संभाजीचा राज्याभिषेक** – संभाजीच्या राज्याभिषेकाची मिति याच्याच पुढल्या ६३व्या श्लोकांत पुढीलप्रमाणे दिली आहे:-

**राजन्नेत्रनभोङ्गभूमिभरिते रौद्राद्गते रौद्रके ।**
**माघे मासि सिते रथोत्सवदिने मुख्ये मुहूर्ते शुभे ।।६३।।**

नेत्र = २; नभ = ०, अंग = ६ आणि भूमि = १ म्हणून नेत्रनभोंगभूमि म्हणजे १६०२. हाच शक रौद्र संवत्सराचा येतो. रथोत्सवदिन म्हणजे रथसप्तमी. याप्रमाणें शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे माघ शु ।। ७ या मितीस संभाजीला राज्याभिषेक झाला, असें या श्लोकांत सांगितलें आहे. जेधे शकावलींत राज्याभिषेकाची हीच मिति दिलेली आहे, तीस या काव्यांतील उल्लेखाने दुजोरा मिळतो. पुरस्कारांत पहिल्याच पानावर The coronation of Sambhaji in July 1680 असें म्हटलें



आहे; पण त्या वेळीं झाला तो राज्याभिषेक नव्हे, तें मंचकारोहण आहे. हे दोन विधि भिन्न आहेत. संभाजीचे मंचकारोहण आणि त्याचा राज्याभिषेक दोहोंच्याहि मित्या जेधे शकावलींत दिलेल्या आहेत. वरील श्लोकावर संपादकीय टीप Shivaji's date : April 3rd रौद्र अशी आहे. ती येथे गैरलागू आहे हें सांगणें नकोच.

**सोयराबाई शिरक्यांची कन्या की मोहित्यांची ? :** सोयराबाई ही शिरक्यांची कन्या असें ग्रँट डफने म्हटलें आहे तेंच खरें असें रियासतकार सरदेसाई, सर युदनाथ सरकार इत्यादि मोठमोठे इतिहासकार मानितात. पण प्रस्तुत काव्यग्रंथांतील तीन विभागांत प्रायः तीन भिन्न संभाजीसमकालीन कवींनी सोयराबाई ही मोहित्यांची कन्या असें एकंदर चार ठिकाणीं स्पष्टपणें सांगितलें आहे. पाहा:-

१) पृष्ठ ८ श्लोक ५४ – महितान्वये जाता. २) पृष्ठ २९ श्लोक १०७ – मोहितवंशजा.
३) पृष्ठ ४५ श्लोक ४५ – मोहितान्वयसंभवा. ४) पृष्ठ ५२ श्लोक १६ – मोहितवंशजा.

बृहदीश्वर शिलालेखांत सोयराबाई ही मोहिते कुळांतलीच सांगितली आहे आणि सभासदानेंहि तेंच म्हटलें आहे. सभासद हा भोसले घराण्याशीं दृढपरिचित होता. त्याने शिवाजीची उत्तर कारकीर्द तरी खास पाहिली होती. शिवाजीच्या मृत्यूनंतर अवघ्या सतराच वर्षांनी राजारामाच्या आज्ञेने त्याने शिवाजीचें चरित्र लिहिलें आहे. त्यांत राजारामाच्या मातुलवंशाचें आडनांव चुकीचें दिलेलें असतें तर तें त्यांत राजारामाने राहूंच दिलें नसतें असें मला वाटतें. सभासदास प्रस्तुत काव्यांत समकालीन कवींचा मोठाच आधार मिळत आहे. हा नवीन पुरावा पुढे आल्यानंतर आता इतिहासाभ्यासकांनी या प्रश्नाचा पुन्हा विचार करणें प्राप्त आहे.

हा विचार आणखी एका दृष्टीने करतां येतो तो असा:- शिवाजीने प्रौढपणी जीं लग्नें केलीं त्यांत शिरक्यांच्या मुलीशीं लग्न केल्याचा उल्लेख कोठेहि आढळत नाही. तेव्हा त्याच्या बालपणीं सन १६४० व १६४१ मध्ये त्याच्या आई-वडिलांनी त्याचीं जीं दोन लग्नें करून दिलीं त्यांपैकीच एक शिरक्यांच्या मुलीशीं झालें असलें पाहिजे व तसे उल्लेखहि आढळतात. शिवाजीचें पहिलेंच लग्न शिरक्यांच्या मुलीशीं झालें असें चिटणीस व शिवदिग्विजयकार सांगतात. तें लग्न पहिलें असो वा दुसरें असो, त्याचा काल सन १६४१ च्या पुढे जात नाही हें निश्चित होय. लग्नांत ही मुलगी पांच-सहाच वर्षांची होती असें मानिलें तरी सन १६८०त तिची पंचेचाळिशी उलटते. या सुमाराचें सोयराबाईचें जें वर्णन आढळतें तें पंचेचाळिशी उलटलेल्या बाईचें खास नाही. सर यदुनाथ सरकार youthful wife of Shivaji असें सोयराबाईचें वर्णन करितात, तें पंचेचाळिशींतल्या शिरकेकुलोत्पन्न स्त्रीस साजत नाही. म्हणून सोयराबाई ही बालपणीं झालेल्या दोन लग्नांपैकी नसावी; प्रौढपणीं शिवाजीने जीं लग्नें केलीं त्यांपैकी असावी आणि म्हणून ती मोहितेकुलोत्पन्न असावी असें म्हणणें प्राप्त होतें. एवंच इतिहासतज्ज्ञांनी एतद्विषयक पुराव्यांचा पुन्हा विचार करणें अवश्य आहे असें सुचवावेंसें वाटतें.

**रघुनाथभट्ट पंडितरावाचा क्षयाने अन्त** – शिवाजीचे पंडितराव रघुनाथभट्ट उपाध्ये हे क्षयरोगाने मृत्यु पावले ही माहिती प्रस्तुत ग्रंथाने नवीनच उपलब्ध होत आहे. पृष्ठ १५२ वरील १२वा श्लोक असा आहे:-

**रघुनाथः क्षयाविष्टो विशिष्टोऽपि धरातले ।**
**प्रययावतिवेगेन दिदृक्षुरमरावतीम् ।।१२।।**

शिवाजीच्या मृत्यूपूर्वी थोडेच दिवस रघुनाथभट्ट पंडितराव वारले असावे असें येथील संदर्भावरून

दिसतें. हे रघुनाथभट्ट पंडितराव राजारामाच्या कारकिर्दीत तंजावरास स्थायिक होऊन राहिले असा उल्लेख पंडितराव बखरींत आहे, तो प्रस्तुत श्लोकाने खोटा ठरतो तसेंच हे पंडितराव तंजावरास स्थायिक झाल्यानंतर तेथे त्यांनी 'नलदमयंती स्वयंवराख्यान' रचिलें असें कित्येक म्हणतात त्यास कांहीच आधार रहात नाही, हें सांगणें नकोच.

**प्रतिनिधिपद मूळ कोणीं निर्मिले?** – प्रतिनिधिपद राजारामाने प्रथम निर्माण केलें अशी सर्वसामान्य समजूत आहे. राजाराम फार दूर जिंजी येथे राहत असल्यामुळे इकडे महाराष्ट्रांत सर्वाधिकारसंपन्न असा कोणी राजप्रतिनिधि असावा अशी आवश्यकता साहजिकपणेंच भासली व म्हणून राजारामाने हें नवें पद निर्माण केलें आणि प्रल्हाद निराजी यास पहिला राजप्रतिनिधि नेमलें अशी समजूत आहे. पण जी आवश्यकता पुढे राजारामास भासली तीच तत्पूर्वी जेव्हा शिवाजी दीर्घकालीन कर्नाटकाच्या मोहिमेवर निघाला तेव्हा त्यासहि भासली असणें शक्य वाटतें.

प्रस्तुत ग्रंथांतील पृ. ५१ श्लोक १२४ पाहा :-

**राजप्रतिनिधिराहुरित्याहुर्यं विचक्षणाः ।।**

यांत राजप्रतिनिधि हें पद आलें आहे. या पदावर ज्याला राहु (=राव=रावजी) म्हणत त्याची नेमणूक झाली होती. हीच गोष्ट पृ. ६८ वरील पुढील श्लोकांनी व्यक्त होते.

**अथ सह्यपतिर्जेतुं देशं कर्णाटमुद्यतः ।**
**सुदिने कारयामास प्रयाणपटहं प्रभुः ।।१।।**
**न्यस्य सूनुं कनीयांसं रैंगिरौ गिरिपूजिते ।**
**यथार्हसैन्यसहिते रहिते स्वेतरैनरैः ।।२।।**
**आत्मनश्च प्रतापेन प्राप्तेन पदमुत्तमम् ।**
**द्विजातिजातिना तेन राहुणा प्रतिपालिते ।।३।।**

वरील श्लोकांत उल्लेखिलेलें हें 'उत्तम पद' म्हणजे राजप्रतिनिधिपद होय. शिवाजीनें कर्नाटकच्या स्वारीस निघतांना जी व्यवस्था करून ठेविली तींत रायगडावर राहु नामक ब्राह्मणास राजप्रतिनिधि नेमिलें असें यावरून दिसतें. या पदावर नेमिलेला हा राहु म्हणजे रावजी सोमनाथ असावा. पूर्वी संभाजीच्या नांवें बादशहाकडून पांच हजार स्वारांची मनसबदारी मिळाली होती, तेव्हा खर्चासाठी वऱ्हाड व खानदेश हे प्रांत तोडून मिळाले होते, त्यांवरचा मराठ्यांचा सर सुभेदार हांच रावजी सोमनाथ होता. शिवाजीच्या अंतकाळीं त्याच्या विशेष विश्वासाचे जे मुत्सद्दी होते त्यांत रावजी सोमनाथाची गणना केलेली आहे. याची रायगडावरील प्रमुखपदीं नेमणूक करितांना शिवाजीने राजप्रतिनिधि ही संज्ञा योजिली असेल तर राजारामाने प्रथमच प्रतिनिधिपद निर्माण केलें ही प्रचलित समजूत बदलावी लागेल.

**संपादकांची कांही चुकीचीं विधानें** – प्रस्तावना व पुरस्कार यांतील कांही विधानें निराधार किंवा चुकीचीं वाटतात तींहि येथे निदर्शनास आणणें अवश्य वाटतें.

१) शिवराजराज्याभिषेककल्पतरूचा कर्ता निश्चलपुरी असें पुरस्कारांत म्हटलें आहे, पण त्याचा कर्ता निश्चलपुरी नसून बर्वेकुलोत्पन्न गोविंद असल्याचें त्या काव्यांतच सांगितलें आहे.

२) पन्हाळा घेण्यास अण्णाजी दत्तोबरोबर गेलेल्या कोंडाजी फर्जंदास प्रस्तावनेंत कोंडाजी रवळेकर म्हटलें आहे. पण 'पर्णालपर्वतग्रहणाख्यानां'त गणाजी व मोत्याजी असे दोन रवळेकरबंधु सांगितले आहेत. कोंडाजी निराळा आहे, तो रवळेकर नव्हे.



३) पोलादपूर रायगडाच्या पायथ्याशीं (At the foot of Raigad) आहे असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. पण रायगडाच्या पायथ्याशीं पाचाड आहे. पोलादपूर २२-२३ मैल दूर आहे.

४) परमानंद कर्नाटकांत शहाजीच्या दरबारीं होता असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. पण शहाजीच्या आश्रयास असलेल्या पंडितांची व कवींची नांवनिशी 'राधामाधवविलासचंपू'त आहे, त्यांत परमानंदाचें नांव नाही.

५) संभाजीच्या राज्याभिषेकास कवींद्र परमानंद उपस्थित असलाच पाहिजे, असें पुरस्कारांत म्हटलें आहे. पण तें निराधार अनुमान आहे.

६) शिवयोगी चितपावन होता असें पुरस्कारांत म्हटलें आहे. पण तो कऱ्हाडा होता असें पुढील श्लोकांत स्वच्छ सांगितलें आहे. पृ. १३७ पाहा.

**शिवयोगी नाम कश्चिद्ब्राह्मणः कोकणोद्भवः ।**
**करहाटः स्फुटमतिर्मेघगम्भीरनिस्वनः ।।४५।।**

या श्लोकाच्या पूर्वार्धातील कोकणोद्भवः या शब्दाकडे दृष्टि जाऊन संपादक व पुरस्कारक यांनी शिवयोगी यास चितपावन म्हटलेलें दिसतें. पण उत्तरार्धात तो करहाट म्हणजे कऱ्हाडा असल्याचें सांगितलें आहे. कोकणोद्भवांत चितपावन, कऱ्हाडे व देवरूखे असे तीन प्रकार सांगितले जातात; कोकणोद्भव तेवढे सर्व चितपावन नव्हते. आजहि कऱ्हाड्यांमध्ये योगी हें आडनांव आढळतें; तें चितपावनांत आढळत नाही.

येथवर 'परमानंदकाव्यम्' या ग्रंथाचे स्वरूप आणि त्यांतून उद्भवणारे कांही ऐतिहासिक प्रश्न यांचा थोडक्यांत विचार केला. असेच सामाजिक, धार्मिक इत्यादि प्रश्नहि विचारार्ह आहेत, पण स्थलमर्यादिस्तव तें बाजूस ठेवणें प्राप्त होय.

* * *

परिशिष्ट २

# परमानन्दकाव्य - परमानन्दाचें नव्हे

## शोधनिबंध - देवीसिंह चौहान

### (मराठवाडा विद्यापीठ पत्रिका, खंड २, फेब्रु. १९६२)

### (दख्खनी हिंदीतील इतिहास व इतर लेख या ग्रंथांतर्गत)

परमानन्द-काव्य नांवाचा ग्रंथ डॉ. गो. स. सरदेसाई यांनी १९५२ सालीं संपादिला. तो बडोद्याच्या गायकवाड ओरिएण्टल मालेंत प्रसिद्ध झाला. या ग्रंथांत ३-४ काव्यें एकत्र छापलेलीं आहेत. त्यांचें संपादकांनी ५ विभाग केलेले आहेत.

पहिल्या विभागांत भोसले वंशांतील शाहजी, शिवाजी व शम्भूजी या राजांच्या वैयक्तिक व सार्वजनिक जीवनाची माहिती शक १६०९ पर्यंत दिलेली आहे. हा सर्व वृत्तांत अत्यंत धावता व त्रोटक आहे. या विभागांत शार्दूलविक्रीडितादि वृत्तें वापरलीं असून १४७ श्लोक आहेत. (पानें २१)

दुसऱ्या विभागांत पहिला अध्याय ११२ श्लोकांचा व दुसरा अपूर्ण ४० श्लोकांचा आहे. या विभागांत शिवराजांच्या निर्वाणानंतर सोयराबाईचा, आपला मुलगा राजाराम याला गादीवर बसवण्याचा प्रयत्न, तिच्या मनांतील भीति इत्यादीचें वर्णन आहे. वृत्त अनुष्टुभ असून वर्णन अपूर्ण आहे.

**अंशावतरण :** सोयीसाठी ४थ्या व ५व्या विभागांचा उल्लेख अगोदर व ३ऱ्या विभागाचा मागाहून करूं. चौथ्या विभागाचे ७ अध्याय असून पांचव्या विभागांत ५ अध्याय आहेत. सर्व अध्याय संपूर्ण आहेत. या दोन्ही विभागांचा मजकूर पाहिल्यास असें दिसून येतें की, दोन्ही विभाग मिळून हें एक काव्य आहे. या दोन्हीतील वर्ण्य-विषय अंशावतरण अर्थात् शाहूचा जन्म हा आहे. पहिल्या विभागांतील अध्याय-समाप्तीच्या उल्लेखात 'अंशावतरण' हा शब्द आलेला आहे. ५ व्या विभागातील पहिल्या ४ अध्यायांत वर्ण्य-विषयांचीं नांवें दिलेलीं आहेत. अंशावतरण शब्द वापरलेला नाही. शेवटच्या अध्यायाच्या समाप्त्युल्लेखांत मात्र 'अंशावतरण' हा शब्द योजिलेला आहे.

दुसरें असें की, एखाद्या संपूर्ण काव्याला आवश्यक गणली गेलेली नमन व आशीष् यांच्या निर्देशाची प्राचीन पद्धति येथे स्वीकारलेली आढळून येते. चौथ्या विभागांतील वंदनाचा श्लोक 'श्रीमदानन्द...समुपास्महे' हा असून ५व्या विभागांतील पांचव्या अध्यायाचा अंतिम श्लोक 'यः कर्णे...मानैकमान्यो भवेत्।' अशी ग्रंथाची फलश्रुति सांगणारा आहे. अशी फलश्रुति चौथ्या विभागाच्या ७व्या अध्यायाच्या शेवटी नाही. म्हणून संपादकांनी जरी ४ व ५ असे दोन विभाग केलेले असले तरी हें अंशावतरण अर्थात् शाहू जन्माचें एकच प्रकरण असून तें कवींद्र परमानन्दाचा नातू देवदत्तपुत्र गोविंद याने लिहिलेलें आहे.

यावरून असें दिसून येईल की विभाग एक व दोन या दोन स्वतंत्र कृति वेगवेगळ्या लेखकांच्या आहेत. डॉ. यदुनाथ सरकार यांनी म्हटल्याप्रमाणे त्या परमानन्दाच्या कृति नव्हेत. चौथा व पांचवा विभाग हें एकच प्रकरण असून तें गोविंद कवीचें आहे.



**तिसरा विभाग :** तिसऱ्या विभागाचे संपादकांनी १३ अध्याय कल्पिले आहेत. पण तें खरें नाही. वस्तुतः या विभागांत १४ अध्याय आहेत. याचा विचार नंतर करूं. डॉ. सरदेसाई यांनी प्रकाशिलेल्या परमानन्द-काव्यांतील हा तिसरा विभाग महत्त्वाचा आहे. पहिला व दुसरा विभाग भाषादि दृष्टीने परमानन्दांचा नाही हें संपादकास मान्य आहे. चौथा व पाचवा विभाग हे गोविंदकविकृत आहेत. ते परमानन्दाचे नव्हेत. राहतां राहिला तिसरा विभाग. तो परमानन्दाचा आहे अशी डॉ. सरदेसाई व डॉ. यदुनाथ सरकार यांची धारणा आहे व म्हणून या प्रकाशनास डॉ. सरदेसाई यांनी परमानन्द-काव्य असें नांव दिलेलें दिसतें.

या संग्रहाचें संपादन करितांना डॉ. सरदेसाई यांनी विशेष दक्षता घेतल्याचें दिसून येत नाही. पहिली गोष्ट म्हणजे संग्रहांतील पांची विभागांचा पौर्वापर्य संबंध नीट लाविलेला नाही. चौथा व पांचवा विभाग एक विभागात्मक करावयास पाहिजे होता. दुसरें असें की या विभागांत छापलेल्या मजकुरावरून १४ अध्याय होतात; पण संपादकांनी १३च अध्याय ठरविले आहेत. छापलेल्या क्रमानुसार तेराव्या अध्यायाचा शेवट पान १०० वर होतो व नवीन अध्याय सुरू होतो. छापील क्रमानुसार त्याचा शेवट १०२ वर होतो व त्यांत एकूण ४७ श्लोक आहेत. एवंच हा विभाग १३ अध्यायांचा नसून तो १४ अध्यायांचा आहे ही गोष्ट स्पष्ट आहे.

या संबंधात दुसरी विसंगति म्हणजे चौथा अध्याय व चौदाव्या अध्यायांतील ३८व्या श्लोकानंतर झालेली मजकुराची अदलाबदल. अध्याय १४वा हा शिवराजवर्णनाचा आहे. अध्याय ४था हा शम्भुराजवर्णनाचा आहे. पान १०० वरील ३९व्या श्लोकापासून पुढील १०२ पानावरचा मजकूर शम्भुराज्याभिषेकाचा असून तो १४व्या अध्यायांतील शिवराज वर्णनाशी मुळीच जुळत नाही. योगायोगाने ही अदलाबदल ३९व्या श्लोकापासून पुढे झालेली आहे. विषयानुक्रमाच्या दृष्टीने नवीन क्रम लावणें जरूर आहे. चौथ्या अध्यायाच्या ३९व्या श्लोकापासून (पान ४४) शेवटपर्यंतचा मजकूर, १४व्या अध्यायाच्या ३८व्या श्लोकानंतर (पान १०२) वाचावा म्हणजे ४थ्या अध्यायांत ४७ श्लोक होतात. पान १०२ वरील ३८व्या श्लोकानंतर पान ४४ वरील श्लोक ३९ पासूनचा मजकूर वाचावा म्हणजे १४व्या अध्यायांत एकूण १२७ श्लोक होतील. वर्ण्य विषयाच्या दृष्टीने वरील क्रमच योग्य आहे.

**कथासूत्र :** तिसरी अत्यंत महत्त्वाची बाब म्हणजे अध्यायांच्या क्रमाची. या विभागांतील मुख्य वर्ण्य विषय छत्रपति शम्भुराज आहे. ग्रंथांत शिवराजाची कारकीर्दहि आलेली आहे व कालदृष्ट्या शम्भुराज्याभिषेक ही शेवटची घटना वर्णिलेली आहे. ग्रंथांत मुख्यतः तीन विषय आलेले आहेत. कवि हा शम्भुराजाचा पक्षपाती असून तो शिवराजाकडे छिद्रान्वेषी दृष्टीने पाहतो. शिवराज, सोयराबाई, राजाराम व शिवराजाचे मंत्री यांच्यांत कलीचा प्रवेश झाला होता. शम्भुराजाला काली, भवानी प्रसन्न झाली होती असें वर्णन कवीने पुष्कळ अध्यायांतून केलेलें आहे. (पाहाः अध्याय १४, ५). शम्भुराजाला छत्रपति शिवराजांनी योग्य रीतीने वागविलें नाही असा गर्भित सूर काढून कवीने शम्भुराजाचें मोगलाकडे-दलेलाकडे- जाण्याचें प्रकरण वर्णिलें आहे (पाहाः अध्याय ८ ते १३). व शेवटीं शम्भुराजाचा राज्याभिषेक अध्याय १ ते ४ मध्ये वर्णिला आहे. या सर्व कथासूत्रावरून व घटनाक्रमावरून पुस्तकांत छापलेला क्रम योग्य नाही. एवढेंच नव्हे तर कवीचादेखील तसा मूळ क्रम नाही असें दिसतें. वस्तुतः पान १०० वर सुरू झालेला अध्याय म्हणजे क्रमानुसार १४ वा अध्याय हा पहिला समजला पाहिजे. त्यांत कलीची पूर्वपीठिका व शिवराजमंत्र्यांत कलिप्रवेश

हा विषय आहे. पांचव्या अध्यायांत सोयराबाईचा शृंगार, राजाराम-जन्म, शिवराजाचें प्रजापीडन यांचें वर्णन आहे. सहाव्या अध्यायांत सोयराबाईचा राजारामास राज्य देण्याचा हट्ट व शिवराजाची संमति वर्णिली आहे. ७व्या अध्यायांत शिवराजांचा शम्भुराजास उपदेश व शृंगारपुरास जाण्याची आज्ञा, ८व्या अध्यायांतील पहिल्या १६ श्लोकांत शिवराजाचें दक्षिणदिग्विजयार्थ प्रयाण सांगून, शम्भुराजाची कालीपूजा व दिल्लींद्राशीं संधान वर्णिले आहे. ९व्या अध्यायांपासून १३व्या अध्यायांत शम्भु-दलेल पत्रव्यवहार, शम्भुराजाचें दलेलाकडे प्रयाण, दलेलाकडून बहुमान, सैन्याची जमवाजमव व भूपालगिरीयुद्ध हीं वर्णिली आहेत. शिवराजनिर्याणाचा उल्लेख अप्रत्यक्ष रीत्या करून कवीनें पहिल्या अध्यायांत राज्याभिषेकाची नांदी म्हटली आहे. दुसऱ्या अध्यायांत शिवराजमंत्र्यांच्या शम्भुराजावरील पन्हाळगडच्या स्वारीचें वर्णन आहे. तिसऱ्या अध्यायात शम्भुराजाची सरशी व अपराध्यांना शासन इत्यादि वर्णन आहे. चौथ्या अध्यायांत शम्भुराजाच्या राज्याभिषेकाचें व दानधर्माचें वर्णन आहे.

हाच क्रम स्वीकारण्याचें दुसरें महत्त्वाचें कारण असें की प्राचीन संस्कृत कवींची आरंभी नमन करण्याची व शेवटी अभीष्ट चिंतन करण्याची पद्धति कवीने स्वीकारलेली दिसून येते. पान १०० वरील प्रथम श्लोक

**बन्दारुविबुधोदारमौलिमन्दारदामभिः ।**
**स्विद्यत्पदारविन्दाय गोविन्दाय नमो नमः ।।**

हा ग्रंथाचा नमनदर्शक श्लोक वरील क्रमानुसार १४व्या अध्यायाचा पहिला श्लोक आहे. म्हणून ह्या काव्याला पान १०० वरील नमनश्लोकाने आरंभ होतो असें म्हणण्यास पुष्टीच मिळते. हा श्लोक शिवभारताचाच नमन श्लोक आहे.

तसेंच वर सुचविलेल्या क्रमानुसार पान १०२ वरील ४७वा श्लोक म्हणजेच पुस्तकांत छापलेल्या १४व्या अध्यायाचा शेवटचा श्लोक हा ग्रंथाचा शेवटचा श्लोक ठरतो. तो शम्भुराजाच्या आशीःपर आहे. 'शम्भुच्छत्रपतेः सदोदितमिदं साम्राज्यमुद्द्योतते' असा आशीर्वाद कवीने दर्शविला आहे. अशा रीतीने ग्रंथाचा आदि व अंत जुळतो. विषयानुसारहि ही जुळणी योग्य अशीच आहे.

**शम्भुराज्याभिषेक :** या विभागाच्या बाबतींत श्री. य. ग. फफे (पाहा : सह्याद्रि १९५३, पान १९५) यांचें म्हणणें योग्य दिसत नाही. त्यांनीं छापील क्रम स्वीकारून पहिल्या ४ अध्यायांचा एक विभाग समजावा व त्यास संभाजीचें राज्यारोहण असें नांव द्यावें व पुढील १० अध्यायांचा दुसरा विभाग कल्पून त्यास 'शिवाजीचें राज्यारोहणोत्तर चरित्र' असें नांव द्यावें असें सुचविलें आहे. परंतु वरील सर्व विवेचनावरून ही योजना अनावश्यक व अनुचित आहे असें सहज रीत्या पटण्यासारखें आहे. शेवटच्या १० अध्यायांत प्रामुख्याने शम्भुराजाचें दलेलप्रकरणच वर्णिलेलें आहे. कर्नाटकाच्या व दक्षिणेच्या स्वारीचा विषय केवळ १६ श्लोकांत संपविलेला आहे. शिवराज जिवंत असतांनाहि कवीने शम्भुराजाचें वैभव व त्याचा दरारा यांचें वर्णन केलें आहे. (पाहा : अध्याय ७.१-२३) शम्भुराजाची दिनचर्या, कालीपूजा, पत्रव्यवहार, परळीहून प्रयाण वगैरे अनेक गोष्टी शम्भुराजवर्णनाच्या आहेत. शिवराजाचा उल्लेख संदर्भात्मक आलेला आहे. म्हणून अध्याय ६ ते १४ हा भाग शिवराजचरित्राचा म्हणणें योग्य नाहीं.

वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं, काव्यांत मुख्य वर्ण्यविषय शम्भुराजाच्या राज्याभिषेकाचा आहे. काव्यांत दलेलप्रकरण विस्ताराने आलेलें आहे. त्यापायीं ६ अध्याय (८ ते १३) व ३९२ श्लोक खर्ची पडले आहेत. शम्भुराजावरील शिवराजांची इतराजी व त्याला प्रत्युत्तर म्हणून कवीने हें प्रकरण इतक्या विस्ताराने वर्णिलेलें दिसतें. हें सर्व काव्य शम्भुराजाची बाजू उचलून धरणारें व शिवराज, त्यांचे अण्णाजी, मोरोपंत आदि मंत्री, सोयराबाई व राजाराम या सर्वांना दोष देणारें आहे. बाजू सांभाळण्याचें, व दोषारोप ठेवण्याचें सूत्र कवीनें सुसंगतपणे पाळलेलें दिसून येतें. मुख्य विषय शम्भुराजाचा राज्याभिषेक असल्यामुळे या काव्याला 'शम्भुराज्याभिषेक' असें नांव देणें योग्य होईल. याच नांवानें यानंतर त्याचा उल्लेख करण्यांत येईल.

ग्रंथाच्या व्यवस्थाक्रमाबद्दल एवढें सांगितल्यानंतर ही गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते की या ठिकाणी काव्यविषयाची चर्चा कर्तव्य नाही. डॉ. सरदेसाई व डॉ. सरकार यांनी हें काव्य शिवभारतकार कवींद्र परमानन्दाचें आहे असें समजून तें प्रसिद्ध केलें व त्या संग्रहाला 'परमानन्दकाव्य' असें नांवहि दिलें. वरील इतिहासतज्ज्ञद्वयांच्या मतें या पुस्तकांतील ५ विभागांपैकी फक्त तिसरा विभागच परमानन्दकृत आहे. परंतु प्रस्तुत प्रसंगीं हें दाखववयाचें आहे की हा तिसरा विभाग अर्थात् 'शम्भुराज्याभिषेक' हें काव्य परमानन्दकृत नाही.

**ग्रंथ परमानन्दाचा नव्हे :** या शम्भुराज्याभिषेक ग्रंथांत अध्याय ६ व १२च्या समाप्त्युल्लेखांत 'परमानन्दकृति' असा उल्लेख आहे. अध्याय ४, ५, ८ व ९ च्या शेवटीं 'परमानन्दप्रकाशितायां' असा निर्देश आहे. बाकीच्या अध्यायाच्या शेवटी 'कवि', 'परमा' किंवा केवळ 'सूर्यवंशे' एवढेच तुटक उल्लेख आहेत.

शम्भुराज्याभिषेक ग्रंथांत अध्यायांतीं वरीलप्रमाणे उल्लेख असले तरी हें काव्य कवींद्र परमानन्दानें लिहिलें आहे असें म्हणतां येत नाही. परमानन्दाचा शिवभारत ग्रंथ अपूर्ण असलेला पाहून, तो पूर्ण करण्याची महत्त्वाकांक्षा त्यांच्या एखाद्या शिष्यवराने बाळगली व तसा त्याने प्रयत्न केला असल्यास त्यांत नवल वाटण्यासारखें कांहीं नाही. डॉ. सरकारांनी शंका व्यक्त केल्याप्रमाणे परमानन्दाच्या एखाद्या शिष्याने अथवा त्याच्या श्रीधर किंवा देवदत्त या पुत्रांपैकी एकाने हा प्रयत्न केलेला असावा व हें लिखाण परमानन्दाच्या नांवावर शिवभारताचा भाग म्हणून प्रसिद्ध करण्याचा त्यांचा विचार असावा. डॉ. सरकारांनी अशाच स्वरूपाची कांहीं युरोपीय उदाहरणें दिली आहेत. (पा. २) तसेंच बाणभट्टाची अपूर्ण राहिलेली कादंबरी त्याच्या मुलाने पूर्ण केली, कालिदासाच्या अष्टाध्यायी कुमारसंभवांत कोणा कविवराने आखणी ९ अध्यायांची भर घातली, किंवा अर्धवट राहिलेल्या भवभूतीच्या महावीरचरितास कोण्या एकाने पूर्णता आणली, त्याप्रमाणे प्रस्तुत प्रसंगीहि घडलें असलें पाहिजे असें म्हणावें लागतें. परमानन्दाचे उल्लेख अधूनमधून ग्रंथांत दिसले तरी हें काव्य परमानन्दाचें होऊं शकत नाही हें पुढील विवेचनावरून दिसून येईल. परमानन्दाच्या शिवभारताचे ३१ अध्याय संपूर्ण व ३२व्या अध्यायाचे फक्त ९ श्लोक उपलब्ध आहेत. ही सर्व ग्रंथसंख्या २२६२ आहे. शम्भुराज्याभिषेकाचे १४ अध्याय आहेत व ग्रंथसंख्या ९११ आहे. १४व्या अध्यायांत ८ व २४ चे श्लोकार्थ असून ९ ते २३ पर्यंतचे श्लोक गहाळ झालेले आहेत. या दोन्ही ग्रंथांच्या आकाराकडे पाहिल्यास दोन्ही कविव्यक्तींच्या काव्यशक्ति स्पष्ट व्हायला अडचण नाही. शम्भुराज्याभिषेकाच्या अध्यायांतीचे उल्लेख अर्धवट असल्यामुळें अध्यायांतील मजकुरांत कांहीं कमीपणा येतो असें नाही. शिवभारत व शम्भुराज्याभिषेक हे दोन्ही ग्रंथ बारकाईने पाहिल्यास दोन्ही ग्रंथांच्या कर्त्यांत फार कमी साम्य दिसून येते. दोन्ही ग्रंथांतील हा साम्यभेद खालील बाबतींत तपासून पाहिल्यास हें चांगलें स्पष्ट होईल : (१) ऐतिहासिक व्यक्ति व योद्धे यांचे उल्लेख. (२) कवीची स्वतःची माहिती.

त्यांचा आत्मविश्वास व ग्रंथफल. (३) वर्णनांतील साहित्यगुण, उदात्तपणा व शृंगार. (४) ग्रंथवस्तूंत कालतिथिनिर्देश. (५) नात्यागोत्यांचें ऐतिहासिक सूक्ष्म उल्लेख. (६) दैवी अनुज्ञेचा वा आदेशाचा वापर. (७) वाक्प्रयोगांचा वापर. (८) शिवराजाविषयीं आदरबुद्धि. (९) दोन्ही ग्रंथांत पुरोहित-वृत्तींचा सुगावा इत्यादि बाबींचा बारकाईने विचार केल्यास शम्भुराज्याभिषेकाचें कर्तृत्व परमानन्दाला चिकटवितां येत नाही असें म्हणावें लागेल.

**ऐतिहासिक व्यक्तींचे उल्लेख :** कवींद्र परमानन्दाने आपल्या शिवभारत काव्यांत जागोजागीं अनेक ऐतिहासिक व्यक्तींचा व सेनापतींचा उल्लेख केलेला आहे. अशा योद्ध्यांच्या याद्या अनेक अध्यायांत मिळतात. भातवडीच्या प्रसिद्ध युद्धांत एका बाजूने मोगली व आदिलशाही सैन्य व दुसऱ्या बाजूने निजामशाही सैन्य असा मुकाबला झाला. त्यांत परमानन्दाने एकूण ५२ योद्ध्यांचीं नांवें उद्धृत केलीं आहेत. त्यांपैकी ११ नांवें आदिलशाही (श्लोक ४, २२ ते ३२), १६ नांवें मोंगल व बाकीचीं २५ निजामशाही सेनानायकांचीं आहेत. (४, १० ते २१).

शाहराजाला मुस्तफाखानाने आदिलशहाच्या गुप्त हुकुमाप्रमाणे कैद केलें. त्या वेळीं शाहराज व मुस्तफा यांच्या सैन्यांत मोठी चकमक उडाली. या वेळच्या दोन्ही गटांतील वीरांचीं नांवें कवीने दिलेलीं आहेत. शाहराजपक्षीय योद्ध्यांचा उल्लेख १२व्या अध्यायांत श्लोक २४, २५, ५७, ६२, ६८ व ६९ मध्यें केलेला आहे. मुस्तफाच्या वीरांचीं नांवें १२.४, ७ व १६.२०, ४६ व ४७ मध्ये आलीं आहेत.

शाहराजाला कारावासांत ठेवल्यानंतर शिवराजाचें पारिपत्य करण्यासाठी आदिलशहाने फत्तेखानाच्या आधिपत्याखाली सेना रवाना केली. (अध्याय १३, ८ ते १४), शिवराजांनी कावजीच्या आधिपत्याखाली फौज पाठविली. (१३.५१ ते ५७). पुरंदरला वेढा पडला असतांना लढाईत भाग घेणाऱ्या योद्ध्यांची नांवें सविस्तर दिलेली आहेत. आदिलशाही योद्ध्यांचा (१४. ४०-४२ व ४५-४७, ५९, ६७, ८१, १५, १६) व शिवराज योद्ध्यांचा (१४.४७-४९,५६, ६७, ६९, ७० व ८९) उल्लेख वेगवेगळा सापडतो.

याचप्रमाणे अफजलखानाच्या स्वारीत त्याचे असलेले सेनानी (१७.५१-५३, ५५-५७) जावळीचे मोरे (१७, ४, ८), रुस्तुमजमाशी झालेल्या युद्धांत आदिलशाही सेनानी (२४, २८, २९, ४२-४५ व ७२) व शिवशाही सेनानी (२४. ३२-४०, ६८, ७० व ७१) आणि पन्हाळगडच्या सिद्दी जोहराच्या वेढ्यांतील आदिलशाही योद्धे (२५. १२, १५-१८, २०-२३ व २६. ३३, ३९) इत्यादींची माहिती पाहावयाला मिळते. वरील युद्धवर्णनांत आणखी एक विशेष दिसून येतो. तो म्हणजे सैन्याची केलेली विशिष्ट रचना, रुस्तुमजमाशीं झालेल्या युद्धांत व पन्हाळगडाच्या जोहराने घातलेल्या वेढ्यांत प्रत्येक पक्षाने दुसऱ्याचें निरीक्षण केलेली विशिष्ट सैन्यरचना यांचीं वर्णनें सांपडतात.(रुस्तुमजमाशीं युद्ध २४.४२ ते ४५ व ४७ ते ५२ आणि पन्हाळवेढा २५.३६-५५)

शाइस्ताखान शिवराजाचा समूळ उच्छेद करण्यासाठी आला. त्याचें सैन्य ७७००० होतें असें सांगून कवीने ६३ सेनानींचीं नांवें दिलीं आहेत.

याच्या उलट प्रकार शम्भुराज्याभिषेक काव्यांत दिसतो. यांत कवीने कोणाहि प्रसिद्ध मुत्सद्द्याचा वा योद्ध्याचा उल्लेख केलेला नाही. कांही ठळक व्यक्तींचीं नांवें मात्र आलीं आहेत. या काव्यांतील वर्ण्यविषयांतहि ५-६ असे प्रसंग आहेत. उदाहरणार्थ, श्रीशिवराजाने कर्णाटक प्रांत व दक्षिण यांच्या दिग्विजयार्थ केलेली मोहीम. या मोहिमेंत शिवराजांनी फक्त विश्वनाथ प्रधानाला बरोबर घेतल्याचा



उल्लेख : 'अथैष धीनिधानेन प्रधानेन द्विजन्मना । विश्वनाथाभिधानेन सावधानेन साधुना ॥८.११' केलेला आहे. स्वतःच्या विश्वासाचे वीर बरोबर घेतले असें म्हटलेलें असलें तरी इतरांचीं नांवें दिलेलीं नाहीत.

शम्भुराजावर नाराजी व्यक्त करून श्रीशिवराजांनी त्याला शृंगारपूर सोडून सज्जनगडास जाण्याची आज्ञा दिली. शम्भुराजा सज्जनगडावर पोचल्यानंतर त्याचें कोणी कोणी स्वागत केलें याचा उल्लेख या काव्याच्या १०व्या अध्यायांत आलेला आहे. येथेहि फक्त 'सुधिया विश्वनाथेन' (१०.३२) असा एका किल्लेदाराचाच उल्लेख आलेला आहे. शम्भुराजाबरोबर गेलेल्यांची किंवा स्वागत करणाऱ्यांची नांवें कवीने दिलेलीं नाहीत.

शम्भुराजा श्रीशिवराजावर असंतुष्ट होऊन मोगलाचा सेनापति दिलेरखान याच्या साहाय्याने राज्याचा आपला वारसा मिळविण्यासाठी त्याच्याकडे सज्जनगडाहून निघून जातो. वेणा व कृष्णा नद्यांच्या संगमावर शम्भुराजाने जावे व तिकडून दिलेराचें सैन्य यावें असा संकेत पूर्वनिश्चित होता. शम्भुराजाने आपल्याबरोबर

**तं यान्तमनुयान्ति स्म तदीयाः सर्व एव हि ॥ ११.४५**

असे अनेक वीर घेतले असें लिहिलें आहे. पण त्यांच्या नांवांचा तपशील मात्र दिलेला नाही. पा. ७९ (९.३७-३९), पा. ७४ (८.८०-८३) व पा. ६५ (७.६९-७०) पाहावे. अशा प्रकारें तपशीलवार नांवें देण्याची सवय किंवा वळण शम्भुराज्याभिषेककर्त्या कवीला मुळीच नाही. हें काव्य जर कवींद्र परमानन्दाचें असतें तर अध्यायागणिक अनेक वीरांची नांवें देणाऱ्या परमानन्दाने वीरांची नामावली खास दिली असती.

दिलेरसैन्याच्या मदतीने शम्भुराजाने श्रीशिवराजाच्या ताब्यांत असलेला भूपालगड जिंकून घेतला. या युद्धाच्या वर्णनांत, धनुर्धारी, गदाधारी, पट्टाधारी, चंद्रहासशस्त्र धारण करणारे, त्रिशूलधारी, मुद्गरधारी, बाण व वारबाण सोडणारे यांच्या साहाय्याने शम्भुराजाने लढाई केली असें वर्णन ११.४६ व ४७ मध्यें केलेलें आहे. यांत फक्त 'गाढवर्मा' म्हणजे गाढे नांवाचा क्षत्रिय होता, असा मोघम उल्लेख आहे. किल्ला घेतल्यावर पराभूत झालेल्या वीरांपैकी फक्त फिरंगजित्फिरंगोजी नरसाळे एवढा एकच उल्लेख आलेला आहे. (११.५७) कवींद्र परमानन्दाची अशा युद्धवर्णनप्रसंगी योद्ध्यांची लांबच्या लांब यादी आठविली म्हणजे या काव्याचा कर्ता परमानंद नेवासकर असू शकत नाही असें वाटावयास लागतें.

**कवीचा स्वतःचा उल्लेख व त्याचें व्यक्तिमत्त्व :** शिवभारतांत कवीनें आपला स्वतःचा उल्लेख अनेक वेळा केलेला आहे. स्वतःची माहिती देणाऱ्या पहिल्या अध्यायांतील श्लोक २ ते १० आणि २१ व २२ खेरीज इतरत्र स्वतःची मनोऽवस्था अनेक वेळां दिग्दर्शित केलेली आहे. कवि आत्मनिष्ठ होता (१.२५) रघुवंशनिर्मितीची जबाबदारी महाकवि कालिदासाने स्वीकारल्यानंतर त्याला ज्याप्रमाणे आपल्या बुद्धिशक्तीचा खुजेपणा जाणवला, तशीच अवस्था परमानन्दाने (१-२८ ते ३५) स्वतःची वर्णिली आहे. स्वतःचें वर्णन परमानन्दाने सर्वशास्त्रवेत्ता, अध्यात्मविद्, पौराणिकांमध्ये श्रेष्ठ, लब्धवाक्सिद्धिवैभव (१.५, ६), निष्पाप विप्रोत्तम (२५.२७) व गोविंदभक्त (२५.२७) असें केलें आहे. अशा प्रकारची विशेषणें शम्भुराज्याभिषेक-काव्यांत कोठेंच वापरलेलीं नाहींत. शिवभारतांत परमानन्दाचा आत्मविश्वास पदोपदी प्रत्ययाला येतो, तर शम्भुराज्याभिषेक-कर्त्यांत असा आत्मविश्वास मुळींच व्यक्त होत नाही.

**शिवचरिताशीं तादात्म्य :** शिवचरित लिहावयास घेतल्यानंतर 'कवीला दैवी आत्मप्रत्यय प्रतीत झाला. शिवराजांनी आपलें चरित्र लिहावयास सांगितल्यावर परमानन्दाला आपल्या काव्यशक्तीबद्दल संशय वाटला.' 'अहो कथमहं कुर्यां भारतप्रतिमे महत्, अमानुषचरित्रस्य शिवत्यैतत् समीहितम्' (१.२९) परंतु एकवीरादेवीच्या कृपाप्रसादाने सर्व वाग्ब्रह्म त्याच्या रसनाग्रावर अधिष्ठित झालें व 'अनागतानां भावानामतीतानां च सर्वशः । साक्षात् संदर्शनेनाहममानुष इवाभवम् ।।' (१.३४) अशा प्रकारचें अलौकिकत्व त्याला प्रतीत झालें. परमानन्दाने स्वतः शिवचरितरूपी सोमपानाने आपण उत्साहित झालो आहोत असें स्वतःचें वर्णन केलें आहे.

**शिवभूपयशःसोमसमुल्लासितचेतसम् । (१५.२८)**

हीच त्याच्या मनाची तल्लीनता शिववीरयशःक्षीरनिधिप्लावित्चेतसा । २७.३ मध्ये व्यक्त झाली आहे. शिवचरितरूपी रसाने कवि उन्मन झालेला आपणाला दिसतो. याउलट शंभुराज्याभिषेक-काव्यांत या मनोऽवस्थेचा लवलेशहि दिसत नाही.

**कल्मषहारी शिवभारत :** आपण लिहावयाला घेतलेलें शिवराजचरित पारतंत्र्याचें पापविनाशक व स्वातंत्र्यप्रस्थापनेमुळे लोकांचीं अंतकरणें हरण करणारें आहे असें आत्मविश्वासपूर्वक कवीला वाटतें.

**कलिकल्मषहारीणि हारीणि जनचेतसाम् ।**
**यशांसि शिवराजस्य.... ।।१.२३।।**

**शिवचरिताची गोडी :** आपण लिहीत असलेलें शिवचरित उदार व गंभीर संदर्भानें भरलेलें, अनेक भावार्थानें युक्त, एक प्रकारें अद्भुत, माधुर्यादिगुणांनी युक्त, अलंकारांनीं नटलेलें, धर्मशास्त्र व राजनीति यांनी संपूर्ण व दोषरहित असें आहे (१.१६ ते १९) असा परमानन्दाचा आत्मविश्वास पदोपदीं दृग्गोचर होतो. ही कथा अमृतासारखी अतिशय माधुर्यवती व पुण्यवती आहे (८.४) असें परमानन्दाने काशीस्थ पंडितांच्या तोंडी विधान घातलें आहे. तसेंच

**वयं भागीरथीतीरे भवतो भारतीमिमाम् ।**
**पायं पायं न तृप्यामः सुधां सुमनसो यथा ।। (२८.१२)**

असे कवीने आत्मविश्वासाचे उद्गार काढले आहेत; ते वावगे नाहीत.

**भक्तकवि :** आपण आत्मनिष्ठ होतों; परंतु शिवराजांनी मालोजी राजापासून आपल्या भोसले वंशाची महनीय कथा (१.२७) वर्णन करावयास सांगितली. आपण आरंभी या गोष्टीकडे प्रवृत्त नव्हतों, असें कवीला सुचवावयाचें आहे. कवि गोविंदाचा-विष्णूचा- भक्त आहे.

**श्रीगोविन्दपदाम्भोजप्रमोदभरमेदुरम् ।।२५.२७।।**

कवींद्र परमानन्दाची भक्त व आत्मनिष्ठ साधु म्हणून फार मोठी प्रतिष्ठा होती. श्रीशिवाजीराजाने स्वतः जाऊन त्याचें दर्शन घेतलें.

**मन्दिराग्र्यं समासाद्य एक एवाग्रगोऽभवत् ।**
**गोस्वामिचरणद्वन्द्वं वन्दयामास मन्दिरे ।।४.१८।।**
**गोस्वामी च ततस्तस्य हस्तं विन्यस्य मस्तके ।**
**पूर्णसाम्राज्यदात्रीभिराशीर्भिः पर्यतोषयत् ।।४.१९।।**

या पर्णालपर्वतग्रहणाख्यानांतील जयरामकविकृत वर्णनावरून कवीची योग्यता दिसून येते.

वर वर्णन केलेलें कवीचें स्वतःचें व्यक्तिमत्त्व, काव्यविषयीचें पापविनाशकत्व, त्याचा



आत्मविश्वास, किंवा तो लिहीत असलेल्या काव्याचा गोडवा व तसेंच त्याची भक्ति इत्यादींचा मागमूसहि शम्भुराज्याभिषेक-काव्यांत पाहावयास मिळत नाही. म्हणून हें काव्य परमानन्दाचें आहे असें म्हणणें कठीण आहे. तसें असतें तर कवींच्या व्यक्तिमत्त्वाचे हें पैलू कोठे ना कोठे तरी उघड झाल्याशिवाय राहते ना. प्रस्तुत काव्यांत फक्त गोविंदविष्णूच्या वंदनाचा श्लोक (१४.१) शिवभारतांतून जशाचा तसा उद्धृत केलेला आहे. शिवभारतांतील कवीच्या स्वतःच्या मनोवृत्ति दर्शविणाऱ्या उल्लेखांवरून व शम्भुराज्याभिषेकांतील तशा उल्लेखांच्या अभावांवरून या काव्याचें जनकत्व परमानन्दाला चिकटवितां येत नाही.

**कालोल्लेख :** निरनिराळ्या युद्धप्रसंगी उपस्थित असलेल्या भिन्नपक्षीय योद्ध्यांची नांवें जशीं परमानन्द बिनचूक देतो, त्याचप्रमाणे त्याचे कालाचे उल्लेख बिनचूक आहेत, शाहराज दोन वर्षांचा झाला असता शरीफजी जन्मला (१.८८), शाहराज ५ वर्षांचा असतां मालोजी इन्दापूरच्या युद्धात स्वर्गवासी झाला (२.१ व ५), शिवराज ७ वर्षांचा झाल्यावर त्याच्या विद्याभ्यासास आरंभ झाला (९.७०), तो १२ वर्षांचा असतां शाहराजानी त्याची पुण्यास रवानगी केली (१०.१) इत्यादि उल्लेखांशिवाय परमानन्दाने शिवराजजन्मतिथि (अध्याय ६.२६,२७) व अफजलखानवधतिथि (२१.८३,८४) ही बिनचूक दिलेली आहेत. परमानन्दाने दिलेल्या दोन्ही तिथि कालदृष्ट्या बिनचूक व विश्वासार्ह आहेत, असा तज्ज्ञांचा अभिप्राय व्यक्त झालेला आहे. वरीलप्रमाणे एकहि उल्लेख शम्भुराज्याभिषेक-काव्यांत दिलेला नाही. फक्त एकाच ठिकाणीं राजाराम नऊ वर्षांचा असतां श्रीशिवराजांनी शम्भुराजाला शृंगारपुराला पाठविलें (१०.४) असा उल्लेख आलेला आहे. या बाबतींतहि दोन्ही काव्यवस्तूंत फारच भिन्नपणा आहे.

**वर्णनशैलींतील भिन्नता :** शिवभारत व शम्भुराज्याभिषेक या दोन्ही काव्यांतील लेखनशैली अगदी भिन्न आहेत. परमानन्दाची वर्णनशैली, शिवभारताचे संशोधक व संपादक श्री. दिवेकर यांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे प्रसादयुक्त व मनोवेधक आहे. याचे प्रत्यंतर शिवराजाची शिशुलीला (अध्याय ९),व्यवहार-निरीक्षण (अ. ११), रायबागिणीचें भाषण (अ. २९), शिवस्वरूपवर्णन (अ. ३०) इत्यादि अनेक प्रसंगी येतें. बहारदार वर्णनें ग्रंथभर सापडतात. परमानन्दाच्या निरीक्षणाची अतिसूक्ष्मता आपणाला अफजलवधप्रसंगी शिवराजांनी केलेल्या पोशाखाच्या वर्णनावरून (२१. २१ ते २३) दिसून येते.

**शिवोऽपि तं पुरो वीक्ष्य वृषा वृत्रमिवागतम् ।**
**स्मयमानः स्वयं तस्य दृशा दृशमयोजयत् ।।२१.२४**

या वर्णनांतील उदात्तता, अतिसूक्ष्म निरीक्षणशक्ति व प्रसाद पाहिल्यावर कालिदासाची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. इतर कवींत असें वर्णन दुर्मिळच. अशीं अनेक उदाहरणें व उतारे शिवभारतांतून देतां येतील. अशा प्रकारची वर्णनाची व शैलीची उदात्तता शंभुराज्याभिषेकांत वानगीदाखल शोधूनहि मिळत नाही. दोन्ही काव्यांकडे या दृष्टिकोनांतून पाहिल्यास हीं दोन्ही काव्यें भिन्न जातींचीं व भिन्न कोटींतील वाटतात. शिवभारताची सर या दुसऱ्या काव्याला कदापि येत नाही.

शिवभारतांत निरनिराळे शब्दार्थालंकार अनेक ठिकाणीं आल्याचें श्री. दिवेकरांनी उपोद्घातांत निर्देशिलें आहे. त्यांत चकत्कृतिपूर्ण वर्णनेंहि बरींच सांपडतात. शंभुराज्याभिषेकांत उपमादृष्टान्तादि सामान्य अर्थालंकार व रुक्ष आणि ओढूनताणून साधलेले अनुप्रास पाहावयास मिळतात. शिवभारतांत

मनुष्याच्या प्रासंगिक भावनांना पोषक असा निसर्ग, निसर्गांतील हिरवीगार वनश्री (२६. ७३-७७; २९. ८६-८८), अनुकूल वायु (२६. ६९-७१), मध्याह्न (२९. १-३), ग्रीष्मर्तु (३२. ५-९, ३१. ५, ६-९) इत्यादींच्या वर्णनांचा उपयोग, भरपूर केलेला दिसून येतो. अशीं बहारदार वर्णनें दुसऱ्या काव्यांत अभावरूपानेच तळपतात.

**दोन्हींतील शृंगार :** परमानन्द हा आत्मनिष्ठ व साधुवृत्तीचा असल्यामुळे त्याची स्त्रियांकडे पाहण्याची दृष्टि कवीची नसून संताची आहे. त्याने चार-पांच युवतींचीं वर्णनें केलीं आहेत. पण त्यांत शृंगारिक वर्णन एकाहि तरुणीचें केलेलें नाही. मालोजीची पत्नी उमा, शाहराजाची जिजू, शरीफजीची दुर्गा व शाहराजाचा वडील मुलगा शम्भु याची जयंती यांचीं वर्णनें केवळ उदात्त व शिष्टसंमत अशीं आहेत. मालवर्मपत्नी उमेचें वर्णन सावित्री व इंदुमतीच्या उपमांनी वरच्या पातळीवर पोचलें आहे. विशेष म्हणजे जिजूचें वर्णन १४ श्लोकांत केलें असूनहि त्यांत 'स्तन' किंवा इतर शृंगारदर्शक शब्द आलेले नाहीत. माझ्या माहितीप्रमाणे या काव्यांत 'स्तन' शब्द, जिजाईमातेच्या दर्शनासाठी शिवराज पन्हाळ्याहून येऊन भेटतात, तेव्हां फक्त एकदांच खालील ठिकाणीं आला आहे.

**संप्रस्नुतस्तनस्तन्यधाराभिरमृतात्मभिः ।**
**स्नपयन्तीं महाबाहुर्जननीं स्वामवन्दत ।।२७.४९।।**

मातृप्रेमाचें याहून अधिक वात्सल्यपूर्ण वर्णन दुसरीकडे क्वचितच पाहावयास मिळेल.

शम्भुराज्याभिषेक-कर्त्याची पातळी भिन्न आहे. त्यानें अशा प्रकारचा संयम पाळलेला नाही. उलट राजाराम-माता सोयराबाई ही सर्व जिवंत राण्यांत वडील व राज्यारोहणप्रसंगीं तिला पट्टराणीचा मान प्राप्त झालेला असूनहि तिजबद्दल अनुदार व अश्लील उद्गार काढलेले आहेत. सोयराबाईचें ममता व कैकेयी म्हणून वर्णन आहेच, पण या तरुण व सुंदर युवतीने (वय चाळिशीच्या पुढे- लग्न श. १५७२त) शृंगारचेष्टा करून शिवराजाला मोह पाडला असें खालच्या पातळीवरील वर्णन केलेलें आहे.

**अत्युन्नतेन घनयोः स्तनयोर्द्वितयेन च ।**
**माल्यबन्धोल्लसन्मौलेर्मौलेरान्दोलनेन च ।।५.६**
**अपत्रपाप्रचलेन निचोलाडम्बरेण च ।**
**दर्शितोरःसूत्रिकथा लीलया च कयाचन ।।५.१५**
**इत्युक्तया तया तत्र निरपत्रपया पुनः ।६.४६**

परमानन्दासारख्या आत्मनिष्ठ (१.२५), साधुवृत्ति, 'धर्मात्मा' (१.२०), महाभाग (१.२७), सुमति (१.२६), 'परमानन्दविग्रहा' कडून (१.७), असें अश्लीलवर्णन लिहिलें जाईल अशी कल्पना करणें चुकीचे होईल.

**वर्णनविसंगति :** शम्भुराजाची वागणूक व इतर व्यवहार पाहून शिवराजांना शम्भुराजाबद्दल चिंता वाटत होती. राज्याचा वारस कोणाला नेमावा याची चर्चा, सल्लामसलत वा मंत्रणा श्रीशिवराज दक्षिणदिग्विजयाला निघण्यापूर्वी चाललेली होती, असें या काव्यावरून दिसतें. शम्भुराजाची वागणूक पसंत नसल्यानें त्यांना शृंगारपुरास राहण्यास महाराजांची आज्ञा झाली. शम्भुराजाबद्दलची वाटणारी भीति साधार होती हें पुढें दिसून आलें. याचेंच शम्भुराज्याभिषेककर्त्यानें शिवराजाला व तदनुयायांना मोह पडला असें वर्णन केलें आहे. शिवराजाला मोह पडला व राज्यकर्त्या पुरुषांत कलिप्रवेश झाला



असें म्हटलें तरी श्रीशिवराज्याची उत्तरोत्तर समृद्धि होत असल्याचीं वस्तुस्थिति कवीला लपवितां आली नाही. हा सत्यापलाप पूर्वपुण्याच्या आवरणाखाली झांकण्याचा कवीचा प्रयत्न निव्वळ असफल झाला आहे.

**यथा यथा महाबाहुः स मुमोहतमां तदा ।**
**तथा तथा दिगन्तेभ्यस्तमायान्ति स्म सम्पदः ।।५.५९**
**ये दत्तपूर्वास्ताम्रेभ्यस्तेऽमुना प्रभुणादृताः ।**
**पर्वताः पर्वतेन्द्रेण प्रबलाः प्रबलादयः ।।५.६०**
**अनिष्टमपि यच्चक्रे कालचक्रेण मोहितः ।**
**तदेवेष्टमभूत्तस्य पूर्वपुण्यानुभावतः ।।५.६१**

विसंगतीचा दुसरा नमुनाहि लक्ष्य आहे. मी वृद्ध झालेलो आहे,

**दिनेष्वेतेषु मद्वर्ष्म विवशीकुरुते जरा ।**
**नेतुं मां परलोकाय कालदूतीव सत्वरा ।।७.७४**

इत्यादि वर्णन कवीने दिलें आहे. पण पुढील अध्याय ८ मध्ये श्रीशिवराज दक्षिणविजयास निघण्यासाठी प्रयाण दुंदुभि वाजवितांना असें कवि सांगतो :

**अथ सह्यपतिर्जेतुं देशकर्णाटमुद्यतः । सुदिने कारयामास प्रयाणपटहं प्रभुः ।।८.१**

यावरून श्रीशिवराजाच्या वृद्धपणाचें अवास्तववादी वर्णन कवि करूं इच्छितो असें स्पष्ट होतें.

**दैवी आदेशाचा वापर :** शिवकालीन तदुत्तर सर्व संस्कृत पंडितांमध्ये दैवी संदेशांचा वा आदेशाचा आपल्या वर्ण्यवस्तूच्या कथानकविकासासाठी किंवा ऐतिहासिक शुभ वा अशुभ घटनांच्या पुष्टीसाठी उपयोग करून घेण्याची प्रवृत्ति दिसून येते. कवींद्र परमानन्दाने आपल्या शिवभारत ग्रंथांत, त्याचा नातू गोविंद कवि याने अंशावतरण या शाहूजन्माख्यानांत, केशवपंडिताने राजारामचरितांत, कृष्णाजी अनंत सभासदाने शिवचरित्र बखरींत, उत्तरपेशवाईत झालेल्या पुरुषोत्तम कवीने आपल्या शिवकाव्यांत आणि प्रस्तुतच्या शम्भुराज्याभिषेक ग्रन्थांत अशा प्रकारचा वापर अनेक प्रसंगी केल्याचें आढळून येतें. शिवजन्म (५.५४; ६, १) शाहराजाने मोगलाविरुद्ध न लढण्याचें ठरविण्याचा निश्चय (९.१३-२०), द्वादशवर्षीय बालशिवराजास पुण्यास पाठविण्याचा निश्चय (१०.३-१८), शिवराजांचा अफजलखानाशीं भेटण्याचा वा लढण्याचा निर्धार (२०.१-२४), तसेंच एकीकडे सिद्दी जोहर अत्यंत बलिष्ठ व कृतनिश्चय, तर दुसरीकडे दिल्लीन्द्राचा मामा शाइस्ताखान चढाई करून आल्यावर पन्हाळगडावरील वेढ्यांतून मुक्तता करून घेण्याची शिवराजांची मनीषा (२६.४४-५०, ७२) आणि शिवराजांनी सिद्दी जोहराला सोडून देण्याचा केलेला प्रमाद (२८.९-२१) या प्रसंगीं कवींद्र परमानन्दाने दैवी आदेशांचा किंवा परमेश्वरी इच्छा-आदेशांचा वापर केलेला आहे. या सहा प्रसंगांपैकी केवळ शिवराजाचा जन्म हीच बाब सर्वस्वी दैवाधीन असलेली आहे. इतर पांचहि प्रसंगांत मनुष्याने आपल्या बुद्धिकौशल्याने व मुत्सद्दीगिरीने मार्ग काढावयाचा आहे. या सर्व प्रसंगीं कवींद्र परमानन्दाने दैवी आदेशांचा वापर अत्यंत कौशल्याने, औचित्यपूर्ण व प्रसंगपरिपोषक केलेला आहे. यांपैकी शिवजन्मासंबंधी अवतारकल्पना परमानन्दाला कां स्वीकारावी लागली याचे मार्मिक विवेचन श्री. द. वि. आपटे यांनी शिवभारताच्या प्रस्तावनेंत (पान ११३ ते ११८) केलें आहे. त्याची पुनरावृत्ति येथे करण्याचें प्रयोजन नाही, एवढेंच सांगणें पुरे की श्रीशिवराज जन्मले असतां

**अनुग्रहाय देवानां दैत्यानां निग्रहाह च ।६.३८**

हेंच ज्याचें ब्रीद त्या भगवान विष्णूचे ते अवतार आहेत असें सर्वत्र प्रसृत केल्याने, स्वातंत्र्यप्राप्तीसाठी करावया लागणाऱ्या वीर्यशौर्यादि गुणवृद्धिस व लोकसंग्रहास अतोनात मदत झाली.

शाहराजाने मोंगलाविरुद्ध न लढण्याचा विचार, शिवराजाला तो केवळ बारा वर्षांचा असतांना जबाबदारी टाकून पुण्याला पाठविण्याची युक्तायुक्तता व इष्टानिष्टता, अफ़जलखानास तोंड देण्याचा शिवराजांचा मनोदय, जोहराच्या तावडींतून सुटण्याचा व शाइस्ताखानास तोंड देण्याचा प्रश्न, व जोहराला सोडून देण्याचा प्रश्न हे सर्व प्रसंग दोघाहि वीरांच्या मुत्सद्दीगिरीला आव्हान करणारे असे आहेत. अमुक एखादा निर्णय कर्त्या जबाबदार व्यक्तीने घेतल्यास व असा प्रसंग संदेहात्मक असल्यास, तो सर्व अनुयायांना पटेलच व ते पूर्ववत् कार्यप्रवण राहतीलच असें नाही. अशा संदेहात्मक परिस्थितीवर मात करावी लागते. संदेहावस्थेंतून बरोबरीच्या कार्यकर्त्यांचा व आपल्या विश्वासू अनुयायांचा विश्वास कायम ठेवीत मार्ग काढावा लागतो. अशा संदेहजन्य परिस्थितींतून आत्मविश्वासाने सर्व अनुयायांचा विश्वास कायम ठेवण्याचा व तो वृद्धिंगत करण्याचा मार्ग त्यांनी वरील सर्व प्रसंगी कसा अवलंबिला हें कवींद्र परमानन्दाने दाखविलें आहे. एखादा निर्णय घेणें अपरिहार्य असावें, परंतु तो योग्य कां अयोग्य याचा मनोमन विश्वास वाटूं नये अशा कठीण प्रसंगीं

**देव मस्तकीं धरावा । हलकल्लोळ करावा ।**

या समर्थोक्तीने सन्मान्य व बहुजनमान्य मार्ग मोकळा होतो. मोगल हा अति बलाढ्य, त्याच्या विरूद्ध तत्प्रसंगीं लढण्यांत शक्त्यपव्यय आहे, असा सल्ला शंकराने शाहराजाच्या अंतर्मनास दिला तर तो परिस्थित्यनुसार योग्यच होय. बालशिवराजाला पुण्यास पाठवावें कीं नाही या द्विधावृत्तींत, त्याला पाठव पण

**ततः कतिपयैरेव गजवाजिपदातिभिः ।**
**मौलेराप्तैरमात्यैश्च ख्यातैरध्यापकैरपि ।।१०.२५**
**बिरुदैश्च ध्वजैरुच्चैः कोषाणापि च भूयसा**
**तथा परिजनैरन्यरनैन्यसमकर्मभिः ।।१०.२६**

अशा सर्व साधनासामग्रीने युक्त व जय्यत तयारीने पाठव असा सल्ला व आशीर्वाद श्रीशंकराने दिला तर तो योग्यच होय. हीच पार्श्वभूमि अफजलवध व जोहरापासून मुक्ति या प्रसंगाला लागू पडते. म्हणून या सर्व आणीबाणीच्या कठीण प्रसंगीं, कवींद्र परमानन्दाने दैवी आदेश किंवा देवदैवताचा आशीर्वाद संपादन करून घेतलेल्या निर्णयाला लोकमान्यता मिळवून दिलेली आहे.

याच्या उलट शम्भुराज्याभिषेक ग्रंथांत अशा दैवी आदेशांचा वापर दुष्ट, अनर्ह वा अशिष्टसम्मत हेतु साध्य करण्याकरितां करण्यांत आलेला आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या कर्त्याला शम्भुराजाच्या पक्षाचें मंडण आणि शिवराज, सोयराबाई, राजाराम व शिवराजाचें मंत्रिमंडळ यांच्या मतांचें खंडण करावयाचें आहे. यासाठीं त्याने कलिप्रवेशाच्या प्रकाराचा अवलंब केलेला आहे. शम्भुराजाला राज्यवारसा देणें शिवराजाला अनिष्ट वाटलें, हे मत परमानंदाला पटलें नाही, दुर्दैवाने तो दीर्घायु ठरून, शम्भुराजाच्या राज्याभिषेकोत्तर त्याचें गुणगान करण्याची व त्याच्या भल्याबुऱ्या पक्षाचें व मताचें समर्थन करण्याची अनर्ह जबाबदारी त्याच्यावर पडली तरी, आत्मनिष्ठ, धर्मात्मा, धर्मशास्त्रवेत्ता, राजनीतिज्ञ व गोस्वामी असा परमानंद आपल्या उतारवयांत शिवाजीला मोह पडला असें त्याच्याविषयी बोलावयाला तयार होईल असें वाटत नाही. शम्भुराजाखेरीज सर्व भृशबलवंशाला व त्याची राज्यधुरा वाहणाऱ्या मंत्र्यांना मोह पडला, असें म्हणावयाला शिवराजाच्या हयातींत किंवा



त्यांच्या निर्याणानंतर केवळ २-३ वर्षांच्या कालावधींत परमानंद तयार झाला असें समजणें म्हणजे मनुष्याच्या भावना व मानसशास्त्र समजून न घेण्यासारखें आहे.हें काव्य शम्भुराज्यारोहणानंतर व त्याच्या वधापूर्वी लिहिलेलें असावें असें तदंतर्गत पुराव्यावरून वाटतें. डॉ. यदुनाथ सरकार यांनी या काव्यांत शिवराजांनी सुचविलेली राज्य-वांटणी योग्यच होती, पण शम्भुराजाला ती रुचली व पचली नाही असा अभिप्राय व्यक्त केला आहे, हें येथें नमूद करावेसें वाटतें. सभासदाने देखील ही व्यवस्था श्रीशिवराजांनी आंखली होती पण ती शम्भुराजाला पसंत पडली नाही, असें नमूद केलें आहे.

शम्भुराजाने दिल्लीपतीचा सुभेदार दिलेरखान याच्याकडे जावें असा सल्ला वा आदेश कालीने वा तुळजादेवीने दिला असें काव्यकर्त्यानें म्हटलें आहे.

**कदाचिदर्धरात्रेऽमुं सुप्तं तत्र निकेतने ।**
**नियोगेन किलेश्वर्याः प्राह वागशरीरिणी ।।१०.३७**
**वत्स गच्छ द्रुतं तत्र यत्र दिल्लीपतेर्बलम् ।**
**प्रस्थितस्य तवाध्वानं प्रतिबध्दुं न केऽप्यलम् ।।१०.३८**

अशा या काव्यकर्त्याच्या बुद्धिदारिद्र्याचा व उदरंभरणवृत्तीचा संबंध कवीन्द्र परमानन्दाशीं जोडणें कदापि सदभिरुचीला धरून होणार नाही.

**एका वाक्प्रयोगाचा उपयोग :** प्रस्तुत ग्रंथाच्या कर्त्यानें एक विशिष्ट प्रकारचा वाक्प्रयोग दोन ठिकाणीं योजिलेला आहे.

**बिभिषणेन संभाष्यान्तरं भेदं रघूद्वहे ।**
**धातितः स्वाग्रजो नाम रावणो लोकरावणः ।।१२.२६**
**जगदेकगतिं भूतपतिं मृत्युञ्जयं मृडम् ।**
**शङ्करं सर्वलोकानां शङ्करं प्रत्यपद्यत ।।१४.७**

'रावणो लोकरावणः' व 'शङ्करं सर्व लोकानां शङ्कर' हा विशिष्ट प्रकारचा शब्दप्रयोग शिवोत्तरकालीन संस्कृत पंडितांत रूढ व मान्य झालेला दिसतो. शिवपूर्वकालांत तो केव्हां व कसा रूढ होता हें प्रस्तुत प्रसंगी पहाणें जरूर नसलें तरी शिवोत्तरकालांत बऱ्याच ठिकाणीं याचा वापर आढळतो. शक १६११ सालांत केशव पंडिताने लिहिलेल्या राजारामचरितांतहि

**तुच्छीकृत्य तु तान्सर्वान् महाम्लेच्छविनाशकः ।**
**नारायणसुते श्रीमच्छङ्करे लोकशङ्करे ।।४.११**

असा शङ्कराजी नारायण यांचा गौरवपूर्वक उल्लेख केलेला आहे. कवीन्द्र परमानन्दाचा धाकटा मुलगा देवदत्त हा राजारामपत्नी राणी ताराबाई व दुसरा शिवाजी छत्रपति यांचा आश्रित असून तो शक १६४२ पर्यंत जिवंत असल्याचा उल्लेख सापडतो. त्याने कांही साहित्यरचना केली आहे.

**श्रीदेवदत्तसुत अद्‌भुत वैभवाचा । जो भक्तराज अभयंकर शंकराचा ।**

या श्लोकार्धांतहि वरील शब्दप्रयोगाची छाया मराठी पेहरावांत आपणाला दिसते. (कृ. ना. देशपांडे-सरदेसाई स्मारक ग्रंथ)

देवदत्ताचा मुलगा व कवींद्र परमानन्दाचा कवींद्र उपनाम असलेला नातू गोविंद याने शाहूमहाराज यांच्या जन्मासंबंधी 'अंशावतरण' नांवाचें लिहिलेलें काव्य प्रस्तुत पुस्तकांतच छापलेलें आहे. त्या काव्यांतहि दोन वेळां या प्रयोगाचा उपयोग केला आहे.

पूजयन् शङ्करं नित्यं सर्वलोकैकशङ्करम् ।।४.६.३

आणि तथैव शिवराजोऽपि सर्वलोकशिवङ्करः ।।४.७.१३

वरील विवेचनाचा हेतु एवढाच की शम्भुराज्याभिषेक हें काव्य, सरदेसाई, जदुनाथ सरकार किंवा कृ. ना. देशपांडे समजतात त्याप्रमाणे कवीन्द्र परमानन्दाचेंच असतें तर शिवभारताच्या दोन-सव्वादोन हजार ग्रंथसंख्येच्या साहित्यप्रपंचांत हा प्रयोग केव्हा तरी योजला जावयाला पाहिजे होता. परंतु आमच्या माहितीप्रमाणे शिवभारतांत या प्रयोगाचा उपयोग झालेला नाही. 'क्व सूर्यप्रभावो वंशः क्व चाल्पविषयामतिः' या कालिदासाच्या आकर्षक व परिणामकारक वाक्यरचनाप्रयोगाचा संस्कृत भाषेच्या पश्चात्सूरीनी वापर केला. तसाच या प्रयोगाचा इतिहास असावा. परंतु देवदत्ताचा पिता, गोविंदाचा आजा व केशवपंडिताचा पूर्वसूरि असलेल्या कवीन्द्र परमानन्दाकडे या प्रयोगाचें जनकत्व नाही, एवढें खास. यावरून प्रस्तुत पद्याचा कर्ता परमानन्द असूं शकत नाही असें अनुमान काढण्यास हरकत नसावी.

**दोन्ही ग्रंथांचा लेखनकाल :** परमानन्दाचें आज उपलब्ध असलेलें शिवभारत शके १५९६ च्या अगोदर लिहिलेलें असलें पाहिजे, असें वाटतें. कारण आरंभीच कवींद्राने सांगितलें आहे की चरितविषय असलेला 'राजा राजगिरीश्वरः' (१-११) आहे. त्याची राजधानी रायगिरी, रायरी किंवा रायगड नसून ती राजगड आहे. या महनीय कथेत शिवराजांना राज्याभिषेक झाल्याचा उल्लेख नाही. एवढेंच नव्हे तर 'छत्रपति' असा शब्द काव्यांत कोठेहि वापरलेला नाहीं. वस्तुतः ग्रंथ शक १५८३ पर्यंतच्या घटना वर्णन करीत असतांना संपलेला आहे. राज्याभिषेक शक १५९६ च्या ज्येष्ठांत सुरू झाला.

दुसरें असें की परमानन्दाच्या शिवभारतांत 'रायगड हा शब्द मुळीच आलेला नाही. श्रीशिवराज हे केवळ 'राजगिरीश्वरः' (१-११) होते. शक १५९० च्या फाल्गुन पौर्णिमेस राजारामाचा जन्महि राजगडावरच झाला. याचा अर्थ असा की, शक १५९० अखेरपर्यंत राजधानी राजगडावर होती. सर्व राजघराणेंहि तेथे होते. शक १५९२च्या भाद्रपदांत श्रीशिवराज मोगलाच्या मुलुखावर स्वारी करण्यासाठी रायगडावरून निघून जुन्नरावर चालून गेले होते. म्हणजे रायगड ही राजधानी शक १५९२च्या ग्रीष्म ऋतूनंतर झालेली असावी. रायरीगडाच्या बांधणीचा काल शक १५९३चा आहे असें उपलब्ध पत्रावरून दिसून येतें (पत्रसारसंग्रह-१९५९)

पर्णालपर्वतग्रहणाख्यानकर्ता जयराम कवि श्रीशिवराजांना राजगडावर जाऊन भेटला व तो श्रीशिवराजाकडे तीन वर्षे होता हें

इतो राजगडं गत्वा गृहीतं राजदर्शनम् ।।१.२८

आणि वर्षत्रयमितो गत्वा भवद्भिर्यदनुष्ठितम् ।।१.२६

या उल्लेखांवरून दिसून येते. जयराम कवीने शक १५९४ पर्यंतच्या घटना वर्णिल्या आहेत.

यावरून शिवभारतलेखनाचा काल राज्याभिषेकपूर्व आणि रायगड राजधानी होण्याच्या अगोदर म्हणजे शक १५९३ च्या पूर्वीचा आहे, असें निश्चयाने म्हणावें लागतें.

याला उपोद्बलक असा इतर पुरावाहि मिळतो. पोलादपूर गांवीं कवींद्र राहात होता. त्याच्या सहवासांत १५ कवि होते. त्यांनी गायिलेलीं स्वतःचीं यशोगीते श्रीशिवराजांनी ऐकलीं. कवीन्द्र परमानन्दाला एकटेच पुढे जाऊन त्यानें वंदन केले व पूर्णसाम्राज्यदायी आशीर्वाद संपादन केला, अशी माहिती जयराम पिंड्ये या शाहाजी महाराजाच्या पदरी असलेल्या व तीन वर्षे श्रीशिवराजाच्या



सहवासांत राहिलेल्या महाकवीने आपल्या पर्णालपर्वतग्रहणाख्यान या छोट्याशा ग्रंथांत दिली आहे. (अध्याय ४.१६-१९). परंतु डॉ. जदुनाथ सरकारांच्या मतें हीं गायिली गेलेली किरकोळ स्तुतिपर कवनें होती. शिवभारत नव्हतें. सरकारांना असें कां व कोणत्या आधारावर वाटलें हें कळण्यास मार्ग नाही. परंतु वरील वस्तुस्थितीवरून कवींद्र परमानंदाने शिवभारतांतील कांही भाग महाराजांना ऐकविला असावा, असें सकारण अनुमान काढतां येतें. राज्याभिषेकाच्या वेळीं परमानन्दाला ही कामगिरी सांगितली असें डॉ. सरकारांचें म्हणणें आहे. परंतु वरील वस्तुस्थिति समोर असतां, असें समजण्याचें मुळींच कारण नाही ग्रन्थनिर्मितीचें हें काम राज्याभिषेकाच्या पूर्वी निदान अंशतः केलें गेलें होते असें दिसतें. (पाहा म. म. पोतदार-ऐ. सं. निबंध खं. ४था.)

शम्भुराज्याभिषेक-काव्य शम्भुराजाचा राज्याभिषेक होईपर्यंतच्या घटना देतें. शम्भुराजाच्या वधाचा किंवा राजारामाच्या जिंजीप्रयाणाचा उल्लेख करीत नाही. ग्रंथ संपविला तेव्हा शम्भुराजा छत्रपति होता. म्हणजे हा काल फाल्गुन शक १६१० च्या पूर्वीचा आहे. यावरून दिसून येईल कीं शिवभारत व शम्भुराज्याभिषेक या ग्रन्थांच्या लेखनकालांत पंधरा-वीस वर्षांचें अंतर आहे.

**पुरोहितवृत्तीचा प्रादुर्भाव :** ग्रन्थांत आणखी एक लक्षणीय विशेष दिसून येतो. शिवराजाच्या मृत्यूनंतर शम्भुराजांनी सर्व स्थिरस्थावर केल्यानंतर कविकलश हा मुख्य प्रधान नेमिला. तो तांत्रिक पंथाचा होता. या कालांत राजदरबारी जपजाप्य, पूजा-अर्चा, ब्राह्मणास दानधर्म यांचा विशेष प्रसार झाल्याचें दिसून येतें. प्रस्तुत शम्भुराज्याभिषेक ग्रंथांत या गोष्टीचें भरपूर प्रत्यंतर मिळतें. वेळीं अवेळीं ब्राह्मणांना दक्षिणा देण्याचें प्रस्थ पुष्कळ माजलेलें होतें असें दिसतें.

डॉ. सरकार व डॉ. सरदेसाई यांनीं म्हटल्याप्रमाणे प्रस्तुत काव्यकर्त्याची कवित्वशक्ति दुबळी असल्याचें सर्वत्र निदर्शनास येतें. कालिदासादि महाकवींनी आनंदव्यक्तीकरितां अवलंबिलेल्या मार्गाचा अवलंब परमानन्दाने ठायीं ठायीं केलेला आहे. त्याच्या उलट अवस्था प्रस्तुत काव्यांत दिसते. तो आनंदव्यक्तीसाठी दक्षिणाच देत सुटतो. शम्भुराजा दिलेरखानाकडे जाऊन शिवराजनिधनोत्तर सत्ता हातीं घेईपर्यंतचा काळ सोडून, या काव्यांत ८ वेळां ब्राह्मणांना भरपूर द्रव्यदान केल्याचीं वर्णनें आलीं आहेत. (१.६; ३.२९; ४.४१ ते ४५; ८.९, ७२, ९५, ९६; व १०.५०)

हीच प्रथा केशवपंडिताने लिहिलेल्या राजारामचरितांतसुद्धा दिसून येते. परमानन्दाचा नातू गोविंदाने लिहिलेल्या शाहूजन्माच्या अंशावतरणांतहि याची रेलचेल आहे. एवंच शिवराजनिधनोत्तर व परमानन्दाच्यानंतर ही प्रवृत्ति प्रादुर्भूत झाली असें दिसून येतें.

कवीन्द्र परमानन्द अशा प्रकारच्या प्रवृत्तींपासून अलिप्त होता. म्हणून अशा प्रकारचें पुरोहितवृत्तीचें द्योतक काव्य त्याच्या हातून लिहिलें जाणें शक्य नाही असें निश्चित अनुमान काढण्यास हरकत नाहीं.

शिवभारत काव्यांत ब्राह्मणांना दक्षिणा देण्याचे प्रसंग नाहीत. अत्यंत आनंदाच्या प्रसंगीं देखील दक्षिणा दिल्याचें वर्णन सापडत नाही. शाहराजाच्या जन्माचें वर्णन-

जाते राजकुमारेऽस्मिन् कुमारसमतेजसि
नेदुमङ्गलवाद्यानि ननृतुवारयोषितः ।।१.८१।।
अमोघाभिस्तथाशीर्भिरभ्यनन्दन् द्विजोत्तमाः
गृहे गृहे विशेषेण ववृधे स महोत्सवः ।।८३।।

असें केलें आहे. शिवराजाच्या जन्मवर्णनावर कवीने एक संपूर्ण अध्याय खर्ची घातलेला आहे. जिजूमातेचे डोहाळे वर्णन केलेले आहेत. बाळंतिणीच्या खोलीची व्यवस्था वर्णिली आहे. जन्म झाल्यावर–

**तदा मुदा मानुषाणां सुराणां च सहस्रशः ।**
**समं दुन्दुभयस्तस्य नादेन नदतोऽभवन् ।।६.३२**
**वादित्राण्यप्यवाद्यन्त विविधानि गृहे गृहे ।**
**प्रसीदन्ति स्म हरितः समस्ताः सरितस्तथा ।।३३**

सर्व देवांनी बालाचें स्वस्तिवाचन केलें. सर्व नद्या बाळाला अभिषेक करण्यासाठी सोत्सव आल्या. १० कुलस्त्रियांनी बाळबाळंतिणीस न्हाऊं घातलें. दैवविद् व सिद्धान्तपारंगतांनी सभेंत मुलाचें जातक वर्तविलें. या आनन्दोत्सववर्णनाच्या भरांत कवीने अप्रतिम असें

**तेजोभरेण महता निशाऽपि दिवसायिता ।।६.४१**

मुलाच्या तेजस्वितेचें कालिदासाची आठवण करून देणारें (रघुवंश सर्ग ३) वर्णन केलें आहे. इतर ठिकाणींहि आनंद व उत्सवप्रसंगीं निसर्गातील सूर्य, वायु, नद्या इत्यादि वस्तूंचा उपयोग केलेला दिसतो.

अफझुलवधानंतर :

**विध्वस्तेऽफजले बलिन्यपि बलेनैतेन भूमीभृता ।**
**वाति स्मातिहिमः प्रभूतकुसुमामोदी मृदुर्मारुतः**
**नद्यश्चापि सुधावदातसलिलाः सद्यः स्थिरा सुस्थिरा**
**स्वं स्वं स्थानमवाप्य निर्वृतहृदः सर्वेऽप्यभूवन्सुराः ।।२१.८५**

ही आनंदव्यक्ति हृद्य आहे.

आनंद व संतोष यांच्या अभिव्यक्तीसाठी दक्षिणा देण्याची वृत्ति परमानन्दाला चिकटली नव्हती असें दिसतें. केवळ एकदाच शिवराजांनी ब्राह्मणांना दक्षिणा दिल्याचा उल्लेख आढळतो. सूर्यराज दळवी व जसवंतराज यांचा शृंगारपुरात पाडाव करून श्रीशिवराज परशुराम क्षेत्रीं देवदर्शनास गेले. 'क्षिप्रदत्तेन वित्तेन विप्रवृंदमनन्दयत् । २९.७८ म्हणून त्यांचें दानशौंड असें वर्णन कवीने केलें आहे.

आणखी एका मुद्द्याचा विचार करून हा विषय संपवूं. परमानन्दाने आपल्या ग्रन्थांत संस्कृत शिष्टसंमत शब्द वापरण्याचा सर्वत्र प्रयत्न केलेला आहे. याला बाध येऊं दिलेला नाही. मराठी किंवा क्वचित् प्रसंगीं यावनी शब्दावर गीर्वाण भाषेचे संस्कार करून ते शब्द वापरलेले आहेत. विशेष लक्षणीय गोष्ट ही की एकदा ज्या वेषांत शब्द वापरला तो त्यानंतर तसाच वापरलेला आढळून येतो. याच्या उलट शम्भुराज्याभिषेककर्त्याने असा विवेक व अशी स्थिरबुद्धि व सूक्ष्मता दाखविलेली नाही. शम्भुराज्याभिषेकांत 'मोगल' (८.८०) 'मुल्लाण' 'पीरजाद' (८-८१) भूपालदिगडाः (१२-९५) व मयुरादिप्रभृति (१२-७७) 'कसायिन' (८-८१) 'वलन्देज' (८-८२) 'काटक' (८-८३) 'वैराड', 'कन्हाड' 'विजापुरीय' (८-८६) असे शब्द वापरलेले आहेत. रायगडकरिता एकच शब्द तीन रीतीने वापरला आहे. उदाहरणार्थ 'रायगिरी' (५-३०) 'रैगिरी' (१.८, ८.२) 'रैङ्गिरि' (३.१०;३.३०.४.५,७.८८) 'रैघर' (३.१२) व 'रैङ्गमहीधर' (४.७). परमानंदाने मोगलासाठी 'ताम्र' (२६.४५) 'ताम्रानन'(२६.४४) 'ताम्रवक्त्र' (१७.२२) वगैरे, वैराड किंवा वाईसाठी 'वैराट' (२३.९,२० व १७.७६) कन्हाडसाठी 'करहाट' (२३.५९) विजापूरसाठी 'विजयाह्वपत्तन' (१.६१)



'विजयपुर' (१४.१०६) इत्यादि, आणि विजापूरकर किंवा 'विजापुरीय' यासाठी सातत्याने 'येदिल' असे शब्द वापरलेले आहेत.

शम्भुराज्याभिषेक काव्य गडबडींत लिहिलें व त्याच्यावर शेवटचा परिपूर्णतेचा हात कवीला फिरवितां आला नाही असें मानलें तरी वरील शब्दयोजनेच्या बाबतींत कवीला झालेली घाई त्यास कांही संरक्षण देऊं शकत नाहीं. ही कवीची विशिष्ट शैली असून त्या शब्दयोजनेवरून कवीच्या विद्वत्तेची बैठक व त्याची मनोभूमि स्पष्ट होते.

वरील विवेचनावरून सरदेसाईसंपादित तथाकथित परमानंद काव्याचें जनकत्व शिवभारतकार कवींद्र परमानंदाकडे जाऊ शकत नाही, असें म्हणावयास इतिहासज्ञांची हरकत नसावी.

प्रस्तुत विषयाच्या दृष्टीने परमानन्दाचा शिवभारतांतील ऐतिहासिक खरेपणा पडताळून पाहण्याचें हें स्थान नव्हे. पण असें सांगावेसे वाटतें कीं, यदुनाथ सरकार व सरदेसाई यांनी परमानंदाकडे अनध्ययनामुळें किंवा अन्य कारणाने दुर्लक्ष केलेलें आहे. तीच अवस्था श्री. वाकसकर आदींची आहे. शिवकालीन व तदुत्तर झालेली बरींचशीं संस्कृत काव्यें ऐतिहासिक दृष्ट्या निरुपयोगी व पुरोहितवृत्तींचीं निदर्शक आहेत, या श्री. यदुनाथ सरकारांच्या मताची नोंद घेऊनहि असें साग्रह म्हणावेसें वाटतें कीं अशा इतर काव्यांत शिवभारताची गणना त्यांनी करावयास नको होती. हें मत त्यांच्या शिवभारताच्या अनध्ययनांतून निर्माण झालेलें आहे असें वाटतें. शम्भुराज्याभिषेक, शिवराज्याभिषेककल्पतरु किंवा अंशावतरण ही काव्यें डॉ. सरकार म्हणतात त्याप्रमाणे खरोखरच त्या वर्गांतील आहेत. पण केशवपंडितकृत राजारामचरित, जयरामकविकृत पर्णालपर्वतग्रहणाख्यान व परमानंदकृत शिवभारत यांना त्या वर्गांत समाविष्ट करितांना, कोणालाहि अधिक विचार करावा लागेल. परंतु ही आगळीक डॉ. सरकार यांच्यासारख्यांकडून घडलेली असल्यामुळे तिकडे दुर्लक्ष होता कामा नये. त्यामुळे इतिहासप्रेमी विद्वानांनी परमानंदावर अन्याय करण्यास हातभार लावला असें होईल.

(मराठवाडा विद्यापीठ पत्रिका, खण्ड २, फेब्रुवारी १९६२)

* * *

# काही वैशिष्ट्यपूर्ण शब्दांची सूची

## (Index of Some Interesting Words)

- अगदङ्कार – वैद्य, रोगचिकित्सक
- अञ्जसा – सत्य, सरळपणाने, सत्य
- अजिरक – न्यायालय
- अणु – अतिसूक्ष्म कण, शंकराचे एक नाव
- अन्त्र – आतडे, अपरिहार्य
- अथो, अथ – आता
- अदभ्र – खूपच, पुष्कळ
- अनलीक – सत्य, खरे
- अनीकिनी – सेना, लष्कर
- अनुसार – उपयोग, अधिकार
- अनूचानः – वेदाभ्यासनिपुण
- अनेहसि – वेळेवर
- अनोकह – झाड, वृक्ष
- अन्तरीप – बेट
- अन्वय,अन्ववाय – कुटुंब, वंश
- अपवर्ग, मोक्ष – मोक्ष
- अभिचार – बद्कर्म करण्यासाठी नेमलेला जादूगार
- अभीक – कामुक
- अभ्यर्णा – जवळ
- अभ्यासजुप – जवळ उभे
- अरम् – ताबडतोब
- अराल,अरालिता – भुवया
- अराली – ओबडधोबड प्रदेश
- अलीक – खोटे
- अवदात – शुद्ध
- अंहस् – पाप
- आखण्डल – इंद्र
- आतङ्क – रोग, व्याधी
- आतोद्य – वाद्य
- आहोपुरुषिका – आश्चर्य
- इंद्रद्युम्न – इंद्राची शक्ती असलेला
- इभ्य – राजा
- उत्क, उत्कण्ठित – आसुसलेला
- उदर्क – अतिशय बळकट, भावी
- उद्ग्राह – वर उचलणे
- उद्धुर – घट्ट, जड
- उपकण्ठ – नजीक
- उपजाप – कुजबुजणे, विश्वासघात
- उपधि – अपहार, अप्रामाणिकपणा
- उपव्हर – अंतःपूर
- उररीकृत्य – मान्य करून, स्वीकारून
- उररीचक्रे – संमती दिली
- ऊर्ध्वरेतस् – ब्रह्मचारी
- उलूखल – उखळ
- कच्छुपी – कासवाची मादी
- कटाह – कढई
- कण्ठीरव – सिंह
- कपाट – दरवाजा
- कम्र, कमन – नाजूक, प्रिय
- करपत्र – करवत
- करिघटा – हत्तीचा समुदाय
- कर्बुर, कर्बूर – भूत
- काञ्ची – कंबरपट्टा
- कार्मणा – जादू
- किकिदिविः – चाष नावाचा पक्षी
- कीर – पोपट
- कुड्य – मुलामा दिलेली भिंत
- कुहक – जादूगार, फसव्या
- कृत्या – चेटकीण
- कोटिर, कोटीर – डोक्यावरील केस
- कोटीर – आंबाडा
- कौकुटिक – ढोंगी, कोंबड्यासारखा आवाज करणारा
- क्रव्य – कच्चे मांस
- खड्गपरशु – शिवाचे एक नाव
- खर्व – लहान, बुटका



- गान्धर्वविद्या – संगीतशास्त्र
- गार्ह – घरासंबंधी
- गुल्फ – पायाचा घोटा
- गोधिका – पाल
- चञ्चरीक – काळी माशी
- चन्दिर – चंद्र
- जग्धि – खाणे
- जग्ध्यर्थम् – खाण्यासाठी
- जैत्रयात्राः – विजययात्रा
- जोष – सौख्य, आनंद
- तनुत्र – चिलखत
- तर्षुल – तहानलेला
- ताटङ्क – कर्णभूषण
- ताटङ्कयुगल – कर्णभूषणाची जोडी
- तिग्म – अत्यंत तीक्ष्ण
- तुहिन – थंड, बर्फ
- दतान्धाम – तोंड
- दम्भोलि – इंद्राचे वज्र
- दस्र,अश्विनीकुमार – अश्विनीकुमार
- दुरासद् – पकडण्यास कठीण
- दोग्ध्री – निष्काम केलेले काम
- द्युम्न – वैभव
- द्युसद – ग्रह
- द्विरदन – गज, हत्ती
- धिष्ण्यः – होमाचे ठिकाण, होमकुंड
- ध्वजिन् – मद्य विक्रेता
- नक्तक – धूळ पुसण्याचा रुमाल
- नाथ् – विचारणे, विनंती करणे
- नासीर – अग्रभागी असलेला पहारेकरी
- निकुर,निकुरम्बक – कळप
- निघ्रता – समाधान देणारा, मदत
- निर्ऋति – संकट
- निर्वेद – तिटकारा, घृणास्पंद
- निशीथिनी – निशा, रात्र
- नीवृत् – वस्ती झालेला देश
- पण्डा – विद्या
- परिबर्ह – मोठ्या माणसांचे नोकर
- परिवृढ – मालक, धनी
- परिष्यन्द – दागिने, अलंकार
- पल्याण – खोगीर
- पाञ्चालिकाः – पांचाल देशाची
- पाथोधि,पाथोदधि – महासागर
- पार्ष्णि – सैन्याची पिछाडी
- पांसुल – पापी
- पिचिण्डिल – लठ्ठ, स्थूल
- पुण्डरीक – कपाळावरील चिन्ह (गंध) नाम
- पृथुक – मूल, बाळ
- प्रचेतस् – वरुणदेव, जलदेवता
- प्रणयप्रह्व – आज्ञापालनासाठी नम्र असलेला
- प्रतिप्रप – प्रत्येक वसंत ऋतूत
- प्रत – दिलेले
- प्रत्यूह – अडथळा, आड येणारी गोष्ट
- प्रधन – युद्ध
- प्रपदः – पावलाचा समोरचा भाग
- प्रपा – जलस्थान, पाणपोई
- प्रमथ – शंकराचा अनुयायी
- प्रव्ह – दुसऱ्यापुढे नम्र राहणारा
- प्रश्रय – आदर, सभ्यता, शिष्टाचार
- प्रश्री – नाजूक व्यक्ती, तुलनेमध्ये कमी पडेल असा (बुटका)
- प्रसमरः – पुढे जाणारा
- प्रस्थ – पठार
- प्रेङ्खत् – दोलायमान
- प्रेष्यता – दास्य
- फेरु – लबाड, कोल्ह्याच्या जातीचा
- बन्धुजीव – एक प्रकारचे फूल
- ब्रह्मण्य – ब्राह्मणयोग्य, द्विजयोग्य
- भङ्गी – तरंग, लाटा
- भणिति – व्याख्यान, भाषण
- भिदुर – नाजूक, सहज मोडणारा, भंगुर
- भृगु – उंच पहाडावरील कडा
- भृगुपात – उभ्या कड्यावरून पडणे

| शब्द | अर्थ |
|---|---|
| भृगूद्वह | परशुराम, भृगूचा वंशज |
| भौरिक | ब्राह्मण |
| मकरालय | महासागर |
| मङ्क्षु | ताबडतोब, लगेच |
| मञ्जु | प्रिय, मोहक |
| मञ्जीर | पैंजण, पायात घालण्याचा दागिना |
| मन्तुमान् | गुन्हेगार |
| माथुर | मथुरेहून आलेला, मथुरावासी |
| माय | हातचलाखीचे प्रयोग करणारा, जादूगार |
| मायूर | मोरासारखा |
| मार्दङ्गिक | मृंदगवादक |
| माहेयी | गाय |
| मुकुर | आरसा, कळी |
| मृध् | ओलसर करणे |
| मृध | युद्ध |
| मुदिर | ढग, बेडूक |
| मेदुर | पूर्ण आच्छादित |
| मेल | भेट |
| यामिक | रात्रीचा पहारेकरी |
| यायजूक | याजक, यज्ञकर्ता |
| राजपटली | अनेक राजे, राजसमूह |
| रात्रिञ्चर | राक्षस, भूत (निशाचर) |
| रावण | रडणारा, विव्हळणारा |
| रैङ्गिरि | रायगड |
| लल् | क्रीडा करणे, खेळणे |
| वञ्जुल | बासरी, वेणू, बांबू |
| वधूटी | तरुण स्त्री, तरुणी |
| वर्ष्म | शरीर, काया |
| वाणि | विणकर |
| विजम् | बाण |
| विदूरग्राव | एका विशिष्ट पर्वतावरील दगड, पोवळे |
| विष्टप | प्रदेश |
| विष्टि | भाड्याने लावलेला मजूर |
| वृजिनात्मा | दुष्ट वृत्तीचा |
| वेतण्डी | हत्तीवर स्वार झालेला, माहूत |
| वैणिक | वीणावादक |
| वैमात्रेय | सावत्र भाऊ |
| वैयात्य | उद्धटपणा |
| व्यत्यास | विरोध, विपरीत गोष्ट |
| व्रततिका | लता, वेल |
| शमल | पाप, अशुद्धता |
| शमला | अशुद्ध, पापी |
| शावक, शावकर | शवासंबंधी, प्रेतासंबंधी |
| शेमुषी | बुद्धिमान |
| षण्ढ | नपुंसक |
| सङ्कथा | संभाषण, संवाद |
| सप्तसप्ति | सप्ताश्व, सूर्य |
| सभास्तार | दरबारी, सभा-सदस्य |
| सरीसृप | साप |
| सर्पिस् | तूप |
| साद | अशक्तपणा, कळ |
| सामि | अपूर्ण |
| सुनासीरः | इंद्रदेव |
| सुपर्वन् | ईश्वर |
| सुषमा | आत्यंतिक सौंदर्य |
| सौषुप्तिक | झोपाळू |
| स्पश | हेर |
| स्वनि | ध्वनी, आवाज. |

* * *



# स्थल व नाम सूची

* * *



## संपादक परिचय


**डॉ. सदाशिव सखाराम शिवदे**

'वैष्णतेज', सुंदरबन सोसायटी, नवी पेठ पुणे-४११०३०

शिक्षण : पशुवैद्यक पदविका (D.Vet.), एम.ए.(मराठी), एम.ए.(इतिहास), पीएच.डी.(इतिहास/संस्कृत)

Fellow of United Writers Association.

फोन नं. : ०२०-२४५३४२२१


**ग्रंथलेखन :** १. ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा (संशोधनात्मक ग्रंथ), २. महाराज्ञी येसूबाई (संशोधनात्मक ग्रंथ), ३. रणरागिणी ताराराणी (संशोधनात्मक ग्रंथ), ४. दर्याराज कान्होजी आंग्रे (संशोधनात्मक ग्रंथ), ५. सेनापती हंबीरराव मोहिते (संशोधनात्मक ग्रंथ), ६. माझी गुरं; माझी माणसं (ग्रामीण कथासंग्रह), ७. शिवपत्नी सईबाई (ऐतिहासिक कांदबरी), ८. सेनापती प्रतापराव गुजर (संशोधनात्मक ग्रंथ), ९. छ. राजाराम महाराणी ताराराणी, १०. मराठ्यांचे लष्करी प्रशासन (अनुवाद), ११. परमानन्दकाव्यम् (अनुवाद), १२. श्रीप्रतापदुर्गामाहात्म्यम् , १३. मराठ्यांच्या इतिहासाची संस्कृत साधने.

**पुरस्कार :** ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा या ग्रंथास महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ऐतिहासिक चरित्र ग्रंथ १. 'महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार पुरस्कार', २. 'रा. ना. नातू पुरस्कार', ३. महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था पुणे यांचा संदर्भ ग्रंथ 'शारंगपाणी पुरस्कार', ४. महाराज्ञी येसूबाई या ग्रंथास 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था पुरस्कार', ५. पुणे महानगरपालिका 'गौरव पदक' (उत्कृष्ट ऐतिहासिक ग्रंथनिर्मिती), ६. कै. मणीभाई देसाई प्रतिष्ठानचा 'राष्ट्रीय सेवा पुरस्कार', ७. संभाजी स्मृती समितीचा 'श्रीशंभूसेवा पुरस्कार', ८. सुखकर्ता सांस्कृतिक प्रतिष्ठानचा 'सुखकर्ता पुरस्कार व मानपत्र', ९. पर्वती पुण्यभूषण पुरस्कार, १०. श्रमशक्ति देशव्यापी पुरस्कार मुंबई, ११. दर्याराज कान्होजी आंग्रे ग्रंथास 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था पुरस्कार', १२. संगमनेर इतिहास संशोधक मंडळाचा कवी अनंत फंदी पुरस्कार २००८, १३. महर्षि वेदव्यास प्रतिष्ठानचे गौरव पत्र व पुरस्कार.

**शोधनिबंध :** १. अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या अधिवेशनात व भारत इतिहास संशोधक मंडळात शोधनिबंध वाचन व प्रसिद्धी, २. आंतरराष्ट्रीय इतिहास परिषदेत शोधनिबंध, ३. अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेचे शोधनिबंध संपादक संचालक.

**व्याख्याने :** छ. संभाजी, महाराणी येसूबाई, शिवपत्नी सईबाई या विषयांवर महाविद्यालये, सार्वजनिक संस्थांमधून व्याख्याने.

**संस्था सहभाग :** १. अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद - उपकार्यवाह, २. जनसेवा फौंडेशन, पुणे - कार्यकारिणी सदस्य, ३. भारत इतिहास संशोधक मंडळ - ग्रंथालय सदस्य, ४. महाराष्ट्र साहित्य परिषद - आजीव सदस्य सहकार्यवाह, ५. महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था - आजीव सदस्य, ६. मरिमाता देवस्थान ट्रस्ट मोडवे - विश्वस्त, ७. धन्वंतरी ट्रस्ट, लोणंद - विश्वस्त, ८. लायन्स क्लब, औंध-पाषाण - सदस्य.

'परमानन्दकाव्यम्' या ग्रंथाचे मूळ नांव 'अनुपुराण' असे आहे. शिवसमकालीन प्रख्यात शिवचरित्रकार परमानंद गोविंद नेवासकर यांच्या देवदत्त या पुत्राने व गोविंद या नातवाने प्रस्तुत काव्य संस्कृतमध्ये लिहिले. ते डॉ. गो. स. सरदेसाई व डॉ. जदुनाथ सरकार यांनी इ.स. १९५२ मध्ये प्रकाशित केले. आज हेच काव्य व त्याचे मराठी भाषांतर प्रकाशित करण्याचा योग येत आहे. डॉ. सदाशिव शिवदे यांनी हे संपादित केले असून डॉ. स. मो. अयाचित यांनी त्याचे मराठीत भाषांतर केले आहे. प्रस्तुत आवृत्तीमुळे व मराठी भाषांतरामुळे अभ्यासकांची खूपच सोयसुविधा झाली आहे. या ग्रंथावरील अभ्यासपूर्वक भाष्ये प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, संशोधक य. ग. फफे, इतिहासपंडित देवीसिंह चौहान आणि डॉ. सदाशिव शिवदे यांनी केलेली आहेत. त्यांचाही समावेश प्रस्तुत आवृत्तीत आहे. अट्ठावन्न वर्षांच्या कालावधीनंतर हा ग्रंथ पुन्हा प्रकाशित होत आहे. श्रीशिवशंभु छत्रपती यांच्या इतिहासासाठी हा साधनग्रंथ उपयोगी आहे.

धियोयोनः प्रचोदयात्

विश्वामित्र प्रकाशन, पुणे